भारत-गौरव-ग्रंथमाला-पुष्प ९८ वें.

# श्रीमन्महाभारतार्थ

( महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर )



## पंचम खंड.

विराटपर्व, अध्याय ४१-७२. उद्योगपर्व अ० १-१३३.



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भ. गी. अ. ४, ३८.

लेखकः—

आचार्यभक्त विष्णु वामन बापटशास्त्री,

संस्थापक, आचार्यकुल, पुणें.

पृ. १७५.

एको धर्मः परं श्रेयः क्षमैका शान्तिरुत्तमा । विद्यैका परमा तृप्तिरहिंसैका सुखावहा ॥
आचारः फलते धर्ममाचारः फलते धनम् । आचाराच्छ्रियमाप्नोति आचारो हन्त्य-
लक्षणम् ॥ पृ. ४३४.

शके १८५३ ] किंमत ~~साडे तीन~~ रुपये. [ सन १९३१

# विषयानुक्रमणिका.



## ४ विराटपर्व.

### गोहरणपर्व ४. पृ. १–७५.

## वैवाहिकपर्व ५. पृ. ७६–८३.



---

# ५ उद्योगपर्व.

## सेनोद्योगपर्व १. पृ. ८७–१२८.

---

## संजययानपर्व २. पृ. १२९–१६८.

---

## प्रजागरपर्व ३. पृ. १३९–२२९.

---

## **सनत्सुजातपर्व** ४. पृ. २३०–२७८.

---

## यानसंधिपर्व ५. पृ. २७८–३४०.

---

## भगवद्यानपर्व ६. पृ. ३४१–४८०

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर )



### पञ्चम खंड



## ४ विराटपर्व–( पुढें चालू )



## गोहरणपर्व ४.



### अध्याय ४१ वा.

[ १ वृक्षावरील शवाची शंका घेणाऱ्या उत्तराचें समाधान व गांडीव धनुष्याचें दर्शन. ]

(१) **वैशंपायन**—बृहन्नलेचें हें भाषण ऐकून तो स्वभावतःच भीरु असलेला राजपुत्र वृक्षावर चढण्याचें टाळण्यासाठीं म्हणाला—" हे बृहन्नले, या शमी वृक्षावर कोणीं तरी एक शव बांधून ठेविलें आहे, असें आम्हीं ऐकिलें होतें. तेव्हां मी राजपुत्र असून याला आपल्या हातानें स्पर्श कसा करूं? माझ्यासारख्या क्षत्रिय कुलांत जन्मलेल्या मंत्र-यज्ञवेत्त्या थोर राजपुत्रानें अशाप्रकारें शवाला स्पर्श करणें युक्त नाहीं. हे बृहन्नले, युद्धामध्यें ऐन्द्रादि मंत्रांच्या जपाचा मला अधिकार आहे आणि शवाला स्पर्श केला असतां त्रिरात्र अशौच सांगितलें आहे, तेव्हां मी असलें कर्म कसें करूं! व तूं तरी मला असलें निंद्य कर्म करावयास सांगून अव्यवहार्य भाषण कसें करीत आहेस?"

बृहन्नला—हे नृपात्मजा, तूं भिऊं नको, येथें शव नाहीं. हीं धनुष्यें आहेत. तूं व्यवहार्य व पवित्रच रहाशील. तूं मत्स्यराजाच्या कुलांत उत्पन्न झालेला मानी राजपुत्र आहेस. तेव्हां मी तुझ्याकडून निंद्य कर्म कसें करवीन ?

राजा, अर्जुनानें त्याची अशी समजूत घातली असतां तो पराधीन झालेला विराटपुत्र रथांतून उडी मारून मोठ्या अनिच्छेनें शमीवृक्षावर चढला. तेव्हां शत्रुसंहार करणारा धनंजय रथांत उभा राहून त्याला असें सांगूं लागला—"हे क्षत्रिया, वृक्षाच्या अग्रभागीं असलेलीं हीं धनुष्यें सत्वर खालीं आण. आतां विलंब लावूं नको. त्यांचीं वेष्टनें त्वरित सोड पाहूं !"

तेव्हां उत्तरानें तीं विशाल वक्षःस्थलावर शोभणारीं दीर्घ धनुष्यें काढून त्यांवरील पानांचें वेष्टन दूर केलें व त्यांचीं बंधनें सोडिलीं. त्याबरोबर इतर चार धनुष्यांसह गांडीवधनुष्य त्याच्या दृष्टीं पडलें. तीं सूर्यकिरणांसारखीं तेजस्वी धनुष्यें सोडलीं असतां ग्रहांच्या उदयकालीं जशी प्रभा पसरते, तसें दिव्य तेज पसरलें. फूत्कार सोडणाऱ्या नागांप्रमाणें त्या धनुष्यांचें दिव्य रूप पाहून तो विराटपुत्र क्षणभर भयभीत झाला. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. नंतर त्या देदिप्यमान विशाल धनुष्यांना नमस्कार करून व त्यांकडे बोट दाखवून तो अर्जुनाला असें म्हणाला. ४. ४. ४१.

---

## अध्याय ४२ वा.

[ १ धनुष्यांचें दिव्य रूप पाहून विस्मित झालेल्या उत्तराचा स्वरूपवर्णनपूर्वक त्यांच्या स्वामींविषयीं प्रश्न.]

( १ ) उत्तर—बृहन्नले सुवर्णाच्या शंभर चक्रांनीं भूषित झालेलें व देदीप्यमान अग्रांनीं युक्त असलेलें हें उत्तम धनुष्य कोणत्या वीराचें आहे ? सुवर्णाच्या हत्तींनीं पृष्ठभाग चित्रित केलेलें आणि मध्यभाग व पार्श्वभाग रमणीय असलेलें हें दिव्य धनुष्य कोणाचें ? पृष्ठभागावरील शुद्ध सुवर्णाच्या पृथक् पृथक् इंद्रगोप कीटकांच्या आकृतींनीं शोभणारें हें श्रेष्ठ धनुष्य कोणाचें ? सुवर्णाच्या तीन सूर्याकृतींनीं युक्त व अतिशय तेजस्वी असलेलें हें उत्कृष्ट धनुष्य कोणत्या धनुर्धराचें आहे ? सुवर्णयुक्त मिन्याचे पतंग काढलेलें हें रत्नजडित धनुष्य कोणाचें आहे ?

त्याचप्रमाणें हे बृहन्नले, सुवर्णाच्या भात्यांत असलेले, लोमाचा छेद करणारे व रौप्यासारखीं चकचकित अग्रें असलेले हे नाराच बाण कोणाचे! गृध्रांच्या पंखांनीं भूषित असलेले, तीक्ष्ण धारेचे, पिवळ्या रंगाचे हे फार मोठे लोखंडी 'विपाठ'-नांवाचे बाण कोणत्या वीराचे? पांच व्याघ्रांच्या चिह्नांनीं युक्त असलेला, वराहाच्या कर्णासारखा व चित्र-विचित्र दहा बाण धारण करणारा हा कृष्णवर्ण भाता कोणाचा? हे रुधिरप्राशन करणारे दीर्घ, जड, अर्धचंद्राकृति सातशें नाराच बाण कोणाचे? पूर्वभागीं शुकाच्या पंखासारखे नीलवर्ण व उत्तरभागीं सुंदर हेममुखांनीं चित्रित केलेले हे तीक्ष्ण धारेचे बाण कोणत्या वीराचे?

हे बृहन्नले, ज्याच्या पृष्ठभागावर बेडकीचें चित्र काढलें आहे व ज्याला बेडकीसारखेंच मुख आहे असें हें तीक्ष्ण धारेचें, मोठा भार सहन करणारें आणि शत्रूंना भयंकर वाटणारें दिव्य व दीर्घ खड्ग कोणाचें? जें व्याघ्रचर्माच्छादित कोशांत ठेविलें आहे, ज्याची मूठ सुवर्णानें भूषविलेली आहे, ज्याचें पातें सुंदर आहे व ज्याला घुंगुरु लावले आहेत, असें हें दुसरें मोठें खड्ग कोणाचें? सुवर्णाच्या मुठीनें युक्त असलेली ही दिव्य चकचकीत तरवार कोणाची? तशीच ही गोचर्माच्या कोशांत ठेवलेली निर्मल तरवार कोणाची? निषधदेशांतील पांच नखांनीं युक्त असलेल्या अजचर्माच्या कोशांत ठेविलेली व पर्वतांचाहि छेद करणारी ही सुवर्णभूषित तरवार कोणत्या महारथाची आहे? जिचा आकार व स्वरूप प्रमाणांत आहे, अशी आकाशासारखी नीलवर्ण व तेजस्वी आणि तप्त अग्नीसारख्या रसरशीत सुवर्णाच्या कोशांत ठेवलेली ही तरवार कोणत्या श्रेष्ठ वीराची?

हें तीस अंगुलीहून अधिक दीर्घ असलेलें, मोठें, पिवळ्या वर्णाचें, शत्रूला व्रण करणारें व सुवर्णाच्या बिंदूंनीं सुशोभित केलेलें ओतीव खड्ग कोणाचें? सर्पासारखें केवल स्पर्शानें प्राणघात करणारें, शत्रूंच्या देहांचें विदारण करणारें, शत्रूंना भयप्रद असलेलें, फार मोठा भार सहन करणारें, हें दिव्य खड्ग कोणाचें आहे? हीं सर्व महान् आयुधें पाहून मला अतिशय विस्मय वाटत आहे, यास्तव हे बृहन्नले, मीं विचारलेल्या प्रश्नांची मला सविस्तर माहिती सांग. ४. ४. ४२.

## अध्याय ४३ वा.

[ १ अर्जुनानें केलेलें त्या शस्त्रांचें व त्यांच्या स्वामींचें वर्णन. ]

(१) **वैशंपायन**—राजा, उत्तरानें असा प्रश्न केला असतां त्याचा युद्धोत्साह वाढविण्यासाठीं अर्जुन त्यांतील प्रत्येक आयुधाच्या स्वामीचा निर्देश करीत म्हणाला—" हे राजपुत्रा, तूं मला प्रथम ज्या धनुष्याविषयीं विचारिलेंस, तें अर्जुनाचें शत्रुसैन्याचा विध्वंस करणारें लोकप्रसिद्ध गांडीवधनुष्य आहे. अरे वीरा, सुवर्णानें अलंकृत केलेलें, एक लक्ष धनुष्यांच्या तोडीचें, राष्ट्रवर्धन करणारें व सर्व आयुधांतील वरिष्ठ असें हेंच तें पार्थाचें श्रेष्ठ धनुष्य आहे. पार्थानें याच धनुष्यानें रणामध्यें देव व मनुष्य यांना जिंकिलें. देव-दानव या चित्र-विचित्र रंगाच्या गुळगुळित व व्रणरहित धनुष्याचें पूजन दीर्घकाल करीत होते. हें दिव्य धनुष्य एक लक्ष वर्षें ब्रह्मदेवानें धारण केलें, नंतर पांचशें तीन वर्षेंपर्यंत प्रजापतीनें धारण केलें. पंचायशीं वर्षें इंद्रानें, पांचशें वर्षें सोमानें, शंभर वर्षें वरुणानें धारण केलें आणि हे नृपनंदना, धनंजय हें श्रेष्ठ धनुष्य पांसष्ट वर्षें धारण करील. हें दर्शनीय व दिव्य धनुष्य अतुल पराक्रमी पार्थाला वरुणापासून प्राप्त झालें आहे.

हे उत्तरा, हें सुवर्णाची मुष्टि असलेलें विशाल धनुष्य भीमसेनाचें आहे. या सुंदर धनुष्याचा देव आणि मानव मोठा गौरव करितात. याच धनुष्याच्या साह्यानें भीमसेनानें सर्व पूर्व दिशा जिंकिली.

हे विराटपुत्रा, सुवर्णाच्या इंद्रगोपक चित्रांनीं भूषित असलेलें हें रत्नजडित प्रेक्षणीय धनुष्य राजा युधिष्ठिराचें आहे. सुवर्णाच्या सूर्यांनीं चित्रित केलेलें, प्रकाशमान, आपल्या तेजानें प्रज्वलित होणारें हें धनुष्य नकुलाचें आहे. भ्रमरांच्या सोनेरी आकृतींनीं युक्त व मिन्याचें विचित्र काम केलेलें हें धनुष्य माद्रीपुत्र सहदेवाचें आहे.

---

१ या पांसष्ट वर्षांच्या कालाविषयीं टीकाकारांचा मतभेद दिसतो. कोणी म्हणतो अर्जुनाचें या जन्मांतील आयुष्य पांसष्ट वर्षें होतें, म्हणून तोच त्याच्या गांडीवधनुष्यधारणाचा काल येथें सांगितला आहे. नीलकंठ आपल्या टीकेंत 'पार्थानें साडे बत्तीस वर्षें गांडीव धनुष्य धारण केलें,' असें म्हणतो व श्रुति-स्मृतींच्या आधारानें 'एका संवत्सरांत दक्षिणायन व उत्तरायण अशीं दोन वर्षें मानतात,' असें सांगून पांसष्ट संवत्सरांचीं साडे बत्तीस वर्षें होतात. अर्जुनाला खांडवदाहप्रसंगीं अग्नीपासून हें धनुष्य मिळालें. त्यावरून अर्जुनानें हें धनुष्य आतांपर्यंत साडे बत्तीस वर्षें धारण केलें, हेंच म्हणणें अधिक सयुक्तिक दिसतें.

राजपुत्रा, सर्पासारखे प्राणघातक, शीघ्रगामी, युद्धामध्यें आपल्या तेजानें दीप्त होणारे हे अक्षय्य बाण अर्जुनाचे आहेत. शत्रूचा नाश करणारे हे अर्ध-चंद्राकार, दीर्घ व भारी शर भीमसेनाचे आहेत. सुवर्णपुंखयुक्त तीक्ष्ण शरांनीं संपन्न असलेला हा भाता नकुलाचा आहे. तो पीतवर्ण असून पांच व्याघ्र-चिह्नांनीं युक्त आहे. याच्या योगानें त्या वीरानें सर्व पश्चिम दिशा जिंकली. सर्व शत्रूंचा संहार करणाऱ्या भास्कराकार शरांनीं युक्त असलेला व सोनेरी चित्ररचना केलेला हा भाता धीमान् सहदेवाचा आहे. हे पीतवर्ण, जड, सुवर्ण-पृष्ठयुक्त व तीन पर्वें असलेले महाशर राजा युधिष्ठिराचे आहेत.

हे भूमिंजया, ही बेडकीच्या चित्रानें भूषित असलेली शीलिमुख दीर्घ तलवार अर्जुनाची आहे. व्याघ्रचर्माच्या कोशांत असलेली ही भयंकर तरवार भीमसेनाची आहे. ही उत्तम तरवार धर्मात्म्या युधिष्ठिराची आहे. तिची मूठ सोन्याची आहे. ती तीस अंगुलांहून दीर्घ आहे. ज्यावर सुईनें सुंदर भरतकाम केलेलें आहे अशा अजचर्माच्या कोशांत असलेली व युद्धासाठींच ठेवलेली ही विचित्र तरवार नकुलाची आहे व गोचर्माच्या कोशांत असलेलें हें मोठें खड्ग सहदेवाचें आहे. हीं सर्व आयुधें फार मोठा भार सहन करणारीं आहेत, असें तूं समज. ४. ४. ४३.

---

## अध्याय ४४ वा.

[ १ कंकादिकच युधिष्ठिरादि आहेत असें अर्जुनाचें उत्तराला कथन. २ त्याच्या प्रत्ययासाठीं स्वतःच्या दहा नांवांचें निर्वचन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें अर्जुनानें पांडवांच्या श्रेष्ठ आयुधांचें वर्णन केलें असतां विस्मित झालेला उत्तर म्हणाला—" हे बृह-न्नले, ज्या महात्म्या चपल पांडवांचीं हीं सुवर्णालंकृत दर्शनीय आयुधें येथें दिसत आहेत, ते पांडुपुत्र कोठें आहेत ? अर्जुन कोठें बरें आहे ? त्याचप्रमाणें पृथापुत्र युधिष्ठिर, भीमसेन व नकुल-सहदेव हे कोठें आहेत ? ते सर्व शत्रूंचा विनाश करणारे महात्मे वीर द्यूतांत पराभव पावल्यामुळें आपलें राज्य टाकून कोठें निघून गेले आहेत ? त्यांचें नांवहि कोठें ऐकूं येत नाहीं. ते कोठें बरें गेले असतील ? तशीच द्रौपदी कोठें बरें असेल ? ती पांचाली स्त्रीरत्न म्हणून प्रसिद्ध आहे. पांडवांना द्यूतांत जिंकल्यावर ती कृष्णाहि त्यांच्याचबरोबर वनांत गेली होती. "

राजा, उत्तराचे हे प्रश्न ऐकून एका वर्षानें आपल्या प्रिय गांडीव धनुष्याचें दर्शन झाल्यामुळें हर्षातिरेकानें अर्जुनाला आपल्या अज्ञातवासांतील गुप्तवेषाचें स्मरण न राहून तो एकदम म्हणाला—"हे राजपुत्रा, मीच अर्जुन आहें, सभासद कंक युधिष्ठिर, तुझ्या पित्याचा पाक सिद्ध करणारा बल्लव भीमसेन, अश्वपाल नकुल आणि गोपाध्यक्ष ग्रंथिक सहदेव आहे. जिच्यासाठीं कीचकांचा वध झाला, ती सैरंध्री द्रौपदी आहे."

उत्तर—हे वीरा, पूर्वीं मीं पार्थाचीं दहा नांवें ऐकिलीं आहेत. तीं जर तूं मला सांगशील तर तुझ्या या सर्व बोलण्यावर माझा विश्वास बसेल.

( २ ) अर्जुन—ठीक आहे. हे विराटपुत्रा, पूर्वीं तूं जीं माझीं दहा नांवें ऐकिलीं आहेस, तीं सर्व मी तुला सविस्तर सांगतों. एकाग्रचित्तानें लक्षपूर्वक ऐक. अर्जुन, फाल्गुन, जिष्णु, किरीटी, श्वेतवाहन, बीभत्सु, विजय, कृष्ण, सव्य-साची व धनंजय हीं माझीं दहा नांवें आहेत.

राजा, हीं नांवें ऐकून उत्तरानें पुनः प्रश्न केला—"हे पुरुषश्रेष्ठा, तुला 'विजय' हें नांव कशामुळें प्राप्त झालें ? त्याचप्रमाणें तुझीं श्वेतवाहनादि इतरहि नांवें कोणत्या कारणानें प्रसिद्ध झालीं, हें सर्व मला तत्त्वतः सांग. पूर्वीं मीं त्या वीराच्या नांवांचीं जीं कारणें ऐकलेलीं आहेत, तींच सर्व जर तूं कथन करशील तर मी तुझें हें भाषण श्रद्धेय मानीन.

अर्जुन—हे उत्तरा, माझ्या प्रत्येक नांवाचा अर्थ सांगतों ऐक. मीं सर्व देशांना जिंकून तेथून वित्त आणिलें व त्या केवल धनामध्येंच उभा राहिलों, म्हणून मला धनंजय असें म्हणतात.

मी ज्या ज्या संग्रामांत जातों, तेथें तेथें युद्धाचा मद चढलेल्या शत्रूंना जिंकल्यावांचून परत फिरत नाहीं. म्हणून लोक मला 'विजय' या नांवानें ओळखतात.

रणांगणांत युद्ध करतेवेळीं सुवर्णमय आच्छादनादिकांनीं भूषित झालेले शुभ्र अश्व माझ्या रथाला जुंपलेले असतात, त्यावरून मला 'श्वेतवाहन' हें नांव प्राप्त झालें.

पूर्वा आणि उत्तराफाल्गुनी हीं दोन नक्षत्रें क्रमानें दिवसा व रात्रीं ज्या पौर्णिमेला चंद्रासमीप होतीं त्या फाल्गुनमासांत सकाळीं हिमालयाच्या पृष्ठावर माझा जन्म झाला म्हणून मला 'फाल्गुन' असें म्हणतात.

पूर्वी बलाढ्य दानवांशीं युद्ध करतेवेळीं इंद्रानें मला देदीप्यमान किरीट दिला. तो सूर्यप्रभेसारखा तेजस्वी किरीट माझ्या मस्तकावर असल्यामुळें मला 'किरीटी' असें म्हणतात.

मी युद्ध करतेवेळीं कधींहि निंद्य कर्म करीत नाहीं, उलट तें निंद्य कर्मच माझ्याकडून निंद्य केलें जातें. म्हणून मी देव-मनुष्यांमध्यें 'बीभत्सु' या नांवानें प्रसिद्ध आहें.

मी डाव्या व उजव्या अशा दोन्ही हातांनीं गांडीव धनुष्याचें आकर्षण करितों, त्यामुळें मला देव व मनुष्य 'सव्यसाची,' असें म्हणतात.

चार सागरांनीं परिवेष्टित झालेल्या या पृथ्वीवर माझ्यासारखा तेजस्वी वर्ण दुर्लभ असल्यामुळें व मी नेहमीं शुद्ध व सरल कर्म करीत असल्यामुळें मला 'अर्जुन' हें नांव प्राप्त झालें. मी दुर्धर्ष, दुराकलनीय शत्रूंचें दमन करणारा व इंद्राचाहि पराभव करणारा असल्यामुळें देवलोकीं व मर्त्यलोकीं 'जिष्णु' म्हणजे जयशील या नांवानें माझी प्रसिद्धि झाली. माझें दहावें नांव 'कृष्ण' हें माझ्या पित्यानें माझ्या चित्ताकर्षक मनोहर बालस्वरूपामुळें प्रेमानें ठेविलें होतें.

राजा, अर्जुनाच्या मुखानें नांवांची ही व्याख्या ऐकतांच त्या विराटपुत्रानें पार्थाच्या समीप येऊन त्याला अभिवादन केलें व स्वतःचीं दोन नांवें निवेदन करीत तो म्हणाला—" हे महाबाहो, माझें भूमिंजय आणि उत्तर हीं दोन नांवें आहेत. हे पार्था, मला तुझें दर्शन झालें, ही मोठ्या आनंदाची गोष्ट घडली. हे नागराजकरोपम धनंजया, तुझें स्वागत असो. मीं तुला ओळखलें नसल्यामुळें अज्ञानानें कांहीं बोललों असलों तर मला त्याची क्षमा कर. हे लोहिताक्षा, तूं पूर्वी जें दिग्विजयादि अतिशय दुष्कर विलक्षण कर्म केलेंस, त्यामुळें मला शत्रूविषयीं वाटणारें भय आतां गेलें. तूं मला अतिशय प्रिय वाटत आहेस." ४. ४. ४४.

---

## अध्याय ४५ वा.

[ १ बृहन्नला अर्जुनच आहे असा उत्तराचा निश्चय, गांडीव धनुष्यादि आयुधांची रथांत स्थापना. २ पार्थानें उत्तराला धीर देऊन अस्त्रांचें केलेलें चिंतन. ३ अस्त्रदेवतांचें सामीप्य. ४ त्यांस वंदन करून युद्धप्रसंगीं अंतःकरणांत स्थिर होण्याची प्रार्थना. ५ उत्तराची संशयनिवृत्ति. ]

( १ ) **उत्तर** म्हणाला—हे वीरा, ज्याअर्थी तूं मला या उत्तम रथावर बसवून सारथि केलें आहेस, त्याअर्थीं तूं कोणत्या सैन्याशीं युद्ध करणार आहेस तें सांग, म्हणजे मी तिकडेच रथ चालवितों.

**अर्जुन** म्हणाला—हे रणविशारद पुरुषश्रेष्ठा, तुला आतां भय वाटत नाहीं, हें ऐकून मी संतुष्ट झालों आहें. रणांतून मी तुझ्या सर्व शत्रूंना पळवून लावतों, तूं स्वस्थ बैस. या संग्रामांत शत्रूबरोबर युद्ध करणाऱ्या माझें भयंकर महत्कर्म पहा; आतां तूं प्रथम हे सर्व भाते सत्वर माझ्या रथावर बांध आणि सुवर्णानें भूषविलेलें एक खड्ग घेऊन ये.

राजा जनमेजया, अर्जुनाचें हें वचन ऐकतांच उत्तर मोठ्या त्वरेनें अर्जुनाचीं आयुधें घेऊन त्या वृक्षावरून खालीं उतरला. तेव्हां अर्जुन म्हणाला—" हे विराटपुत्रा, मी कौरवांशीं युद्ध करून तुझ्या धेनु जिंकून परत घेईन. हे राजपुत्रा, तूं या रथावर जरी आरूढ झाला आहेस, तरी नगरांत असल्याप्रमाणेंच मी तुझें रक्षण करीन. माझ्या सामर्थ्यानें हा रथ नगराप्रमाणेंच तुझा रक्षक होईल. कारण या रथाचीं चक्र, ध्वज इत्यादि अंगें तुझ्या नगरांतील विस्तीर्ण व सुदृढ मार्गांसारखीं आहेत. माझे बाहु हेच तुझे बांधव आहेत व ते तुझ्या नगराचा प्राकार व नगरद्वार यांप्रमाणें तुझें रक्षण करितील. माझे बाणभाते, तुझ्या नगराप्रमाणेंच शत्रूंच्या शस्त्रांना तुझ्यापर्यंत येऊं देणार नाहींत. तुझें नगर जसें अनेक ध्वजांनीं युक्त आहे, त्याप्रमाणें माझा हा वानरध्वज संख्येनें एक असला, तरी अनेक ध्वजांची बरोबरी करणारा आहे. मीं क्रोधानें केलेला धनुष्यांचा टणत्कार व माझ्या रथचक्रांचा ध्वनि तुझ्या नगरांतील असंख्य दुंदुभींचें कार्य करितील. हे नृपनंदना, मी गांडीवधन्वा अर्जुन ज्या रथावर अधिष्ठित झालों आहें, तो समरांगणांत शत्रुसैन्याला अजिंक्य आहे, असें तूं निःसंशय जाण व सर्व भीति सोडून दे."

**उत्तर** म्हणाला—हे श्रेष्ठ धनुर्धरा, मी या कौरवांना भीत नाहीं. संग्रामामध्यें तूं साक्षात् इंद्राप्रमाणें किंवा केशवासारखाच स्थिर आहेस, हें मी जाणतों.




"हे राजपुत्रा, हें अर्जुनाचें शत्रुसैन्याचा विध्वंस करणारें प्रसिद्ध गांडीव धनुष्य आहे तेंच अक्षय्य भात्या-सह खालीं आण."

(पृष्ठ ४)

परंतु एका गोष्टीचा विचार करूं लागलों म्हणजे मात्र माझी बुद्धि कुंठित होते व मी मतिमंद होऊन कांहींच निश्चय करूं शकत नाहीं. तूं योद्धयाला अनुरूप अशा अवयवांनीं, स्वरूपानें व शस्त्रास्त्रनैपुण्यादि गुणांनीं युक्त असतांना कोणत्या दैवदुर्विपाकामुळें तुला हें क्लीबत्व प्राप्त झालें आहे ? मला तर असें वाटतें कीं, क्लीबवेष धारण करणारा तूं वास्तविक शूलपाणि शंकर, गंधर्वराजासारखा कोणी तरी श्रेष्ठ देव किंवा इंद्रच असावास !

अर्जुन म्हणाला—हे नृपात्मजा, ज्येष्ठ भ्रात्याच्या आज्ञेनें मी एक वर्षभर हें व्रत आचरीत आहें. हें मी तुला खरें सांगतों. हे महाबाहो, मी धर्मबद्ध झाल्यामुळें परतंत्र होतों. परंतु आतां माझें तें व्रत समाप्त होऊन मी त्या आपत्तींतून पार पडलों आहे, असें तूं जाण.

उत्तर म्हणाला—हे नरश्रेष्ठा, माझ्यावर आज हा फार मोठा अनुग्रह झाला. कारण अशा प्रकारचा पुरुषार्थ असलेल्या तुझ्या ठिकाणीं क्लीबत्व संभवत नाहीं, हा माझा तर्क वृथा ठरला नाहीं. हे वीरा, युद्धामध्यें मी तुझ्या साहाय्यानें युक्त असल्यामुळें माझें भय पूर्णपणें नाहींसें झालें आहे. मी देवांशींहि युद्ध करण्यास सिद्ध आहें. हे महाबाहो धनंजया, माझ्या गुरूनें मला सारथ्याचें शिक्षण उत्तम प्रकारें दिलें आहे. मी शत्रूंच्या रथांचा भंग करणाऱ्या तुझ्या अश्वांचें नियमन करीन; वासुदेवाचा जसा दारुक, किंवा इंद्राचा जसा मातलि तसाच मीहि निपुण सारथि आहें, असें तूं समज.

( २ ) हे पुरुषव्याघ्रा, हा दक्षिण धूरेला जोडलेला व जो चालत असतां भूमीवर पाऊल केव्हां टेंकतो हें कोणाच्या लक्षांतहि येत नाहीं, तो हा माझा चपल अश्व भगवानाच्या सुग्रीव अश्वासारखा आहे. जो हा डाव्या धूरेला जोडलेला माझा दुसरा अश्व आहे, तो भगवानाच्या मेघपुष्प अश्वासारखा वेगवान् आहे, असें मला वाटतें. ज्याच्या पाठीवरील कवचादि सर्व वस्तु कांचनमय असून हा जो माझा तिसरा अश्व डावीकडील मागची बाजू ओढीत आहे, तो भगवानाच्या शैब्यासारखा वेगवान् व बलवान् आहे, असें मी समजतों आणि हा जो चवथा अश्व दक्षिणेकडील पार्श्वभाग वाहत आहे, तो तर कृष्णाच्या बलाहकाहूनहि चपल आहे. हे पार्था, हा माझा रथ तुज धनुर्धरालाच संग्रामांत नेण्यास योग्य आहे व तूंच या रथांत बसून युद्ध करण्यास समर्थ आहेस, असें माझें निश्चित मत आहे.

( ३ ) राजा जनमेजया, त्यानंतर त्या वीर्यवान् अर्जुनानें आपल्या हातांतील कंकणें सोडलीं व ज्याघातांचें निवारण करणारें सुवर्णाचें श्रेष्ठ तलत्राण बांधिलें. मस्तकावरील कुरळ्या केंसांना शुभ्र वस्त्रानें बांधून टाकिलें. नंतर पूर्वाभिमुख होऊन व शुचिर्भूतपणें एकाग्रचित्तानें त्या श्रेष्ठ रथांत बसून सर्व अस्त्रांचें चिंतन केलें. तेव्हां तीं सर्व अस्त्रें त्याच्या मनःचक्षूपुढें प्रकट झालीं व हात जोडून म्हणालीं—" हे पांडुनंदना, हीं आम्ही सर्व श्रेष्ठ अस्त्रें तुझीं किंकर आहोंत."

( ४ ) त्यावेळीं पार्थानें त्यांना हातानें स्पर्श करून प्रणिपात केला व म्हटलें—" मी जेव्हां जेव्हां स्मरण करीन तेव्हां तेव्हां तुम्ही सर्व माझ्या मनांत उपस्थित व्हा." तेव्हां अस्त्रांनीं त्याचा स्वीकार केला असतां त्याचें मुख अतिशय प्रसन्न झालें. त्यानें मोठ्या वेगानें गांडीव धनुष्य सज्ज केलें व वज्रानें पर्वतशिखरावर प्रहार केला असतां जसा प्रचंड ध्वनि होतो, तसा टणत्कार केला. त्या ध्वनीबरोबर पृथ्वी दुभंगिली. वायु जोरानें वाहूं लागला. महान् उल्कापात झाला व दिशा प्रकाशहीन झाल्या. त्या झंझावातानें कौरवांचे ध्वज आकाशांत उडविले व महावृक्ष कांपूं लागले. पार्थानें रथांत बसून तें श्रेष्ठ धनुष्य हातांत धारण करतांच झालेला तो विजेच्या कडकडाटासारखा महाशब्द कौरवांनीं तत्काल ओळखिला.

( ५ ) उत्तर म्हणाला—हे पांडवश्रेष्ठा, ते सर्व शस्त्रास्त्रपारंगत महारथ अनेक आहेत आणि तूं एकटा आहेस. तेव्हां तूं यांना संग्रामांत कसा बरें जिंकशील ? हे कौंतेया, तूं साह्यरहित आहेस आणि हे ससैन्य कौरव तर सहायसंपन्न आहेत. त्यामुळें हे महाबाहो, मी मोठ्या भीतीनें या रथावर तुझ्यापुढें बसलों आहें.

राजा, उत्तराचें हें भाषण ऐकून पार्थ मोठ्यानें हंसला व म्हणाला—" हे वीरा, तूं घाबरूं नको. घोषयात्रेच्या प्रसंगीं अतिशय बलाढ्य चित्ररथ गंधर्वाशीं मीं जेव्हां युद्ध केलें, तेव्हां मला साह्यकर्ता कोण होता ? त्याचप्रमाणें देवदानवांनीं युक्त असलेल्या त्या भयंकर खांडव वनांत युद्ध करतेवेळीं मला कोणाचें साह्य होतें ? तसेंच निवातकवचांसह महाबलाढ्य पौलोमांशीं इंद्रासाठीं केलेल्या युद्धप्रसंगीं मला कोणीं साह्य केलें ? द्रौपदीस्वयंवराच्या वेळीं अनेक नृपालांसह युद्ध करणाऱ्या मला साह्यकर्ता कोण होता ?

हे विराटपुत्रा, गुरु द्रोण, इंद्र, कुबेर, यम, वरुण, अग्नि, कृप, त्याचप्रमाणें वासुदेव कृष्ण व शूलपाणि शंकर यांच्या अनुग्रहबलावर मी या कौरवांशीं युद्ध करण्यास कसा बरें समर्थ होणार नाहीं? यास्तव हे वीरा, तूं आपल्या चित्ताची व्यग्रता सोड आणि माझा रथ सत्वर चालीव. ४. ४. ४५.

---

## अध्याय ४६ वा.

[ १ अर्जुनाच्या केवळ चिंतनानेंच वानरलक्षणध्वजाची रथावर उपस्थिति. २ धनंजयाच्या देवदत्तशंखाचा ध्वनि ऐकतांच भयत्रस्त झालेल्या उत्तराचें आश्वासन. ३ रथध्वनि व उत्पातदर्शन यांवरून अर्जुनाचें आगमन ओळखून द्रोणाचार्यांनें केलेली व्यूहरचना. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें तो पांडवश्रेष्ठ पार्थ उत्तराला सारथि करून शमीला प्रदक्षिणा घालून व सर्व आयुधें घेऊन निघाला. त्या महारथानें प्रथम त्या रथावरील सिंहाकार ध्वज काढून टाकिला व उत्तरसारथि असलेल्या त्या कौंतेयानें त्या शमीच्या मूळाशीं बसून ध्यान केलें. तेव्हां विश्वकर्म्यानें निर्माण केलेला सुवर्णासारखा, पिवळ्या वर्णाचा, हिंस्रपुच्छ असलेला वानरस्वरूप अद्भुत ध्वज त्या रथावर उपस्थित झाला. नंतर पार्थानें मनांत अग्नीच्या प्रसादाचें चिंतन केलें. त्याबरोबर त्याचें चिंतन जाणून अग्नीनें सर्व भूतांची त्याच्या रथावर योजना केली. तेव्हां पताका व विचित्र अंगें यांनीं युक्त असलेल्या भात्यांसहित महाबलवान् व दिव्यस्वरूप बाण अंतरिक्षांतून रथावर पडले. तेव्हां तो ध्वज रथाकडे आलेला पहातांच अर्जुनानें त्याला प्रदक्षिणा केली आणि तो रथारूढ झाला.

( २ ) हे राजेंद्रा, ज्यानें गोधा-अंगुलित्राण बांधलें आहे व गांडीव धनुष्य धारण केलें आहे, असा कपिध्वज श्वेतवाहन पार्थ उत्तर दिशेकडे वळला आणि त्या बलाढ्य शत्रूंचा नाश करणाऱ्या वीरानें शत्रूंच्या अंगावर रोमांच आणणारा व प्रचंड ध्वनि करणारा आपला देवदत्तसंज्ञक महाशंख जोरानें वाजविला. तो शब्द कानीं पडतांच त्याच्या रथाच्या अश्वांनीं भूमीवर गुडघे टेंकले व रथावर असलेला उत्तर भयभीत होऊन खालीं बसला. तेव्हां पार्थानें अश्वांची पाठ थोपटून त्यांना धीर दिला व लगाम ओढून त्यांना उठविलें.

हे भारता, नंतर त्या पराक्रमी पांडुपुत्रानें उत्तराला आलिंगन दिलें व त्याला आश्वासन देत म्हटलें—" हे श्रेष्ठ राजपुत्रा, भिऊं नको. तूं क्षत्रिय असून शत्रूंच्या पुढें असा खिन्न काय होतोस ? हे परंतपा, तूं शंख आणि भेरी यांचा भयंकर नाद व व्यूहरचना करून उभ्या असलेल्या सैन्यांतील गजांचा चीत्कार पुष्कळ वेळां ऐकिला असशील. असें असतां, हे पुरुषव्याघ्रा, एखाद्या प्राकृत पुरुषाप्रमाणें या शंखध्वनीला कसा भितोस ? आणि भीतीनें असा निस्तेज काय होतोस ?

उत्तर—हे धनुर्धरा, मीं शंख व भेरी यांचा शब्द पुष्कळ ऐकला आहे. व्यूह रचून उभ्या केलेल्या हत्तींचाहि भयंकर चीत्कार ऐकलेला आहे. परंतु अशा प्रकारचा प्रचंड शंखध्वनि मात्र मीं पूर्वीं कधींहि ऐकला नव्हता आणि अशा प्रकारचा ध्वजहि मीं कधीं पाहिला नव्हता. त्याचप्रमाणें हे वीरश्रेष्ठा, धनुष्याचा असा टणत्कारहि मीं या पूर्वीं कधीं ऐकला नव्हता. हा शंखाचा नाद, धनुष्याचा टणत्कार, तुझ्या या ध्वजावरील अमानुष भूतांचा भयंकर शब्द व रथचक्राचा ध्वनि, यांनीं माझें मन अतिशय गोंधळून गेलें आहे. सर्व दिशा धुंद झाल्या आहेत. माझें हृदय व्यथित होत आहे. या ध्वजाच्या योगानें सर्व आकाश आच्छादून गेल्यामुळें मी दिङ्मूढ झालों आहें आणि या गांडीव धनुष्याच्या टणत्कारानें माझे कान बधिर झाले आहेत.

नरेंद्रा, विराटपुत्राचें हें भाषण ऐकून क्षणभर पुढें गेल्यावर पार्थ पुनः म्हणाला—" हे उत्तरा, रथ दृढ धरून व पाय चांगले टेकून उभा रहा आणि लगाम ओढून अश्वांचें नियमन कर. मी पुनः एकदा शंख वाजवितों.

राजा, असें बोलून अर्जुनानें पर्वतांचें जणुकाय विदारण करीतच जोरानें शंख वाजविला. त्या प्रचंड ध्वनीनें पर्वतांच्या गुहा, सर्व दिशा आणि पर्वतशिखरें यांना दुमदुमून सोडलें. उत्तरहि रथांत लपून बसला. पार्थाचा तो शंखनाद, त्याच्या रथचक्राचा घोष व गांडीव धनुष्याचा टणत्कार यांच्या योगानें पृथ्वी कापूं लागली. तेव्हां धनंजयानें पुनः त्या विराटपुत्राला धीर दिला.

( ३ ) जनमेजया, इकडे कौरवसेनेमध्यें हीं सर्व चिह्नें पाहून द्रोणाचार्य म्हणाला—" हे वीरहो, ज्याअर्थी मेघाच्या गडगडाटासारखा रथघोष होत आहे आणि पृथ्वी कांपत आहे, त्याअर्थीं हा वीर सव्यसाची धनंजयावांचून दुसरा कोणी नाहीं, हें स्पष्ट दिसत आहे. शिवाय आपलीं शस्त्रें चकाकत नाहींत.

अश्व उत्साहरहित झाले आहेत. समिद्ध अग्नि[1] प्रज्वलित होत नाहीं, हें कांहीं शुभ चिह्न नाहीं. घोर शब्द करणारे पशु पूर्वदिशेकडे पळत आहेत. आपल्या ध्वजांवर कावळे बसत आहेत. पक्षिसमूह आपल्याला डावी घालून फार मोठें भय सूचवीत आहेत. हा कोल्हा रोदनासारखा कर्कश शब्द करीत सैन्याच्या मधून धांवत आहे आणि आमच्या शस्त्रांनीं विद्ध न होतांच निसटून जात आहे. हीं खरोखर दुश्चिह्नें आहेत. तुमच्या अंगावर रोमांच आलेले दिसत आहेत. यावरून या युद्धामध्यें क्षत्रियांचा नाश होणार, हें निश्चित आहे.

हे नरश्रेष्ठांनो, तुमच्या नेत्रांतील तेज लुप्त झालें आहे, वाणी अडखळत आहे आणि मनाची प्रसन्नता नष्ट झाली आहे. सूर्यप्रकाश मंद झाला आहे आणि पशु-पक्षी दारुण शब्द करीत आहेत. असे हे सर्व क्षत्रियांचा नाश करणारे घोर उत्पात दिसत आहेत. हीं सर्व दुश्चिह्नें विशेषतः आमचा विनाश दर्शवीत आहेत.

राजा दुर्योधना, तुझ्या सैन्यावर प्रदीप्त उल्कापात होत आहे, आपल्या सैन्यांतील अश्व-गजादि वाहनें निरुत्साह होऊन जणु काय रडतच आहेत आणि तुझ्या सैन्याभोवतीं हे गृध्रपक्षी फिरत आहेत. धार्तराष्ट्रा, पार्थाच्या बाणानें पीडीत होत असलेलें सैन्य पाहून मग तुला पश्चात्ताप होईल. पहा, हें आपलें सैन्य मागें पळत आहे, तें युद्ध करूं इच्छीत नाहीं. हे सर्व योद्धे अतिशय निस्तेज झाले आहेत. यास्तव प्रथम गायींना पुढें पाठवून दे आणि आपण सर्व व्यूह रचून युद्धाला सज्ज होऊं या. ४. ४. ३६.

---

## अध्याय ४७ वा.

[ १ द्रोणाच्या वचनावरून पार्थाच्या आगमनाविषयीं निश्चय करून भ्यालेल्या सैनिकांना दुर्योधनाचें प्रोत्साहन. २ कर्णानें केलेली द्रोणाची निंदा. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा पारिक्षिता, द्रोणाचार्यांचें हें युक्त भाषण ऐकून दुर्योधन त्या समरभूमीवर भीष्म, द्रोण व कृप यांना उद्देशून म्हणाला—"हे आचार्यहो, कर्णानें आणि मीं तुम्हांला कितीदा तरी याविषयीं सांगितलें आहे. तरी तेवढ्यानें तृप्त न होतां मी पुनः तेंच सांगतों. द्यूतांमध्यें पराभूत झालेल्या पांडवांनीं बारा वर्षें उघडपणें वनवास करावा आणि

---

१ द्रोणाचार्यांचें अग्निहोत्र असल्यामुळें त्यांच्या रथांत अग्नि होता. हुत-आहुतीनें अग्नि प्रज्वलित न होतां धूर निघणें, हें दुश्चिह्न मानिलें आहे.

एक वर्ष अज्ञातवासांत रहावें, असा आम्हीं पण लावला होता. त्यांचें अज्ञातवासाचें तेरावें वर्ष अद्यापि संपलें नाहीं. इतक्यांतच हा पार्थ आमच्यावर चालून येत आहे. अज्ञातवासाचा काल पूर्ण होण्यापूर्वींच हा अर्जुन प्रकट झाल्यामुळें पांडवांना पुनः बारा वर्षें वनवास करावा लागेल. आतां राज्य-लोभामुळें त्यांना प्रतिज्ञेचें भान राहिलें नाहीं किंवा कालगणना करण्यांत आमची चूक होत आहे, या विषयींचा निर्णय भीष्माचार्य करील. कारण त्यांच्या अज्ञातवासाचा काल अतीत झाला किंवा नाहीं, ही न्यूनाधिकता जाणण्यास तोच पितामह समर्थ आहे. कांहीं झालें तरी दोन्ही पक्षीं पांडवां-कडेच दोष येतो. प्रतिज्ञा-काल पूर्ण होण्यास जर अवधि असेल, तर आपल्याला तें इष्टच आहे आणि अधिक काल जर लोटला असेल, तर अर्जुनानें आम्हांवर निष्कारण चालून यावें, हें अयोग्य आहे.

फलप्राप्तीचे दोन प्रकार असले तर त्याविषयीं नेहमीं संशय येतो. पांडवांनीं आपली प्रतिज्ञा पूर्ण केली असली तर आपला राज्यविभाग परत मिळावा, म्हणून त्यांनीं मजपाशीं उघडपणें यावयास पाहिजे होतें. पण माझ्या प्रसादानें त्यांना त्याची प्राप्ति होईल किंवा नाहीं, असा संशय येण्याचा जरी संभव असला तरी तसल्या संशयावस्थेंत युद्धासाठीं अकस्मात् आम्हांवर चालून यावें, हें अयोग्य नव्हे का ? पूर्ववैरामुळें संशय असतांनाहि आम्हांला मारण्यासाठीं आलेल्या या पांडवाचा पराजयहि संभवतो. अर्थात् अन्यायानें युद्ध करणाऱ्या या अर्जुनाचा जर पराजय झाला तर अधिकच नाश होणार ! येथें कौरव आणि मत्स्य यांचा युद्धप्रसंग असतां अर्जुनाला त्यांत पडण्याचें काय प्रयोजन होतें ? हा अर्जुनाचा अपराध नाहीं का ?

'अहोपण, या युद्धांत कौरवांचा तरी प्रत्यक्ष काय संबंध होता ! त्रिगर्त व मत्स्य यांच्या युद्धांत त्यांनीं तरी कां पडावें ?' असें जर म्हणाल, तर आम्ही त्रिगर्तांना साह्य करण्यासाठीं आलों. 'मत्स्यांनीं आम्हांला अनेक प्रकारें पीडा देऊन आमचा पराभव केला आहे,' असें त्रिगर्तांनीं आम्हांला सांगितलें असतां त्या भ्यालेल्या त्रिगर्तांसाठीं आम्हीं मत्स्याशीं युद्ध करण्याची प्रतिज्ञा केली. तेव्हां आमच्यावर हा दोष येत नाहीं.

त्रिगर्तांनीं सप्तमीला अपराह्णकालीं मत्स्यावर चाल करून दक्षिणेकडील त्यांच्या गायींचें हरण केलें असतां विराटाचें सर्व सैन्य तेथें जाईल. तेव्हां

आम्हीं अष्टमीला प्रातःकाळीं उत्तरेकडील गायी न्याव्या, असा आमचा संकेत ठरला होता व त्याप्रमाणें त्यांनीं केलें. आतां ते त्रिगर्त गायींचें हरण करून आणतात, किंवा त्यांचा पराभव होतो किंवा ते आमची वंचना करून मत्स्यांशीं स्नेह करतात, हें कांहींच सांगवत नाहीं. पण या तिन्ही पक्षीं आम्ही मात्र आतां युद्ध करणार ! कदाचित् मत्स्यराजा गायींसह त्रिगर्तांची उपेक्षा करून आपलें प्रचंड सैन्य घेऊन जर रात्रींच परत आला असला तर तो आतां आमच्याशीं युद्ध करावयास येत असेल. त्यांच्यांतीलच एखादा महापराक्रमी वीर किंवा स्वतः विराटराजाच आम्हांला जिंकण्यासाठीं येथें येत असावा.

हा मत्स्यराज असो किंवा अर्जुन असो, आम्हीं सर्वांनीं युद्ध करण्याचा निश्चय केला आहे. भीष्म, द्रोण, कृप, विकर्ण व अश्वत्थामा हे सर्व महारथ या वेळीं असे भ्रांतचित्त होऊन रथांत बसून काय राहिले आहेत ? या वेळीं आम्हांला युद्धच श्रेयस्कर आहे, यास्तव स्वस्थचित्त व्हा. असे गोंधळून जाऊं नका. आम्हीं हरण केलेल्या गोधनाला हिरावून नेण्यास प्रत्यक्ष इंद्र, यम किंवा इतर देव जरी आले, तरी आम्ही युद्धांत त्यांचा पराभव केल्यावांचून हस्तिनापुरास परत जाणार नाहीं. सारांश देवहि आमच्या हातून गायी जिंकून नेण्यास समर्थ नाहींत. मग मानवांची काय कथा ! अहो, गहन वनामध्यें पळून जाणारा कोणता सैनिक या माझ्या शरवृष्टीपुढें जिवंत राहूं शकेल ? तसाच अश्वांच्या जीविताचाहि संशयच आहे."

(२) दुर्योधनाचें हें भाषण ऐकून कर्ण म्हणाला—हे राजा, अगोदर या रणामध्यें भिणाऱ्या द्रोणाचार्याला सेनापतीच्या जागेवरून दूर कर. कारण हाच मुख्य नेता भिऊं लागला म्हणजे सर्व सैन्य घाबरून जाईल. हा पांडवांची प्रौढि व आमचा तेजोभंग कसा करावा, हें चांगलें जाणतो. याची अर्जुनावर नेहमींच प्रीति दिसून येते. त्यामुळें धनंजय येत असलेला पाहून हा त्याची प्रशंसा करूं लागला आहे. अश्वांचें खिंकाळणें ऐकून हा द्रोण भयभीत झाला असतां सर्वांचेंच सामर्थ्य गळालें. या ग्रीष्म ऋतूंत स्वदेशांतून दूर आल्यामुळें मार्गाविषयीं अनभिज्ञ असलेल्या व शत्रूंच्या वश झालेल्या या सैन्याचा नाश होणार नाहीं, अशी योजना करूं या.

सर्वच आचार्यांना व विशेषतः या द्रोणाचार्याला पांडव सदैव प्रिय असल्यामुळें त्या स्वार्थी पांडुपुत्रांनीं हा स्वपक्षीय द्रोण मुद्दाम तुमच्या समीप

ठेविला आहे. त्यावांचून अर्जुनाला येथें येण्याचें काय कारण व त्यांत त्याची प्रशंसा करण्याइतकें तरी काय आहे? अश्वांचें नुसतें खिंकाळणें ऐकून कोणीं प्रशंसा केली आहे? अहो, अश्व आपल्या स्थानावर असोत किंवा चालत असोत ते नेहमींच खिंकाळतात. त्याचप्रमाणें वायु सर्व काळ वहात असतो व इंद्रहि सर्वदा वृष्टि करीत असतो. तसाच मेघनादहि बहुधा ऐकूं येतो. यांत पार्थाची प्रशंसा करण्यासारखें त्यानें कोणतें कार्य केलें आहे? तथापि पांडवांवरील प्रीति व आमचा द्वेष किंवा आमच्यावरील रोष यांवांचून यांत दुसरा कांहीं हेतु दिसत नाहीं.

हे आचार्य नेहमीं दयावान् असल्यामुळें युद्धधर्माविषयीं अनभिज्ञ असतात. ते तत्त्वज्ञानी व अहिंसादि धर्म दाखविणारे असतात. यास्तव युद्धासारखें महाभय प्राप्त झालें असतां त्यांचें मत केव्हांहि विचारूं नये. ते राजमंदिरांत, उद्यानांत, देवालयांत बसून, लोकसमुदायांत विचित्र व अनेक आश्चर्ययुक्त कथा सांगून लोकांचें रंजन करण्यांत फार निपुण असतात. किंवा यज्ञयागांतील पात्रांची रचना करण्यांत व इतर याज्ञिकांचीं छिद्रें दाखविण्यांत मोठे प्रवीण असतात. त्याचप्रमाणें घराच्या ओट्यावर, दारांत बसून स्नान-आचमन-भोजनादि, हत्ती-अश्व-रथ इत्यादिकांचें गमन, खर, उंट, अज इत्यादिकांची चर्चा हें सर्व करण्यांत ते निष्णात असतात. तसेंच वैश्वदेवादिकांच्या अन्नांत केश-कीटकादि दोष पहाण्यांत किंवा सिद्ध झालेल्या स्वयंपाकांत तिखट, हिंग, मीठ कमी-अधिक झालें असल्यास त्याची चिकित्सा करण्यांत मात्र त्यांचें पांडित्य उत्तमप्रकारें चालतें. यास्तव शत्रूचे गुणानुवाद गाणाऱ्या या पंडितांना मागें सारून ज्यायोगें शत्रूंचा वध करतां येईल अशी आपण योजना करूं या. गायींची रवानगी करून, सैन्याचा व्यूह रचून, शत्रूंपासून आपलें रक्षण होईल अशी योजना करून, आपण युद्धांत प्रवृत्त होऊं या. ४.४.४७.

---

## अध्याय ४८ वा.

[ १ कर्णाची आत्मश्लाघा व अर्जुनाच्या पराभवाची प्रतिज्ञा. ]

( १ ) कर्ण म्हणाला—हे वीरहो, तुम्ही सर्व दीर्घायु असूनहि भयभीत व त्रस्त झालेले दिसत आहां! युद्ध न करण्याचा निश्चय करून हे भीष्मादि सर्व अस्थिर झाले आहेत. परंतु तुम्ही सर्व आयुष्मान् असल्यामुळें मृत्यु

तुमच्या अधीन आहे. द्रोणाचार्याला युद्धांत मृत्यु येणार नाहीं. भीष्म इच्छामरणी आहे. कृप व अश्वत्थामा अजर आणि अमर आहेत. असें असतां तुम्ही शत्रूला कां भीतां ? तुम्हांला मरणाची भीती कां वाटते !

राजा दुर्योधना, तूं घाबरूं नको. हा आलेला वीर मत्स्यराज विराट असो किंवा पार्थ असो, मी समुद्राच्या वेलेप्रमाणें त्याचें निवारण करीन. माझ्या धनुष्यापासून सुटलेले नतपर्व शर वेगानें जाणाऱ्या सर्पाप्रमाणें शत्रूला वेध केल्यावांचून कधींहि निवृत्त होणार नाहींत. शरक्षेपामध्यें निष्णात असलेल्या माझ्या हातांतून सुटलेले तीक्ष्ण व सुवर्णपृष्ठयुक्त बाण वृक्षावर पडणाऱ्या टोळधाडीप्रमाणें पार्थाला आच्छादित करोत. पुंखयुक्त बाण सोडतेवेळीं होणारा माझ्या धनुष्याचा टणत्कार भेरीच्या शब्दाप्रमाणें तुम्ही ऐका.

हा अर्जुन तेरा वर्षें स्वस्थ बसल्यावर आतां त्याला युद्धाविषयीं मोठें प्रेम उत्पन्न झालें आहे. पण तो या युद्धांत मजवर प्रहार करण्यास जेव्हां येईल तेव्हां गुणवान् ब्राह्मणाप्रमाणें हा पाशुपतादि अस्त्रांनीं संपन्न व माझ्याशीं स्पर्धा करण्यास योग्य असलेला सत्पात्र कौंतेय मीं सोडलेल्या हजारों शरसंघाताचा प्रतिग्रह करील. या पार्थाची श्रेष्ठ धनुर्धर म्हणून त्रिभुवनांत प्रसिद्धि आहे आणि मीहि या नरश्रेष्ठ अर्जुनापेक्षां पराक्रमांत यत्किंचित्‌हि हीन नाहीं. त्यामुळें गृध्रपक्ष्यासारखा वेग किंवा शब्द असलेल्या या सुवर्णमय बाणांच्या योगानें सर्व आकाश काजव्यांनीं व्याप्त झाल्याप्रमाणें आज दिसेल. पूर्वीं द्यूताच्या आरंभीं 'मी अर्जुनाला जिंकीन' अशी प्रतिज्ञा केली होती. तें धार्तराष्ट्राचें ऋण आज मी पार्थाला समरांत गतप्राण करून फेडीन.

हे कौरवा, आज संग्रामांत मध्येंच तुटून इतस्ततः खालीं पडणाऱ्या शरांनीं आकाश पतंगांनीं व्याप्त झाल्याप्रमाणें दिसेल. प्रदीप्त ज्वालांनीं गजेंद्राला जसें जर्जर करावें, तसें मी महेंद्रासारख्या तेजस्वी आणि ज्याचा स्पर्श वज्रासारखा असह्य आहे, अशा पार्थाला पीडित करीन. हा पार्थ वीरांमध्यें अतिरथ आहे, शूर आहे व शस्त्रधारण करणारांमध्यें श्रेष्ठ आहे; पण गरुड जसा सर्पाला धरितो, तसा मी त्याला विवश करीन.

हे गांधारेया, अश्वांचा वेग हाच वृष्टीला हेतु होणारा पूर्व दिशेचा वायु आणि रथघोष हीच मेघगर्जना, यांनीं युक्त असलेला मी महामेघ शरवृष्टिरूपी पर्जन्यानें खड्ग-शक्ति-शररूपी इंधनानें प्रदीप्त केलेल्या व शत्रूला दग्ध करण्यास

प्रवृत्त झालेल्या पांडवरूपी अग्नीस शांत करीन. सर्प जसे वारुळांत शिरत त्याप्रमाणें माझ्या धनुष्यापासून सुटलेले व विषारी सर्पांसारखे असलेले श आज पार्थाच्या अंगांत शिरोत. कर्णिक वृक्षांनीं जसें पर्वताला आच्छादा त्याचप्रमाणें हेमपुङ्खाच्या पाजळलेल्या व पाणी दिलेल्या शरांनीं, मीं पार्था व्याप्त केलेलें तुम्ही पहाल.

हे दुर्योधना, श्रेष्ठ जामदग्न्य ऋषीपासून मला जें अस्त्र प्राप्त झालें आ त्याच्या बलाचा आश्रय करून मी इंद्राशींहि युद्ध करीन. या पार्थाच्या रथ वरील ध्वजावर जो वानर बसला आहे, तो आज माझ्या 'भल्ल'-संज्ञ बाणानें विद्ध होऊन भयंकर ध्वनि करीत भूमीवर पडेल. त्याचप्रमाणें शत्रूच ध्वजावरील भ्रंश पावलेलीं भूतें दश-दिशांत पळून जात असतां त्यांचा श स्वर्गापर्यंत जाऊन पोंचेल. आज मी धनंजयाला रथांतून खालीं पाडून दुर्यो धनाच्या मनांत दीर्घकाल टोंचीत असलेलें शल्य काढून टाकीन.

आज हे सर्व कौरव स्वपराक्रमाचा गर्व बाळगणाऱ्या या पार्थाला अ मारले जाऊन विरथ झाल्यामुळें फूत्कार सोडणाऱ्या सर्पाप्रमाणें निःश्वास टाकी असलेलें पाहोत. आतां हे कौरव त्यांची इच्छा असल्यास गोधन घेऊन प जावोत किंवा माझें युद्ध पहात रथांत स्वस्थ बसून राहोत. मला कांहीं त्यांच साह्याची अपेक्षा नाहीं. ४. ४. ४८.

---

## अध्याय ४९ वा.

[ १ कृपाचें नीतिवचन. २ त्यानें केलेली कर्णाची निंदा. ]

( १ ) कृप—हे राधेया, युद्धाविषयींचे तुझे विचार नेहमींच क्रूरतर अ तात. परंतु तूं गोधनाच्या प्राप्तीचा हेतु व त्याचा परिणाम यांकडे लक्ष दे नाहींस. शकुनीनें कपटद्यूताचा आश्रय करून पांडवांचें धन हरण केलें, त आतां युद्धामध्यें अर्जुनाला जिंकणें शक्य नाहीं. साम-दान-दंडादि राजनीत युद्ध अतिशय पापिष्ठ मानलें आहे. कारण तें अत्यंत नाशकारक आहे, अ शास्त्रवेत्त्यांनीं विचार करून निश्चय केलेला आहे. अनुकूल देश व काल यां युक्त असलेलें युद्धच विजयप्रद होतें. प्रतिकूल कालांत युद्ध फलप्रद होत ना सांप्रत ग्रीष्म ऋतु आहे; त्यामुळें जलाच्या अभावीं सैन्यांतील श्रांत झालेल अश्वादि वाहनांचा नाश होईल. यास्तव हा युद्धाला अनुकूल काल नाहीं. शिव

-या प्रदेशीं आपल्याला गिरि-दुर्गादिकांचाहि आश्रय नाहीं. त्यामुळें तो शत्रूला हितावह आहे. सारांश अनुकूल देश व काल पाहून केलेला पराक्रम कल्याणप्रद होतो. देशादिकांची अनुकूलता असली तरच कार्य सफल होत असतें.

एखाद्या रथकारानें एक रथ तयार केला व 'हा मीं बनविलेला दिव्य रथ अतिशय दृढ आहे, यांत बसून तूं देवांनाहि जिंकशील,' असें जरी म्हटलें, तरी विचारी लोक त्याच्या या वचनावर विश्वास ठेवून देश-कालादिकांची अपेक्षा न करतांच युद्धाला निघत नाहींत. त्याप्रमाणें आम्ही जरी आयुष्मान् आहोंत, तरी त्या रथकाराप्रमाणें केवळ तुझ्या वचनावर विसंबून युद्धामध्यें प्रवृत्त होण्यास आमचें मन तयार होत नाहीं. आम्हीं पार्थाला युद्धशिक्षण दिलें आहे. तेव्हां तो रथाप्रमाणेंच केवढाहि युद्धभार सहन करण्यास समर्थ आहे. परंतु आम्ही मात्र रथकाराप्रमाणें तो भार स्वीकारण्यास असमर्थ आहों. यास्तव पार्थाशीं संग्राम न करितां संधान करणेंच श्रेयस्कर आहे, असें आमचें निश्चित मत आहे.

( २ ) पार्थाच्या पराक्रमाचा जर विचार केला तर आम्ही त्याच्या पुढें युद्धांत टिकाव धरण्यास समर्थ होणार नाहीं. पहा, तो एकटा वीर दिग्विजय-प्रसंगीं उत्तरकुरूंवर चालून गेला. त्यानें एकट्यानें खांडववनांत अग्नीला तृप्त केलें. त्यानें एकट्यानेंच पांच वर्षें ब्रह्मचर्यव्रत धारण केलें. त्या एकट्यानेंच सुभद्रेचें हरण केलें व तिला रथांत बसवून कृष्ण-बलरामांस युद्धासाठीं आह्वान केलें. त्या एकट्या धनुर्धरानेंच किरातरूपी शंकराशीं युद्ध केलें. याच वनांत जयद्रथानें पांचालीचें हरण केलें असतां एकट्या पार्थानें त्याला जिंकून तिला परत आणिलें. एकटा धनंजयच इंद्राजवळ पांच वर्षें राहून अस्त्रविद्या शिकला. त्या एकट्यानेंच शत्रूंना जिंकून कौरवांना यश संपादून दिलें. या एकट्या परं-तपानें युद्धामध्यें दुर्जय सैन्याचा पराभव करून चित्ररथ गंधर्वाला जिंकलें.

त्याचप्रमाणें देवांनाहि अजिंक्य असलेल्या निवातकवच व कालखंज या दानवांना या एकट्या सव्यसाची अर्जुनानें समरांत गतप्राण केलें. तसेंच पांडवांतील एकेका भ्रात्यानें अनेक नृपालांना वश करून घेतलें. हे कर्णा, त्याप्रमाणें तूं एकट्यानें पूर्वी काय पराक्रम केला आहेस तो सांग पाहूं. अरे,

१ गेल्या अध्यायाच्या आरंभींच कर्णानें 'तुम्ही सर्व आयुष्मान् असून' इत्यादि

इंद्रदेखील पार्थाशीं युद्ध करण्यास समर्थ नाहीं. यास्तव जो कोणी त्याच्याशीं युद्ध करण्याची इच्छा करील, त्याचा मोह घालविण्यासाठीं कांहीं तरी औषधाचीच योजना केली पाहिजे. अरे कर्णा, क्रुद्ध झालेल्या सर्पाच्या मुखांत उजव्या हाताची करांगुलि घालून त्याची दाढ उपटून काढण्याची तूं इच्छा करीत आहेस.

अथवा वनामध्यें एकट्याच फिरत असलेल्या मत्त गजावर अंकुशावांचूनच आरूढ होऊन नगरांत जाण्याची तूं महत्त्वाकांक्षा धरीत आहेस. किंवा प्रदीप्त अग्नीमध्यें घृत-मेद-वसा इत्यादिकांची आहुति देऊन घृतानें भिजविलेलें वस्त्र स्वतःच्या शरीराभोंवतीं गुंडाळून त्या प्रज्वलित अग्नीमधून चालत जाण्याचें हें धाष्ट्र्य करीत आहेस.

पण बाबारे, स्वतःचे हात-पाय बांधून गळयांत महाशिला अडकवून आपल्या बाहुबलानें समुद्र तरून जाण्याची कोण इच्छा करील व त्यांत पुरुषार्थ तो कोणता! हे राधेया, स्वतः अति दुर्बल व अस्त्रविद्येंत निष्णात नसलेला जो कोणी बलवान् व अस्त्रकुशल पुरुष पार्थाशीं युद्ध करण्याची इच्छा करील तो निःसंशय दुर्मति होय. आम्हीं तेरा वर्षें कपटाचरणानें क्लेश दिलेला हा सिंह आज पाशांतून सुटला आहे. तो आम्हांला आज जिवंत ठेवणार नाहीं. एखाद्या कूपामध्यें गुप्त असलेल्या अग्नीप्रमाणें एकान्तांत राहिलेल्या या पार्थाच्या समीप येऊन आम्हीं अज्ञानामुळें आपल्यावर मोठें संकटच ओढवून घेतलें आहे. यास्तव आतां आपण एकमतानें प्राप्त झालेल्या या युद्धदुर्मद पार्थाशीं युद्ध करूं या. सर्व सैन्य सज्ज होऊन, व्यूह रचून व शस्त्रास्त्रें घेऊन उभें राहो.

हे राधेया, असें साहस करूं नको. द्रोण, दुर्योधन, भीष्म, तूं, अश्वत्थामा व मी असे सर्व मिळून पार्थाशीं युद्ध करूं या. आम्ही सहाहि रथी जर एकमेकांना साह्य करीत या युद्धांत स्थिर राहिलों, तरच इंद्राप्रमाणें उद्धत असलेल्या या दृढनिश्चयी पार्थाशीं प्रतियुद्ध करूं शकूं. अनेक दानव एकट्या इंद्राशीं जसें युद्ध करितात, त्याप्रमाणें आपण सर्व धनुर्धर व्यूहरचना करून व सज्ज होऊन जर आजच्या या संग्रामांत धनंजयाशीं युद्ध केलें, तरच आमची धडगत आहे. ४. ४. ४९.

---

## अध्याय ५० वा.

[ १ द्रोणाची निंदा ऐकून क्रुद्ध झालेल्या अश्वत्थाम्यानें कर्ण व दुर्योधन, यांची मर्मभेदक शब्दांनीं केलेली निर्भर्त्सना. ]

( १ ) **अश्वत्थामा म्हणाला—हे राधेया, अद्यापि तूं गायींना जिंकिलें नाहींस किंवा त्या मत्स्यदेशाच्या सीमेपलीकडेहि गेल्या नाहींत, अथवा हस्तिनापुरास जाऊन पोंचल्या नाहींत, असें असतांना तूं व्यर्थ स्वतःची प्रौढि कसली सांगत आहेस! अरे, जे खरे शूर असतात ते अनेक युद्धांत विजयी होऊन, शत्रूचें सैन्य जिंकून, विपुल धन मिळवून, त्यांच्या सीमेच्या पार जाऊन, तें वित्त स्वनगरांत घेऊन आले, तरीहि आत्मश्लाघा करीत नाहींत व तूं तर यांतील कांहींच न करितां केवल व्यर्थ वल्गना करीत आहेस, यावरून तुझा निर्लज्जपणा मात्र व्यक्त होत आहे. अग्नि गर्जना न करतां सर्व पदार्थ दग्ध करीत असतो. सूर्य स्वस्थ बसूनच सर्व सृष्टीला प्रकाशित करितो आणि ही पृथ्वी या चराचर भूतांना मुकाट्यानेंच धारण करिते.**

**राजा जनमेजया, इतकें बोलून कर्णाच्या ' ब्राह्मणांचें भोजनादिकांतच कौशल्य० ' इत्यादि उपहासपर वचनांनीं क्रुद्ध झालेला अश्वत्थामा ' तूं वैश्य असल्यामुळें तुझ्यांतहि युद्धसामर्थ्य नाहीं, ' हें दर्शविण्यासाठीं चातुर्वर्ण्याचीं नियत कर्में सांगूं लागला.**

**अश्वत्थामा—हे कर्णा, स्वयंभू ब्रह्मदेवानें चातुर्वर्ण्याचीं कर्में नियत केलीं आहेत. त्या त्या कर्मांच्या अनुसार त्या त्या वर्णानें धन मिळविण्याचा व्यवसाय केला असतां त्यास दोष लागत नाहीं. ब्राह्मणांनीं अध्ययन करून याजन व यजन करावें; क्षत्रियांनीं धनुष्याचा आश्रय करून यजन करावें, पण याजन करूं नये. वैश्यांनीं कृषि-वाणिज्यादि करून वेदोक्त कर्में करवावींत आणि शूद्रांनीं वंदनादिकांच्या योगानें नम्र होऊन सर्वदा तिन्ही वर्णांची शुश्रूषा करावी, असें शास्त्रविधान आहे.**

**हे राधासुता, याप्रमाणें यथाविधि आचरण करणारे महाभाग वीर पुरुष समग्र पृथ्वीला न्यायानें जिंकूनहि गुरु दुर्जन जरी असला तरी त्याचा सत्कार करितात, आणि तूं अन्यायानें पांडवांना जिंकून सज्जन गुरूंची निंदा करीत आहेस! द्यूतानें राज्य मिळवून कोणता क्षत्रिय स्तुतीस पात्र झाला आहे! त्याचप्रमाणें हा दुर्योधन क्रूर व निर्लज्ज आहे. एखाद्या कपटी व्याधाप्रमाणें**

वंचना करून व कपट द्यूतानें वित्त हरण करून कोणता प्राज्ञ मनुष्य स्वतःची प्रौढि गाईल ?

हे कर्णा, ज्या पांडवांचें धन तूं कपटानें हरण केलेंस त्यांतील धनंजय किंवा नकुल-सहदेव यांना तूं कोणत्या द्वैरथ युद्धांत जिंकलेंस ? अथवा युधिष्ठिर किंवा बलाढ्य भीम यांचा केव्हां पराभव केलास ? तूं पूर्वीं कोणत्या संग्रामांत इंद्र-प्रस्थ जिंकून घेतलेंस ? त्याचप्रमाणें हे दुष्टकर्मन्, ज्या एकवस्त्रा रजस्वला पांचालीला सभेंत नेलीस, त्या कृष्णेला तूं कोणत्या रे युद्धांत जिंकिलें होतेंस ?

अरे सूता, पूर्वीं द्यूतप्रसंगीं विदुरानें ' धनाची किंवा सुगंधाची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें चंदनवृक्षाचें मूळच जसें तोडून टाकावें तशी ही तुमची कृति आहे ' असें जें म्हटलें होतें, तें अगदीं यथार्थ आहे. कसें तें पहा—

वेदविरुद्ध असलेलें कपटद्यूत करणाऱ्या धार्तराष्ट्रानें धर्माचें मूळ छेदून टाकिलें आणि तूंहि आतां ब्राह्मणांचा अवमान करून तेंच निंद्य कर्म केलेंस. चंदनाचें मूळ शीतल असतें. तें दाहक नसतें. परंतु हा दुर्योधन क्रोधी आहे, त्यानें पांडवांच्या पितृ-पितामहांच्या राज्याचें द्यूतानें हरण करून पांडवांना आपले दास केलें; परंतु ही त्याची कृति परिणामीं अनर्थावह होईल.

' अहोपण, मी सूत असल्यामुळें माझ्याकडे दोष आहे,' पण ते पांडव तर क्षत्रिय आहेतना ! मग ते कां शांत बसत नाहींत ? विराटाला साह्य करण्याच्या हेतूनें ते आमच्याशीं युद्ध करावयास कां आले ? अर्जुनाची ही कृति वालिवध-प्रसंगीं रामाच्या वर्तनाप्रमाणेंच गर्ह्य आहे, असें जर म्हणशील, तर वालि व राम यांचा विरोध नसतां रामानें वालीचा वध करण्यांत कदाचित् अन्याय केला असेल, पण अर्जुनानें तुमच्या वधाची इच्छा करावी, यांत कांहींच दोष नाहीं. कारण तुम्हीं पांडवांना अतिशय पीडा दिली आहे. कीटें, मुंगी इत्यादि क्षुद्र जीवांमध्येंहि जर त्यांच्या सहनशीलतेला मर्यादा असलेली दिसून येते, तर मग मनुष्याविषयीं काय सांगावें ? याच न्यायानें द्रौपदीला दिलेले अमर्याद क्लेश पांडव कधींहि सहन करणार नाहींत, या कौरवांचा नाश करण्यासाठींच आज येथें धनंजय प्रकट झाला आहे आणि तूं तर पंडित होऊन मोठी वाचाळता चालविली आहेस ! वैराचा अंत करणारा हा पार्थ आज निःसंशय

१ यथाशक्ति मनुष्याणां शममालक्षयामहे ।
अन्येषामपि सत्त्वानामपि कीटपिपीलिकैः ॥

आमचा नाश करील. हा कुंतीपुत्र. धनंजय देव, गंधर्व, असुर व राक्षस यांच्याशीं युद्ध करण्याचा प्रसंग आला असतां भयानें कधींहि माघार घेत नाहीं. गरुड जसा वेगानें वृक्षाला पाडवूनच पुढें जातो तसा हा अतिशय क्रुद्ध होऊन संग्रामांत ज्याच्या ज्याच्या अंगावर धांवून जाईल त्या प्रत्येकाचा प्राण घेऊनच परत फिरेल.

हे राधेया, तुझ्याहून वरिष्ठ, धनुर्विद्येंत देवेंद्रासारखा पराक्रमी आणि युद्ध करण्यांत वासुदेवतुल्य असलेल्या या पार्थाचा कोण सत्कार करणार नाहीं ! हा पांडुपुत्र देवांशीं देवासारखें आणि मनुष्यांशीं मनुष्यासारखें युद्ध करितो. जो आपल्या अस्त्रानें शत्रूंच्या अस्त्रांचें प्रयोगानें निवारण करील असा अर्जुनावांचून दुसरा कोणता पुरुष आहे ! अरे, 'गुरूला पुत्राप्रमाणेंच शिष्यहि प्रिय असतो,' असें धर्मवेत्ते म्हणतात. या कारणानेंहि द्रोणाचार्यांचें अर्जुनावर प्रेम असल्यास त्यांत आश्चर्य तें कसलें ?

हे दुर्योधना, ज्याप्रमाणें तूं द्यूत खेळलास, इंद्रप्रस्थ हिरावून घेतलेंस, पांचालीला सभेंत आणलेंस, तसेंच आतां या पांडवांशीं युद्ध कर. हा तुझा शकुनिमामा मोठा बुद्धिमान् व क्षात्रधर्मांत विशारद आहे. त्या कपटद्यूत करणाऱ्या गान्धारेश्वराला आतां पार्थाशीं युद्ध करूं दे. अरे बाबा, हें गांडीव धनुष्य कृत, द्वापर या नांवाचें फासे फेंकीत नसतें बरें ! या श्रेष्ठ धनुष्यापासून जळजळीत बाण सूटत असतात, हें लक्षांत ठेव. या गांडीवापासून सुटलेले गृध्रपक्ष्यासारखे वेगवान् व पर्वतांनाहि विदीर्ण करणारे तीक्ष्ण बाण मध्यें थांबत नाहींत. यम, वायु, मृत्यु किंवा वडवाग्नि कदाचित् क्षमा करतील. परंतु क्रुद्ध झालेला धनंजय तुम्हांला क्षमा करणार नाहीं. सभेमध्यें द्यूतांत जसा तुझा मातुल तुझा साह्यकर्ता होता, तसा आतां त्या सौबलानें ज्याचें संरक्षण केलें आहे असा तूंच संग्रामांत युद्ध कर.

हे वीरहो, ज्यांची इच्छा असेल त्यांनीं युद्ध करावें, परंतु मी कांहीं धनंजयाशीं युद्ध करणार नाहीं. मत्स्यराज विराट जर गायींच्या मागोमाग आला असता तर मात्र मीं त्याच्याशीं युद्ध केलें असतें. ४. ४. ५०.

---

## अध्याय ५१ वा.

[ १ भीष्मानें द्रोण, कृप व अश्वत्थामा यांचें केलेलें सान्त्वन. २ दुर्योधन व कर्ण यांनीं द्रोणादिकांची मागितलेली क्षमा. ३ द्रोणाचा कर्तव्योपदेश. ]

( १ ) भीष्म म्हणाला—अश्वत्थाम्याचें म्हणणें योग्य आहे आणि कृपाचार्यांचेंहि मत दीर्घदर्शित्व प्रकट करणारें आहे. परंतु हा कर्ण मात्र क्षात्रधर्माला अनुसरून केवळ युद्धच करूं इच्छीत आहे. विचारी पुरुषानें द्रोणाचार्यांची निंदा करूं नये. कारण देश व काल यांचें आनुकूल्य आणि परिस्थिति जाणून युद्ध करावें, असें माझें मत आहे. हे सूर्यासारखे प्रखर पांच पांडव दुर्योधनावर प्रहार करणारे शत्रु आहेत, त्यांचा उत्कर्ष होत असलेला पाहून कोणता पंडित मोहित होणार नाहीं ? धर्मवेत्ते विद्वान्हि स्वार्थाच्या प्रसंगीं मोहित होतात. यास्तव हे राजन्, तुला जर रुचत असेल तर माझें वाक्य ऐक. कर्णानें आतां द्रोणाचार्यांची जी निंदा केली, ती युद्धाची ईर्षा उत्पन्न करण्यासाठीं होय. द्वेषानें नव्हे. यास्तव आचार्यपुत्र अश्वत्थाम्यानें त्याला क्षमा करावी. या वेळीं फार मोठें कार्य उपस्थित झालें आहे. हा काल विरोधाचा नाहीं पार्थ समीप येऊन उभा राहिला असतां आतां हे द्रौणे, तूं, द्रोणाचार्य आणि कृपाचार्य यांनीं सर्व दुरुक्तीची क्षमा करावी. 'शापादपि शरादपि ' हें दोन्ही प्रकारचें सामर्थ्य द्रोणाच्या ठिकाणीं आहे. तो जर आम्हांवर क्रुद्ध झाला, तर शाप देईल, किंवा पांडवांच्या पक्षाकडे जाऊन युद्ध करूं लागला, तरी तेंहि आम्हांला दुःखदच होईल. परंतु ब्राह्मणाचीं दिव्य अस्त्रें त्याला कलंकरूप आहेत. ब्राह्मणाची क्षमाच श्रेष्ठ होय.

हे ब्राह्मणश्रेष्ठहो, आदित्याची जशी प्रभा, तशी तुमची अस्त्रनिपुणता आहे. चंद्रापासून त्याची कांति जशी दूर करतां येत नाहीं, तसें तुमच्या ठिकाणीं ब्राह्मण्य व ब्रह्मास्त्र प्रतिष्ठित आहे. चार वेद एका ठिकाणीं आढळतात आणि क्षात्रतेज एकाचा आश्रय करितें. परंतु हा द्रोणाचार्य व त्याचा पुत्र यांच्या ठिकाणीं तीं दोन्ही वास करितात. या दोघांखेरिज अन्य कोठेंहि एका व्यक्तींत चतुर्वेद व शस्त्रास्त्रनैपुण्य एकत्र दिसून येत नाहीं. हे राजन्, वेदान्त, पुराणें व प्राचीन इतिहास यांस जाणणाऱ्या या द्रोणाहून एका परशुरामावांचून दुसरा कोण श्रेष्ठ आहे ? वेद आणि ब्रह्मास्त्र यांचें एकत्र ज्ञान याच्यावांचून

१ स्वार्थे सर्वे विमुह्यन्ति येऽपि धर्मविदो जनाः ।

अन्य कोठेंहि आढळत नाहीं. यास्तव आचार्यपुत्रानें क्षमा करावी. ही वेळ भेद करण्याची नाहीं. आपण सर्व एकत्र होऊन धनंजयाशीं युद्ध करूं या. विचारी पंडितांनीं सैन्याच्या नाशाचीं जीं कारणें सांगितलीं आहेत, त्यांत 'भेद' हें मुख्य व अनर्थावह आहे, असें म्हटलें आहे.

अश्वत्थामा म्हणाला—हे पुरुषश्रेष्ठा, आमच्या न्याय्य वचनाला तूं अशा प्रकारें निंद्य म्हणूं नको. माझ्या पूज्य पित्यानें कौरवांच्या कपटद्यूतादि दर्शनानें आलेल्या क्रोधाच्या भरांत अर्जुनाची प्रशंसा केली, त्यांत त्याचा काय दोष? शत्रूच्याहि गुणांचें ग्रहण करावें आणि गुरूचेहि दोष उघड बोलून दाखवावे. कांहीं झालें तरी गुरूनें पुत्र व शिष्य यांचें नेहमीं हितचिंतन करावें व त्याच्या हिताचाच उपदेश करावा, असा न्याय आहे. त्याला अनुसरून माझ्या पित्यानें 'आम्हीं दुर्बलांनीं विचार करूनच बलाढ्य पार्थाशीं युद्ध करावें' असा उपदेश केला.

( २ ) दुर्योधन म्हणाला—आचार्यांनीं या कर्णाला व मला क्षमा करावी आणि शांत व्हावें. त्यानें केवळ रोषामुळेंच आमची निंदा केली. आम्हांविषयींच्या द्वेषबुद्धीनें नव्हे.

( ३ ) वैशंपायन—राजा, त्यानंतर दुर्योधन व कर्ण यांनीं भीष्म व महात्मा कृप यांसह द्रोणाची क्षमा मागितली. तेव्हां द्रोण म्हणाला—"हे दुर्योधना, हा शांतनव भीष्म आरंभींच 'भेद करण्याची ही वेळ नव्हे॰' इत्यादि जें वचन बोलला, त्यानेंच मी प्रसन्न झालों. आतां आपण युद्धनीतीचा विचार करूं या. संग्रामांत ज्यायोगें पार्थ साहसानें किंवा मोहानें दुर्योधनावर चालून येणार नाहीं, अशी योजना करणें अवश्य आहे. ज्याअर्थी धनंजय प्रकट झाला आहे, त्याअर्थी पांडवांचा अज्ञातवास निःसंशय पूर्ण झाला आहे. आज जर पार्थाला गोधन परत मिळालें तर तो आपली उपेक्षा करून घरीं निघून जाईल. परंतु आपण जर गायींना अतिशय दूर नेलें व त्या जर त्याच्या हातीं लागल्या नाहींत, तर तो क्रुद्ध झालेला वीर युद्धांत आपणां सर्वांचा अंत केल्यावांचून रहाणार नाहीं. यास्तव धार्तराष्ट्राचें पार्थाशीं युद्ध होणार नाहीं व आपल्या सैन्याचा पराभव होणार नाहीं, अशी युक्ति योजिली पाहिजे.

१ शत्रोरपि गुणा ग्राह्या दोषा वाच्या गुरोरपि ।
सर्वथा सर्वयत्नेन पुत्रे शिष्ये हितं वदेत् ॥

आतां हे गांगेया, दुर्योधनानें प्रथमच म्हटल्याप्रमाणें 'पांडवांच्या अज्ञातवासाचा काल पूर्ण झाला किंवा नाहीं' याचा निर्णय करण्यास तूंच समर्थ आहेस." ४. ४. ५१.

---

## अध्याय ५२ वा.

[ १ पांडवांचा अज्ञातवासकाल चांद्रमानानें पूर्ण झाला आहे, असें भीष्मानें केलेलें उपपादन. २ पांडवपराक्रमवर्णनपूर्वक संग्राम किंवा राज्यप्रदान यांतील कांहीं तरी एक करण्याविषयीं दुर्योधनाला प्रेरणा. ३ दुर्योधनानें केलेला राज्यप्रदानाचा निषेध. ४ धेनूंसह दुर्योधनाचें स्वनगराकडे प्रेषण, व्यूहरचना व युद्धाची सज्जता. ]

( १ ) भीष्म म्हणाला—हे धार्तराष्ट्रा, काल एकरूप आहे. त्याला वास्तविक अवयव नाहींत. त्यामुळें त्याचें हीनत्व किंवा अधिकत्व मुख्य वृत्तीनें संभवत नाहीं. गौणवृत्तीनेंच त्याची गणना करावी लागते. कला, काष्ठा, मुहूर्त, दिवस, शुक्लादि पक्ष, चैत्रादि मास, अश्विन्यादि नक्षत्रें, चंद्रादि ग्रह, वसंतादि ऋतु, दक्षिणोत्तर अयनें व प्रभवादि संवत्सर, हे सर्व कालावयव कालाशीं संयुक्त होतात. या कालविभागानेंच हें कालचक्र सतत प्रवृत्त होतें. चोवीस पक्षांनीं एक चांद्रसंवत्सर होतो. त्या संवत्सरांत तीनशें चौपन दिवस असतात. सावन संवत्सर तीनशें साठ दिवसांचा होतो. हा सावन संवत्सरच द्वादश वार्षिकादि प्रतिज्ञा व गवामयनादि सत्रें यांमध्यें उपयुक्त असतो. तीनशें पासष्ट दिवस, पंधरा घटका, एकतीस पळें व तीस विपळें, हें सार संवत्सराचें प्रमाण आहे. ज्योतिर्विद् प्रायः सौर संवत्सराच्या अनुरोधानेंच वर्षप्रवेशादिक करितात. पण स्मार्त वर्धापनादि संस्कारांमध्यें चांद्र संवत्सराचेंच ग्रहण करितात.

राजा, चांद्र व सौर संवत्सरामध्यें असा जरी विशेष असला तरी या दोहोंच्या मध्यवर्ती असलेल्या सावन संवत्सराची जेव्हां गणना करितात, तेव्हां सौर संवत्सरांतील दिवसांची वृद्धि त्याबरोबर मोजतात. याप्रमाणें गणना करूं लागलें असतां तेरा वर्षांत पांच चांद्रमास, दोन दिवस, सदतीस घटका, पंचेचाळीस पळें व पंधरा विपळें अधिक होतात. त्यामुळें तेरा वर्षांचा काल पूर्ण होऊन नऊ दिवसांहूनहि कांहीं अधिक काल आज लोटला आहे. या कालाच्या आधिक्यानें व नक्षत्रांनीं केलेल्या सूर्य-चंद्रांच्या उल्लंघनानें प्रत्येक पांच वर्षांत

दोन अधिकमास येतात. कालगणनेच्या या पद्धतीनें तेरा वर्षांत एकशें छपन्न चांद्रमास होतात.

हे दुर्योधना, विजयादशमीस पांडवांचा द्यूतांत पराभव झाला व आपण आज ग्रीष्म ऋतूंत विराटाच्या गोग्रहणास प्रवृत्त झालों आहों. त्यामुळें येत्या विजयादशमीस तेरावें वर्ष पूर्ण होतें, असें तुला वाटत असेल, पण पांडव चांद्र संवत्सराच्या प्रमाणानें प्रतिज्ञेचीं तेरा वर्षें संपवून कृतकृत्य झाले आहेत. त्यांनीं वस्तुतः येत्या विजयादशमीच्या पूर्वीं पांच महिने व बारा दिवस अगोदरच प्रकट व्हावयास पाहिजे होतें, पण दर्शांतमासांतील वैशाख कृष्ण सप्तमीसच ते प्रकट झाले आहेत. ते महात्मे पंडित आहेत, यास्तव प्रतिज्ञेचा काल संपल्यावरहि कलहाला अवकाश मिळूं नये, म्हणून आणखी कांहीं दिवस अज्ञातवासांतच राहून ते आज प्रकट झाले आहेत.

---

१ भीष्मानें हा निर्णय चांद्रमतानें केला आहे. वर्ष या शब्दाचा मुख्य अर्थ चांद्रवर्ष असाच आहे. सौरमतानें पुढील कार्तिकांतील संक्रांतीस युधिष्ठिरादिकांची तेरा वर्षांची प्रतिज्ञा पुरी झाली असती. पण लौकिक व्यवहाराला अनुसरून पांडव चांद्रमतानेंच आपल्या पणाचीं वर्षें मोजित होते. त्याप्रमाणें ते बारा वर्षें पूर्ण होतांच गुप्त झाले व ज्येष्ठ कृष्ण अष्टमीस अर्जुन प्रकट झाला. आदल्या दिवशीं त्रिगर्तानें जेव्हां दक्षिण गोग्रहण केलें, त्या दिवशीं सप्तमी होती. त्याच मध्यरात्रीं त्याचें तेरावें वर्ष संपत होतें. म्हणून त्रिगर्ताशीं युद्ध करितांना युधिष्ठिरानें भीमाला 'तूं वृक्ष उपटून घेतल्यास हे त्रिगर्त तुला ओळखतील, यास्तव तूं मानुषआयुधानेंच युद्ध कर' असें सांगितलें. दुसऱ्या दिवशीं अर्जुन प्रकट झाला व त्याला दुर्योधनादिकांनीं ओळखिलें, त्यावरूनहि त्यांचें तेरावें वर्ष पूर्ण झालें होतें, हें सिद्ध होतें. कारण तें जर पूर्ण झालें नसतें, तर यम-धर्माच्या प्रभावानें दुर्योधनादिकांनीं अर्जुनाला ओळखिलें नसतें. भीष्मालाहि भ्रांति उत्पन्न झाली असती. भीष्मानें आपल्या भाषणांत 'युधिष्ठिर ज्यांचा राजा आहे, ते पांडव धर्माचरणांत प्रमाद कधींहि करणार नाहींत,' असें जें म्हटलें आहे त्याचाहि तेरा वर्षांच्या अभावीं बाध झाला असता.

पांडव शुभ दिनाच्या लोभानें दोन दिवस उशीरानें विराटनगरींत प्रकट झाले. अभिमन्यूचा उत्तरेशीं विवाह ज्येष्ठांतच झाला. पांडव प्रकट होतांच पुढील पांच-सहा दिवसांतच हा सर्व प्रकार घडला. कारण तसें जर न मानिलें, तर पुढें स्त्री-

राजा, यावरून पांडवांनीं जी जी प्रतिज्ञा केली होती, ती सर्वहि त्यांनीं अक्षरशः पाळली आहे, यांत संशय नाहीं व आपली प्रतिज्ञा पूर्ण झाली आहे, असें निश्चित जाणूनच आज बीभत्सु आपल्यासमोर आला आहे. हे पांची पांडव महात्मे व धर्मार्थज्ञ आहेत. युधिष्ठिर ज्यांचा राजा आहे ते पांडुपुत्र धर्मकार्यांत प्रमाद कसा करितील ! हे पार्थ लोभग्रस्त नाहींत. त्यांनीं आपली दुष्कर प्रतिज्ञा सिद्धीस नेली आहे. ते अधर्मानें राज्याचीहि इच्छा करणार नाहींत. ज्यावेळीं तुम्हीं कपटानें त्यांचें राज्य हरण केलेंत, त्याच वेळीं त्या कुरुनंदनांनीं आपलें राज्य परत मिळविण्यासाठीं पराक्रम करण्याची इच्छा केली असती. पण धर्मरज्जूनें बद्ध झालेले ते महात्मे आपल्या क्षत्रियधर्मापासून रेंसभरहि ढळले नाहींत.

( २ ) हे गांधारेया, कोणी या अर्जुनाला जर मिथ्या म्हणेल, तर त्याचा निःसंशय पराभव होईल. हे पांडुपुत्र मरणहि स्वीकारतील, पण असत्याचा आश्रय करणार नाहींत. हे नरश्रेष्ठ योग्य काल प्राप्त झाला असतां त्यांच्या न्याय्य वस्तूंचें इंद्रानें जरी रक्षण केलें असलें, तरी ते स्वपराक्रमानें ती परत मिळविल्यावांचून रहाणार नाहींत. यास्तव आज आपण त्या शस्त्र धारण करणारांतील श्रेष्ठ वीराशीं समरांगणांत युद्ध करूं या. या लोकीं सज्जनांनीं ज्या कल्याणाचें अनुष्ठान केलें आहे, त्याचें तूं सत्वर आचरण कर. आमच्या स्वार्थाचा अत्यंत नाश न होवो.

हे कौरवा, युद्धामध्यें निश्चित जय मीं कधींच पाहिलेला नाहीं. त्यांत आतां धनंजय येऊन पुढें उभा आहे. एकदा युद्ध प्रवृत्त झालें म्हणजे त्यांत जीवित-मरण, जय-पराजय यांतील कांहीं तरी एक अवश्य घडत असतें, ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. तस्मात् तूं युद्धाला तरी प्रवृत्त हो किंवा पांडवांशीं ऐक्य करून त्यांचा राज्यविभाग परत दे.

( ३ ) दुर्योधन—हे पितामह, मी पांडवांचें राज्य परत देणार नाहीं. यास्तव युद्धाची योजनाच सत्वर करा.

---

पर्वांत उत्तरा विलाप करतांना 'ब्रह्मदेवानें माझ्याशीं आपला सहवास सहाच महिने निश्चित केला होता. म्हणून आपण या सातव्या महिन्यांत परलोकीं गेलांत' असें म्हटलें आहे. मार्गशीर्ष शुद्ध पंचमीला अभिमन्यू युद्धांत पडला. ज्येष्ठमासापासून मार्गशीर्ष हा सातवा महिना येतो, अर्थात् येथील हा कालनिर्णय चांद्रमतानें निर्दोष आहे.

भीष्म—हे कुरुनंदना, माझा विचार जर तुला रुचत असला तर ऐक. कारण तुझ्या हिताचें वचन सांगणें हें माझें कर्तव्य आहे. आपल्या सैन्यांतील एक-चतुर्थांश सैन्य बरोबर घेऊन तूं स्वतः स्वनगरीकडे सत्वर निघून जा. एक-चतुर्थांश सैन्य गायींना घेऊन जाऊं दे आणि राहिलेलें अर्धें सैन्य घेऊन आम्ही पार्थाशीं युद्ध करूं. द्रोण, कर्ण, अश्वत्थामा, कृप व मी असे मिळून येथें आलेल्या कृतनिश्चयी धनंजयाशीं युद्ध करूं. समुद्राचें निवारण करणाऱ्या वेलेप्रमाणें, मी मत्स्यराजा किंवा प्रत्यक्ष इंद्र जरी समरांगणांत आला तरी त्याचें निवारण करीन.

( ४ ) वैशंपायन—राजा महात्म्या भीष्माचें तें वचन त्या कौरवांना रुचलें व त्या कुरुराजानें त्याप्रमाणें केलें. त्यानंतर भीष्मानें दुर्योधनाची रवानगी केली. त्याच्या मागून सर्व गोधन पाठवून दिलें आणि सैन्यांतील मुख्य योद्धयांना व्यवस्थित उभें करून व्यूहरचना आरंभिली.

भीष्म—हे द्रोणाचार्य, तूं मध्यें उभा रहा. अश्वत्थामा तुझ्या डाव्या बाजूला राहील. बुद्धिमान् कृपाचार्य उजव्या बाजूचें रक्षण करील. हा सज्ज झालेला सूतपुत्र कर्ण पुढें उभा राहील आणि मी सर्व सैन्याच्या मागें राहून सर्वांचें रक्षण करीन. ४. ४. ५२.

---

## अध्याय ५३ वा.

[ १ कौरवसेनेवर चाल करून येणाऱ्या अर्जुनानें प्रथम दोन बाण द्रोणाचार्यांच्या चरणाजवळ सोडून त्यांस केलेलें वंदन व दोन बाण आचार्यांच्या कानाजवळ सोडून केलेला कुशलप्रश्न, द्रोणानें केलेली प्रशंसा. २ सैन्यांत दुर्योधन न दिसल्यामुळें पार्थानें उत्तराला दक्षिणमार्गानें रथ नेण्याविषयीं केलेली प्रेरणा. ३ कृपानें पार्थाचा अभिप्राय जाणून त्याचा केलेला पाठलाग. ४ अर्जुनानें कुरुसैन्याचा पराभव केला असतां धेनूंचें निवर्तन. ]

( १ ) वैशंपायन—हे भारता, भीष्माच्या आज्ञेप्रमाणें सर्व कौरवसैन्य व्यूह रचना करून उभें राहिलें असतां अर्जुन आपल्या रथघोषानें दाही दिशा दुमदुमून सोडीत मोठ्या त्वरेनें तेथें आला. तेव्हां त्याच्या रथध्वजाचें अग्र दिसूं

लागलें. आकर्ण आकर्षण केलेल्या गांडीवधनुष्याचा टणत्कार आणि रथचक्राचा महाशब्द ऐकूं आला. त्यावेळीं गांडीव धारण करणाराच महारथ येत आहे असें पाहून द्रोणाचार्य सर्वांकडे अवलोकन करीत म्हणाला—

"हे वीरहो, पार्थाच्या ध्वजाचें अग्र दुरून झळकत आहे. हा रथघोष व रथस्थ वानराचा भुभूत्कार ऐकूं येत आहे. हा रथिश्रेष्ठ या उत्कृष्ट रथांत उभा राहून आपलें विजेसारखा शब्द करणारे गांडीव धनुष्य आकर्ण ओढीत आहे. हे पहा, हे दोन बाण माझ्या पायाजवळ येऊन पडले आणि हे दुसरे दोन माझ्या दोन्ही कानांजवळून निघून गेले. अहो, वनांमध्यें राहून अतिमानुषकर्म करणाऱ्या या पार्थानें माझ्या पायांजवळ शर सोडून मला वंदन केलें आणि कानाजवळ बाण सोडून कुशलप्रश्नपूर्वक जणुंकाय युद्धाची अनुज्ञाच घेतली. हा बुद्धिमान्, बांधवप्रिय अतिशय कांतिमान् पांडुपुत्र धनंजय आज दीर्घ कालानें आमच्या दृष्टीं पडला. यज्ञामध्यें आज्याहुतींनीं उद्दीपित झालेला अग्नि जुहूप्रभृति उपकरणांनीं जसा शोभतो, त्याप्रमाणें रथ, शर, तलत्राण, बाणांचे भाते, शंख, पताका, कवच, किरीट, खड्ग व धनुष्य यांनीं युक्त असलेला हा पार्थ शोभत आहे.

(२) राजा जनमेजया, द्रोणाचार्य याप्रमाणें बोलत असतां इकडे वेगानें येणारा अर्जुन आपल्या सारथ्याला म्हणाला—"हे विराटपुत्रा, जेथून सोडलेले बाण शत्रूच्या सैन्यावर जाऊन पडतील अशा स्थानीं रथ नेऊन अश्वांचें नियमन कर, म्हणजे मी अगोदर या शत्रुसैन्यांत तो कुरुकुलाधम दुर्योधन कोठें आहे तें पहातों, आणि या सर्व भीष्म-द्रोणादि महारथांची उपेक्षा करून त्या अतिमानी धार्तराष्ट्राच्या मस्तकावर प्रहार करितों. कारण त्याला एकट्याला जिंकिलें असतां हे सर्व सहजच पराभूत होतील. येथें मोठालीं धनुष्यें धारण करणारे हे द्रोण व अश्वत्थामा उभे आहेत. त्यांच्या मागें भीष्म, कृप व कर्ण दिसत आहेत. परंतु तो राजा मात्र कोठें दृष्टीं पडत नाहीं. यावरून तो आपला जीव वांचविण्यासाठीं गायींना घेऊन दक्षिणमार्गानें चालला असावा, असें मला वाटतें. यास्तव हे उत्तरा, आतां या रथसमूहाला सोडून दुर्योधन ज्या मार्गानें जात आहे, तिकडेच रथ चालीव. मी तेथेंच युद्ध करीन. कारण आमिषावांचून युद्ध करणें व्यर्थ आहे. त्या कौरवाला जिंकून गायींना घेऊन मी परत फिरेन.

**वैशंपायन**—राजा, अर्जुनाचें हें वचन ऐकून विराटपुत्रानें प्रथम जो रथ मोठ्या यत्नानें अश्वांना आवरून थांबविला होता, तो त्यानें पुनः चालविला. आपल्या हातांतील लगाम ओढून अश्वांना चालण्याची प्रेरणा केली व जिकडे दुर्योधन गेला होता, त्या बाजूला त्यांना वळविलें.

( ३ ) हे पारिक्षिता, याप्रमाणें धनंजय आपल्या समोर युद्धार्थ सज्ज असलेला रथसमूह सोडून निघून जात आहे, असें पाहतांच कृपाचार्यानें त्याचा अभिप्राय जाणला व तो म्हणाला—" हे वीरहो, दुर्योधनावांचून असलेल्या या सैन्यांत हा अर्जुन उभें राहण्याचीहि इच्छा करीत नाहीं. यास्तव वेगानें जाणाऱ्या त्याच्या मागोमाग आपण सर्व जाऊं या. अतिशय क्रुद्ध झालेल्या या पार्थापुढें संग्रामांत एकटा दुर्योधन टिकाव धरणार नाहीं. सहस्राक्ष इंद्र, देवकीपुत्र वासुदेव, किंवा पुत्रासह महारथ द्रोणाचार्य यांवांचून अन्य कोणीहि या सव्यसाची धनुर्धराशीं युद्ध करण्यास समर्थ नाहीं. अहो, पार्थरूपी जलामध्यें राजा दुर्योधन नौकेप्रमाणें बुडाल्यानंतर आपल्याला गायी किंवा विपुल धन घेऊन काय करावयाचें आहे !

( ४ ) राजा, इतक्यांत धनंजय गायींचें रक्षण करणाऱ्या सैन्यापर्यंत जाऊन पोंचला. त्यानें त्या सैन्याला प्रथम स्वतःचें नांव ऐकविलें आणि टोळधाडीप्रमाणें त्या सेनेला सत्वर शरांनीं व्यापून टाकिलें. पार्थानें सोडलेल्या शरांनीं आवृत झालेल्या त्या योद्ध्यांना त्याच्या बाणांनीं आच्छादित झालेली भूमि व अन्तरिक्ष यांतील कांहींच दिसेनासें झालें. युद्धामध्यें पतन पावणाऱ्या त्या सैनिकांना पळून जाण्याचीहि बुद्धि सुचली नाहीं. ते मनांत पार्थाच्या चपलतेचीच प्रशंसा करूं लागले. त्यावेळीं धनंजयानें शत्रूंच्या अंगावर रोमांच आणणारा भयंकर शंखनाद केला आणि आपलें श्रेष्ठ धनुष्य आकर्ण ओढून ध्वजावरील भूतांना प्रेरणा केली. त्यांच्या प्रचंड शंखनादानें, रथचक्राच्या घोषानें, गांडीव धनुष्याच्या टणत्कारानें आणि ध्वजावर रहाणाऱ्या अमानुष भूतांच्या गर्जनेनें पृथ्वी कांपूं लागली. तो भयंकर ध्वनि ऐकून धेनूंचें सर्व खिल्लार हंबरूं लागलें. त्या सर्व धेनु पुच्छें वर करून दक्षिण दिशेकडे वळल्या आणि वेगानें पळत सुटल्या व त्या सर्व गायी पुनः विराटनगरींत जाऊन पोंचल्या. ४. ४. ५३.

---

## अध्याय ५४ वा.

[ १ अर्जुनाचें कौरवसैन्याशीं तुमुल युद्ध. २ कर्णाच्या भ्रात्याचा वध. ३ कर्णाशीं युद्ध व त्याचें पलायन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भरतसत्तमा, याप्रमाणें कौरवसेनेचा पराभव करून गायींना जिंकून तो धनुर्धरांतील अग्रणी पार्थ पुनः युद्धाच्या इच्छेनें दुर्योधनाच्या संमुख गेला. तेव्हां मत्स्यराजाच्या धेनु वेगानें स्वनगरीस परत गेल्या असतां पार्थ कृतकृत्य झाला आहे हें कौरववीरांनीं जाणलें आणि तो आतां दुर्योधनावर चाल करून येत आहे, असें पाहून ते सर्व वीर मोठ्या त्वरेनें त्याच्याकडे धांवून आले.

राजा, त्यावेळीं शत्रूंचा संहार करणारा अर्जुन कौरवांचें अनेक ध्वजांनीं युक्त व दृढ व्यूह रचून उभें असलेलें विस्तीर्ण सैन्य पाहून मत्स्यपुत्र उत्तराला हांक मारून म्हणाला—" हे वैराटे, सुवर्णमय लगाम असलेल्या या श्वेत अश्वांना या मार्गानें अतिशय वेगानें नेण्याचा प्रयत्न कर म्हणजे मी या सर्व कुरुमुख्यांशीं जाऊन भिडतों. एक गज जसा दुसऱ्या गजाशीं झुंझण्याची इच्छा करितो, तसा हा दुरात्मा सूतपुत्र माझ्याशीं युद्ध करण्याची इच्छा करीत आहे. हे राजपुत्रा, दुर्योधनाच्या आश्रयामुळें तो नीच सूतपुत्र उन्मत्त झाला आहे, यास्तव त्या कर्णाकडेच मला घेऊन चल."

जनमेजया, पार्थाचें हें वचन ऐकतांच त्या विराटपुत्रानें आपले सुवर्णाच्या पट्टयांनीं युक्त असलेले, वायुसारखे वेगवान् व धिप्पाड अश्व त्वरेनें चालविले आणि कौरवांच्या रथसैन्याचा व्यूह फोडून अर्जुनाला सैन्याच्या मध्यभागीं नेऊन उभें केलें. तेव्हां कर्णाचा जीव वांचविण्याची इच्छा करणारे चित्रसेन, संग्रामजित्, शत्रुसह व जय हे दुर्योधनाचे चौघे महारथ भ्राते आपल्या 'विशिख-विपाठ'-संज्ञक बाणांचा वर्षाव करीत पार्थावर तुटून पडले. त्यावेळीं अग्नि जसा वनाला जाळून टाकितो, तसा धनुष्य हीच ज्याची ज्वाला आहे व बाणांचा वेग हीच ज्याची धग आहे, अशा त्या पुरुषश्रेष्ठ क्रुद्ध पार्थाग्नीनें कौरवांचा रथसमुदाय दग्ध करून टाकिला.

याप्रमाणें त्यांचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें असतां कौरववीर विकर्ण आपल्या भयंकर 'विपाठ'-बाणांचा वर्षाव करीत भीमानुज पार्थावर रथांतून धांवून आला. तेव्हां अर्जुनानें विकर्णाचें सुवर्णाग्रानें भूषविलेलें व दृढ प्रत्यंचेनें युक्त

असलेलें धनुष्य तोडून त्याच्या रथावरील ध्वजहि हालवून भूमीवर पाडविला. तसा तो छिन्नध्वज झालेला विकर्ण लज्जित होऊन संग्रामांतून मोठ्या त्वरेनें निघून गेला.

हा पराभव शत्रुंतपाला सहन झाला नाहीं. त्यानें अतिमानुषकर्मे करणाऱ्या पार्थाला शरवृष्टीनें पीडा दिली. त्यावेळीं तो राजा आपल्यावर शरवर्षाव करीत आहे, हें पहातांच कौरवसैन्यांत संचार करीत असलेल्या व शत्रुसैन्याला निस्तेज करणाऱ्या त्या कौंतेयानें कवचाचा भेद करणारे पांच तीक्ष्ण बाण शत्रुंतपावर मोठ्या वेगानें सोडले आणि दहा बाणानें त्याच्या सारथ्याचा वध केला. त्यावेळीं वायूनें भग्न झालेला वृक्ष पर्वतशिखरावरून जसा खालीं पडतो तसा धनुर्धर पार्थाच्या कवचभेदी शरांनीं विद्ध झालेला तो शत्रुंतप राजा गतप्राण होऊन भूमीवर पडला. तेव्हां प्रचंड झंझावातानें महावनें जशीं कांपूं लागतात, तसे समरांगणांत त्या नरश्रेष्ठाच्या तीव्र शरवृष्टीनें पराजय पावलेले वीर कांपूं लागले.

राजा, त्या समरभूमीवर उत्तम वेष धारण केलेले अनेक वीर गतप्राण होऊन पडले. पार्थानें हिमालयावरील गजेंद्रासारखे विशाल, इंद्रासारखे पराक्रमी, उदार व सुवर्णाचीं कवचें धारण करणारे असंख्य योद्धे रणामध्यें पराभूत केले. याप्रमाणें समरामध्यें शत्रूंचा संहार करणारा व गांडीव धनुष्य धारण करणारा तो नरश्रेष्ठ ग्रीष्म ऋतूंत अग्नि जसा वनाला दग्ध करितो, तसा दिशा व विदिशा जणुंकाय जाळीतच रणामध्यें संचार करूं लागला. वसंत ऋतूंत गळून पडलेलीं पानें किंवा मेघ यांना वायु जसा उडवून देतो, तसा अतिरथ किरीटी शत्रूंचा धुव्वा उडवीत रणांगणांत रथांतून फिरूं लागला.

(२) त्यानंतर किरीटीनें कर्णाचा जो बलाढ्य भ्राता शोणाश्ववाह संग्रामजित्, त्याच्या अश्वांचा वध करून एकाच शरानें त्याचाहि शिरश्छेद केला. तेव्हां एखादा गजेंद्र जसा आपल्या दंतांनीं पर्वतशिखरावर प्रहार करण्यास धांवतो, किंवा व्याघ्र जसा वृषभावर झडप घालतो, तसा आपल्या भ्रात्याचा वध झालेला पहातांच उत्साह धारण करणारा सूतपुत्र कर्ण अर्जुनावर धांवून गेला. त्यानें पांडुपुत्रावर मोठ्या वेगानें बारा शर सोडिले आणि त्याच्या सर्व अश्वांच्या गात्रांना व विराटपुत्राच्या हस्ताला तीव्र बाणांनीं वेध केला. याप्रमाणें त्या वैकर्तनानें एकदम चाल केलेली पहातांच विचित्र पंख असलेला वेगवान् गरुड जसा सर्पावर झडप घालितो, तसा अर्जुन त्याच्यावर वेगानें तुटून पडला.

(३) राजा जनमेजया, त्या धनुर्धरांतील श्रेष्ठ व बलाढ्य पार्थ व कर्ण या दोघां शत्रूंचें अपूर्व युद्ध पाहून सर्व कौरव युद्धापासून निवृत्त झाले व प्रेक्षकांसारखे स्वस्थ उभे राहिले. ज्यानें आपले अनंत अपराध केले आहेत, असा कर्ण समीप आलेला पहातांच पांडुपुत्राचा क्रोधाग्नि भडकला व त्यानें शरांचा घोर वर्षाव करून एका क्षणांत अश्व, रथ व सारथि यांसह कर्णाला मोठ्या हर्षानें झांकून टाकिलें.त्यावेळीं अर्जुनानें शरवृष्टीनें भीष्मादि सर्व योद्धयांना त्यांचे रथ, अश्व व गज यांसह आच्छादित केलें. तेव्हां रथ व गज यांसह अतिशय विद्ध झालेले कौरवांचे योद्धे मोठ्यानें आक्रोश करूं लागले. तो महात्मा वीर कर्णहि धनुष्य-बाण धारण करून अर्जुनाच्या हातांतून सुटलेल्या शरांचा विस्फुलिंगयुक्त अग्नीप्रमाणें आपल्या बाणवृष्टीनें वेगानें प्रतिकार करीत उभा राहिला. तेव्हां कर्णाची प्रशंसा करणाऱ्या कौरवांच्या टाळ्या, शंख-भेरीप्रभृति वाद्यें, वीरांचा सिंहनाद व धनुष्यांचा टणत्कार यांचा प्रचंड ध्वनि झाला.

राजा, ज्याच्या रथावर वानराचें उभारलेलें पुच्छ हाच महाध्वज आहे, ज्याच्या रथाग्रावर भीषण महाभूतें स्थित आहेत व जो मेघाच्या गडगडाटासारखा गांडीव धनुष्याचा प्रचंड टणत्कार करीत आहे, अशा अर्जुनाला पाहून कर्णानें सिंहनाद केला. तेव्हां पार्थानें पितामह भीष्म, द्रोण व कृप यांकडे पहात रथ, अश्व व सारथि यांसह कर्णावर शरवृष्टि करून त्याला अतिशय पीडित केलें. त्यावेळीं कर्णानेंहि पार्थावर मेघाप्रमाणें असंख्य बाणांचा वर्षाव केला. धनंजयानेंहि आपल्या तीक्ष्ण शरांनीं ते सर्व बाण तोडून टाकिले. याप्रमाणें त्या रणांगणांत महान् शस्त्रास्त्रांचा वर्षाव व त्यांचा छेद चालला असतां, मेघसमूहांच्या मध्य-भागीं असलेले चंद्र-सूर्य जसे दिसतात, तसे पार्थ व कर्ण हे दोघे धनुंधर बाणांनीं व्याप्त झालेल्या रथांत शोभले.

त्यानंतर असहिष्णु वेगवान् कर्णानें किरीटीच्या चारी अश्वांना तीक्ष्ण बाणांनीं वेध केला. तीन शर त्याच्या सारथ्यावर व तीन ध्वजावर मोठ्या वेगानें सोडले. तें पहातांच सुप्त सिंहाला जसें जागें करावें, तसा समरामध्यें शत्रूंचें मर्दन करणारा तो कुरुश्रेष्ठ गांडीवधन्वा जिष्णु कर्णावर धांवून गेला,आणि शर व अस्त्र यांच्या वृष्टीनें पीडीत झालेल्या व अतिमानुष कर्म करणाऱ्या त्या महात्म्या पार्थानें सूर्य जसा आपल्या किरणजालांनीं या लोकाला व्यापून टाकितो, त्याप्रमाणें कर्णाचा रथ शरांनीं व्याप्त करून टाकिला. एका गजेंद्रानें प्रहार

केलेल्या दुसऱ्या मत्त गजेंद्राप्रमाणें सूतपुत्रानें वेध केलेल्या अर्जुनानें आपल्या भात्यांतून 'भल्ल'-संज्ञक तीक्ष्ण बाण काढिले व गांडीव धनुष्य आकर्ण ओढून सूतपुत्राच्या शरीरावर सर्वत्र प्रहार केले. त्याची मान, हस्त-पादादि प्रधान अंगें, मस्तक, ललाट इत्यादि सर्व अवयवांस गांडीवापासून सोडलेल्या विद्युत्तुल्य तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें. तेव्हां एका गजानें जिंकिलेल्या दुसऱ्या गजाप्रमाणें पार्थाच्या बाणांनीं विद्ध झालेला कर्ण रणभूमि सोडून सैन्याच्या पृष्ठभागीं निघून गेला. अर्जुनाच्या विद्युत्पातासारख्या बाणांनीं त्याचें सर्व शरीर संतप्त झालें. ४. ४. ५४.

---

## अध्याय ५५ वा.

[१ पार्थानें केलेला कुरुसैन्याचा विध्वंस व कृपाचार्यादिकांच्या रथादिकांचें वर्णन.]

(१) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें राधेय कर्णाचा पराभव झाला असतां दुर्योधनप्रभृति योद्धे सैन्यासह हळुहळू पार्थाच्या समीप येऊं लागले. त्यावेळीं वेला जसें समुद्राचें धारण करते, त्याप्रमाणें अनेक प्रकारची व्यूहरचना करून येणाऱ्या कौरवसेनेच्या वेगाचें पार्थानें आपल्या शरांच्या योगानें निवारण केलें व दिव्य अस्त्रांचा प्रयोग करणारा रथसत्तम श्वेतवाहन पार्थ हंसतच त्यांच्यासमोर गेला. नंतर आदित्य आपल्या किरणांनीं समग्र पृथ्वीला ज्याप्रमाणें आच्छादित करतो, त्याप्रमाणें त्यानें गांडीवधनुष्यापासून सुटलेल्या शरांनीं दाही दिशा झांकून टाकिल्या. योद्धयांचे रथ, अश्व, गज व कवचें यांमध्यें शेकडों बाणांनीं विद्ध न झालेलें असें दोन अंगुलांचेंहि अंतर राहिलें नाहीं.

भारता, कौंतेयाचा दिव्ययोग, वीर्य व अति चापल्य; उत्तराच्या अश्वांची शिक्षाशिल्पनिपुणता आणि अस्त्राचा प्रयोग हें पाहून शत्रूंनीं पांडुपुत्राचा बहुमान केला. राजा त्यावेळीं शत्रूंचे वीर प्रजेला दग्ध करणाऱ्या कालाग्नीप्रमाणें किंवा प्रज्वलित अग्नीप्रमाणें आपल्या सैन्याचा दाह करणाऱ्या पार्थाकडे पाहाण्यासहि समर्थ झाले नाहींत. पर्वतशिखरासमीप आलेलीं अचंचल अभ्रें सूर्यकिरणांनीं जशीं शोभतात, तशी अर्जुनानें सोडलेल्या शरांनीं ग्रस्त झालेली कौरवसेना शोभली. हे राजेंद्रा, पुष्पांनीं आच्छादिलेलीं अशोकवृक्षांचीं वनें जशीं शोभिवंत दिसतात, तसें पार्थाच्या बाणांनीं कौरवसैन्य शोभलें.

कौंतेयाच्या बाणांनीं उडविलेल्या शत्रुसैनिकांच्या गळ्यांतील सोनचाफ्याच्या माला आणि कौरवांच्या पताका व छत्रें वायूनें वरच्यावर आकाशांतच धारण केलीं. कारण मध्यें अर्जुनाच्या शरांचें जाळें पसरल्यामुळें तीं खालीं येऊं शकलीं नाहींत. पार्थानें कौरवांच्या रथांच्या धूरा छेदून टाकिल्या. तेव्हां सैन्याच्या पराभवानें त्रस्त झालेले अश्व रथांचे अवशिष्ट भाग घेऊनच दश-दिशांत पळूं लागले. अर्जुनानें कौरवसेनेच्या अग्रभागीं असलेल्या गजांचा कर्णादि प्रदेशीं व मर्मस्थानीं वेध करून संहार केला. त्यावेळीं आकाश जसें सजल काळ्या मेघांनीं व्याप्त होतें, तशी भूमि एका क्षणांत मृतगजांच्या देहांनीं आच्छादित झाली. प्रलयकालचा प्रदीप्त अग्नि सर्व स्थावर-जंगम पदार्थांना जसा दग्ध करितो, तसा पार्थानें समरामध्यें सर्व शत्रूंचा दाह केला.

हे महाराज, त्यानंतर बलवान् परंतप पार्थानें आपल्या सर्व अस्त्रांच्या तेजानें, गांडीवाच्या टणत्कारानें, ध्वजावरील अमानुष भूतांच्या शब्दानें, वानराच्या भयंकर भूत्कारानें आणि देवदत्त शंखाच्या प्रचंड नादानें दुर्योधनाच्या त्या सैन्याला भयभीत करून सोडिलें.

महाबाहु धनंजयाला अकस्मात् पाहिल्यामुळें त्या सैन्याचा अगोदरच शक्तिपात झाला होता. इतक्यांत तो महावीर साहसानें युद्धासाठीं त्यांच्या समीप आला, त्यामुळें तर त्यांचें शरीरसामर्थ्य सर्वथा नष्ट झालें. पक्षी जसे आकाशाला आच्छादित करितात, तसें अर्जुनानें शत्रूंचें रक्त प्राशन करणाऱ्या तीव्र अग्रांच्या शरसमूहांनीं अंतरिक्षाला आवृत केलें. एखाद्या पात्रांत प्रखर सूर्यकिरणें अवकाशाच्या अभावीं जशीं संकोच पावतात, तसे पार्थाचे शर आकाशांतहि मावूं शकले नाहींत.

हे पारिक्षितराजा, सव्यसाची पार्थाच्या रथासमीप येण्याची संधि शत्रूला एकदाच व एक क्षणभरच मिळत असे. कारण अर्जुनाच्या पुढें येतांच त्याला यमलोकाची प्राप्ति होत असे. पुनः परत येण्यास तो योद्धा जिवंतच रहात नसे. तो धनुर्धर रथस्थ वीरांना त्यांच्या अश्वासह पहातां पहातां शरवृष्टीनें परलोकीं पाठवीत असे. बीभत्सूचे बाण शत्रुशरीरांत सक्त न होतां, त्यांना विद्ध करून जसे परत येत असत, तसाच त्या वीराचा रथहि शत्रूसैन्यांत अडकून न रहातां सर्वत्र अप्रतिहत संचार करीत होता. त्याच्या शराप्रमाणेंच रथाची गति कोठेंहि कुंठित झाली नाहीं.

हे नृपश्रेष्ठा, अनंत फणा असलेला नाग आपल्या क्रीडेनें जसा महासागराला क्षुब्ध करितो, तसें अर्जुनानें शत्रुसैन्याला सहज लीलेनें क्षुब्ध केलें.

भूतांनीं पूर्वी कधींहि न ऐकलेला, बाणांची सतत वृष्टि करणारा व इतर सर्व ध्वनींना लोपविणारा किरीटीच्या धनुष्याचा टणत्कार ऐकिला. धनंजयानें थोडथोड्या अंतरावर मारलेल्या शरांनीं विद्ध झालेले गज सूर्यकिरणांनीं व्याप्त झालेल्या सजल मेघांप्रमाणें भासले. डाव्या व उजव्या अशा दोन्ही हातांनीं अतिशय वेगानें बाणवृष्टि करीत सर्व दिशांमध्यें भ्रमण करणाऱ्या पार्थाचें धनुष्य अलातचक्राप्रमाणें शोभलें. राजा, दृष्टि जशी मनोरम पदार्थावरच खिळते, तसे त्या गांडीवधन्व्याचे शर लक्ष्याचाच वेध करीत, अन्यत्र जात नसत. हत्तीचा कळप वनांतून जाऊं लागला म्हणजे त्याच्या मार्गांत येण्यास जसा दुसरा कोणताहि प्राणी धजत नाहीं, तसा त्या युद्धांत विजयाच्या रथ-मार्गांत कोणीहि येऊं शकला नाहीं.

हे भारता, कौंतेयानें समरांत पराभूत केलेले शत्रु 'खरोखर पार्थाच्या जयाची इच्छा करणारा हा इंद्रच सर्व देवांसह आम्हांवर प्रहार करीत आहे,' असें समजले. त्या रणांगणांत बीभत्सु सर्वांचा संहार करीत असतां 'अर्जुन-रूपानें हा साक्षात् काळच प्रजेला ग्राशीत आहे,' असें ते योद्धे मानूं लागले. त्या धनुर्धर पांडुपुत्रानें कौरवसैन्याचा जो नाश केला, तो अनुपमेय होय. राम-रावणांच्या अद्वितीय युद्धाप्रमाणें, या युद्धाला पार्थाच्या युद्धाचीच उपमा देणें योग्य आहे.

राजा, व्रीह्यादिकांच्या रोपांना कणिस आलें असतां, त्याचा अग्रभाग जसा वांकतो, त्याप्रमाणें कौरवसेनेंतील शत्रूंचीं मस्तकें पराक्रमी अर्जुनाच्या भयानें नम्र झालीं. पार्थरूपी वायूनें हालवलेलीं अर्जुनशत्रूंचीं वनें रक्ताच्या धारांनीं पृथ्वीला लाल भडक करूं लागलीं.

वायूनें उडविलेल्या रक्तमिश्रित धूलीमुळें सूर्यकिरणेंहि तांबडीं लाल दिसूं लागलीं. सूर्यासह आकाश तत्काल संध्येप्रमाणें तांबडें झालें. संध्यासमयीं सूर्यहि अस्ताला जातो, परंतु पार्थ युद्धांतून निवृत्त होत नाहीं. त्या अचिं-त्यात्म्या शूरानें समरांत स्वपराक्रमानें स्थित असलेल्या धनुर्धरांवर दिव्य अस्त्रांचा प्रहार केला. त्या पृथापुत्रानें द्रोणावर ज्याहत्तर, दुःसहावर दहा, अश्व-त्थाम्यावर आठ, दुःशासनावर बारा, शारद्वत कृपावर तीन, शांतनव भीष्मा-वर साठ, आणि दुर्योधनावर शंभर तीक्ष्ण बाण सोडिले.

राजा, त्यानंतर परंतप अर्जुनानें महाधनुर्धर कर्णाच्या कर्णप्रदेशीं ' कर्णि '-नांवाच्या बाणानें वेध केला. याप्रमाणें रथ, अश्व व सारथि यांचा वध होऊन तो सर्व अस्त्रविशारद कर्ण विरथ झाला असतां त्याचें सैन्य पळूं लागलें. तरी पार्थ रथांत तसाच स्थित आहे, हें पाहून व त्याचा आशय ओळखून विराटपुत्र त्याला म्हणाला—" हे जिष्णो, मज सारथ्यासह या उत्कृष्ट रथावर आरूढ होऊन तूं कोणत्या सैन्याशीं युद्ध करणार आहेस ? तूं सांगशील तेथें मी तुला नेतों. "

अर्जुन म्हणाला—हे राजपुत्रा, व्याघ्रचर्मानें परिवेष्टित अशा ज्या या तांबड्या अश्वानें युक्त असलेल्या शुभ चिह्नाला तूं पहात आहेस व नीलपताकेचा आश्रय करून जो रथावर स्थित आहे, तो कृपाचार्यांच्या सैन्याचा ध्वज आहे, यास्तव त्या वृद्ध आचार्यांच्या समोर मला ने. त्या दृढ धनुर्धराला आज मी माझीं शीघ्रास्त्रें दाखवीन. हे उत्तरा, ज्याच्या ध्वजावर सुवर्णाच्या शुभ कमंडलूचें चिह्न झळकत आहे, तोच हा सर्व शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ द्रोणाचार्य होय. सर्व शस्त्रधारी वीरांमध्यें मला हा सर्वदा मान्य आहे. यास्तव या सुप्रसन्न महावीराच्या उजव्या बाजूनें रथ चालीव. या द्रोणाचार्यांच्या रथासमीप येतांच मी रथांतून उतरून प्रथम त्यास नमस्कार करितों व पुनः रथारूढ होऊन युद्धाला सज्ज होतों. हे विराटपुत्रा, हा सनातन धर्म आहे. हा द्रोण जर माझ्यावर प्रथम प्रहार करील, तरच मी त्याच्यावर शर सोडीन. म्हणजे तो क्रुद्ध होणार नाहीं.

हे वैराटे, या द्रोणाचार्यांच्या जवळच ज्याच्या ध्वजाग्रावर धनुष्याचें चिह्न दिसत आहे, तो हा आचार्यपुत्र महारथ अश्वत्थामा होय. शस्त्रधारण करणाऱ्या सर्व योद्ध्यांमध्यें मला हाहि सदैव मान्य आहे. याच्या समीप रथ नेऊन तो पुनः पुनः परत फिरीव.

हे सारथे, या सैन्याच्या तिसऱ्या विभागांत मध्यभागीं उत्साहानें उभा असलेला आणि ज्याच्या ध्वजाग्रावर सुवर्णगजचिह्नांकित पताका फडकत आहे, तो हा धृतराष्ट्रात्मज श्रीमान् राजा दुर्योधन होय. हे वीरा, हा राजा मोठा प्रमाथी व युद्धदुर्मद आहे. शत्रुरथाचें चूर्ण करणारा तुझा हा उत्तम रथ याच्या अभिमुख घेऊन चल. हा दुर्योधन द्रोणशिष्यामध्यें शीघ्रास्त्रांत अग्रेसर मानिलेला आहे. यास्तव मीं आतां याला या युद्धामध्यें माझें विपुल शीघ्रास्त्र दाखवितों.

हे विराटनंदना, ज्याच्या ध्वजाग्रावर सुवर्णाच्या हस्तिशृंखलेचें चिह्न आहे, तो हा कर्ण तूं पूर्वीच पाहिलेला आहेस. या राधेयाच्या समीप रथ जातांच तूं अतिशय दक्ष रहा. कारण तो दुरात्मा युद्धामध्यें नेहमीं माझ्याशीं स्पर्धा करीत असतो.

हे नृपसुता, हा जो रथ पांच तारांनीं चिह्नित झालेल्या नील पताकेनें युक्त आहे, तो तूं लक्षपूर्वक पहा. त्यांत हस्तत्राण घातलेला व मोठें धनुष्य धारण करणारा जो पराक्रमी वीर बसला आहे, त्याच्याकडेहि तूं दृष्टि दे. ज्याच्या श्रेष्ठ रथावर तारका व सूर्य यांचें चित्र काढलेला हा ध्वज आहे, ज्याच्या मस्तकावर हें शुभ्र व निर्मल छत्र झळकत आहे, मेघसमूहांत जसा सूर्य प्रकाशतो, तसा नानाध्वजपताकांनीं युक्त असलेल्या या विस्तीर्ण सेनेमध्यें जो प्रामुख्यानें दिसत आहे, ज्याच्या अंगांतील सुवर्णाचें कवच चंद्रसूर्याप्रमाणें देदीप्यमान दिसत आहे व ज्याच्या मस्तकावर सुवर्णाचें शिरस्त्राण आहे, तो हा आम्हां सर्वांचा पितामह शांतवन भीष्म आहे. हा महात्मा राजश्रीनें अतिशय वृद्धि पावलेला असूनहि दुर्योधनाच्या अधीन होऊन राहिला आहे, त्यामुळें माझ्या मनाला फार खेद होतो. आपण याच्यावर मागाहून चाल करून जाऊं. कारण तो माझ्या युद्धामध्यें विघ्न आणणार नाहीं. पण हे वैराटे, मी जेव्हां याच्याशीं युद्ध करूं लागेन, तेव्हां तूं अश्वांचें मोठ्या प्रयत्नानें नियमन कर.

राजा जनमेजया, अर्जुनाची ही आज्ञा शिरसा मान्य करून विराटपुत्र अर्जुनाला मोठ्या उत्साहानें, कृप जेथून युद्ध करीत होता, तेथें घेऊन गेला. ४. ४. ५५.

---

## अध्याय ५६ वा.

[ १ कौरव व अर्जुन यांचें युद्ध पहाण्यासाठीं विमानस्थ देवादिकांचें आकाशांत आगमन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, ग्रीष्म ऋतूच्या शेवटीं मंदवायूनें मेघ जसे सावकाश सरकत असतात, तशीं उग्रधनुष्यें धारण करणाऱ्या कौरवांची चतुरंग सेना हळु हळू पुढें येत असलेली दिसली. ज्यावर प्रहार करणारे योद्धे आरूढ झाले आहेत असे अश्व पार्थाच्या समीप येऊन उभे राहिले. ज्यांवर माहुत आरूढ

झाले आहेत व जे तोमर आणि अंकुश यांनीं प्रेरित झाले आहेत असे विचित्र कवचांनीं शोभणारे विशाल गजहि तेथेंच आले. त्यावेळीं सर्व देव व मरुद्गण यांसह इंद्र विमानांत बसून अंतरिक्षांत आला. तेव्हां देव, यक्ष, गंधर्व, सर्प यांनीं व्याप्त झालेलें निरभ्र आकाश ग्रहमंडलानें युक्त असल्याप्रमाणें शोभलें.

हे राजन्, कृप व अर्जुन यांचें भयंकर महायुद्ध पहाण्यासाठीं सर्व देव पृथक् पृथक् विमानांतून आले. देवराज इंद्राच्या विमानाला एक कोटी सुवर्णांचे खांब होते. त्यांनीं रत्नजडित प्रासाद धारण केला होता. तें सर्व रत्नमय व कामगामी दिव्य विमान आकाशांत शोभूं लागलें. त्या विमानांत इंद्राबरोबर आठ वसु, अकरा रुद्र, द्वादश आदित्य व दोघे अश्विनिकुमार हे तेहतीस देव, उग्रसेनादि गंधर्व, राक्षस, पितर, महर्षि आणि वसुमना-सगर इत्यादि अनेक राजे दिसत होते.

त्याचप्रमाणें अग्नि, ईश, सोम, वरुण, प्रजापति, कुबेर, यम, धाता, विधाता, तुम्बुरु या सर्वांचीं विमानें यथाक्रम योग्य स्थलीं प्रकाशत होतीं. याशिवाय इतर देवांचे समूह, सिद्ध व श्रेष्ठ ऋषि अर्जुन आणि कौरव यांचें युद्ध पहाण्यास आले होते. त्यावेळीं हे भारता, वसंत ऋतूच्या आरंभीं वनांचा सुवास जसा सर्वत्र पसरतो, त्याप्रमाणें त्या सर्वांनीं धारण केलेल्या दिव्य पुष्पमालांचा पुण्य सुगंध सर्वत्र पसरला होता. विमानस्थ देवांचे रत्नजडित अलंकार, छत्रें, वस्त्रें, पुष्पमाला व व्यजनेंहि दिसूं लागलीं. भूमीवरील धूलि शांत झाली. सर्व अवकाश किरणांनीं व्याप्त झाला. वायु दिव्य गंधानें योद्ध्यांची सेवा करूं लागला. त्यावेळीं सुरोत्तमांनीं आणलेल्या, आकाशांतून संचार करणाऱ्या व विचित्र रत्नांनीं प्रकाशणाऱ्या विमानांच्या तेजानें आकाश विचित्र शोभेनें अलंकृत झालें. विमानस्थ देवांनीं परिवेष्टित झालेला व उत्पलांची तेजस्वी माला धारण करणारा इंद्र अतिशय शोभला. परंतु दीर्घकाल युद्ध पहात असलेल्या त्याची तृप्ति झाली नाहीं. ४. ४. ५६.

---

## अध्याय ५७ वा.

[ १ कृप व अर्जुन यांचें युद्ध, कृपाचें पलायन. ]

(१) **वैशंपायन**—हे कुरुनंदना, व्यूहरचना करून पृथक् पृथक् स्थित असलेल्या कौरवांच्या सर्व सेना पाहून पार्थ विराटपुत्राला हांक मारून म्हणाला—

" हे उत्तरा, ज्याच्या ध्वजावर सुवर्णमय वेदी झळकत आहे, त्या शारद्वत कृपाचार्यांच्या उजव्या बाजूनें चल."

धनंजयाचें हें वचन ऐकून वैराटीनें सुवर्णभूषणांनीं युक्त, रजतासारख्या शुभ्र व तेजस्वी अश्वांना क्रमानें चालविलें व जणुंकाय क्रुद्ध झाल्याप्रमाणें त्या चंद्रासारख्या अश्वांना प्रेरणा केली. त्या अश्वविशारद उत्तरानें आपला रथ कौरवांच्या सेनेसमीप नेऊन पुनः वायुवेगानें चालणाऱ्या त्या अश्वांना परत फिरविलें आणि डावीकडून प्रदक्षिणा घालून त्या तत्त्ववेत्त्या विराटपुत्रानें आपल्या रथानें कौरवांना गोंधळून सोडलें. तो निर्भय वैराटि कृपाच्या रथासमीप येऊन त्याला प्रदक्षिणा करून त्याच्या समोर उभा राहिला.

राजा, त्यावेळीं अर्जुनानें आपलें नांव उच्च स्वरानें सांगून आपला श्रेष्ठ देवदत्त शंख अतिशय जोरानें वाजविला. त्या जिष्णूनें शंखनाद केला असतां त्या युद्धामध्यें जणुंकाय पर्वतच विदीर्ण झाल्याप्रमाणें भयंकर शब्द झाला.

पार्थानें आपला दिव्य शंख इतक्या जोरानें वाजविला असतांहि तो शंख शतधा विदीर्ण झाला नाहीं. म्हणून सर्व सैन्यासह कौरवांनीं त्या श्रेष्ठ शंखाचा मोठा सत्कार केला. पर्वतावर विद्युत् पडली असतां त्याचा जसा प्रतिध्वनि उमटतो, त्याप्रमाणें धनंजयाच्या शंखाचा प्रचंड ध्वनि आकाशापर्यंत पोंचून पुनः त्याचा प्रतिशब्द झाला.

राजा, तो शब्द सहन न करणाऱ्या महारथ शारद्वत कृपानें अर्जुनावर क्रुद्ध होऊन आपला प्रसिद्ध शंख मोठ्या वेगानें वाजविला व त्या शब्दानें त्रैलोक्य भरून टाकलें. नंतर त्या रथिश्रेष्ठानें आपलें विशाल धनुष्य घेऊन त्याचा टणत्कार केला. तेव्हां ते दोघे युद्धाची इच्छा करणारे महाबलाढ्य, सूर्यासारखे प्रखर तेजस्वी वीर शरदृतूंतील गर्जना करणाऱ्या मेघाप्रमाणें शोभले. शरदृतूंत मेघ जसे वृष्टि न करतां केवळ गर्जना करीत असतात, तसा या दोघां धनुर्धरांनीं युद्धाला आरंभ होण्यापूर्वीं प्रचंड नाद केला. त्यानंतर शारद्वत कृपानें दहा मर्मभेदी तीक्ष्ण शरांनीं शत्रूंच्या वीरांचा नाश करणाऱ्या पार्थाला विद्ध केलें. तेव्हां अर्जुनानें आपलें प्रसिद्ध व श्रेष्ठ गांडीव धनुष्य आकर्ण ओढून मर्मभेद करणारे अनेक 'नाराच' बाण सोडिले. परंतु कृपाचार्यानें आपल्या तीक्ष्ण शरांनीं त्या रक्त प्राशन करणाऱ्या 'नाराच' बाणांचे हजारों तुकडे करून टाकिले. तेव्हां अतिशय क्रुद्ध झालेल्या महारथ अर्जुनानें शरांचे अनेक विचित्र प्रकार प्रद-

र्शित करीत बाणांनीं सर्व दिशा झांकून टाकिल्या. त्या श्रेष्ठ धनुर्धरानें सर्व आकाश बाणांनीं व्यापून टाकिलें आणि कृपाला शंभर बाणांनीं आच्छादून टाकिलें. त्याच्या शरांनीं पीडित झालेल्या कृपानें क्रोधानें संतप्त होऊन अप्रतिम तेजस्वी पार्थावर अग्निज्वालेसारख्या प्रखर दहा हजार शरांचा वर्षाव करून समरामध्यें मोठ्यानें सिंहनाद केला.

राजा, याप्रमाणें कृपानें पीडित केलें असतां अर्जुनाच्या श्रेष्ठ गांडीवापासून सुटलेल्या व चार सुवर्णपर्वें असलेल्या तीक्ष्ण बाणांनीं कृपाच्या चारी अश्वांना वेध केला. त्यावेळीं फुत्कार सोडणाऱ्या सर्पाप्रमाणें वेगानें येणाऱ्या तीक्ष्ण बाणांनीं विद्ध झालेले ते अश्व एकदम उधळले व त्यामुळें कृपाचार्य आपल्या रथस्थानापासून च्युत झाला. तथापि त्या आचार्याचें महत्त्व राखण्यासाठीं विजयी अर्जुनानें त्याला वेध केला नाहीं. त्यामुळें कृपाचार्य पुनः स्वस्थानीं येऊन बसला व त्यानें सव्यसाची पार्थाला दहा कंकपत्र बाणांनीं सत्वर वेध केला. तेव्हां धनंजयानेंहि एकच तीक्ष्ण 'भल्ल' बाणानें कृपाचें धनुष्य तोडलें व दुसऱ्या बाणानें त्याचे हस्तावाप फोडून मर्मभेदक अनेक तीक्ष्ण बाणांनीं त्याच्या कवचाचेंहि विदारण केलें. पण त्या महात्म्यानें आपल्या पूर्वगुरूच्या शरीराला मुळींच पीडा दिली नाहीं. कृपाचार्यांच्या अंगातील कवच खालीं गळून पडलें असतां कात टाकलेल्या सर्पाप्रमाणें त्याचें शरीर शोभूं लागलें.

हे भारता, पार्थानें कृपाचार्याचें एक धनुष्य तोडलें असतां त्यानें सत्वर दुसरें धनुष्य सज्ज केलें. पण चपल अर्जुनानें तेंहि तत्काल तोडून टाकिलें. खरोखर तें मोठें आश्चर्यच घडलें. त्यानंतर कृपाचार्यानें एका मागून एक अशीं अनेक धनुष्यें सज्ज केलीं, पण धनुर्विद्येंत अतिशय निष्णात असलेल्या त्या मध्यम पांडवानें तीं सर्व एका मागून एक तोडिलीं. याप्रमाणें ज्यांचीं सर्व धनुष्यें तुटलीं आहेत, अशा प्रतापी कृपाचार्यानें आपल्या रथांतून प्रदीप्त अशनीसारखी एक भयंकर शक्ति घेऊन ती पांडुपुत्रावर सोडली. पण सुवर्णभूषित शक्ति आपल्या रथाकडे येत आहे, असें पहातांच कौंतेयानें दहा बाणांनीं आकाशांतील भयंकर उल्केप्रमाणें दिसणाऱ्या तिचा छेद केला. तेव्हां जिचे दहा तुकडे झाले आहेत, अशी ती शक्ति भूमीवर पडली. तेवढ्या अवकाशांत कृपाचार्यानें आणखीं एक धनुष्य सज्ज केलें व एकाच वेळीं दहा तीक्ष्ण भल्ल शरांनीं पार्थाला वेध केला. तेव्हां क्रुद्ध झालेल्या महातेजस्वी किरीटीनें अग्नीसारखे प्रज्वलित तेरा बाण कृपाचार्यांवर सोडिले. त्यांतील एका बाणानें

कृपाच्या रथाची धुरा, चार बाणांनीं चार अश्व, सहाव्या बाणानें त्याच्या सारथ्याचें मस्तक, तीन बाणांनीं त्याच्या रथाचें त्रिशूलाकार काष्ठ, दोन बाणांनीं रथाचा कणा, आणि वज्रतुल्य बाराव्या बाणानें रथध्वज यांचा छेद करून तेराव्या बाणानें कृपाचार्यांच्या वक्षःस्थलावर हंसत हंसत प्रहार केला. तेव्हां ज्याचें धनुष्य तुटलें आहे, अश्व व सारथि गतप्राण झाले आहेत, त्यामुळें जो विरथ झाला आहे, असा कृपाचार्य हातांत उग्र गदा घेऊन खालीं उतरला व त्या वीरानें ती जड गदा मोठ्या वेगानें पार्थावर फेंकिली. पण हस्तलाघवानें युक्त असलेल्या अर्जुनानें अनेक वेगवान् शर सोडून अर्ध्या मार्गांतूनच तिला परतविलें असतां ती उलट कृपाच्याच अंगावर येऊं लागली. असहिष्णु शारद्वताचे प्राण वांचविण्यासाठीं त्याच्या योद्ध्यांनीं अर्जुनावर सर्व बाजूंनीं भयंकर शरवृष्टि केली. पण विराटपुत्रानें आपल्या अश्वांना उजव्या बाजूनें वळवून व शत्रूंना प्रतिबंध करणारें यमक मंडल घेऊन त्या सर्व योद्ध्यांचें निवारण केलें. तेव्हां ते सर्व पुरुषश्रेष्ठ योद्धे विरथ झालेल्या कृपाचार्याला घेऊन मोठ्या वेगानें कुंतीपुत्र धनंजयापासून दूर पळून गेले. ४. ४. ५७.

---

## अध्याय ५८ वा.

[ १ अर्जुनाचें द्रोणाचार्यांशीं युद्ध. २ द्रोणाचें पलायन. ]

( १ ) वैशंपायन—हे कुरुश्रेष्ठा, याप्रमाणें कृपाचार्य युद्ध सोडून निघून गेला असतां ज्याच्या रथाचे अश्व रक्तवर्ण आहेत, असा अजिंक्य द्रोण सशर धनुष्य घेऊन श्वेतवाहनावर धांवला. आपल्या सुवर्णमय रथांत बसून गुरु द्रोण समीप येत आहे, असें पाहून जिष्णु उत्तराला म्हणाला—" हे वैराटे, ज्याच्या रथस्थ श्रेष्ठ ध्वजावर अनेक पताकांनीं अलंकृत केलेली सुवर्णाची उच्च वेदी दिसत आहे, त्या द्रोणाचार्यांच्या सेनाव्यूहाजवळ मला घेऊन चल. हे सारथे, तुझें कल्याण असो. तूं भिऊं नको, तुझ्या सर्व शत्रूंना जिंकून मी तुला विजय प्राप्त करून देतों. ज्याच्या रथाला उंच व सुंदर गतीनें युक्त असलेले, पोवळ्यासारखे तुळतुळित, ताम्रमुख, प्रेक्षणीय व सर्वशिक्षाविशारद अश्व जोडलेले दिसत आहेत, तोच हा दीर्घबाहु महातेजस्वी, पराक्रमी, सर्व लोकांमध्यें प्रसिद्ध असलेला प्रतापी भारद्वाज होय. हा बुद्धीनें शुक्रासारखा व नीतीमध्यें बृहस्पतीसारखा आहे. हे विद्वन्, या माझ्या आचार्यांच्या ठिकाणीं चार वेद,

ब्रह्मचर्य, प्रयोग व संहार यांसह सर्व दिव्य अस्त्रें आणि समग्र धनुर्वेद नित्य प्रतिष्ठित आहेत. या द्विजश्रेष्ठाच्या अंगीं क्षमा, दम, सत्य, दया, आणि अंतः-करणाची सरलता, हे व आणखींहि अनेक गुण वास करीत आहेत. या महा-भागाशीं मी समरामध्यें युद्ध करण्याची इच्छा करीत आहें. यास्तव हे आर्या उत्तरा, मला सत्वर त्या आचार्यांच्या समीप घेऊन चल.

राजा, अर्जुनानें असें म्हटलें असतां उत्तरानें सुवर्णालंकारानें भूपविलेल्या आपल्या अश्वांना भारद्वाज द्रोणाच्या रथाकडे वळविलें. त्यावेळीं एक मत्त गज जसा दुसऱ्या मत्त गजावर धांवून जातो, तसा द्रोण रथिश्रेष्ठ पार्थावर वेगानें चालून गेला व त्यानें शेकडों भेरींच्या ध्वनीसारखा प्रचंड नाद करणारा शंख वाजविला. त्या ध्वनीनें सर्व सैन्य सागराप्रमाणें क्षुब्ध झालें. हे राजेंद्रा, त्या समरामध्यें द्रोणाचे रक्तवर्ण व पार्थाचे हंसासारखे शुभ्र अश्व अति संनिध गेल्यामुळें परस्परांत मिश्रित झालेले पाहून लोक विस्मित झाले. ते दोघे महा-पराक्रमी द्रोण व पार्थ शस्त्रविद्यानिपुण, महाबलाढ्य व अजिंक्य होते. ते रथस्थ गुरु-शिष्य परस्परांस आलिंगन देत असलेले पाहून 'या द्रोणानें पार्थाशीं सख्य केलें, आतां तो आमच्यावरच प्रहार करील,' या शंकेनें कौरवांची विस्तीर्ण सेना वारंवार भयकंपित झाली.

जनमेजया, त्यानंतर वीर्यवान् पार्थ हृष्टचित्तानें द्रोणाच्या रथासमीप आपला रथ नेऊन त्याला वंदन करून हंसतच मधुर वाणीनें असें सामयुक्त वचन बोलला—"हे पूज्य आचार्य, शत्रूनें केलेल्या अपकाराची फेड करण्याची इच्छा करीत आम्हीं वनांतील नियत काल काढला. तरी आतां हे समरदुर्जय वीरा, या युद्धाविषयीं तूं माझ्यावर कोप करूं नको. हे निष्पापा, तूं प्रथम मजवर प्रहार केल्यावर मग मी तुझ्याशीं युद्ध करावें, असें माझें मन मला सांगत आहे. यावर काय कराव-याचें तें करण्यास तूं समर्थ आहेस."

राजा, पार्थाचें हें भाषण ऐकून मनांतून प्रसन्न झालेल्या द्रोणानें त्याच्यावर वीसांपेक्षां अधिक शर सोडिले. परंतु शर सोडण्यांत निष्णात असलेल्या पार्थानें ते बाण त्याच्यापर्यंत येऊन पोंचण्यापूर्वीं मध्येंच तोडून टाकिले. तेव्हां पराक्रमी द्रोणानें एक हजार बाणांनीं पृथापुत्राचा रथ झांकून टाकिला आणि कंकपत्राच्या तीक्ष्ण शरांनीं त्याचे रजतासारखे शुभ्र अश्व जणुंकाय त्याला क्रोध आणीतच विद्ध केले. याप्रमाणें अग्नीज्वालेसारख्या देदीप्यमान शरांची रणांत वृष्टि करणाऱ्या त्या दोघां—भारद्वाज व पांडुनंदन यांचें युद्ध प्रवृत्त झालें.

त्या दोघां युद्धकर्मांत प्रसिद्ध असलेल्या, वायूसारख्या वेगवान् दिव्य अस्त्रवेत्त्या व अमित तेजस्वी धनुर्धरांनीं शरजालाचा क्षेप करीत सर्व नृपालांना मोहित केलें. त्यांचें शर सोडण्याचें कौशल्य पाहून तेथें जमलेले सर्व योद्धे विस्मित झाले व 'धन्य धन्य,' असे उद्गार काढून त्यांचा सत्कार करूं लागले.

त्या संग्रामाच्या अग्रभागीं स्थित असलेले लोक 'अहो या द्रोणाशीं रणामध्यें युद्ध करण्यास फाल्गुनावांचून दुसरा कोण समर्थ आहे ! गुरूशीं युद्ध करावयास लावणारा हा क्षत्रियधर्म खरोखर मोठा कठोर आहे,' असें बोलूं लागले.

त्या दोघां अपराजित वीरांनीं परस्परांच्या शरसंघाताचा छेद केला. क्रुद्ध झालेल्या द्रोणानें आपलें अतिशय मोठें सुवर्णपृष्ठयुक्त धनुष्य ओढून पार्थाला वेध केला आणि तीक्ष्ण शरांच्या जाळ्यानें त्याचा रथ आच्छादून टाकिला. त्यामुळें सूर्याचे किरणहि लोपून गेले. नंतर मेघ पर्वतावर जशी वृष्टि करितो, तसा त्यानें अर्जुनावर उज्ज्वल बाणांचा वर्षाव केला.

तेव्हां अर्जुनानें आपलें श्रेष्ठ गांडीव धनुष्य घेऊन मोठ्या हर्षानें अनेक चित्रविचित्र, अच्छेद्य व शत्रुघ्न उत्कृष्ट शर सोडून भारद्वाजाच्या त्या सर्व बाणांचें निवारण केलें. रथांतून सर्वत्र संचार करणाऱ्या त्या प्रेक्षणीय धनंजयानें आपलें अस्त्रनैपुण्य प्रकट करीत एकाच वेळीं सर्व दिशा बाणांनीं आच्छादून टाकिल्या व अद्भुत आश्चर्य करून दाखविलें. त्यानें सर्व आकाशांत शरांचें एकच छत पसरलें, त्यायोगें पर्वत जसा धुक्यानें आच्छादित व्हावा, तसा द्रोण शरांनीं आच्छादित झाल्यामुळें दिसेनासा झाला. त्यावेळीं चकचकीत शरांनीं आवृत झालेल्या द्रोणाचें स्वरूप सर्व बाजूंनीं प्रदीप्त झालेल्या पर्वताप्रमाणें भासलें.

राजा, याप्रमाणें धनंजयानें रणांगणांत आपला रथ शरांनीं व्यापून टाकलेला पाहून संग्रामांत शोभणाऱ्या द्रोणानें आपलें मेघगर्जनेप्रमाणें शब्द करणारें व अग्निचक्रासारखें घोर धनुष्य आकर्ण ओढून, त्या सर्व बाणांचा छेद केला. त्या वेळीं वेळु जळतांवेळीं जसा ध्वनि होतो तसा भयंकर टणत्कार झाला. त्याच्या धनुष्यांपासून सुटलेल्या सुवर्णमय तेजस्वी बाणांनीं सूर्यप्रभेप्रमाणें सर्व दिशा प्रकाशित झाल्या. तो द्विजश्रेष्ठ एका मागून एक असे असंख्य बाण सोडीत असल्यामुळें आकाशांत संचार करणाऱ्या त्या शरांचे अंतरिक्षांत अनेक समूह दिसले व त्याच्या धनुष्यापासून निरंतर सुटणाऱ्या त्या बाणांकडे पाहिलें असतां 'हा एकच दीर्घ बाण आहे कीं काय ?' असा भास झाला.

हे भारता, त्या दोघां धनुर्धरांनीं सोडलेल्या सुवर्णपुंखयुक्त बाणांच्या योगानें आकाश उल्कांनीं व्याप्त झाल्याप्रमाणें दिसलें. कंक व मयूर यांचीं पिसें लावलेल्या त्यांच्या बाणांचा समूह, आकाशांत शरदृतूमध्यें फिरणाऱ्या हंस-समुदायाप्रमाणें शोभला. त्या दोघां क्षुब्ध झालेल्या द्रोण-पांडवांचें युद्ध इंद्र व वृत्रासुर यांच्या युद्धासारखें घोर होतें. दोन मत्त गज जसे आपल्या दंताग्रांनीं परस्परांवर आघात करितात, तसे ते दोघे वीर आपापलीं धनुष्यें मंडलाकार वांकवून त्यांतून सुटलेल्या शरांनीं परस्परांवर प्रहार करीत होते. याप्रमाणें धर्म-युद्ध करणारे ते दोघे श्रेष्ठ अजिंक्य वीर समरामध्यें दिव्य अस्त्रांचा परस्परांवर प्रयोग करून जणुंकाय खेळतच होते. त्या तुमुल युद्धांत द्रोणानें दिव्य अस्त्रांचा प्रयोग करून पार्थाच्या अस्त्रांचें निवारण केलें. त्यावेळीं देव-दानवांप्रमाणेंच त्या दोघां असहिष्णु व क्रुद्ध झालेल्या नरसिंहांनीं परस्परांवर प्रहार केले.

द्रोणानें सोडलेल्या ऐंद्र, वायव्य, आग्नेय इत्यादि अस्त्रांचें पांडुपुत्रानें त्या त्या प्रति-अस्त्रानें पुनः पुनः निवारण केलें. अर्जुनाच्या धनुष्यापासून सुटलेल्या शरांचा, पर्वतावर जसा वज्रप्रहार व्हावा, तसा भयंकर शब्द झाला. हे राज-श्रेष्ठा, त्यावेळीं विद्ध झालेले गज, रथ व अश्व रक्तांनीं माखल्यामुळें पुष्पित पलाशवृक्षासारखे दिसले.

द्रोण व पार्थ या गुरु-शिष्यांचें असें घोर युद्ध चाललें असतां अर्जुनाच्या बाणांनीं पीडलेले व गतप्राण झालेले योद्धे भूमीवर पडले. कित्येकांचे बाहुभूष-णांनीं युक्त असलेले बाहु तुटून पडले. कित्येकांचे महारथ छिन्न-भिन्न झाले. कित्ये-कांचीं सुवर्णमय विचित्र कवचें विशीर्ण झालीं व ध्वज तुटून पडले. अर्जुनाचा हा प्रभाव पाहून कौरवांचें सैन्य भयभीत झालें. तथापि त्या दोघां अतिरथि गुरु-शिष्यांचें घोर युद्ध चाललेंच होतें. त्यांच्या त्या युद्धाला बलि व इंद्र यांच्या युद्धाचीच उपमा योग्य होय. ज्यामध्यें प्राणांचा पण लाविला आहे, असें तें रणरूपी द्यूत प्रवृत्त झालें असतां त्या वीरांनीं धनुष्य आकर्ण ओढून तीक्ष्ण बाणांनीं परस्परांचीं शरीरें विदीर्ण करण्याचा यत्न चालविला.

हे राजा, त्यावेळीं आकाशांतून युद्ध पहाणाऱ्या देवांनीं द्रोणाची अशी प्रशंसा केली—“ शत्रूसैन्याचें मर्दन करणाऱ्या, महाबलाढ्य, दृढमुष्टि, अजिंक्य व सर्व देव-दैत्यांना जिंकणाऱ्या या महारथ अर्जुनाशीं द्रोणानें एवढा वेळ युद्ध केलें, हें खरोखरच मोठें आश्चर्य आहे. त्या महात्म्यानें हें अति दुष्कर कार्य केलें आहे. ”

राजा, आपल्या प्रिय शिष्याचें धैर्य, शिक्षण, हस्तलाघव व दूर असलेल्या लक्ष्यालाहि अचूक वेध करण्याचें सामर्थ्य पाहून द्रोणाला मोठा विस्मय वाटला. अर्जुनानें आपल्या दोन्ही हातांनीं गांडीवाचें आकर्षण करून टोळांच्या समूहाप्रमाणें बाणवृष्टि केली. त्याचें तें अद्भुत रणकर्म पाहून सर्व प्रेक्षक 'धन्य धन्य,' असें म्हणून त्याचा बहुमान करूं लागले. सतत शरसंधान करून सोड-लेल्या त्याच्या बाणांतून वायुहि संचार करूं शकला नाहीं. तो महावीर बाण घेतो केव्हां व सोडतो केव्हां, हेंहि कोणाला समजत नसे.

जनमेजया, याप्रमाणें तें अति घोर शीघ्रास्त्र युद्ध प्रवृत्त झाले असतां यशस्वी अर्जुन उत्तरोत्तर शीघ्र व शीघ्रतर शरसंधान करूं लागला व ते असंख्य बाण द्रोणाच्या रथाला टोळांप्रमाणें सर्व बाजूंनीं व्यापूं लागले. तेव्हां कौरवसेनेंतील महावीरांनीं मोठा हाहाकार केला. पांडवाच्या शीघ्रास्त्राची इंद्रानें व त्याच्या समीप असलेल्या गंधर्व-अप्सरांनीं स्तुति केली.

हे राजा, अर्जुनाचा हा अद्भुत पराक्रम पाहून आचार्यपुत्र अश्वत्थामा फार मोठ्या रथसमूहासह अर्जुनाच्या समोर आला व त्यानें आपल्या पित्यावरील शरवृष्टीचें निवारण केलें. त्या गुरुपुत्रानें महात्म्या अर्जुनाच्या त्या रणकौशल्याची मनांत प्रशंसा केली. पण आपल्या पित्याचा पराभव झालेला पाहून त्याला अतिशय कोपहि आला. क्रुद्ध झालेला द्रोणपुत्र वृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें हजारों बाणांचा वर्षाव करीत अर्जुनापुढें धांवून आला.

हे राजेंद्रा, तेव्हां महापराक्रमी कौंतेयानें आपल्या सारथ्याला अश्वत्थाम्याच्या व्यूहाकडेच आपले अश्व वळविण्यास सांगून द्रोणाला समरांतून निघून जाण्यास अवकाश दिला. तेव्हां अर्जुनाच्या तीक्ष्ण बाणांनीं ज्याचें कवच व रथध्वज विदीर्ण झाला आहे असा तो शूर भारद्वाज द्रोण अवकाश मिळतांच वेगवान् अश्वांच्या साह्यानें रणांगणांतून सत्वर निघून गेला. ४. ४. ५८.

---

## अध्याय ५९ वा.

[ १ अर्जुनाचें अश्वत्थाम्याशीं युद्ध. २ टणत्कार करणाऱ्या कर्णावर युद्धासाठीं धांवून जाणें. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें द्रोणाचार्यांचा पराभव करून पार्थ अश्वत्थाम्याशीं युद्ध करण्यास सज्ज झाला. मेघाप्रमाणें शरवृष्टि

करीत वायुवेगानें आलेल्या त्या आचार्यपुत्राचा अर्जुनानें युद्धार्थ स्वीकार केला व त्या दोघां योद्ध्यांचें इंद्र व वृत्रासुर या देव-दानवांसारखें तुमुल युद्ध सुरू झालें. त्यावेळीं सर्व आकाश शरजालांनीं व्यापून गेल्यामुळें सूर्य दिसेनासा झाला व वायूची गति थांबली.

हे राजन्, ते दोघे बलाढ्य वीर परस्परांवर प्रहार करीत असतां दग्ध होणाऱ्या वेळूसारखा 'चटचट' असा फार मोठा शब्द होऊं लागला. पार्थानें अश्वत्थाम्याच्या सर्व अश्वांना मृतप्राय करून सोडिलें. त्यामुळें ते दिङ्मूढ होऊन त्यांना कोणत्या दिशेला जावें हेंहि कळेनासें झालें. त्यानंतर महापराक्रमी अश्वत्थाम्यानें संचार करणाऱ्या पार्थाचें एक सूक्ष्म छिद्र पाहून त्याच्या धनुष्याची प्रत्यंचा तीक्ष्ण बाणानें तोडून टाकिली. त्यामुळें त्याचें तें अतिमानुष कर्म पाहून देवांनीं त्याचा सत्कार केला आणि द्रोण, भीष्म, कर्ण, कृप इत्यादि महारथ 'धन्य, धन्य' म्हणून त्याची प्रशंसा करूं लागले. तेव्हां अश्वत्थाम्यानें आपलें श्रेष्ठ धनुष्य आकर्ण ओढून त्या नरव्याघ्र धनंजयाच्या हृदयावर कंकपत्रयुक्त शरांनीं पुनः प्रहार केला.

हे राजा, त्यावेळीं पार्थानें मोठ्यानें हास्य करून, आपल्या गांडीव धनुष्याला सत्वर नवीन मौर्वी जोडिली, आणि एक मत्त गज जसा दुसऱ्या मत्त गजावर धांवून जातो, तसा पार्थ आपलें धनुष्य अर्धचंद्राकार वांकवून याच्यावर चालून गेला. तेव्हां सर्व पृथ्वीतलावर लोकैकवीर म्हणून प्रसिद्ध असलेल्या त्या दोघां धनुर्धरांचें अंगावर रोमांच आणणारें घनघोर महायुद्ध प्रवृत्त झालें. दोन मत्त गजांप्रमाणें परस्परांशीं युद्ध करणाऱ्या त्या दोघां महावीर्यवान् योद्ध्यांना पाहून सर्व कौरव विस्मित झाले. त्या वीरांनीं फूत्कार सोडणाऱ्या सर्पांच्या आकाराच्या शरांनीं परस्परांवर प्रहार केले.

( २ ) हे भारता, महात्म्या पृथापुत्राचे दोन्ही भाते दिव्य व अक्षय होते. त्यामुळें तो शूर पांडुनंदन युद्धामध्यें पर्वतासारखा अचल राहिला होता. परंतु समरामध्यें सर्व बाजूंनीं वेगानें शरवर्षाव करणाऱ्या अश्वत्थाम्याचे बाण संपल्यामुळें अर्जुनाकडून तो पराभूत होण्याचें चिह्न दिसूं लागलें. तेव्हां कर्ण आपलें महद्धनुष्य आकर्ण ओढून त्याचा टणत्कार करूं लागला. तेव्हां कौरवसेनेंत मोठा हाहाकार उडाला. तो ऐकून ज्या बाजूनें धनुष्याच्या प्रत्यंचेचा शब्द ऐकूं येत होता, त्या बाजूस अर्जुनानें आपली दृष्टि वळविली. तों एकदा पराभूत होऊन

पळून गेलेला कर्णच निर्लज्जपणें हा टणत्कार करीत आहे, असें पाहून अर्जुनाचा कोप अतिशय वाढला आणि क्रोधाधीन झालेला तो कुरुपुंगव पार्थ आपले दोन्ही नेत्र वटारून कर्णाला मारण्याच्या इच्छेनें त्याच्याकडेच पाहूं लागला.

हे राजा, त्यावेळीं अर्जुनाचें लक्ष कर्णाकडे वेधलें आहे हें पाहून कौरवांच्या इतर योद्धयांनीं मोठ्या त्वरेनें द्रोणपुत्राला हजारों बाण आणून दिले. पण महापराक्रमी शत्रुनाशक धनंजय द्रोणपुत्रास सोडून अकस्मात् कर्णावरच धांवला. क्रोधानें ज्याचे नत्र रक्तवर्ण झाले आहेत, असा तो कौंतेय कर्णाजवळ जाऊन त्याच्याशीं द्वैरथ युद्धाची इच्छा करीत होत्साता त्याला असें बोलला. ४.४.५९.

---

## अध्याय ६० वा.

[ १ दुरुत्तरपूर्वक कर्णार्जुनांचें युद्ध. २ कर्णाचा पराभव. ]

( १ ) अर्जुन म्हणाला—हे कर्णा, तूं ‘युद्धामध्यें माझ्या तोडीचा दुसरा कोणीहि नाहीं’ अशा ज्या सभेंत वल्गना केल्यास, त्या सत्य करून दाखविण्याचा समय आतां प्राप्त झाला आहे. हे राधेया, आज या महायुद्धांत माझ्याशीं युद्ध केलें असतां तुला स्वतःचें दुबलत्व कळून येईल व मग तूं इतरांचा अवमान करण्यास धजणार नाहींस. तूं धर्माला सोडून अतिशय कठोर वचनें बोलला आहेस, तथापि आतां तूं ज्या युद्धाची इच्छा करीत आहेस तें दुष्कर कर्म तुला झेंपेल असें मला वाटत नाहीं. हे राधासुता, माझ्यासमोर युद्धाला उभें राहण्यापूर्वींच तूं कौरवांच्यापुढें जी स्वतःची प्रौढि गाइली होतीस, ती आज पूर्ण करून दाखीव.

हे वैकर्तना, कौरवसभेमध्यें दुःशासनादि दुरात्म्यांनीं पांचालीला असह्य पीडा दिली असतां तूं मोठ्या हर्षानें पहात बसला होतास, त्याचें फल आज तुला मिळेल. हे कर्णा, धर्मपाशानें बद्ध झाल्यामुळें मीं जो क्रोध आजवर आंवरून धरिला होता. त्या माझ्या क्रोधाचा विजय आज तूं समरांगणांत पहा. हे राधेया, वनामध्यें आम्हीं बारा वर्षें जे क्लेश सहन केले, त्यामुळें उत्पन्न झालेल्या क्रोधाचें फल आजच तुला प्राप्त होईल. हे दुर्मते, ये, समरामध्यें माझ्याशीं द्वंद्वयुद्ध कर आणि तुझे सैनिक आणि हे सर्व कौरव आपल्या संग्रामाचे प्रेक्षक होऊं देत.

**कर्ण**—हे पार्था, तूं जी ही बडबड करीत आहेस, त्याप्रमाणें कर्म करून दाखीव. 'अल्प कृति व वल्गना मोठी' या म्हणीप्रमाणेंच तुझें हें वर्तन आहे. पूर्वीं तूं क्लेश सहन केलेस, ते केवल तुझ्या दुर्बलपणामुळेंच तुला सोसावे लागले. हे अर्जुना, तूं अद्यापि कांहींच पराक्रम दाखविलेला नाहींस, तुझें सामर्थ्य पाहून मग आम्ही तुझ्या पराक्रमाला मान्यता देऊं.

अरे, तूं पूर्वीं जसा धर्मपाशानें बद्ध होतास, तसाच आतांहि आहेस. तूं स्वतःला त्या बंधांतून मुक्त झाल्याचें कसें मानितोस ? द्यूतांत पण लाविल्याप्रमाणें जर तूं वनवास भोगलास, तर त्यांत मला काय सांगतोस ? तूं धर्मार्थज्ञ असल्यामुळेंच ते क्लेश भोगलेस, पण त्यासाठीं आज माझ्याशीं युद्ध करण्याची इच्छा करीत आहेस ! हे पांडुपुत्रा, तुझा पक्ष घेऊन साक्षात् इंद्र जरी माझ्याशीं युद्ध करावयास आला, तरी पराक्रमाची इच्छा करणाऱ्या मला यत्किंचित्‌हि पीडा होणार नाहीं. हे कौंतेया, माझ्याशीं युद्ध करण्याची तुला नुक्तीच इच्छा झालेली दिसत आहे. आज तूं माझ्याशीं जेव्हां युद्ध करशील तेव्हां माझें सामर्थ्य पाहशील !

कर्णाची ही आत्मश्लाघा ऐकून पार्थ म्हणाला, अरे राधेया, आतांच कीं रे तूं माझ्या हातून पराजित होऊन रणांतून पळून गेलास आणि त्यामुळें जिवंत तरी राहिलास ! हे कर्णा, तुझ्या अनुजाला तर तुझ्यासमक्ष मीं आतांच यमलोकीं पाठविलें. भ्रात्याचा घात करवून, स्वतः रणांगणाच्या अग्रभागांतून पळ काढून पुनः अशा रीतीनें सज्जनांमध्यें आत्मश्लाघा करणारा तुझ्यावांचून अन्य पुरुष खरोखर कोठेंहि सांपडणार नाहीं !

**वैशंपायन**—राजा, असें बोलून तो अपराजित अर्जुन कवचभेदी तीक्ष्ण बाण सोडीत कर्णापाशीं येऊन पोंचला. तेव्हां हृष्ट झालेल्या महारथ कर्णानें वृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें पार्थावर प्रतिशरांचा फार मोठा वर्षाव केला. नंतर कर्णानें शरांचें भयंकर जाळें पसरून धनंजयाच्या अश्वांवर, बाहूंवर व हस्तत्राणावर पृथक् पृथक् बाण सोडिले. त्यावेळीं असहिष्णु पार्थानें तीक्ष्ण अग्रें असलेल्या नतपर्व शरांनीं कर्णाची भाते बांधलेली रज्जु तोडून टाकिली. तेव्हां कर्णानें दुसरा भाता घेऊन त्यांतील शरांनीं पार्थाच्या हाताला विद्ध केलें व त्याची मुष्टि विदारण केली.

(२) जनमेजया, तें पाहून क्रुद्ध झालेल्या महाबाहु पार्थानें कर्णाचें धनुष्य तोडून टाकिलें. त्यावेळीं कर्णानें शक्ति सोडिली असतां त्या धनुर्धरानें आपल्या

शरांनीं तिचाहि छेद केला. त्यानंतर हे राजा, राधेयाचे विपुल योद्धे धनंजयावर धांवून आले, पण त्या सर्वांना पांडुनंदनानें आपल्या श्रेष्ठ गांडीव धनुष्यापासून सुटलेल्या शरांनीं गतप्राण केलें.

हे राजा, याप्रमाणें कर्णपक्षीय योद्ध्यांचा संहार करून त्या पराक्रमी बीभत्सूनें आपल्या तीक्ष्ण शरांनीं कर्णाच्या अश्वांना विद्ध केलें; तेव्हां ते सर्व अश्व मृत होऊन भूमीवर पडले. त्यानंतर हे राजेंद्रा, त्या सव्यसाची कौंतेयानें प्रज्वलित तीक्ष्ण बाणानें कर्णाच्या वक्षःस्थलावर वेध केला. तेव्हां तो शर त्याचें कवच फोडून आंत शिरला, त्यामुळें कर्णाच्या दृष्टीपुढें अंधेरी येऊन तो मूर्च्छित झाला. त्याला त्या तीव्र वेदना सहन न होऊन तो आत्मश्लाघा करणारा कर्ण रणांगण सोडून उत्तर दिशेकडे पळून गेला. त्यावेळीं हे राजा, महारथ अर्जुन व उत्तर यांनीं उच्च स्वरानें सिंहनाद केला. ४. ४. ६०.

---

## अध्याय ६१ वा.

[ १ घोर संग्राम पाहून भयभीत झालेल्या उत्तराची व्याकुलता. २ अर्जुनानें त्यास दिलेला धीर. ३ भीष्मावर चाल. ४ दुःशासनादिकांचा पराभव. ]

( १ ) वैशंपायन—राजा, याप्रमाणें सूर्यपुत्र कर्णाला जिंकून तुझा प्रपितामह पार्थ विराटपुत्रास म्हणाला—" हे वीरा, जेथें हा तालवृक्षासारखा उंच सुवर्णाचा ध्वज दिसत आहे, त्या सेनासमूहासमोर मला घेऊन चल. त्या रथावर आमचा पितामह शांतनव भीष्म माझ्याशीं युद्ध करण्याची इच्छा करीत उभा आहे. हे सारथे, खरोखर तो वीर देवासारखा शोभतो."

पण हे पारिक्षिता, अर्जुनाचें हें वचन ऐकून व तें विस्तीर्ण चतुरंग सैन्य पाहून कौरवांच्या शरांनीं अतिशय विद्ध झालेला उत्तर पार्थास म्हणाला—"हे धनुर्धरा, मी या महासेनेकडे आपले अश्व चालविण्यास समर्थ नाहीं. माझे प्राण व्याकुल झाले आहेत. या युद्धांतील दिव्य अस्त्रांचा प्रभाव पाहून माझें मन विह्वल झालें आहे. तुम्हां उभयतांच्या दिव्यास्त्रप्रयोगांनीं दशदिशा जणुकाय आच्छादित झाल्या आहेत. वसा, रक्त व मेद यांच्या दुर्गंधानें मी मूर्छित झालों आहें. यापूर्वी कधींहि न पाहिलेला हा तुझा शूरसमागम पहात असलेल्या माझें मन जणुकाय विदीर्ण झालें आहे.

गदांचा फार मोठा संघर्ष, असंख्य शंखांचा नाद, वीरांचे सिंहनाद, गजांचे चीत्कार व विजेच्या कडकडाटासारखा तुझ्या गांडीव धनुष्याचा टणत्कार यांच्या योगानें गोंधळून गेलेल्या माझी स्मृति नष्ट झाली असून कान बधीर झाले आहेत. हे महाधनुर्धरा, तूं आपलें धनुष्य आकर्ण ओढून अलातचक्राप्रमाणें सतत मंडलाकार फिरवीत आहेस, असें पाहून माझी दृष्टि गरगर फिरूं लागली आहे व माझें हृदय विदीर्ण झालें आहे. क्रुद्ध झालेल्या शंकराप्रमाणें तुझें उग्र स्वरूप आणि रणामध्यें धनुष्य आकर्ण ओढणाऱ्या तुझ्या भुजांचा भयंकर विक्षेप पाहून जणु काय शंभर भुजा असल्याप्रमाणें युद्ध करणाऱ्या तुझी मला फार भीति वाटते. तूं धनुष्याला बाण जोडतोस कधीं व तो सोडतोस कधीं हें मी समक्ष पहात असतांहि मला कळत नाहीं. हे धनंजया, माझे प्राण व्याकुळ होत आहेत व माझें मस्तक भ्रमण करूं लागलें आहे. त्यामुळें हा प्रतोद व अश्वांचे रश्मी हातांत धरण्याची माझ्यामध्यें शक्ति राहिली नाहीं."

( २ ) अर्जुन—हे नरश्रेष्ठा, असा भिऊं नको. तूंहि रणांगणांत अति अद्भुत कर्में केलीं आहेस. तूं शत्रूंचें दमन करणाऱ्या प्रसिद्ध मत्स्यकुलांत उत्पन्न झालेला राजपुत्र आहेस. तुझें कल्याण असो. हे परंतप विराटपुत्रा, धैर्य धारण कर आणि या समरांगणांत युद्ध करणाऱ्या माझ्या रथाच्या अश्वाचें तूं नियमन कर, असा भयभीत होऊं नको.

राजा जनमेजया, याप्रमाणें वैराटीला आश्वासन देऊन तो रथिश्रेष्ठ पार्थ पुनः त्याला म्हणाला—"हे सारथे, सैन्याच्या अग्रभागीं असलेल्या भीष्माजवळ मला सत्वर घेऊन चल. युद्धामध्यें मी त्याच्याहि धनुष्याची प्रत्यंचा तोडून टाकितों. आकाशांतील मेघापासून निघणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें मी आज विचित्र दिव्य अस्त्रें सोडतों, तीं पहा. हे कौरव माझें सुवर्णपृष्ठमय गांडीव धनुष्य पहातील आणि ते सर्व शत्रु एकत्र जमून 'हा कोणत्या बरें हातानें शरसंधान करीत आहे ? उजव्या कीं डाव्या ?' असा तर्क करितील.

हे उत्तरा, शोणित हेंच ज्यांतील जल आहे, रथ हेच ज्यांतील आवर्त आहेत, गज हेच नक्र आहेत, अशा परलोकाकडे वाहून नेणाऱ्या दुस्तर नदीला मी प्रवृत्त करीन. हस्त, पाद, मस्तक, पृष्ठ व बाहु याच ज्याच्या निरंतर शाखा आहेत अशा कौरवरूपी वनाचा मी नतपर्व शरांनीं छेद करीन. एकच अग्नि जसा वनामध्यें वणवा पसरवितो, त्याप्रमाणें मज एकाच विजयी धनुर्धराचे

शर कौरवांच्या सेनेंत शेकडों मार्गांनीं पसरतील. भीष्मादि महारथ आज आपलें सैन्य माझ्या अस्त्रांनीं चक्राप्रमाणें गरगर फिरत आहे, असें पहातील. मी आज तुला माझें शस्त्रनैपुण्य दाखवीन, यास्तव हे वीरा, तूं सम व विषम अशा दोन्ही प्रसंगीं निर्भयपणें उभा रहा. म्हणजे मी आपल्या बाणांनीं अंतरिक्षाला व्यापून सोडणाऱ्या पर्वतांचाहि भेद करीन. मीं पूर्वीं इंद्राच्या आज्ञेवरून संग्रामांत सहस्रावधि पौलोम व कालखंज यांचा संहार केला. मला इंद्रापासून दृढमुष्टि, ब्रह्मदेवापासून कृतहस्तत्व आणि प्रजापतीपासून विविध प्रकारच्या तुमुल विचित्र युद्धाची विद्या प्राप्त झाली आहे.

हे वैराटे, समुद्राच्या पलीकडे असलेल्या हिरण्यपुरवासी उग्र धनुर्धर साठ हजार रथिश्रेष्ठांना मीं जिंकिलें आहे. नदीला पूर आला असतां त्या वाढणाऱ्या जलप्रवाहानें नदीतीर जसें ढासळून पडतें, त्याप्रमाणें माझ्या वृद्धिंगत झालेल्या क्रोधानें कौरवसमुदायाला भूमीवर लोळत पडलेलें तूं पहाशील.

हे राजपुत्रा, ज्या कौरवरूपी वनांत ध्वज हेच वृक्ष, पायदळ हेंच तृण व रथ हेच सिंहांचे कळप आहेत, त्या वनास मी माझ्या अस्त्ररूपी अग्नीनें आज दग्ध करीन. हे सारथे, इंद्रानें वृत्रासुराचा जसा नाश केला, तसा मी एकटा आज युद्धाच्या इच्छेनें स्थित असलेल्या या सर्व बलाढ्य सैन्याला उधळून टाकीन.

हे विराटपुत्रा, मी रुद्रापासून रौद्र, वरुणापासून वारुण, अग्नीपासून आग्नेय, वायूपासून वायव्य, त्याचप्रमाणें इंद्रापासून वज्रादि अस्त्रें मिळविलीं आहेत. यास्तव हे उत्तरा, या श्रेष्ठ पुरुषव्याघ्रांनीं रक्षण केलेलें हें कौरवरूपी वन मी आज उद्ध्वस्त करून टाकणार आहें. यास्तव तूं धैर्य धर, असा घाबरूं नको.

( ३ ) वैशंपायन—राजा, पार्थानें याप्रमाणें धीर दिला असतां विराटपुत्रानें भीष्मानें रक्षण केलेल्या प्रचंड रथसैन्याजवळ आपला रथ नेला. त्यावेळीं रणामध्यें कुरूंना जिंकण्याची इच्छा करणारा तो महाबाहु धनंजय आलेला पहातांच क्रूर कर्में करणाऱ्या गांगेयानें मुळींच व्यग्र न होतां त्याचें निवारण केलें. तेव्हां पृथापुत्रानें भीष्माच्या समीप जाऊन आपलें धनुष्य आकर्ण ओढलें आणि सुवर्णपृष्ठयुक्त शरांनीं त्याच्या ध्वजाला मुळांतच वेध करून तो भूमिवर पाडविला.

अर्जुनाचें हें कृत्य पहातांच दुःशासन, विकर्ण, दुःसह आणि विविंशति हे विचित्र माला व वस्त्रें धारण करणारे, शस्त्रास्त्रनिपुण, महाबलाढ्य चौघे वीर धनुर्धर पार्थावर धांवून आले. परंतु एकट्या कौंतेयानें त्या चौघांचेंहि निवारण केलें.

( ४ ) राजा, दुःशासनानें एका भल्ल बाणानें विराटपुत्राला विद्ध केलें आणि दुसरा बाण पार्थाच्या वक्षःस्थलावर सोडला. तेव्हां अर्जुनानें आपल्या तीक्ष्ण धारेच्या शरानें त्याचें सुवर्णमय धनुष्य तोडून टाकिलें व गृध्रपंखांनीं भूषित केलेल्या पांच बाणांनीं त्याच्या हृदयावर प्रहार केले. त्यावेळीं पार्थाच्या बाणांनीं पीडित झालेला तो दुःशासन युद्ध सोडून पळून गेला.

त्यानंतर हे भारता, धृतराष्ट्रपुत्र विकर्णानें महा धनुर्धर परंतप पार्थाला तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें. तेव्हां शत्रुतापन अर्जुनानें आपल्या नतपर्व शरानें त्याच्या ललाटावर वेध केला. तेव्हां विद्ध झालेला तो दुर्योधनाचा भ्राता रथांतून खालीं पडला.

राजा, तें पाहून त्याचें रक्षण करण्याची इच्छा करणारे दुःसह आणि विविंशति पार्थावर धांवून गेले आणि त्यांनीं अर्जुनावर तीक्ष्ण शरांची वृष्टि केली. तेव्हां धनंजयानें त्या दोघांना गार्धपत्रयुक्त शरांनीं विद्ध करून एकाच वेळीं त्यांच्या अश्वांचाहि वध केला. याप्रमाणें ज्यांचीं अंगें छिन्न-भिन्न झालीं आहेत व अर्जुनानें अश्वांचा वध केल्यामुळें जे विरथ झाले आहेत असे ते दोघे धृतराष्ट्रपुत्र हताश झाले. तें पाहून त्यांचे अनुचर धांवून आले आणि त्यांनीं त्या दोघांना दुसऱ्या रथांत घालून रणांगणांतून दूर नेलें. तेव्हां हे कुरुश्रेष्ठा, अचुक लक्ष्यवेध करणारा महाबलाढ्य किरीटमाली अजिंक्य बीभत्सु सर्व दिशांतील कौरवांवर प्रहार करूं लागला. ४. ४. ६१.

---

## अध्याय ६२ वा.

[ १ एकत्र जमून युद्ध करणाऱ्या कुरुवीरांचा अर्जुनानें रणांत केलेला संहार. ]

(१) वैशंपायन—हे भारता, अर्जुनाचें तें अद्भुत कर्म पाहून कौरवांचे सर्व महारथ एकत्र होऊन त्याच्या रथावर चाल करून आले. तेव्हां धुक्यानें पर्वतांना जसें आच्छादून टाकावें, तसें पार्थानें आपल्या शरजालांनीं त्या सर्व महारथांना झांकून टाकिलें. त्यावेळीं मदोन्मत्त गजांचा चीत्कार, अश्वांचें खिंखाळणें व शंख, भेरी इत्यादि रणवाद्यांचा कर्कश ध्वनि, यांचा फार मोठा नाद झाला. अर्जुनाच्या सहस्रावधि बाणांनीं मनुष्यें व अश्व यांच्या पोलादि कवचांचा भेद करून त्यांना विद्ध केलें. राजा, रणामध्यें अतिशय त्वरेनें शर सोडणारा तो पार्थ शरदृतूंतील मध्याह्नकालच्या निर्मल किरणांनीं युक्त असलेल्या सूर्याप्रमाणें शोभला.

हे कुरुश्रेष्ठा, सव्यसाची धनंजयाच्या शरवृष्टींनीं त्रस्त झालेले रथी व अश्वसादी आपापले रथ व अश्व सोडून भूमीवर इतस्ततः धावूं लागले. पायदळ सैन्यानेंहि तोच मार्ग स्वीकारला. त्या शूर योद्धयांचीं ताम्र, रौप्य व पोलादि कवचें अर्जुनाच्या शरवृष्टीनें फुटून त्यांचा फार मोठा शब्द होऊं लागला. ती सर्व रणभूमि तीक्ष्ण शरांनीं विद्ध झालेले गज, अश्व व त्यांवर आरूढ झालेले योद्धे यांच्या मृत शरीरांनीं भरून गेली; ज्यानें हातांत धनुष्य धारण केलें आहे, असा धनंजय त्या रणभूमीवर जणुंकाय नृत्यच करूं लागला.

राजा, त्या समरांगणांत विजेच्या कडकडाटाप्रमाणें पार्थाच्या गांडीव धनुष्याचा प्रचंड टणत्कार ऐकून त्रस्त झालेलीं सर्व कौरवसैन्यें त्या महायुद्धांतून परत फिरलीं. ती सर्व युद्धभूमि सुवर्णाचीं कुंडलें व शिरस्त्राणें धारण केलेल्या मस्तकांनीं व सुवर्णमालांनीं आच्छादून गेलेली दिसत होती. त्यावेळीं बाणांनीं छिन्नविच्छिन्न झालेलीं गात्रें व धनुष्यासह इतर हस्ताभरणांनीं युक्त असलेले बाहु यांनीं पृथ्वी आच्छादित झाली. पार्थाच्या तीक्ष्ण बाणांनीं सैनिकांचीं मस्तकें पडत असतांना आकाशांतून होणाऱ्या अश्मवृष्टीचाच भास झाला.

हे भरतर्षभा, याप्रमाणें रुद्रस्वरूपी धनंजयानें भयंकर पराक्रम करून, तेरा वर्षें ज्या क्रोधाचा निरोध करून ठेविला होता, त्या क्रोधाग्नीचा धृतराष्ट्रपुत्रांवर वर्षाव केला. त्या पांडवाचा सैन्याला दग्ध करून टाकणारा तो पराक्रम पाहून सर्व कुरुयोद्धे दुर्योधनाच्या समक्ष स्वस्थ बसले. त्यावेळीं हे भारता, विजयिश्रेष्ठ अर्जुन त्या सर्व सैन्याला भयभीत करून आणि सर्व महारथांना रणांतून पळावयास लावून सर्वत्र निर्भयपणें फिरूं लागला.

राजा, युगांतीं कालानें निर्माण केलेल्या घोर नदीप्रमाणें त्या श्रेष्ठ धनुर्धरानें त्या समरभूमींत रक्ताची नदी प्रवृत्त केली. त्यांत अस्थि हेंच शेवाळ, धनुष्यबाण याच नौका, योद्धयांचे केंस हेंच तीरावरील हिरवें गवत आहे, असें भासलें. कवचें व शिरस्त्राणें यांनीं ती नदी व्याप्त होऊन गेली होती. त्यांत हत्ती हेच कांसव व मत्त गज हेच जलगज होते. मेद, वसा, व रक्त यांचा प्रवाह वहाणारी ती नदी भय वाढविणारी होती. तेथें विकराल आणि विशाल श्वापदांच्या ओरडण्याचा भयंकर ध्वनि पसरला होता. त्यांत तीक्ष्ण शस्त्रें हेच नक्र असून कच्चें मांस खाणाऱ्या शृगालादि हिंस्रपशूंनीं ती आवृत झाली होती. मोत्याचे हार याच त्या नदीच्या लाटा, विचित्र अलंकार हेच बुड-

बुडे व शरसंघ हेच आवर्त होते. त्या दुस्तर नदींतील गज हेच नक्र व मोठाले रथ हींच बेटें असून शंख आणि दुंदुभी यांच्या ध्वनींनीं ती नादित झाली होती.

हे भारता, अशा प्रकारची ही दुस्तर शोणितनदी पार्थानें निर्माण केली व आपल्या शरसंधानाच्या कौशल्यानें सर्वांना थक्क करून सोडिलें. ४. ४. ६२.

---

## अध्याय ६३ वा.

[ १ कर्ण-दुर्योधनादिकांनीं केलेला महा-अस्त्रांचा प्रयोग. २ पार्थानें केलेला ऐंद्रास्त्राचा प्रयोग. ३ सर्वांचें पलायन. ]

( १ ) वैशंपायन—राजा पारिक्षिता, याप्रमाणें पार्थानें त्या सर्व कुरु-योद्धयांचा पराभव करून त्यांना पळावयास लाविलें असतां दुर्योधन, कर्ण, दुः-शासन, विविंशति, पुत्रासह द्रोण आणि महारथ कृप हे सव वीर क्षुब्ध होऊन धनंजयाला मारण्याची इच्छा करीत आपापलीं दृढ धनुष्यें सज्ज करून पार्थावर पुनः चालून आले. त्यावेळीं हे महाराजा, ज्याच्या ध्वजावरील पताका अचल आहे व ध्वजाग्रावर वानर आरूढ झाला आहे, अशा सूर्यासारख्या तेजस्वी रथांतून धनुर्धर पार्थ त्या सर्वांशीं प्रतियुद्ध करण्यास पुढें सरसावला.

राजा, पृथापुत्राच्या रथासमीप येतांच रथिश्रेष्ठ कृप, कर्ण व द्रोण या तिघांनीं दिव्य अस्त्रांनीं पराक्रमी धनंजयाचें निवारण केलें. वर्षाकालच्या मेघाप्रमाणें शर-समूह सोडणाऱ्या कौरव वीरांनीं चोहोंकडून धनंजयावर अविच्छिन्न शरवृष्टि केली. त्याच्या समीप जाऊन ते वीर पिसाऱ्यानें भूषित झालेले तीक्ष्ण बाण व दिव्य अस्त्रें यांनीं मोठ्या आस्थेनें व वेगानें त्याला आच्छादित करूं लागले. त्यामुळें पार्थावर सोडलेल्या दिव्य अस्त्रांनीं त्याच्या शरीरावरील दोन अंगुळें जागाहि उघडी राहिली नाहीं.

( २ ) त्यावेळीं महारथ अर्जुनानें हंसून आदित्यासारखें तेजस्वी ऐंद्रास्त्र आपल्या गांडीव धनुष्याला जोडिलें आणि शरवृष्टीनें सर्व कुरूंना आच्छादून टाकिलें. तेव्हां ज्याचीं किरणें सभोंवार पसरलीं आहेत अशा आदित्याप्रमाणें तो वीर समरामध्यें शरांची वृष्टि करीत उभा राहिला. त्या प्रसंगीं अर्जुनाचें तें प्रसिद्ध गांडीव धनुष्य मेघांतील विद्युल्लतेप्रमाणें, पर्वतावरील वणव्याप्रमाणें किंवा इंद्रधनुष्याप्रमाणें शोभलें.

( ३ ) हे कुरुश्रेष्ठा, पर्जन्य पडूं लागला असतां अंतरिक्षांत जेव्हां विद्युत् चमकते तेव्हां सर्व दिशा व पृथ्वी जशी प्रकाशित होते, त्याप्रमाणें गांडीवाच्या तेजानें दाही दिशा प्रकाशित झाल्या. त्यावेळीं हे भारता, गज व सर्व रथिश्रेष्ठ मूर्च्छित झाले. सर्व योद्धे गोंधळून गेले. ते किंकर्तव्यतामूढ होऊन युद्धांतून पराङ्मुख झाले. याप्रमाणें हे भरतर्षभा, तें सर्व भग्न झालेलें सैन्य स्वजीविताविषयीं निराश होऊन दाही दिशांकडे पळून गेलें. ४. ४. ६३.

---

## अध्याय ६४ वा.

[ १ भीष्मार्जुनांचें शस्त्रास्त्रांनीं अतिमानुष युद्ध. २ तें पाहून संतुष्ट झालेल्या इंद्रानें दिव्यपुष्पवृष्टीनें त्या दोघांचा केलेला सत्कार. ३ अर्जुनानें केलेला भीष्माचा पराभव आणि त्याचें पलायन. ]

( १ ) वैशंपायन—हे पांडवेया, ते सर्व योद्धे अर्जुनाकडून मारले जात आहेत, असें पाहून भारतांचा पितामह शांतनव भीष्म आपलें सुवर्णालंकृत श्रेष्ठ धनुष्य व मर्मभेदक तीक्ष्ण शर घेऊन धनंजयावर धांवला. सूर्योदयाच्या वेळीं पर्वत जसा शोभिवंत दिसतो, तसा त्यावेळीं मस्तकावर शुभ्र छत्र असलेला तो नरश्रेष्ठ शोभला. त्या गंगापुत्रानें धृतराष्ट्रपुत्रांना आनंद देत शंखनाद केला आणि अर्जुनाला उजवी घालून त्याचें निवारण केलें.

राजा, याप्रमाणें भीष्म येत आहे, असें पहातांच संतुष्ट झालेला कौंतेय मेघधारांचें ग्रहण करणाऱ्या अचल पर्वताप्रमाणें स्वस्थ चित्तानें त्याचा स्वीकार करण्यास सज्ज झाला. त्यानंतर वीर्यवान् भीष्मानें फूत्कार सोडणाऱ्या सर्पाप्रमाणें महा वेगवान् आठ शर पार्थाच्या ध्वजावर सोडिले व त्या बाणांनीं पांडुपुत्राच्या ध्वजाला भिडून त्यांवर बसलेल्या देदीप्यमान वानराला व भूतगणांना विद्ध केलें.

तेव्हां पांडवानें तीव्रधारेच्या रुंद भल्लबाणानें भीष्माच्या छत्राचा छेद केला असतां तें तत्काल भूमीवर पडलें. लगेच कौंतेयानें तीक्ष्ण शरांनीं भीष्माचा ध्वज, रथाचे दोन्ही अश्व व त्याचे पार्ष्णिसारथि यांस सत्वर विद्ध केलें. त्यावेळीं तें सहन न होऊन हा सव्यसाची विजय आहे, हें जाणत असूनहि गंगापुत्रानें त्यावर दिव्य अस्त्र सोडलें. तेव्हां महामेघाचा स्वीकार करणाऱ्या पर्वताप्रमाणें त्या धनुर्धरानें त्याचा स्वीकार केला आणि भीष्म व पार्थ या दोघां वीरांचें बलि व इंद्र यांच्या युद्धाप्रमाणें अंगावर रोमांच आणणारें तुमुल युद्ध झालें.

राजा, सैन्यासह सर्व कौरव पहात असतां त्यांच्या समक्ष भीष्म व पार्थ यांनीं युद्धांत परस्परांच्या भल्ल बाणांचा भल्ल बाणांनींच छेद केला. तेव्हां ते अंतरिक्षांत वर्षा-ऋतूंतील काजव्याप्रमाणें शोभले. त्यावेळीं उजव्या व डाव्या हातांनीं शर सोडणाऱ्या पार्थाचें गांडीव धनुष्य मंडलाकार दिसलें. त्यानंतर मेघ जसा पजन्यवृष्टीनें पर्वताला आच्छादून टाकितो, त्याप्रमाणें अर्जुनानें शेंकडों तीक्ष्ण शरांनीं भीष्माला झांकून टाकिलें. तें पाहून भीष्मानें अद्भुत शरवृष्टि करून त्या बाणांचें व पार्थाचेंहि निवारण केलें. तेव्हां ते सर्व तुटलेले बाण अर्जुनाच्या रथाकडे परत आले.

त्यानंतर पार्थाच्या रथांतून शलभांच्या पंक्तीप्रमाणें बाण सुटूं लागले व त्यानें पुनः शेंकडों शरांनीं भीष्माला विद्ध केलें. तथापि भीष्मानें आपल्या असंख्य तीक्ष्ण बाणांनीं त्यांचें निवारण केलें. तें पाहून सर्व कौरव 'धन्य धन्य' असें म्हणूं लागले. 'खरोखर, भीष्मानें पार्थाशीं युद्ध करून हें अतिशय दुष्कर कर्म केलें. हा शांतनव भीष्म, देवकीसुत वासुदेव किंवा महाबलाढ्य भारद्वाज द्रोणाचार्य, यांच्यावांचून या दक्ष व चपल धनंजयाशीं अन्य कोणता वीर युद्ध करण्यास समर्थ आहे; समरांगणांत याचा वेग दुसरा कोण सहन करूं शकणार!' असे उद्गार चोहोंबाजूंनीं ऐकूं येऊं लागले. ते दोघे महाबलाढ्य भरतश्रेष्ठ अस्त्रांनीं अस्त्रांचें निवारण करीत खेळत असतां सर्व प्रेक्षकांची दृष्टि मोहित झाली.

त्या संग्रामामध्यें ते दोघे निष्णात वीर प्राजापत्य, ऐंद्र, आग्नेय, दारुण रौद्र, कौबेर, वारुण, याम्य आणि वायव्य या दिव्य अस्त्रांचा परस्परांवर प्रयोग करीत संचार करीत असतां त्यांना पाहून सर्व प्राणी विस्मित झाले आणि 'धन्य धन्य पार्थ! धन्य भीष्माचार्य! भीष्म व पार्थ यांच्या या युद्धांतील हा महान् अस्त्रप्रयोग मनुष्यांमध्यें कधींहि दिसणें शक्य नाहीं' असें म्हणाले.

हे पारिक्षिता, याप्रमाणें त्या दोघां सर्वास्त्रवेत्त्यांनीं प्रथम अद्भुत अस्त्रयुद्ध केलें. नंतर ते शस्त्रयुद्धास प्रवृत्त झाले. प्रथम पार्थानें भीष्माचें सुवर्णमय धनुष्य आपल्या तीक्ष्ण शरानें तोडून टाकिलें. तेव्हां एका निमिषांतच त्या महारथ भीष्मानें दुसरें धनुष्य घेऊन तें सज्ज केलें आणि धनंजयावर अनेक शरांचा वर्षाव केला. अर्जुनानेंहि भीष्मावर असंख्य तीक्ष्ण बाण सोडिले व भीष्मानेंहि पार्थावर विपुल शरवृष्टि केली. याप्रमाणें त्या दोघां दिव्यास्त्रवेत्त्या महात्म्यांनीं परस्परांवर तीव्र शरांचा मारा चालविला असतां ते दोघेहि वीर शस्त्रविशारद असल्यामुळें त्यांच्यामध्यें कांहींच विशेष दिसला नाहीं.

त्यानंतर किरीटमाली कौंतेयानें आणि शांतनव गांगेयानें दाही दिशा शरांनीं आच्छादून टाकिल्या. तें अद्भुत युद्ध पाहून कांहीं लोक ' पार्थाहून भीष्म श्रेष्ठ आहे ' व कित्येक ' पार्थ भीष्माहून वरिष्ठ आहे ' असें म्हणूं लागले. हे राजन्, धनंजयानें भीष्माच्या शूर रथरक्षकांचा वध करतांच त्यांनीं पार्थाच्या रथाजवळच शयन केलें. त्यावेळीं रणांगण शत्रुरहित करण्याची इच्छा करणाऱ्या पार्थाच्या गांडीव धनुष्यापासून सुटलेले सुवर्णपृष्ठयुक्त शुभ्र बाण आकाशांत हंसपंक्ती-प्रमाणें शोभले.

(२) हे भारता, सव्यसाची धनंजयाचें तें दिव्य अस्त्रांचें विचित्र युद्ध पहाण्या-साठीं अंतरिक्षांत इंद्रासह सर्व देव जमा झाले. तो अद्भुत विचित्र अस्त्रप्रयोग पाहून प्रतापवान् चित्ररथ गंधर्व अतिशय हृष्ट होऊन देवेंद्राला म्हणाला—" हे सुरेश्वरा, पार्थाच्या धनुष्यापासून सुटलेले व कोठेंहि आसक्त न होतां वेगानें अचुक जाणारे हे शर पहा. या जिष्णूचा हा विचित्र दिव्यास्त्रप्रयोग खरोखर अतिमानुष आहे. हा मनुष्यामध्यें कोठेंच दिसत नाहीं. धनंजय गांडीवधनुष्य घेतो केव्हां, त्यावर शर जोडतो केव्हां आणि ते सोडतो केव्हां, यांतील अंतर सुद्धां आम्हांला दिसत नाहीं. आकाशांत तळपत असलेल्या मध्याह्नींच्या प्रखर सूर्याकडे जसें पहावत नाहीं, तसें सैन्याच्या मध्यभागीं असलेल्या या पांडुनंदनाकडे पहाण्यास कोणी समर्थ नाहीं. त्याचप्रमाणें हा गंगापुत्र भीष्महि लोकांना दुष्प्रेक्ष्य झाला आहे. ते दोघेहि कुरुश्रेष्ठ तुल्य परा-क्रमी, प्रख्यात धनुर्धर, युद्धांत दुर्जय आणि अद्भुत कर्में करणारे आहेत. "

हे भारता, याप्रमाणें गंधर्वानें पार्थ व भीष्म यांच्या युद्धाची प्रशंसा केली असतां देवराज इंद्रानें दिव्य पुष्पवृष्टि करून त्यांचा सत्कार केला.

( ३ ) त्यानंतर, हे राजन्, शांतनव भीष्मानें पार्थाला डाव्या बाजूला विद्ध केलें, तेव्हां आदित्याप्रमाणें तेजस्वी बीभत्सूनें आपल्या रुंद पात्याच्या गार्ध्र-पत्रयुक्त बाणानें भीष्माच्या धनुष्याचा छेद केला आणि दहा बाणांनीं त्याचा पराभव करण्याचा प्रयत्न करणाऱ्या गांगेयाच्या वक्षःस्थलावर वेध केला. तेव्हां त्या शरप्रहारानें पीडित झालेला तो युद्धदुर्धर्ष महाबाहु भीष्म मूर्छित होत असतां रथाची दांडी धरून उभा राहिला. त्यावेळीं त्याच्या महारथाचें आणि अश्वांचें रक्षण करणाऱ्या सारथ्यानें, अशा प्रसंगीं काय करावें, याचा यथाशास्त्र विचार करून भीष्माचा रथ समरांगणांतून पलीकडे नेला. ४. ४. ६४.

---

## अध्याय ६५ वा.

[ १ सिंहनाद करून युद्धार्थ आलेल्या दुर्योधनाशीं पार्थाचें युद्ध. २ त्याच्या संरक्षणासाठीं मोठ्या वेगानें आलेल्या विकर्णाच्या गजाचा एका शरानें वध. ३ दुर्योधनाच्या हृदयावर वज्रप्राय शराचा प्रहार. ४ युद्धांतून परत फिरणाऱ्या दुर्योधनाला पार्थाचें निर्भर्त्सनापूर्वक पुनः युद्धार्थ आह्वान. ]

(१) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें युद्धभूमीचा अग्रभाग सोडून भीष्मानें पलायन केलें असतां धृतराष्ट्रपुत्र दुर्योधन आपल्या रथाची पताका मोकळी सोडून सिंहनाद करीत धनुष्य घेऊन पार्थावर धांवून गेला आणि त्यानें आपलें धनुष्य आकर्ण ओढून शत्रुसैन्यांत निर्भयपणें संचार करणाऱ्या पार्थाच्या ललाटाला भल्ल बाणानें विद्ध केलें. त्यावेळीं एकाच शिखरानें युक्त असलेल्या पर्वताप्रमाणें त्या सुवर्णपंखयुक्त बाणानें विद्ध झालेला पार्थ शोभला. त्या बाणानें क्षत पडलेल्या त्याच्या ललाटांतून उष्ण रक्त वाहूं लागलें. सुवर्णपृष्ठानें युक्त असलेला तो विचित्र बाण त्याच्या ललाटाचा भेद करून अतिशय शोभला.

( २ ) राजा, दुर्योधनाच्या बाणानें वेध केल्यामुळें ज्याचा क्रोध अतिशय वाढला आहे अशा पार्थानें दुर्योधनावर विषाग्नीसारख्या तीव्र शरांचा वर्षाव केला. ते दोघेहि अजमीढकुलोत्पन्न पुरुषश्रेष्ठ परस्परांवर प्रहार करूं लागले. तें पाहून पर्वतासारख्या विशाल मदोन्मत्त गजावर आरूढ होऊन विकर्ण पुढें सरसावला. त्याच्या बरोबर गजाचें रक्षण करणारे चार रथ होते. तो वेगानें कुंतीपुत्रावर धांवून आला. तेव्हां धनंजयानें आपलें धनुष्य आकर्ण ओढून मोठ्या वेगानें एक तीक्ष्ण बाण सोडिला व त्या गजेंद्राच्या गंडस्थलावर मधोमध वेध केला. त्या वेळीं इंद्रानें सोडलेलं वज्र जसें पर्वताचें विदारण करून आंत शिरतें, तसा पार्थानें सोडलेला गार्ध्रपत्रयुक्त शर पृष्ठभागासह त्या गजाच्या गंडस्थलाचा भेद करून त्वरेनें आंत शिरला आणि वज्राघातानें पर्वतशिखर जसें खालीं पडावें, तसा पार्थाच्या शरानें पिडीत झालेला तो गजराज कंपित होऊन भूमीवर पडला. तेव्हां आपला श्रेष्ठ गज पडलेला पहातांच भयभीत झालेला विकर्ण मोठ्या त्वरेनें खालीं उतरला आणि आठशें पावलें पळत जाऊन विविंशति-भ्रात्याच्या रथावर चढला.

( ३ ) राजा, याप्रमाणें पार्थानें त्या मेघासारख्या प्रचंड गजेंद्राचा आपल्या वज्रतुल्य बाणानें वध करून तशाच प्रकारच्या तीव्र शरानें दुर्योधनाचें वक्षःस्थल

विद्ध केलें. तेव्हां गजेंद्र, राजा दुर्योधन, विकर्ण व त्याचे रक्षक या सर्वांना जर्जर झालेलें पाहून गांडीवांतून सुटलेल्या तीक्ष्ण शरांनीं विद्ध झालेल्या प्रमुख योद्ध्यांनीं रणांगणांतून सत्वर पलायन केलें. अशाप्रकारें पार्थानें श्रेष्ठ गजाचा वध केला आहे व आपले सर्व योद्धे पळ काढीत आहेत, हें पाहून कुरुश्रेष्ठ दुर्योधन ज्या बाजूला पार्थ नाहीं, त्या बाजूला रणांतून पळून जाऊं लागला.

हे भारता, युद्धामध्यें पराभूत होऊन आपल्या बाणानें विद्ध झाल्यामुळें रक्त ओकणारा हा दुर्योधन आपल्याला चुकवून पलायन करीत आहे, हें पाहून किरीटीनें आपले दंड थोपटले आणि सिंहनाद करून दुर्योधनाला म्हटलें—

( ४ ) " हें सुयोधना, विपुल यश आणि कीर्ति संपादन करावयाची सोडून युद्धांतून निवृत्त होऊन असा पळून कोठें चाललास? अरे, अद्यापि तुझा विजय झाल्याचीं जयवाद्यें वाजूं लागलीं नाहींत! मग इतक्यांतच संग्राम सोडून कोठें चाललास? हे नरेंद्रा, राज्यापासून च्युत झालेल्या युधिष्ठिराच्या आज्ञेंत वागणारा त्याचा कनिष्ठ भ्राता आणि पृथेचा तिसरा पुत्र हा मी पार्थ तुझ्यापुढें दंड ठोकून उभा आहें व तुला युद्धाचें आह्वान करीत आहें. तरी आतां परत फिर. युद्धांत प्राणत्याग करणें हें नरेंद्राचें लक्षण आहे, युद्धांतून पलायन करणें, हें नव्हे. आपल्या द्यूतांतील जयाचें आतां स्मरण कर.

हे धार्तराष्ट्रा, पूर्वीं तुझें जें हें ' दुर्योधन ' नांव ठेविलें, तें आज व्यर्थ झालें. कारण युद्ध सोडून पलायन करणाऱ्या तुझ्या अंगीं दुर्योधनता नाहीं. अरे आतां तुझें युद्धामध्यें पुढून व मागून रक्षण करणारें कोणीहि नाहीं. यास्तव हे शूरा, तूं युद्धांतून पळ काढ आणि या पांडुपुत्रापासून आपल्या प्रिय प्राणांचें रक्षण कर." ४. ४. ६५.

---

## अध्याय ६६ वा.

[ १ युद्धासाठीं परत फिरलेल्या दुर्योधनाबरोबर इतर योद्ध्यांचें अनुगमन. २ अर्जुनाचें त्या सर्वांशीं तुमुल युद्ध. ३ अर्जुनाच्या संमोहनास्त्रानें भीष्माखेरीज सर्वांची मूर्च्छा आणि मूर्च्छित झालेल्या सर्व वीरांचें उत्तरानें केलेलें वस्त्रापहरण. ४ मूर्च्छा उतरल्यावर भीष्माच्या वचनावरून सर्व कौरवांचें स्वनगरीस गमन. ५ अर्जुनाचें भीष्मादिकांना वंदन व दुर्योधनाचें किरीटच्छेदन. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, याप्रमाणें पार्थानें उपहासपूर्वक युद्धाचें आह्वान केलेलें ऐकून माहातानें अंकुश टोंचला असतां मत्तगज जसा आवेशानें

परत फिरतो, तसा अर्जुनाच्या टोंचणाऱ्या वाग्रूपी अंकुशानें संतापलेला दुर्योधन युद्धभूमीकडे परत वळला. राजा, पायानें डवंचलेला सर्प जसा क्षुब्ध होऊन उलटून धांवतो, तसा अर्जुनाच्या वाक्प्रहारानें तिरस्कृत केलेला तो असहिष्णु महारथ रथांतून वेगानें पार्थावर धांवला. पार्थाच्या बाणांनीं ज्याचीं गात्रें विद्ध झालीं आहेत त्या दुर्योधनाला परत वळलेलें पहातांच कर्ण क्षणभर स्तब्ध उभा राहिला आणि दुर्योधनाचें रक्षण करण्यासाठीं त्याच्या डाव्या बाजूला जाऊन त्याला साह्य करूं लागला.

राजा, त्या वेळीं शांतनव भीष्महि आपल्या सुवर्णालंकारयुक्त अश्वांच्या रथांतून पुढें झाला आणि दुर्योधनाच्या मागें राहून पार्थाच्या शरांपासून त्याचें संरक्षण करूं लागला. त्याचप्रमाणें द्रोण, कृप, विविंशति व दुःशासनादि वीर तत्काल परत फिरले आणि आपापलीं प्रचंड धनुष्यें सज्ज करून दुर्योधनाच्या पुढें उभे राहिले.

( २ ) भरतश्रेष्ठा, ते सर्व कौरव जलौघाप्रमाणें ससैन्य परत फिरलेले पाहून, सूर्य जसा मेघसमूहाला संतप्त करितो, तसा धनंजय त्या कौरवचमूला ताप देऊं लागला. त्या वेळीं अनेक मेघ जलधारांनीं पर्वताला जसे व्यापून टाकितात, त्याप्रमाणें त्या सर्व कौरववीरांनीं पार्थावर सर्व बाजूंनीं दिव्य अस्त्रें सोडून त्याच्यावर शरांचा वर्षाव केला.

तें पाहून हे राजेंद्रा, धनुर्धर पार्थानें त्या कुरुश्रेष्ठांच्या अस्त्रांचें प्रति-अस्त्रांनीं निवारण करून त्यांजवर वज्रतुल्य अनिवार्य संमोहन अस्त्राचा प्रयोग केला. त्या वेळीं त्या महाबलवान् कौंतेयानें तीक्ष्ण धारेच्या शरांनीं आणि गांडीव धनुष्याच्या टणत्कारानें शत्रूंचीं मनें व्यथित केलीं. नंतर शत्रूंचा नाश करणाऱ्या पार्थानें दोन्ही हातांनीं आपला श्रेष्ठ देवदत्त शंख घेऊन त्याचा प्रचंड ध्वनि केला. त्या नादानें सर्व दिशा, उपदिशा, आकाश व पृथ्वी दुमदुमून गेली. तो भयंकर शंखनाद ऐकून सर्व कुरुश्रेष्ठ मोहित झाले आणि क्षणभर आपापलीं धनुष्यें टाकून शांत होऊन बसले.

( ३ ) हे पांडवेया, याप्रमाणें ते सर्व कौरववीर मूर्च्छित झालेले पहातांच पार्थाला विराटकन्या उत्तरेच्या शब्दाची आठवण झाली व तो मत्स्यपुत्राला म्हणाला—" राजपुत्रा, जोंवर हे कौरव सावध झाले नाहींत, तोंवर शत्रूंच्या मध्यभागीं जा आणि द्रोणाचार्य व कृपाचार्य यांचीं पांढरीं शुभ्र वस्त्रें, कर्णाचें

सुंदर पीतवस्त्र, अश्वत्थामा व इतर राजे यांचीं नीलवस्त्रें काढून घेऊन ये. भीष्म मात्र मूर्च्छित झालेला नाहीं. तो या अस्त्राचें निवारण कसें करावें, हें जाणतो, असें मला वाटतें. यास्तव हे श्रेष्ठ वीरा, तूं या पितामहाला डावी घालून जा.

राजा, पार्थाचें हें वचन ऐकून विराटपुत्र आपल्या हातांतील अश्वांची रज्जु बाजूला ठेवून रथांतून खालीं उतरला आणि त्या महारथांचीं वस्त्रें आणून पुनः मोठ्या त्वरेनें रथारूढ झाला. त्यानंतर त्या राजपुत्रानें आपले सुवर्णकवचानें भूषविलेले चार जातिवंत श्वेत अश्व कौरवांच्या ध्वजयुक्त सैन्याच्या मधून चालविले आणि अर्जुनाचा रथ शत्रूंचें उल्लंघन करून पुढें नेला.

भारता, याप्रमाणें पार्थ सर्व सैनिकांना मूर्च्छित करून निघून जात असतां कुरुश्रेष्ठ भीष्माला तें सहन झालें नाहीं. त्यानें अतिशय क्षुब्ध होऊन अर्जुनावर बाण सोडिले, परंतु रणधुरंधर धनंजयानें तत्काल त्या बाणांचें निवारण करून भीष्माच्या अश्वांचा शरांनीं वध केला आणि दुसरे दहा तीक्ष्ण बाण सोडून त्या पितामहालाहि विद्ध केलें. राजा, अशाप्रकारें अर्जुनानें भीष्माचा युद्धांत पराभव करून त्याच्या सारथ्यालाहि वेध केला आणि मेघसमुदायाचें विदारण करून सहस्ररश्मि भास्कर जसा प्रकाशतो, तसा कौरवांचा रथसमूह फोडून बाहेर पडलेला किरीटमाली पार्थ आपल्या रथांत स्वस्थ उभा राहिला.

( ४ ) हे राजन्, त्यानंतर सर्व कौरवसैन्य सावध झालें आणि त्यांनीं महेंद्रतुल्य पार्थाला रणांगणांतून बाहेर पडलेलें पाहिलें. तेव्हां अर्जुन कौरवांच्या हातून मोकळा सुटून निघून जात असलेला पहातांच दुर्योधन मोठ्या त्वरेनें म्हणाला—"हे वीरहो, तुम्हीं या पार्थाला असा मोकळा कसा सोडलांत ? आतां हा अर्जुन मूर्च्छित झालेल्या तुमचें 'तुम्ही पुनः येथून हालणार नाहीं' अशा रीतीनें मर्दन करील. त्यानें या पूर्वींच तुमचे प्राण घेतले नाहींत, हें आपलें भाग्य समजा."

दुर्योधनाचें हें अपमानकारक भाषण ऐकून भीष्म हंसून म्हणाला—"अरे, इतका वेळ तुझी बुद्धि कोठें गेली होती ? आणि तूं जो आपलें विचित्र धनुष्य व बाण टाकून स्वस्थ बसला होतास त्यावेळीं तुझा पराक्रम कोठें लपला होता ! यावर तूं कदाचित् असें म्हणशील कीं, तर मग आम्ही मोहित झालों असतां पार्थानें आमचा वध कसा केला नाहीं ? तर हे दुर्योधना, ऐक. हा बीभत्सु असें निर्दय कर्म करणारा नाहीं. त्याचें मन पापकर्मांत कधींहि प्रवृत्त होत

नाहीं. त्रैलोक्याचें राज्य जरी मिळत असलें, तरी त्यासाठींहि तो धर्मात्मा कधीं स्वधर्माचा त्याग करणार नाहीं. हे कौरवहो, पार्थाच्या या श्रेष्ठ पापभीरुत्वामुळेंच त्यानें तुमचा वध केला नाहीं आणि तुम्ही आज जिवंत राहिलांत.

आतां, हे कुरुश्रेष्ठा, या सर्व कौरवांना परत फिरूं दे आणि पार्थालाहि गायींना जिंकून घेऊन जाऊं दे. व्यर्थ मोहांत पडूं नको व आपल्या स्वार्थाला मुकूं नको."

(५) राजा, पितामहाचें हें आत्महितपर वचन ऐकून तो अतिशय असहिष्णु दुर्योधन भग्नमनोरथ होऊन निश्वास टाकीत स्वस्थ बसला. तेव्हां भीष्माचें हितवचन व त्याचा परिणाम लक्षांत घेऊन आणि धनंजयाचा क्रोधाग्नि प्रदीप्त होत असलेला पाहून दुर्योधनाचें रक्षण करणाऱ्या त्या सर्व कौरववीरांनीं स्वनगरीकडे परत फिरण्याचा निश्चय केला.

हे भरतश्रेष्ठा, त्या कौरवसैन्याला परत जात असलेलें पाहून पार्थ अतिशय संतुष्ट झाला आणि त्यांच्याशीं भाषण करणाच्या इच्छेनें त्यानें आपला रथ पुनः परत फिरविला.

पण त्यावेळीं त्यांच्याशीं संभाषण करण्यास अवकाश न मिळाल्यामुळें त्या पांडवश्रेष्ठानें प्रथम वृद्ध पितामह शांतनव भीष्म व गुरु द्रोणाचार्य यांना मस्तकानें वंदन केलें. नंतर द्रौणि, कृप व मान्य कौरव यांना विचित्र शरांनीं अभिवादन केलें आणि एका शरानें दुर्योधनाच्या मस्तकावरील रत्नजडित मुकुटाचा छेद केला. त्यानंतर धनुर्धरानें त्या बाल्हीक-सोमदत्तादि सर्व मान्य वीरांचा निरोप घेतला आणि गांडीवाच्या टणत्कारानें सर्व लोकांना नादित केलें. त्या वीराच्या देवदत्तशंखाचा प्रचंड ध्वनि होतांच शत्रूंचीं मनें विदीर्ण झालीं.

राजा, याप्रमाणें शत्रुसैन्याचा पूर्ण पराभव करून तो किरीटमाली पार्थ सुवर्णमालायुक्त ध्वजानें शोभणाऱ्या रथांत विराजमान झाला. ते सर्व कौरव परत गेलेले पाहून धनंजय हृष्ट चित्तानें उत्तराला म्हणाला—" हे वैराटे, तूं गायींना जिंकिलें आहेस, आतां अश्वांना मागें वळीव. शत्रु निघून गेले आहेत, यास्तव आतां आपल्या नगरीकडे आनंदानें परत फिर."

जनमेजया, पार्थाचें कौरवांशीं झालेलें तें अद्भुत युद्ध पाहून अंतरिक्षांतील देवहि संतुष्ट झाले आणि अर्जुनाच्या शौर्याची प्रशंसा करीत ते आपापल्या सुरभवनांत परत गेले. ४. ४. ६६.

---

## अध्याय ६७ वा.

[ १ शरण आलेल्या कुरुसैनिकांना पार्थापासून अभयप्राप्ति. २ स्वगृहांतील पांडवांचें वास्तव्य प्रकट न करतां कौरवांचा पराभव राजपुत्रानेंच केला, असें प्रसिद्ध करण्याविषयीं पार्थाची उत्तराला प्रेरणा व उत्तराची अंशतः मान्यता. ३ शमीजवळ येऊन त्यावर शस्त्रांची स्थापना. ४ उत्तराचा जयघोष करण्यासाठीं गोपालांचें प्रेषण व त्यांच्यामागून बृहन्नलेसह उत्तराचा नगरप्रवेश. ]

( १ ) **वैशंपायन**—हे पारिक्षिता, अशाप्रकारें त्या विशालाक्ष कौंतेयानें संग्रामामध्यें सर्व कुरूंना जिंकून विराटाचें विस्तीर्ण गोधन परत आणिलें. त्याच्या हातून शरविद्ध झालेले ते सर्व कौरव निघून गेले असतां युद्धांतून पळून गेलेले जे असंख्य कुरुसैनिक गहन वनांत लपून बसले होते, ते बाहेर आले आणि भयभीत होऊन पार्थापुढें हात जोडून उभे राहिले. ते क्षुधा व तृषा यांनीं व्याकुल झाले होते. त्यांचे केंस मोकळे सुटले असून, विदेशांत पडलेले ते दीन झाले होते. श्रांत झालेल्या त्या सर्वांनीं अर्जुनाला प्रणाम करून म्हटलें—" हे प्रभो, आम्हांला काय आज्ञा आहे ?"

तें ऐकून पार्थ म्हणाला—हे सैनिकहो, तुमचें कल्याण असो. तुम्ही खुशाल परत जा. भिऊं नका. मी आर्तांचा वध केव्हांहि करीत नसतों. तुम्हांला पूर्ण अभय आहे, जा.

राजा, उदारात्म्या पार्थाचें हें आश्वासनपर वचन ऐकतांच तेथें जमलेल्या त्या सव योद्ध्यांनीं आयु, कीर्ति व यश वाढविणाऱ्या आशीर्वादांनीं त्या श्रेष्ठ पृथापुत्राचें अभिनंदन केलें.

त्यावेळीं परत जाणाऱ्या शत्रूंना सोडून एखाद्या मत्त गजाप्रमाणें विराट-नगरीच्या अभिमुख जाणाऱ्या पार्थाकडे पहाण्यासहि ते कौरव समर्थ झाले नाहींत.

(२) त्यानंतर मेघाप्रमाणें वेगानें आलेल्या त्या कुरुसैन्याला पळावयास लावून तो परंतप पार्थ मत्स्यपुत्राला दृढ आलिंगन देऊन म्हणाला—" हे उत्तरा, तुझ्या पित्यापाशीं सर्व पांडव रहात आहेत, ही गोष्ट तुला एकट्यालाच काय ती ठाऊक आहे. तूं नगरांत प्रवेश केल्यावर ती कोणाला सांगूं नको. कारण हें ऐकून विराटराजा भीतीनें प्राणच टाकील. यास्तव हे राजपुत्रा, तूं नगरांत प्रवेश केल्यावर पित्याच्या समीप जाऊन हें सर्व कृत्य तूं स्वतःच केलें आहेस, असें त्याला निवेदन कर, 'कौरवांची ध्वजयुक्त प्रचंड सेना मींच जिंकिली व गायींना शत्रूंच्या हातून मींच सोडवून आणिलें' असें सांग."

उत्तर म्हणाला—हे सव्यसाचिन्, तूं जें अद्भुत कर्म केलेंस त्याला उपमाच नाहीं. असा पराक्रम करण्यास मी खरोखर समर्थ नाहीं. परंतु जोंवर तूं अनुज्ञा दिली नाहींस, तोंवर मी तुझ्याविषयीं पित्याजवळ अक्षरहि काढणार नाहीं.

( ३ ) राजा, याप्रमाणें शत्रुसैन्याला जिंकून व कौरवांच्या सर्व धनाचें हरण करून शरानें विद्ध झालेला बीभत्सु पुनः श्मशानांत आला आणि त्या शमीवृक्षापाशीं उभा राहिला. त्यावेळीं त्याच्या रथध्वजावरील अग्नीसारखा देदीप्यमान असलेला तो महाकपि सर्व भूतगणांसह उड्डाण करून अंतरिक्षांत गेला. सर्व माया नाहींशी झाली व रथावर पूर्ववत् विराटाचा सिंहाकार ध्वज पुनः झळकूं लागला.

तेव्हां विराटपुत्र पांडवाचें तें यशस्वी श्रेष्ठ धनुष्य आणि शर शमीवृक्षावर ठेवून आपल्या महात्म्या किरीटी सारथ्यासह मोठ्या संतोषानें मत्स्यनगरीकडे वळला. उत्तर शस्त्रें वृक्षावर ठेवीत आहे, तों इकडे पार्थानें तें श्रेष्ठ युद्धकर्म केल्यावर आपल्या केसांची वेणी घातली, अलंकार धारण केले आणि पुनः बृहन्नलेचा वेष घेऊन तो उत्तराचा सारथि झाला. त्यानें त्या विराटपुत्राच्या अश्वांची रज्जु आपल्या हातीं घेतली व मोठ्या संतुष्ट चित्तानें नगरीकडे रथ चालविला.

जनमेजया, ते सर्व दीन झालेले कौरव पराजित व परवश होऊन हस्तिनापुराकडे निघून गेले असतां विराटनगराकडे परत येतांना मार्गामध्यें पार्थ उत्तराला म्हणाला—" राजपुत्रा, हीं सर्व धेनूंचीं खिल्लारें त्यांच्या गोपालांसह परत येत आहेत, पहा ! तरी आतां आपण येथें थोडा वेळ थांबूं या. आपल्या या श्रांत झालेल्या अश्वांना पाणी पाजून त्यांना किंचित् विसावा देऊन आपण अपराह्णकालीं विराटनगरीला जाऊं. तोंपर्यंत हे वीरा, या गोपालांना तुझ्या आज्ञेनें त्वरित पुढें जाऊं दे आणि ही प्रिय वार्ता प्रसिद्ध करून नगरींत तुझा जयघोष करूं दे. "

( ४ ) फाल्गुनाच्या या वचनाप्रमाणें उत्तरानें शीघ्रगामी दूतांना बोलावून तत्काल अशी आज्ञा केली—" हे गोपालांनो, तुम्ही सत्वर नगरींत जा आणि शत्रूंचा पराभव झाला व गायीं जिंकून परत घेतल्या, अशी राजाच्या विजयाची घोषणा करा. "

राजा, याप्रमाणें ते दोघे मत्स्य व भारतवीर परस्परांशीं संकेत करून पुनः शमीजवळ आले आणि विजयानें संतुष्ट झालेल्या त्या वीरांनीं तेथें काढून ठेव-

लेले आपले अलंकारादि घेऊन आपल्या रथाला व स्वतःला भूषित केलें. नंतर बृहन्नला-सारथ्यासह तो विराटपुत्र शत्रूचा पराभव करून व कौरवांपासून गोधनादि हरण करून संतुष्ट चित्तानें स्वनगरीस आला. ४. ४. ६७.

---

## अध्याय ६८ वा.

[ १ विराटाचा स्वनगरींत प्रवेश व पौरांनीं केलेला सत्कार. २ कौरवांचा पराभव करण्यास एकटा उत्तर गेला आहे, असें अंतःपुरांत कळल्यावर राजाचें त्याच्या रक्षणार्थ योधप्रेषण. ३ उत्तरानें पाठविलेल्या दूतांनीं केलेली जयघोषणा. संतुष्ट झालेल्या राजाची नगर शृंगारण्याविषयीं आज्ञा. उत्तराला राजकुमारांचें सामोरें जाणें. ४ हृष्ट झालेल्या राजाची कंकाला द्यूतप्रेरणा. राजाची उत्कट इच्छा पाहून कंकाची अनिच्छेनें द्यूतप्रवृत्ति. ५ विराटाची स्वपुत्रपराक्रमप्रशंसा, बृहन्नलेच्या साह्यानें उत्तर विजयी झाला असें कंकाचें विधान. तें ऐकून क्रुद्ध झालेल्या विराटाचें कंकाच्या मुखावर अक्षक्षेपण. ६ कंकाच्या नाकांतून रुधिरस्राव व सैरंध्रीनें त्याचें पात्रांत केलेलें ग्रहण. ७ उत्तराचा सभेंत प्रवेश. ८ उत्तराच्या वचनानें विराटाचें कंकक्षमापन. ९ कंकाचा रक्तस्राव थांबल्यावर बृहन्नलेचा सभेंत प्रवेश. १० विराटाचे उत्तराला युद्धाविषयीं प्रश्न. ]

( १ ) **वैशंपायन**—हे राजेंद्रा, इकडे गोधन जिंकून विराटराजा चारी पांडवांसह हृष्ट चित्तानें सत्वर आपल्या नगरीस परत आला. संग्रामांत त्रिगर्तांचा पराभव करून व आपल्या सर्व गायी परत मिळवून तो मत्स्यराज पांडुपुत्रांसह विजयश्रीनें अतिशय शोभला. आसनावर बसलेल्या व मित्रांचा हर्ष वाढविणाऱ्या त्या वीराच्या सभोंवार चारी पांडवांसह सर्व वीर बसले. ब्राह्मणांसह सर्व प्रजाजनहि त्याचें अभिनंदन करावयास उपस्थित झाले. त्या सर्वांनीं सैन्यासह मत्स्यराजाचा मोठा सत्कार केला. तेव्हां ब्राह्मण व प्रजाजन यांस निरोप देऊन तो विराटराजा अंतःपुरांत गेला आणि 'उत्तर कोठें आहे?' असें विचारूं लागला. तेव्हां अंतःपुरांतील स्त्रिया व कन्या त्या राजास असें सांगूं लागल्या—

"हे महाराज, या नगरीच्या उत्तर दिशेंतील गोधन कौरवांनीं हरण करून नेलें, ही वार्ता ऐकतांच अतिशय क्रुद्ध झालेला उत्तर एकटाच कौरवांना जिंकून धेनु परत मिळविण्यासाठीं अति साहसानें निघून गेला आहे, बृहन्न-

लेला आपलें सारथ्य करावयास सांगून तो महावीर आपलें गोधन हरण करून न्यावयास आलेल्या भीष्मादि सहा अतिरथ्यांवर चालून गेला आहे. कौरवांच्या सैन्यांत शांतनव भीष्म, कृप, कर्ण, दुर्योधन व द्रोण हे सहा रथी प्रामुख्यानें उपस्थित झाले आहेत."

(२) राजा जनमेजया, स्त्रियांचें तें भाषण ऐकून विराटराजा अतिशय भयभीत झाला. बृहन्नलेला सारथि करून एकाकी उत्तर प्रचंड कौरवसेनेवर चालून गेला आहे, हें ऐकतांच तो आपल्या सर्व प्रमुख मंत्र्यांस म्हणाला—" कौरव व इतर राजे त्रिगर्तांचा पराभव झाला आहे, असें ऐकून युद्ध करावयास कधींहि सज्ज होणार नाहींत. यास्तव त्रिगर्तांच्या युद्धामध्यें अक्षत असलेलें फार मोठें सैन्य घेऊन तुम्ही सर्व उत्तराच्या रक्षणार्थ सत्वर निघून जा."

इतकें बोलून त्या भूपालानें अश्व, गज, रथ, पदातिसंघ व विचित्र शस्त्राभरणांनीं युक्त असलेले महावीर, यांस शत्रूंवर चाल करून जाण्यासाठीं सत्वर तयार करून तो आपल्या चतुरंग सेनेस म्हणाला—" तुम्ही अति त्वरेनें शत्रूवर चाल करून जा. पण माझा कुमार उत्तर जिवंत आहे कीं नाहीं हें प्रथम पहा. ज्याचा सारथि क्लीब आहे तो माझा प्रियपुत्र उत्तर जिवंत असेल, असें मला वाटत नाहीं. "

राजा, आपला आश्रयदाता विराटराजा पुत्रासाठीं अतिशय व्याकुल झाला आहे, असें पाहून युधिष्ठिर हंसून त्याला म्हणाला—" हे नरेंद्रा, बृहन्नला जर उत्तराचा सारथि असेल तर कौरव आज तुझ्या गायी नेऊं शकणार नाहींत, हें मी तुला निश्चयानें सांगतों. भूपते, बृहन्नला सारथि असल्यावर तुझा पुत्र कौरवांसह सर्व भूपालांना व देव, असुर, सिद्ध आणि यक्ष यांनाहि समरांत जिंकण्यास समर्थ आहे, असें तूं समज. "

( ३ ) भारता, युधिष्ठिर मत्स्यराजाला असें आश्वासन देत आहे, तोंच उत्तरानें पाठविलेले शीघ्रगामी दूत विराटनगरींत येऊन उत्तराचा विजय झाल्याची वार्ता सर्वांना निवेदन करूं लागले. राजाच्या मुख्य मंत्र्यानें विराटराजापाशीं येऊन राजपुत्राचा उत्तम विजय व कौरवांचा पराजय निवेदन केला. विजयी उत्तर आपल्या अक्षत सारथ्यासह स्वनगरीकडे परत येत आहे, असेंहि कथन केलें. तो म्हणाला—" हे प्रभो, तुझ्या अजिंक्य पुत्रानें कौरवांचा पूर्णपणें पराजय करून आपलें गोधन परत मिळविलें आहे व तो परंतप उत्तर आपला सारथि, रथ व अश्व यांसह कुशल आहे."

तें ऐकून युधिष्ठिर म्हणाला—कौरव पळून गेले व आपल्या धेनु त्यांच्यापासून परत मिळविल्या, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. पण हे प्रभो, तुझ्या पुत्रानें कौरवांना जिंकलें यांत मला कांहीं आश्चर्य वाटत नाहीं, कारण बृहन्नला ज्याचा सारथि आहे, त्याचा विजय निश्चयानें होणारच !

हे कुरुश्रेष्ठा, आपल्या महापराक्रमी कुमाराचा तो अपूर्व विजय ऐकून विराटाला अतिशय हर्ष झाला. त्याचें शरीर नखशिखांत रोमांचित झालें. विजयाची वार्ता आणणाऱ्या दूतांना वस्त्रादिकांचीं पारितोषिकें देऊन त्यानें संतुष्ट केलें आणि तो मंत्र्यांस म्हणाला—“ या नगरींतील सर्व राजमार्ग पताकांनीं अलंकृत करा. सर्व देवतांची पुष्पोपहारांनीं पूजा करा. कुमार, मुख्य मुख्य योद्धे, अलंकारांनीं भूषित झालेल्या गणिका व मंगल वाद्यें यांसह तुम्ही माझ्या विजयी पुत्राला सामोरे जा. एक मनुष्य हातांत मोठी घंटा घेऊन व मत्त हत्तीवर बसून सर्व राजधानीभर प्रत्येक चव्हाट्यावर माझ्या विजयाचा घोष करीत फिरूं दे. राजकन्या उत्तरा मंगलवेष धारण करून अनेक कुमारिकांसह माझ्या पुत्राचें स्वागत करावयास सामोरी जावो. ”

राजा, विराटाचें हें वचन ऐकून सर्व नागरिक अतिशय हृष्ट झाले. कुमारिका व स्त्रिया हातांत दधि, दुर्वा व मंगल आरती घेऊन राजकुमाराचें स्वागत करावयास आपापल्या गृहापुढील मार्गावर उभ्या राहिल्या. सर्व नगरी मंगल वाद्यांच्या ध्वनींनीं दुमदुमून गेली. तरुण व शुभ स्त्रिया उत्तम वेष धारण करून विजयी राजपुत्राची मार्गप्रतीक्षा करीत उभ्या राहिल्या. सूत व मागध विजयी राजा व राजपुत्र यांची सुस्वर स्तुति करूं लागले.

( ४ ) हे पारिक्षिता, याप्रमाणें विजयी राजपुत्राचें मोठ्या संतोषानें स्वागत करावयास सव नगर उत्सुक झालें आहे, असें पाहून विराटराजानें आपली सेना, कन्या व गणिका यांस पुढें पाठविलें व तो मोठ्या आनंदानें म्हणाला—“ हे सैरंध्रि, फांसे घेऊन ये. कंका, ये, आपण आतां द्यूत खेळूं. ”

मत्स्यराजाचें हें भाषण ऐकून ज्येष्ठ पांडव त्यास म्हणाला—“ हृष्ट झालेल्या द्यूतकाराशीं द्यूत करूं नये, असें आम्हीं ऐकिलें आहे. तूं आज पुत्रविजयानें हृष्ट झाला आहेस. यास्तव यावेळीं तुझ्याशीं द्यूत करण्याची माझी इच्छा नाहीं. हे नरेंद्रा, मी तुझें प्रिय करण्याची इच्छा करीत आहें. यास्तव यावेळीं हें द्यूत राहूं दे.”

विराट—हे द्विजा, द्यूतावांचूनहि तुजपासून रक्षण करण्यास योग्य असें माझें कोणतेंच धन नाहीं. स्त्रिया, गायी, सुवर्ण व दुसरेंहि जें कांहीं धन आहे, तें सर्व तुझेंच आहे.

यावर कंक पुनः म्हणाला—हे मानद राजेंद्रा, अनेक दोषांनीं युक्त असलेल्या या द्यूतानें तुझें कोणतें हित होणार! हे प्रभो, द्यूतामध्यें अनेक दोष आहेत. यास्तव तें सर्वदा वर्ज्य करावें. पांडुपुत्र युधिष्ठिराला तूं पाहिलें असशील, निदान त्याचें नांव तरी ऐकिलें असशील. त्या महात्म्यानें द्यूतामध्यें आपलें ऐश्वर्यसंपन्न विस्तीर्ण राष्ट्र व देवांसारखे चार भ्राते, यांस शत्रूकडून हरविलें. म्हणून मला हें द्यूत मुळींच रुचत नाहीं. तथापि तुझी फारच इच्छा असेल तर ये. आपण खेळूं या.

(५) जनमेजया, त्यानंतर त्या उभयतांचें द्यूत सुरू झालें असतां मत्स्यराज हर्षातिरेकानें पांडवाला म्हणाला—"कंका, माझ्या पुत्रानें आज युद्धांत केवढें महत्कार्य केलें पहा! शांतनव भीष्मासारख्या महारथ्यांना आज त्यानें युद्धांत जिंकिलें, हें खरोखर फारच मोठें आश्चर्य आहे."

तेव्हां महात्मा युधिष्ठिर विराटाला म्हणाला—"हे वीरा, बृहन्नला ज्याचा सारथि आहे, तो राजपुत्र युद्धांत कसा विजयी होणार नाहीं! त्यांत आश्चर्य तें कसलें! मला त्यांत कांहींच आश्चर्य वाटत नाहीं."

युधिष्ठिराचें हें सत्यवचन ऐकून राजा मत्स्य अतिशय क्रुद्ध झाला व त्या पांडवाला म्हणाला—"हे ब्राह्मणाधमा, तूं माझ्या पुत्राच्या बरोबर त्या क्लीबाची प्रशंसा करीत आहेस काय? अरे, तुला काय बोलावें आणि काय बोलूं नये, हें कळत नाहीं. म्हणूनच तूं माझा असा अपमान करीत आहेस. माझा तो शूर पुत्र भीष्म-द्रोणादि सर्व वीरांना कां बरें जिंकणार नाहीं! हे ब्रह्मन्, मित्रत्वामुळें मी तुझा हा अपराध सहन करीत आहें. तुला जिवंत रहाण्याची इच्छा असेल तर पुनरपि असें बोलूं नको."

क्रुद्ध झालेल्या विराटाचें हें भयप्रद वचन ऐकूनहि सत्यप्रतिज्ञ वीर युधिष्ठिर म्हणाला—" अरे, भूपाला, ज्या सैन्यामध्यें द्रोण, भीष्म, द्रौणि, कर्ण, कृप, राजेंद्र दुर्योधन व तसेच इतर महारथ धनुर्धर आहेत त्या युद्धांत बृहन्नलेवांचून दुसरा कोण विजयी होईल! हे मत्स्यराजा, भीष्म-द्रोणादिकांशीं युद्ध करण्याचें सामर्थ्य दुसऱ्या कोणामध्येंहि नाहीं. तुला त्या बृहन्नलेचा प्रभाव

ठाऊक नाहीं. देवगणांसह साक्षात् देवेंद्र जरी समोर आला तरी त्याच्याशींहि तो महात्मा प्रतियुद्ध करील. त्याच्या बाहुबलाची बरोबरी करील, असा पुरुष यापूर्वी झाला नाहीं व पुढेंहि होणार नाहीं. शत्रूशीं युद्ध करण्याचा प्रसंग आला असतां त्याला फार मोठा हर्ष होत असतो. ज्यानें देव, दानव व मानव या सर्वांस जिंकिलें आहे, असा साह्यकर्ता मिळाल्यावर तुझा कुमार उत्तर विजयी कां बरें होणार नाहीं!"

कंकाचें हें वचन ऐकून विराटराजा फारच क्षुब्ध झाला व म्हणाला—"हे ब्राह्मणा, मी तुला वारंवार सांगत असूनहि तूं त्या षंढाचीच प्रशंसा करीत आहेस! आपली जीभ आवरून धरीत नाहींस, यास्तव यावेळीं तुला शासनच केलें पाहिजे. कारण नियंता[1] नसेल तर कोणीच धर्माचरण करणार नाहीं."

( ६ ) राजा, इतकें बोलून क्रुद्ध झालेल्या मत्स्यराजानें कंकाची निर्भर्त्सना करीत त्याच्या मुखावर हातांतील फांसा जोरानें फेंकला. त्याचा युधिष्ठिराच्या नाकावर प्रहार होऊन त्यांतून रक्तस्राव होऊं लागला. तेव्हां त्या धर्मात्म्या पृथापुत्रानें तें रक्त भूमीवर पडण्यापूर्वीच आपल्या दोन हातांच्या अंजलींत धरिलें आणि बाजूला उभ्या असलेल्या द्रौपदीकडे पाहिलें. त्याचा अभिप्राय ओळखून भर्त्याच्या चित्ताला अनुसरणाऱ्या त्या साध्वी पांचालीनें तत्काल एक जलपूर्ण सुवर्णपात्र आणिलें आणि युधिष्ठिराच्या नाकांतून वहाणारें रक्त त्यांत धरिलें.

( ७ ) राजा, इकडे पौरजनांकडून विविध सुगंधित पुष्पांचा शुभ वर्षाव होत असतां अत्यंत संतुष्ट झालेला राजपुत्र उत्तर सामोऱ्या गेलेल्या सर्व स्त्रीपुरुषांच्या मिरवणुकीसह नगरांत प्रवेश करून राजमंदिराजवळ आला आणि पित्याला आपलें आगमन सूचित करण्यास द्वारपालास पाठविलें. तेव्हां त्या प्रतिहारीनें अंतःपुरांत प्रवेश करून विराटराजाला म्हटलें—"हे महाराज, बृहन्नला ज्याचा साह्यकर्ता आहे, असा राजपुत्र उत्तर राजद्वारीं उभा आहे." राजा, त्या प्रतिहारीचें तें अमृततुल्य भाषण ऐकून हृष्ट झालेला मत्स्यराजा त्यास म्हणाला—"जा, जा, दोघांनाहि सत्वर घेऊन ये. मी त्यांच्या दर्शनाविषयीं अतिशय उत्सुक झालों आहें."

---

१ नियन्ता चेन्न विद्येत न कश्चिद्धर्ममाचरेत् ॥

राजाचें हें त्वरावचन ऐकून द्वारपाल जाऊं लागला असतां कुरुराज त्याला हळूच म्हणाला—" अरे बाबा, एकट्या राजपुत्रालाच आंत येऊं दे. बृहन्नलेला इतक्यांत आणूं नको. कारण संग्रामावांचून माझ्या शरीरावर जो कोणी क्षत पाडील किंवा अंगांतून रक्त काढील त्याला जिवंत सोडावयाचें नाहीं, असें त्याचें निश्चित व्रत आहे. माझ्या नाकांतून रक्त गळत आहे, हें पाहून तो अतिशय क्रुद्ध होईल व हा अपराध सहन न झाल्यामुळें सैन्य, वाहनें व अमात्य यांसह राजा विराटाचा नाश करील. यास्तव तूं माझें हें हितवचन ऐक व त्याला इतक्यांत आंत सोडूं नको. "

जनमेजया, त्यानंतर तो द्वारपाल बाहेर गेला व राजाचा ज्येष्ठपुत्र पृथिवींजय अंतःपुरांत आला. त्या वीरानें आपल्या पित्याच्या चरणांवर मस्तक ठेवून कंकालाहि अभिवादन करण्यासाठीं त्याच्या समीप गेला. तों कंक भूमीवर एका कोपऱ्यांत बसला आहे, त्याच्या नाकांतून रक्त वहात आहे व सैरंध्री त्याच्याजवळ जलपात्र घेऊन उभी आहे, असें त्याला दिसलें. त्याबरोबर तो राजपुत्र अति त्वरेनें आपल्या पित्याला म्हणाला—" हे राजन्, या निरपराध महात्म्याला कोणीं बरें ताडन केलें ? हा असा अस्वस्थ कां दिसत आहे ? हें महत्पाप कोणीं केलें ?"

हें ऐकून विराट म्हणाला—वत्सा, मींच या शठाला ताडन केलें. तो एवढ्याच शिक्षेला पात्र नसून त्याला याहूनहि अधिक शिक्षा केली पाहिजे. कारण मी तुज शूराची प्रशंसा करूं लागलों असतां हा त्या षंढाची प्रशंसा करितो ! "

( ८ ) विराटराजाचें हें वचन ऐकतांच उत्तर भयभीत होऊन त्यास म्हणाला—"हे तात, तूं हें फार मोठें अकार्य केलें आहेस. यास्तव आतां अगोदर याला सत्वर प्रसन्न कर. हें घोर ब्रह्मविष तुझा समूल नाश न करो. "

राजा, प्रिय पुत्राचें हें वचन ऐकून राष्ट्राची वृद्धि करणारा विराट भस्मानें आच्छादित झालेल्या अग्नीप्रमाणें राहिलेल्या कौंतेयाची क्षमा मागूं लागला. तेव्हां क्षमेची याचना करणाऱ्या त्या मत्स्यराजाला पांडुपुत्र म्हणाला—" हे राजन्, मीं तुला कधींच क्षमा केली आहे. खरोखर मला क्रोध कधींच येत नाहीं. माझ्या नाकांतून गळणारें हें रक्त जर भूमीवर पडलें असतें, तर हे महाराज, सर्व राष्ट्रासह तुझा नाश झाला असता, यांत संशय नाहीं. हे भूपाला, तुझ्या या अकार्याविषयीं मी तुला दोष देत नाहीं, कारण हर्षप्रसंगीं बलवान्

प्रभूच्या हातून असें अन्यायाचें कृत्य घडतच असतें. हृष्ट झालेला मनुष्य दृप्त होत असतो आणि दृप्त झालेला तो धर्माचें अतिक्रमण करूं लागतो, असा नियम आहे. त्याला अनुसरून दुसऱ्याची निंदा न करणाऱ्या मला तूं जें ताडन केलेंस तें योग्यच आहे."

( ९ ) भारता, त्यानंतर युधिष्ठिराचा रुधिरस्राव थांबला असतां बृहन्नला अंतःपुरांत आली आणि विराटराजाला व कंकालाहि अभिवादन करून उभी राहिली. इतक्यांत युधिष्ठिराची क्षमा मागून आपल्या श्रेष्ठ आसनावर बसलेला विराटराजा समरांगणांतून विजयी होऊन परत आलेल्या पुत्राची पार्थाच्या समक्ष प्रशंसा करूं लागला.

( १० ) विराट—हे पुत्रा, खरोखर तुझ्या योगानेंच मी आज पुत्रवान् झालों आहें. तुझा हा पराक्रम पाहून तुझ्या कैकेयी मातेला अतिशय आनंद होत आहे. तुझ्यासारखा पुत्र या पृथ्वीतलावर कोणाला पूर्वीं झाला नाहीं व पुढें होणार नाहीं. जो वीर एकसारखे एक सहस्र बाण सोडीत असतांनाहि त्यांच्या लक्ष्याचा वेध झाल्यावांचून रहात नाहीं, किंवा जो हजार लक्ष्यांवर एकाच वेळीं बाण सोडीत असतांहि त्यांतील एकहि बाण व्यर्थ जात नाहीं त्या कर्णाशीं, या मनुष्यलोकीं ज्याच्या तोडीचा दुसरा योद्धाच नाहीं, अशा शांतनव भीष्माशीं, वृष्णिवीर, कौरव व इतर सर्व क्षत्रिय यांचा आचार्य व सर्व शस्त्रधारण करणारांमध्यें श्रेष्ठ अशा त्या धनुर्धर द्रोणाशीं, आचार्यपुत्र शूर अश्वत्थाम्याशीं, संग्रामामध्यें ज्याचें दर्शन होतांच शत्रु हतबल होतात, त्या कृपाशीं, त्याचप्रमाणें आपल्या मोठमोठ्या बाणांनीं पर्वतालाहि विदीर्ण करणाऱ्या दुर्योधनराजाशीं तुझा समरांगणांत समागम कसा झाला? माझे शत्रु आज पराभूत झाले आहेत, त्यामुळें माझ्या अंगावरून हा सुखावह वायु वहात आहे. कौरवांनीं हरण करून नेलेलें माझें गोधन तूं त्यांचा पराभव करून परत आणिलेंस, हें तूं आज फारच महत्कृत्य केलें आहेस. त्या सर्व बलाढ्य शत्रूंना भयभीत करून व युद्धांत त्यांना पळावयास लावून एखाद्या सिंहानें आपलें भक्ष्य शत्रूपासून जसें सोडवून आणावें, तसें तूं आपलें सर्व गोधन हिरावून आणिलें आहेस! तरी हे वत्सा, तुला हें महत्कार्य कसें करतां आलें! ४. ४. ६८.

## अध्याय ६९ वा.

[ १ उत्तरानें विराटाला 'देवपुत्रानें कौरवांना जिंकलें' असें सांगून त्याच्या पराक्रमाचें केलेलें वर्णन. २ त्याच्या दर्शनाची इच्छा करणाऱ्या राजाला तो दोन-तीन दिवसांनीं प्रकट होईल, असें अभिवचन. ३ पार्थानें युद्धांत हरण करून आणलेल्या वस्त्र-भूषणादिकांचें उत्तरेला केलेलें समर्पण. ४ पार्थाचा उत्तराशीं युधिष्ठिराच्या सत्काराचा संकेत. ]

( १ ) **उत्तर म्हणाला—हे तात, मीं गायींनाहि जिंकिलें नाहीं किंवा शत्रूलाहि पराजित केलें नाहीं. तें सर्व अद्भुत कृत्य कोणा एका देवपुत्रानें केलें. त्या देवपुत्रानें शत्रुसैन्य पाहून भयभीत झालेल्या व रणांगणांतून पळणाऱ्या मला परत फिरविलें. त्याच वज्रदेही तरुणानें रथाच्या अग्रभागीं स्थित होऊन धेनूंना जिंकून परत आणिलें आणि कौरवांचा पराभव केला. हा सर्व त्या वीराचा पराक्रम आहे, माझा नव्हे.**

**हे महाराज, त्याच श्रेष्ठ धनुर्धरानें आपल्या अचुक बाणांनीं कृप, द्रोण, अश्वत्थामा, कर्ण, भीष्म आणि दुर्योधन या सहा रथी कौरवांना समरांगणांतून पराङ्मुख केलें. त्या महाबलाढ्य वीरानें विकर्णाला त्याच्या गजासह विद्ध केलें. हे तात, भयभीत झालेल्या राजपुत्र दुर्योधनाला तो देवात्मज म्हणाला—" हे कौरवनंदना, तुझें आतां हस्तिनापुरांत संरक्षण होईल, असें मला वाटत नाहीं. यास्तव कोठें तरी देशांतरीं निघून जा व आपला जीव वांचीव. नाहीं तर येथें तुझ्या सैन्यासमक्ष तुझा नाश होईल. अरे मूढा, पलायन करून कांहीं तूं सुटणार नाहींस. युद्धाला उभा रहा. युद्धांत जय मिळविलास तर पृथ्वीचें राज्य भोगशील आणि मरण पावलास तर स्वर्गाला प्राप्त होशील."**

**हे प्रजापालका, तो देवपुत्र असें बोलला असतां तो नरव्याघ्र दुर्योधन रथांतून क्रुद्ध सर्पाप्रमाणें फूत्कार सोडीत आपल्या अमात्यासह परत फिरला आणि त्यानें वज्रासारख्या तीक्ष्ण बाणांची वृष्टि केली. तें पाहून हे तात, माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले आणि माझ्या उरांत धडकी भरली; परंतु त्या देवपुत्रानें दुर्योधनाची सिंहासारखी सेना आपल्या शरवृष्टीनें उधळून टाकिली आणि मूर्च्छित झालेल्या त्या सर्व कुरूंचीं वस्त्रें हरण करून तो सिंहासारखा पराक्रमी योद्धा हंसत उभा राहिला. एखाद्या मत्त सिंहानें वनचर मृगांची जशी गाळण उडवावी, त्याप्रमाणें त्या एकट्या वीरानें सहा रथिश्रेष्ठांचा पराभव केला.**

( २ ) पुत्राचें हें भाषण ऐकून हृष्ट झालेला विराट आश्चर्यानें म्हणाला—"हे वत्सा, तो महायशस्वी पराक्रमी देवपुत्र कोठें आहे ? पुत्रा, कौरवांनीं हरण केलेलें माझें गोधन ज्या वीरानें युद्धांत जिंकून परत मिळविलें, त्या महाबलवान् धनुर्धराला पहाण्याची माझी इच्छा आहे आणि ज्यानें माझ्या गायींचें व तुझेंहि रक्षण केलें त्या देवकुमाराचा सत्कार करण्यास मी अतिशय उत्सुक झालों आहें."

उत्तर—हे महाराज, तो महाबलाढ्य देवपुत्र तेथेंच अंतर्धान पावला; परंतु तो उद्यां किंवा परवां प्रकट होईल, असें मला वाटतें.

(३) वैशंपायन—जनमेजया, याप्रमाणें उत्तरानें गुप्तवेषानें रहात असलेल्या पांडवाचें वर्णन केलें, परंतु विराटराजानें त्याला ओळखलें नाहीं. त्यानंतर महात्म्या विराटाच्या अनुज्ञेनें पार्थानें विराटकन्या उत्तरेला युद्धांतून हरण करून आणलेलीं विविध प्रकारचीं मूल्यवान् व नवीं वस्त्रें अर्पण केलीं. तेव्हां त्या वस्त्रांचा स्वीकार करून ती राजकन्या अतिशय संतुष्ट झाली.

( ४ ) राजा, विराटपुत्रानें अशा प्रकारें पांडवांचें वास्तव्य गुप्त राखलें असतां पार्थानें प्रकट होण्याच्या दिवशीं युधिष्ठिरानें सभेंत राजासनावर बसण्याची कशी योजना करावयाची याचा उत्तराशीं संकेत केला आणि त्याप्रमाणें सर्व घडवून आणिलें. तेव्हां मत्स्यपुत्रासह सर्व पांडव संतुष्ट झाले. ४. ४. ६९.

येथें चवथें गोहरणपर्व समाप्त झालें.

---

# वैवाहिकपर्व ५.



## अध्याय ७० वा.

[ १ पांडवांचें राजवेषानें विराटसभेंत गमन, युधिष्ठिराचें राजसिंहासनावर उपवेशन. २ विराटाचा आक्षेप. ३ अर्जुनानें केलेलें युधिष्ठिराचें वर्णन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, त्यानंतर उत्तर गोग्रहणाच्या तिसऱ्या दिवशीं त्या पांची पांडव भ्रात्यांनीं स्नान करून शुभ्र वस्त्रें परिधान केलीं आणि योग्य समयीं अज्ञातवासाच्या व्रताची समाप्ति करून ते प्रकट झाले. सभाद्वारांत जसे मत्त गज शोभतात, तसे युधिष्ठिराला पुढें करून आलेले ते

आते शोभले. ते सर्व अग्नितुल्य तेजस्वी वीर विराटाच्या सभास्थानीं जाऊन नृपालाच्या श्रेष्ठ आसनावर बसले. तेव्हां ते अग्निगृहांतील पंचाग्नींप्रमाणें भासले.

( २ ) हे राजा, याप्रमाणें ते राजासनावर बसले असतां मत्स्यराज विराटभूपति राजकार्यांचा विचार करण्यासाठीं त्या सभास्थानीं आला. तेव्हां प्रज्वलित अग्नीप्रमाणें तेजस्वी दिसणाऱ्या त्या श्रीमान् पांडुपुत्रांना पाहून क्रुद्ध झालेल्या नृपतीनें क्षणभर स्थिर स्थित होऊन विचार केला आणि मरुद्गणांनीं उपासना केलेल्या इंद्राप्रमाणें चारी भ्रात्यांनीं परिवेष्टित झालेल्या देवस्वरूप युधिष्ठिराला तो 'कंक' ब्राह्मणच आहे, असें समजणारा विराटराजा किंचित् क्रोधानें म्हणाला—"हे कंका, तूं निष्णात द्यूतकार आहेस म्हणून तुला मीं सभासद करून सभेंत बसण्याची अनुज्ञा दिली. पण असें असतांना आज तूं राजभूपणें धारण करून या सिंहासनावर येऊन बसलास, हें आहे काय ?"

( ३ ) हे भारता, विराटराजाचें हें निंदायुक्त सरोप वचन ऐकून अर्जुन हंसून म्हणाला—"हे मत्स्यराजा, हा धर्मात्मा इंद्राच्या अर्ध्या आसनावर बसण्यासहि समर्थ आहे. हा ब्राह्मणांचें पूजन करणारा, ज्ञानी, यज्ञशील, दृढव्रत व दाता आहे. हा साक्षात् धर्माचाच अवतार व वीर्यवानांतील श्रेष्ठ आहे. याच्यासारखा बुद्धिमान् या लोकीं एकहि पुरुष नाहीं. हा तपोनिष्ठ आहे. हा सचराचर त्रैलोक्यांतील विविध अस्त्रांत प्रवीण आहे. याला जें ज्ञान आहे तें देव, असुर, मनुष्य, राक्षस, श्रेष्ठ गंधर्व, यक्ष, किन्नर व सर्प यांतील एकाहि वीराला नाहीं व यापुढेंहि त्यांस तें होणार नाहीं. हा दीर्घदर्शी, महातेजस्वी, सर्व प्रजेला प्रिय आणि यज्ञ व धर्म यांत परायण असलेला पांडवांतील अतिरथ आहे.

हे विराटराजा, हा महर्षींच्या तोडीचा राजर्षि सर्व लोकांत प्रसिद्ध आहे. हा बलवान्, बुद्धिमान्, दक्ष, सत्यवादी, जितेंद्रिय, कुबेरासारखा धनवान् आणि इंद्रासारखे यज्ञ करणारा आहे. सव लोकांचें रक्षण करणाऱ्या महातेजस्वी मनूप्रमाणें प्रजेवर अनुग्रह करणारा हा महातेजस्वी कुरुश्रेष्ठ धर्मराज आहे. हे राजा, उदय पावणाऱ्या सूर्यप्रभेसारखी या युधिष्ठिराची कीर्ति वर्धिष्णु आहे. सूर्योदय होतांच त्याचीं किरणें जशीं सर्व दिशांना प्रकाशित करितात, तसें या महात्म्याचें यश दश-दिशांत पसरलें आहे.

हे राजन्, हा धर्मराज जोंवर कुरुदेशांत होता, तोंवर याच्या मागोमाग दहा हजार वेगवान् गज व सुवर्णालंकारांनीं भूषविलेले व सुलक्षणी अश्वांनीं युक्त असलेले तीस हजार उत्कृष्ट रथ जात असत. ऋषि ज्याप्रमाणें इंद्राची स्तुति करितात, त्याप्रमाणें रत्नजडित कुंडलें धारण करणारे आठशें सूत मागधांसह स्तुति करीत याला अनुसरत होते. देव जसे धनेश्वर कुबेराची उपासना करितात, तसे सर्व नृपाल व कौरव या पृथ्वीपतीची दासाप्रमाणें सेवा करीत होते. हे मत्स्याधिपा, या सम्राटानें सर्व भूपालांना मांडलिक करून त्यांना स्वेच्छेनें किंवा अनिच्छेनेंहि वैश्यांप्रमाणें कर देण्यास भाग पाडिलें होतें.

हे नरेश्वरा, या सुव्रतधारी प्रभूच्या आश्रयाला ऐशीं हजार महात्मे स्नातक होते. हा श्रेष्ठ राजा, वृद्ध, अनाथ, पङ्गु व अंध यांचें आणि प्रजेचें पुत्रवत् पालन करीत असे. या राजानें धर्म, दम व अक्रोध यांचें व्रत निग्रहानें पाळलेलें असून हा ब्राह्मणप्रिय व सत्यवादी आहे. या धर्मात्म्याच्या तपस्तेजानें शकुनि व कर्ण यांसह दुर्योधन आणि सर्व कौरव तप्त होतात. हे मत्स्यराजा, या नृपश्रेष्ठाच्या अगणित गुणांचें वर्णन करतां येणेंहि शक्य नाहीं. असा हा नित्य धर्मनिष्ठ असलेला, अतिशय दयावान्, श्रेष्ठ पांडव, महाराज युधिष्ठिर या राजासनावर बसण्यास कसा बरें योग्य नाहीं!" ४. ५. ७०.

---

## अध्याय ७१ वा.

[ १ अर्जुनानें विराटाला करून दिलेला भीमादि इतर भ्रात्यांचा परिचय. २ उत्तरानें केलेलें अर्जुनाच्या पराक्रमाचें वर्णन. ३ अर्जुनानें उत्तरेचा स्नुषात्वानें केलेला स्वीकार. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, अर्जुनाचें हें वक्तृत्वपूर्ण भाषण ऐकून विस्मित झालेला विराटराजा म्हणाला—हे वीरा, हा राजा जर कुंतीपुत्र युधिष्ठिर आहे, तर याचा भ्राता अर्जुन कोणता! बलवान् भीम कोणता! त्याचप्रमाणें नकुलसहदेव आणि यशस्विनी द्रौपदी कोणती! द्यूतामध्यें पराभूत झाल्यापासून त्या पांडुपुत्रांचा कांहींच वृत्तान्त मला कळला नाहीं.

**अर्जुन**—हे नराधिपा, 'बल्लव' या नांवानें तुझा पाक करणारा जो सूद तोच हा भयंकर वेगवान् पराक्रमी भीमसेन होय. याच वीरानें गंधमादन पर्वतावर कुबेराच्या अनुचरांचा संहार करून द्रौपदीसाठीं सुगंधी कमलें

आणिलीं. दुरात्म्या कीचकांचा वध करणारा गंधर्व हाच होय. यानेंच तुझ्या अंतःपुरांतील स्त्रियांच्या पुढें व्याघ्र, आस्वलें, वराह इत्यादि क्रूर पशूंना गत-प्राण केलें.

हे विराटराजा, हे दोघे माद्रीपुत्र आहेत. यांतील हा तुझ्या अश्वशालेचा अध्यक्ष तंतिपाल, परंतप नकुल होय आणि हा गोरक्षक ग्रंथिक सहदेव आहे. राजा, ही कमलपत्राक्षी, सुमध्यमा सुहासिनी सैरंध्री द्रौपदी होय. याच राज-कन्येकरितां कीचकांचा वध झाला. हे मत्स्यराजा, भीमाचा अनुज आणि या माद्रीपुत्रांहून ज्येष्ठ असलेला अर्जुन मीच आहें, हें तूं ऐकलें असशीलच. हे महाराज, गर्भवासामध्यें असलेल्या बालकांप्रमाणें अज्ञातवासांत असलेले आम्ही तुझ्या या राजगृहांत अतिशय सुखानें राहिलों.

राजा जनमेजया, याप्रमाणें अर्जुनानें त्या वीर पांची पांडवांची वर्णन केलें असतां संतुष्ट झालेल्या उत्तरानें तत्काल अर्जुनाचा पराक्रम कथन करण्यास आरंभ केला. तो उत्तर पुनः त्या पांची पांडुपुत्रांचा पृथक् पृथक् निर्देश करीत राजाला म्हणाला—"हे तात, हा सुवर्णासारखा गौरवर्ण, सिंहासारखा पुष्ट, सरळ व मोठी नासिका असलेला, दीर्घ व पुष्ट बाहूंनीं युक्त असलेला, तांबड्या कमल-पत्रासारखे नेत्र असलेला कुरुराज युधिष्ठिर आहे.

हा पहा, मत्त गजेंद्रासारखा गमन करणारा, तप्तसुवर्णासारखा गौरवर्ण, विशालस्कंध आणि दीर्घ व स्थूल बाहु यांनीं युक्त असलेला वृकोदर आहे.

हा याच्या बाजूला, मोठें धनुष्य धारण करणारा, गजेंद्रासारखा शोभणारा, सिंहाप्रमाणें स्कंध असलेला, गजगतीनें गमन करणारा, पद्मासारखे नेत्र असलेला श्यामवर्ण तरुण वीर धनंजय आहे.

हे दोघे धर्मराजाच्या समीप असलेले, विष्णु व महेंद्र यांच्याप्रमाणें शोभ-णारे, माद्रीपुत्र नकुल-सहदेव आहेत. सर्व मनुष्यलोकांत शील व बल यांमध्यें या पुरुषोत्तमांच्या तोडीचा एकहि वीर सांपडणार नाहीं.

यांच्या बाजूला सुवर्णासारखी दिव्य कांति, साक्षात् गौरीप्रमाणें प्रभा आणि नीलकमलाप्रमाणें वर्ण यांनीं युक्त असलेली व साक्षात् लक्ष्मीप्रमाणें शोभ-णारी ही द्रौपदी होय."

(२) हे भारता, याप्रमाणें त्या पांची पांडवांचें वर्णन केल्यावर तो विराटपुत्र राजाला अर्जुनाचा पराक्रम सांगूं लागला. उत्तर म्हणाला—"हे महाराज,

सिंह जसा मृगांचा वध करितो, तसा हा वीर शत्रूंचा संहार करणारा आहे. या पृथापुत्रानें त्या कौरवांच्या रथसमुदायांत संचार करून सर्व रथिश्रेष्ठांचा पराभव केला. याच धनुर्धरानें त्या संग्रामांत सुवर्णाच्या शृंखला व कटिबंध यांनीं युक्त असलेल्या एका महान् गजेंद्राला जेव्हां एका बाणानें विद्ध केलें, त्यावेळीं त्याचे दोन्ही दांत भूमींत शिरले. याच वीरानें युद्धांत कौरवांचा पराजय करून गायींना जिंकून परत आणिलें. हे तात, याच्या शंखनादानें तर माझे दोन्ही कान बधिर होऊन गेले."

हे पारिक्षिता, पुत्राचें हें वचन ऐकून प्रतापवान् मत्स्यराजा त्याला म्हणाला— " वत्सा, माझ्या हातून युधिष्ठिराचा फार मोठा अपराध घडला आहे. यास्तव आपण पांडवांना प्रसन्न केलें पाहिजे. मला हाच काल योग्य दिसतो. तुझी जर संमति असेल तर राजकन्या उत्तरा अर्जुनाला अर्पण करावी, असें मला वाटतें."

उत्तर म्हणाला—राजा, या आर्यांना प्रसन्न करण्यास हाच समय योग्य आहे. हे महाभाग पांडव वस्त्रादिकांनीं पूजनीय व वाणीनें गौरव करण्यास सर्वथा योग्य आहेत.

विराट म्हणाला—हे पुत्रा, संग्रामामध्यें मी तर शत्रूच्या हातीं सांपडलोंच होतों, परंतु या भीमसेनानें मला सोडविलें आणि गायींना जिंकून परत आणिलें. खरोखर या वीरांच्या बाहुबलामुळेंच युद्धांत आमचा जय झाला. यास्तव हे वत्सा, आपण अमात्यांसह या पांडवश्रेष्ठ सानुज युधिष्ठिराला प्रसन्न करून घेऊं या. तुझें कल्याण असो. आम्हीं अज्ञानानें जर कांहीं दुरुक्ति बोललों असलों, तर या धर्मात्म्या पांडवानें त्या सर्वांची आम्हांला क्षमा करावी.

जनमेजया, त्यानंतर मत्स्यराज विराटानें संतुष्ट होऊन व आपल्या पुत्रांशीं संकेत करून उत्तरेच्या विवाहाचा निश्चय केला. त्या महात्म्यानें राजदंड, कोश, नगरें, यांसह आपलें सर्व राज्य युधिष्ठिराला अर्पण केलें. नंतर तो मत्स्यराज धनंजयाला उद्देशून 'धन्य धन्य, आम्ही आज कृतार्थ झालों' असें म्हणाला. त्या सेनाधिपति विराटराजानें युधिष्ठिरादि सर्व भ्रात्यांस पुनः पुनः आलिंगन देऊन त्यांच्या मस्तकांचें अवघ्राण केलें. त्या पांडवांना पाहून त्याची तृप्ति होईना.

तेव्हां तो हृष्ट झालेला मत्स्याधिपति विराट युधिष्ठिराला म्हणाला—हे नृपश्रेष्ठा, तुम्ही सर्व वनांतून सुरक्षित परत आलां, हें पाहून मला अतिशय संतोष वाटत आहे. दुरात्म्या कौरवांचे सर्व नियम व आपल्या प्रतिज्ञा पाळून तुम्ही अज्ञातवासाच्या प्रतिज्ञेंतूनहि निर्विघ्नपणें पार पडलांत, ही अतिशय आनंदाची गोष्ट घडली. आतां हे वीरहो, माझें हें राज्य व इतर सर्व संपत्ति मी या पृथापुत्राला अर्पण करीत आहें, तरी पांडवांनीं निःशंकपणें त्याचा स्वीकार करावा आणि सव्यसाची धनंजयानें माझ्या उत्तरा-कन्येचें पाणिग्रहण करावें. तो पुरुषश्रेष्ठच तिला योग्य पति आहे.

(३) राजा जनमेजया, मत्स्यराजाचें हें वचन ऐकून युधिष्ठिरानें धनंजयाकडे पाहिलें, तेव्हां ज्येष्ठ भ्रात्याचा आशय जाणून अर्जुन म्हणाला—" हे विराटराजा, तुझ्या या कन्येचा मी स्नुषा म्हणून स्वीकार करितों. मत्स्य व भारत या आपल्या उभय कुलांचा असा संबंध जडणें उचितच आहे." ४ ५. ७१.

---

## अध्याय ७२ वा.

[ १ विराटकन्येशीं अर्जुनानें विवाह केल्यास लोकापवादाला अवकाश मिळेल म्हणून तिचा स्नुषात्वानें परिग्रह. २ अभिमन्यूसाठीं कन्यादानाचा अंगीकार. ३ युधिष्ठिराची अनुज्ञा. ४ विराट व युधिष्ठिर यांचें वासुदेवादि सुहृदांकडे दूतप्रेषण. ५ पांडवांचें उपप्लव्य नगरींत गमन. ६ सर्व नृपालांसमक्ष उत्तरेचा विवाहोत्सव. ]

( १ ) **वैशंपायन**—हे पारिक्षिता, अर्जुनाचें हें भाषण ऐकून किंचित् विस्मित झालेला विराटराजा पार्थाला म्हणाला—" हे पांडवश्रेष्ठा, मी अर्पण करीत असलेल्या माझ्या या कन्येचा तूं भार्यात्वानें स्वीकार कां बरें करीत नाहींस ?"

राजाचा हा प्रश्न ऐकून अर्जुन म्हणाला—हे नृपाला, मी तुझ्या अंतःपुरांत रहात असल्यामुळें तुझ्या या कन्येला सर्वदा पहात असें. तिनेंहि मजवर एकांतांत व समूहांत पित्याप्रमाणें विश्वास ठेविला होता. मी गायनामध्यें प्रवीण असलेला तिचा नृत्यशिक्षक असल्यामुळें तिचें मजवर अतिशय प्रेम असून ती तुझी दुहिता मला गुरूप्रमाणें पूज्य मानिते. यास्तव मीं तिच्याशीं विवाह करणें योग्य नाहीं.

शिवाय हे मत्स्यराजा, मी तुझ्या या उपवर राजकन्येच्या सहवासांत वर्षभर एकत्र राहिलों आहें. तेव्हां मीं तिच्याशीं विवाह केला असतां माझ्या ब्रह्मचर्याविषयीं तुला व लोकांनाहि संशय येण्याचा संभव आहे. तस्मात्, हे नृपश्रेष्ठा, मी तुझ्या कन्येला 'दुहिता' असें संबोधून माझ्या पुत्रासाठीं तिची मागणी करीत आहें. त्यायोगानें मी शुद्ध, जितेंद्रिय व दमनशील असल्याचें सिद्ध होऊन तुझी कन्या, माझा पुत्र किंवा मी, यांतील कोणांविषयींच कोणालाहि संशय येणार नाहीं. कारण हे परंतपा, तुझ्या कन्येचा मीं भार्यार्थ परिग्रह केल्यास 'या दोघांचा पूर्वींपासूनच संबंध असेल,' असा मिथ्या लोकापवादहि कदाचित् प्रवृत्त होईल. त्याची मला फार भीति वाटते. यास्तव हे राजन्, तुझ्या उत्तराकन्येचा मी स्नुषात्वानें स्वीकार करितों.

हे विराटराजा, माझा पुत्र महाबाहु अभिमन्यु साक्षात् वासुदेवाचा भागिनेय आहे. तो देवकुमारासारखा असलेला सौभद्र चक्रपाणि श्रीकृष्णाला अतिशय प्रिय असून सर्व अस्त्रांत प्रवीण आहे. यास्तव हे नराधिपा, तो सौभद्रेय तुला योग्य जामात व तुझ्या कन्येला अनुरूप वर आहे.

विराट म्हणाला—हे पांडुनंदना, तुझ्यासारख्या धर्मज्ञ व ज्ञानसंपन्न कुरुश्रेष्ठाचा विचार अशा प्रकारचा असावा हें योग्यच आहे. यास्तव हे कौंतेया, तुला जें उचित दिसेल, तसेंच तूं कर. माझा महाप्रतापी अर्जुनाशीं संबंध जडला, यांतच माझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या.

जनमेजया, विराटराजा असें बोलला असतां, कुंतीपुत्र युधिष्ठिरानें मत्स्य व पार्थ यांच्यांतील या विवाहसंबंधाला आपली अनुमति दिली. तेव्हां हे भारता, मत्स्याधिपानें व धर्मराजानें वासुदेव आणि इतर सर्व आप्त सुहृद् यांच्याकडे निमंत्रण करण्यासाठीं दूत पाठविले.

(५) हे राजा, त्यानंतर पांडवांचें तेरावें वर्ष संपलें असतां ते पांची भ्राते विराटनगरीसमीपच असलेल्या उपप्लव्यनगरींत जाऊन राहिले. तेथें गेल्यावर अर्जुनानें आपला पुत्र अभिमन्यु, वासुदेव आणि यादव यांस आनर्त देशाहून आणविलें. युधिष्ठिरावर प्रेम करणारे काशिराज व शैब्य आपल्याबरोबर दोन अक्षौहिणी सैन्य घेऊन आले. महाबलाढ्य यज्ञसेन द्रुपदराजा एक अक्षौहिणी सैन्यासह आला. द्रौपदीचे सर्व वीर पुत्र, अजिंक्य शिखंडी व सर्व शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ धृष्टद्युम्न हेहि येऊन पोंचले.

जनमेजया, तेथें जमलेले सर्व नृपाल अक्षौहिणी सेनेचे पालक, शूर, युद्धामध्यें देह ठेवण्यास तत्पर, यज्ञामध्यें विपुल दक्षिणा देणारे व वेदाध्ययनसंपन्न होते. त्या सर्व श्रेष्ठ भूपतींना आलेलें पहातांच धर्मनिष्ठ मत्स्यराजानें भृत्य, सैन्य व वाहनें यांच्या योगानें त्यांचा यथाविधि सत्कार केला आणि आपली कन्या अभिमन्यूला अर्पण करून तो अतिशय संतुष्ट झाला

भारता, तेथें जमलेल्या सर्व क्षत्रियांत पुढील मुख्य मुख्य नृपतिहि आले होते. वनमाली वासुदेव, बलराम, कृतवर्मा, हार्दिक्य, युयुधान सात्यकि, अनाधृष्टि, अक्रूर, श्रीकृष्णाचा पुत्र सांब, बलरामात्मज निशठ हे सर्व अभिमन्यूला त्याच्या सुभद्रामातेसह घेऊन आले होते. त्याचप्रमाणें युधिष्ठिराचा सारथि इंद्रसेन इतर सेवकांसह वर्षभर दूर राहिला होता, तोहि आपल्या सर्व रथादि समुदायासह प्राप्त झाला. राजा, त्यांनीं आपल्याबरोबर दहा हजार गज, एक लक्ष अश्व, एक कोटि रथ आणि एक निखर्व पायदळ आणिलें होतें. महाद्युतिमान् भगवान् श्रीकृष्णाच्या मागोमाग वृष्णि, अंधक व भोज या कुलांतील अनेक बलाढ्य वीर आले होते.

राजा या मंगलप्रसंगीं वासुदेवानें महात्म्या पांडवांना पृथक् पृथक् आहेर केला व त्यांस विविध प्रकारचीं रत्नें, मूल्यवान् वस्त्रें व सुंदर स्त्रिया अर्पण केल्या. त्यानंतर मत्स्य आणि पार्थ या दोन प्रसिद्ध कुलांचा संबंध जोडणारा हा विवाह यथाविधि करण्यांत आला. पांडवांशीं आप्तसंबंध जडलेल्या मत्स्यराजाच्या राजमंदिरांत शंख, भेरी, दुंदुभि इत्यादि मंगलवाद्यें वाजूं लागलीं. मृगादि नानाविध शेंकडों पवित्र पशूंचा वध झाला. त्याचप्रमाणें मैरेयादि उंची पेयांची व विपुल मद्याची अभिवृद्धि झाली.

हे कुरुश्रेष्ठा, त्या विवाहमंडपांत गायक, कथेकरी, नट, भाट, सूत, मागध इत्यादि स्तुतिपाठ गाऊं लागले. मत्स्यराजाच्या कुलांतील सुस्वरूप श्रेष्ठ स्त्रिया रत्नालंकारांनीं भूषित होऊन सुदेष्णाराणीला पुढें करून तेथें आल्या. त्या सर्व स्त्रिया अतिशय रूपवती व उत्तम अलंकारांनीं जरी युक्त होत्या, तरी त्या सर्वांचा द्रुपदकन्या पांचालीचें रूप, यश व ऐश्वर्य यांच्या योगानें पराभव झाला. राजा, त्या ठिकाणीं राजतनया उत्तरा उत्तम अलंकार व भूषणें धारण करून महेंद्रकन्येप्रमाणें स्थित होती. तिच्या भोंवतीं या सर्व स्त्रिया उभ्या राहिल्या.

त्यानंतर हे राजन्, अर्जुनानें विराटकन्येचा आपल्या पुत्रासाठीं स्वीकार केला. त्याचप्रमाणें इंद्रतुल्य रूप धारण करणाऱ्या कुंतीपुत्र महाराज युधिष्ठिरानें त्या राजकन्येचा स्नुषात्वानें अंगीकार केला आणि भगवान् श्रीकृष्णाला पुढें करून महात्म्या सौभद्राचा विवाह करविला. त्यावेळीं विराटराजानें जामाताला वायूसारखे वेगवान् सात हजार अश्व व दोनशें प्रमुख गज अर्पण केले. यांशिवाय आणखीहि विपुल धन दिलें. नंतर अग्नीमध्यें यथाशास्त्र आहुत्या देऊन व ब्राह्मणांचें पूजन करून आपलें सर्व सैन्य, राज्य व जीवितहि पांडुपुत्राला समर्पण केलें.

राजा, याप्रमाणें धर्मपुत्र युधिष्ठिरानें विवाहविधि केला असतां अच्युतानें आणलेलें सर्व धन ब्राह्मणांना वांटून टाकिलें. सहस्रावधि धेनु, विविध प्रकारचीं रत्नें, वस्त्रें व भूषणें, मुख्य मुख्य वाहनें व शय्या, अशीं नाना प्रकारचीं दानें दिलीं आणि विविध व रुचकर भोजनांनीं व पेयांनीं लोकांना संतुष्ट केलें. हे भरतर्षभा, अशाप्रकारें त्या महोत्सवप्रसंगीं हृष्ट-पुष्ट जनांनीं व्यापिलेली ती मत्स्यराजाची नगरी अतिशय शोभली. ४. ५. ७२.

( पांचवें वैवाहिक-उपपर्व समाप्त झालें. )

## येथें चवथें विराटपर्व संपलें.

यापुढें पांचवें उद्योगपर्व सुरू होईल, त्याचा हा आद्य श्लोक आहे.

**वैशंपायन म्हणाला—**

**कृत्वा विवाहं तु कुरुप्रवीरास्तदाभिमन्योर्मुदिताः स्वपक्षाः।**
**विश्रम्य रात्रावुषसि प्रतीताः सभां विराटस्य ततोऽभिजग्मुः ॥१॥**

# श्रीमन्महाभारतार्थ

( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर )



## ५ उद्योगपर्व.



## सेनोद्योगपर्व १.



ॐ नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥

### अध्याय १ ला.

[ १ अभिमन्यूच्या विवाहानंतर यादव व पांडव यांचें विराटसभेत अधिवेशन. २ जनार्दनाचें पुढील कर्तव्याविषयीं अर्थपूर्ण भाषण. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, ते कुरुप्रवीर पांडव अभिमन्यूचा विवाह करून अतिशय आनंदित झाले. अभिमन्यूच्या पक्षाचे यादववीरहि पांडवांसारखेच परम संतुष्ट झाले. विवाहोत्सव निर्विघ्नपणें पूर्ण झाला असतां

---

१ महाभारतामध्यें उद्योगपर्व हें सारभूत पर्व आहे, असें वृद्धांचें मत आहे. यास्तव त्याचें व्याख्यान सविस्तर करणें उचित आहे, असें नीलकंठाचें म्हणणें आहे. वाचकांना त्याचा प्रत्यय पुढें येईलच.

त्या सर्व यादव-पांडवांनीं रात्रीं विश्रांति घेतली व प्रातःकाळीं जागे झाल्यावर ते सर्व आपलें आह्निक आटोपून विराटाच्या सभेंत एकत्र जमले. मत्स्यपति विराटाची ती सभा अतिशय समृद्ध होती. ती मुक्ता-प्रवालादिकांच्या जालसमूहानें व उत्तमोत्तम विविध रत्नांनीं विचित्र दिसत होती. तिच्यामध्यें श्रेष्ठ सिंहासनें मांडलेलीं असून सर्वत्र सुगंधी पुष्पांच्या असंख्य माला बांधल्या होत्या. त्या मालांच्या व अगरु-धूपादिकांच्या विचित्र व चित्ताकर्षक सुवासांनीं ती सुगंधयुक्त झाली होती. राजा, अशा प्रकारच्या त्या लोकोत्तर सभेंत ते नरश्रेष्ठ आले.

सर्व पृथ्वीपालांना मान्य असलेले द्रुपद व विराट हे दोघे वृद्ध नरेंद्र मुख्य आसनावर बसले असतां वसुदेवासह बलराम व जनार्दन पांचालराजाच्या समीप बसले. शिनिश्रेष्ठ सात्यकि बलरामाच्या बाजूला स्थानापन्न झाला. पण जनार्दन व युधिष्ठिर हे दोघे मत्स्यराजाच्या अगदीं समीप बसले. द्रुपदराजाचे सर्व पुत्र, भीमार्जुन, उभयतां माद्रीनंदन, युद्धांत श्रेष्ठ असलेले प्रद्युम्न व सांब, विराटपुत्रांसह अभिमन्यु, आपापल्या स्थानीं बसले. त्याचप्रमाणें द्रौपदीचे सर्व शूर पुत्र सुवर्णानें चित्रित केलेल्या श्रेष्ठ आसनांवर बसले. ते पांची कुमार वीर्य, रूप व बल यांत आपापल्या पित्याच्या सदृश होते. अशा प्रकारें वस्त्रें व अलंकार यांनीं भूषित झालेले ते महारथ त्या श्रेष्ठ आसनांवर विराजमान झाले असतां, विमल ग्रहांनीं प्रकाशणाऱ्या अंतरिक्षाप्रमाणें ती समृद्ध राजसभा शोभली.

त्यानंतर तेथें जमलेल्या त्या सर्व श्रेष्ठ नृपालांनीं परस्परांना विचित्र कथावार्ता सांगितल्या व कांहीं वेळानें ते सर्व कृष्णाकडे पहात स्वस्थ बसले. तेव्हां माधवानें तेथें जमलेल्या त्या सर्व राजसिंहांस गोष्टी थांबविण्यास सुचवून पांडवांच्या कार्यासाठीं आपल्या भाषणाकडे लक्ष देण्यास सांगितलें. तेव्हां त्या सर्वांनीं सारभूत व श्रेष्ठ फल देणारें श्रीकृष्णाचें वचन ऐकलें.

( २ ) श्रीकृष्ण—हे नृपश्रेष्ठहो, सौबलानें कपटद्यूतांत युधिष्ठिराला जिंकून त्याचें राज्य कसें हरण करून घेतलें, हें तुम्हांला विदीतच आहे. यांनीं आपल्या वनवासाच्या प्रतिज्ञेचें पूर्णपणें पालन केलें असून आतां हे सत्यनिष्ठ पांडव आपल्या बाहुबलानें ही पृथ्वी जिंकून घेण्यास समर्थ आहेत. या पांडुपुत्रांनीं बारा वर्षें वनवासाचें तीव्र व्रत आचरिलें आणि तेरावें वर्ष अतिशय दुस्तर अज्ञातवासांत तुमच्या समीप काढलें.

त्या महात्म्यांनीं वनांत असह्य व विविध क्लेश सहन केले. आपल्या दायादांनीं हरण केलेलें राज्य आपल्याला परत मिळावें अशी इच्छा करणाऱ्या या वीरांनीं दुसऱ्याचें दास्य स्वीकारूनहि आपली प्रतिज्ञा पार पाडली. असें असल्यामुळें आतां तुम्ही धर्मपुत्र युधिष्ठिर व धृतराष्ट्रपुत्र दुर्योधन या उभयतांनाहि कोणतें काय हितावह होईल, याचा विचार करा. कौरव आणि पांडव या दोघांनाहि जें धर्म्य, युक्त व यशस्कर असेल तेंच करणें श्रेयस्कर आहे.

हा धर्मराज अधर्मानें प्राप्त होणाऱ्या देवांच्या राज्याचीहि इच्छा करणार नाहीं. पण धर्मानें मिळणारें आधिपत्य एखाद्या लहानशा गांवाचें जरी असलें, तरी तें तो मान्य करील. या पांडवांना पित्यापासून प्राप्त झालेलें राज्य धृतराष्ट्राच्या पुत्रांनीं कसें हिरावून घेतलें व कपटानें त्यांना कशा असह्य संकटांत टाकलें, हेंहि सर्व तुम्हांला ठाऊकच आहे. त्या धार्तराष्ट्रांनीं आपल्या तेजानें या पार्थाला रणांत जिंकलेलें नाहीं. तरी हा धर्मराज त्या कौरवांचें सुहृदांसह सदैव कुशलच चिंतीत असतो.

या पांडुपुत्रांनीं स्वतः सर्व भूपालांना जिंकून जी संपत्ति मिळविली होती, तीच हे वीरश्रेष्ठ आतां परत मागत आहेत. त्या शत्रुसंघानें बाल्यावस्थेंत असलेल्या यांचा अनेक उपायांनीं प्राण घेण्याचाहि प्रयत्न केला. यांच्या पितृपरंपरेनें प्राप्त झालेल्या राज्याचें हरण करण्यासाठीं त्या दुष्टांनीं अनेक अन्याय केले; ते सर्व तुम्हांला पूर्णपणें अवगत आहेत.

त्या धार्तराष्ट्रांचा वाढता लोभ, युधिष्ठिराची धर्मज्ञता व त्या दोघांचा परस्परांशीं संबंध, यांकडे लक्ष देऊन तुम्ही स्वतंत्रपणें व एकत्र योग्य विचार करा. हे पांडव सदैव सत्यांत रत आहेत. त्यांनीं आपली प्रतिज्ञा योग्य प्रकारें पार पाडली आहे. यास्तव आतां जर कौरवांनीं विपरीत वर्तन केलें, तर हे वीर त्या धृतराष्ट्रपुत्रांचा वध करण्यास माघार घेणार नाहींत. राज्यलाभासाठीं धार्तराष्ट्रांनीं पांडवांना केलेला अपकार जाणून त्यांचे सुहृज्जन यांच्याच पक्षास मिळतील व कौरव युद्धामध्यें यांना जर पीडा देऊं लागले, तर यांचे सुहृदहि त्यांस युद्धांत मारतील.

हे कुंतीपुत्र अल्पसंख्याक असल्यामुळें त्यांना जिंकण्यास असमर्थ आहेत, असें तुम्हांला वाटत असेल, पण यांचे सर्व सुहृज्जन एकमतानें कौरवांच्या नाशाचा यत्न करतील. परंतु दुर्योधनाचा काय विचार आहे, हेंहि आपल्याला

यथार्थ ठाऊक नाहीं. तेव्हां शत्रूचा विचार कळल्यावांचून आपण तरी काय संकेत करावा ! यास्तव युधिष्ठिराला अर्धे राज्य देण्याविषयीं दुर्योधनाला सांगण्यास एक दूत पाठवावा. तो मनुष्य धर्मशील, शुचि, कुलीन, अप्रमत्त व त्यांना शांत करण्यास समर्थ असावा.

हे राजन्, जनार्दनाचें हें धर्मार्थयुक्त, मधुर, व सम भाषण ऐकून त्याच्या ज्येष्ठ भ्रात्यानें त्याची अतिशय प्रशंसा केली व स्वतः बोलण्यास आरंभ केला. ५. १. १.

---

## अध्याय २ रा.

[ १ बलरामाचें कृष्णमताला अनुमोदन. २ दुर्योधनाशीं सामपूर्वक भाषण करण्याचा उपदेश. ]

( १ ) बलराम—हे भूपालहो, या कृष्णाचें धर्म व अर्थ यांनीं युक्त असलेलें वचन आपण ऐकलेंच आहे. या मुकुंदाचें हें भाषण अजातशत्रु युधिष्ठिराला हितकर व राजा दुर्योधनालाहि उचित असेंच आहे. हे वीर कुंतीपुत्र अर्धे राज्य सोडून अर्ध्या राज्यासाठींच यत्न करीत आहेत. यास्तव धृतराष्ट्रपुत्रांनीं या पांडवांना त्यांचें अर्धे राज्य देऊन स्वतः सुखी व्हावें व आम्हांला आनंद द्यावा. कारण हे पुरुषश्रेष्ठ परक्याच्या हातीं गेलेलें राज्य योग्य प्रकारें मिळवून निश्चयानें शांत होतील. त्यामुळें त्यांना सुख व प्रजेला शांति प्राप्त होईल.

दुर्योधनाचें मत जाणण्यासाठीं व युधिष्ठिराचें म्हणणें त्यास सांगण्यासाठीं कोणी दूत त्यांच्याकडे जर जाईल, तर मला त्यांत संतोषच आहे. कौरव-पांडवांच्या शमासाठीं प्रयत्न करणें मला संमत आहे. कुरुश्रेष्ठ भीष्म, महानुभाव धृतराष्ट्र, पुत्रासह द्रोण, कृप, विदुर, सूतपुत्र कर्ण, गांधारराज शकुनि तसेच इतरहि सर्व बलाढ्य धृतराष्ट्रपुत्र, स्वधर्मांत स्थित आणि चतुरंग सैन्य व नीतिशास्त्र यांनीं युक्त आहेत. यास्तव त्या दूतानें सर्व वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध श्रेष्ठ लोकांस कौरवसभेंत येण्याविषयीं निमंत्रण करावें व सर्व कौरव आणि वृद्ध पौरजन कौरवसभेंत एकत्र जमले असतां तुमच्या दूतानें कुंतीपुत्रांना हितावह होईल अशा प्रकारें नम्रपण भाषण करावें.

( २ ) बलानें युक्त असलेल्या त्या कौरवांनीं पांडवांचा सर्व अर्थ ग्रासला आहे. द्यूतांत आसक्त झालेल्या युधिष्ठिराचें राज्य त्यांनीं हरण केलें आहे.

यास्तव कोणत्याहि अवस्थेंत त्यांना क्रोध येईल, असें भाषण करूं नये. कारण सर्व सुहृदांनीं निवारण केलें असतांहि द्यूतांत प्रवीण नसलेल्या या युधिष्ठिरानें त्या गांधारराजाशीं द्यूत केलें व त्या द्यूतकुशल शकुनीनें याला त्यांत फांशानें जिंकलें. या आजमीढ कुलोत्पन्न धर्मात्म्यानें कर्ण व दुर्योधन या दोघांना सोडून त्या सभेंत जे सहस्रावधि द्यूतकार जमले होते, त्यांना जर आह्वान केलें असतें, तर हा युधिष्ठिर त्यांना जिंकण्यास समर्थ झाला असता.

परंतु त्या सर्वांना सोडून यानें अक्षनिपुण सौबल शकुनीलाच आह्वान केलें व प्रत्येक वेळीं फांसे याच्या प्रतिकूल पडत असतांहि हा त्याच्याशीं द्यूत खेळला व जिंकला गेला. यास्तव हठानें द्यूत केल्यामुळें हा ज्येष्ठ पांडव पराजित झाला, त्यांत शकुनीचा यत्किंचित्हि अपराध नाहीं. तस्मात् तुमच्या दूतानें धार्तराष्ट्राशीं प्रणामपूर्वक सामयुक्तच भाषण करावें. याच उपायानें त्या दौत्यकर्म करणाऱ्या पुरुषाला धार्तराष्ट्रास पांडवांच्या स्वार्थांत नियुक्त करणें शक्य आहे. त्यानें कौरवांशीं युद्धाची आकांक्षा न करतां सामानेंच दुर्योधनाचें आश्वासन करावें. कारण सामानें संपादन केलेला अर्थच हितावह होत असतो. युद्धानें अन्याय घडतो. तो खरा अर्थ नव्हे.

**वैशंपायन**—जनमेजया, बलराम असें बोलला असतां शिनिश्रेष्ठ सात्यकि एकदम उठून उभा राहिला व हलधराच्या उपदेशाची निंदा करीत असें क्रोधयुक्त वचन बोलला. ५. १. २.

---

## अध्याय ३ रा.

[ १ सात्यकीनें केलेला बलरामाच्या वचनाचा तिरस्कार व दुर्योधनाच्या निग्रहाचा निश्चय. ]

( १ ) **सात्यकि**—मनुष्याचें अंतःकरण जसें असतें, तसें तो बोलत असतो. हे कृष्णाग्रजा, तुझ्या अंतःकरणाप्रमाणेंच तूं हें भाषण केलेंस. मनुष्यांमध्यें शूरहि

---

१ सन्ति वै पुरुषाः शूराः सन्ति कापुरुषास्तथा ।
उभावेतौ दृढौ पक्षौ दृश्येते पुरुषान्प्रति ॥
एकस्मिन्नेव जायेते कुले क्लीबमहाबलौ ।
फलाफलवती शाखे यथैकस्मिन्वनस्पतौ ॥

असतात व क्षुद्रबुद्धीचे लोकहि असतात. हे दोन्ही पक्ष दृढ असलेले दिसून येतात. एकाच कुलांत क्लीब व महाबलाढ्य असे दोन्ही प्रकारचे पुरुष उत्पन्न होतात. एकाच वृक्षाची एक शाखा फलांनीं समृद्ध व दुसरी फलशून्य असलेली दिसते.

हे हलधरा, मी तुला किंवा तुझ्या भाषणाला दोष देत नाहीं. परंतु जे तुझें हें भाषण शांतपणें ऐकून घेतात, त्यांचीच मला असूया वाटते. या परिषदेमध्यें सर्वांसमक्ष धर्मराजाचा अल्पहि दोष प्रदर्शित करून भाषण करणारास निर्भयपणा कसा प्राप्त होतो याचेंच मला आश्चर्य वाटतें ! धर्मराजाला दिलेला दोष हे सर्व सभासद स्वस्थपणें ऐकून कसे घेतात !

अहो, त्या अक्षकोविदांनीं या अनक्षज्ञ व द्यूतांत अनासक्त असलेल्या या महात्म्याला बोलावून नेऊन द्यूतांत जिंकलें, याला धर्मजय कसें म्हणतां येईल ! कौरवांनीं जर हा कुंतीपुत्र स्वगृहांत भ्रात्यांशीं द्यूत खेळत असतां त्याच्या समीप जाऊन त्याला जिंकलें असतें, तर त्यांचा धर्मतः जय झाला असता. परंतु त्या दुरात्म्यांनीं क्षत्रधर्मांत सतत रत असलेल्या या राजाला कपटद्यूतानें जिंकलें. यांत त्यांनीं परम शुभ तें काय केलें !

हा पांडव वनवासांतून मुक्त होऊन व अज्ञातवासाची श्रेष्ठ प्रतिज्ञा पार पाडून पैतामहाच्या राज्याला आतां न्यायानें पात्र झाला आहे. तेव्हां त्यानें प्रणिपात करून याचना कां बरें करावी ! या युधिष्ठिरानें जर दुसऱ्याच्या वित्ताची इच्छा केली असती, तर त्या कौरवापाशीं यानें अत्यंत नम्रपणें याचना करणें योग्य झालें असतें. पण धर्मयुक्त असलेल्या यानें आपल्याच राज्याची इच्छा न्यायानें कां करूं नये ! ज्यांनीं आपला अज्ञातवास पूर्ण केला आहे, अशा या कौंतेयांनाहि ‘ तुम्हांला आम्हीं अज्ञातवासांत असतांनाच ओळखलें ’ असें जे म्हणत होते, त्यांना भीष्म, द्रोण व विदुर ‘ यांनीं पांडवांच्या अज्ञातवासाचा काल पूर्ण झाला आहे ’ असें सांगून निरुत्तर केलें आहे. यास्तव धार्तराष्ट्र जर पांडवांना त्यांच्या पितरांची संपत्ति देणार नाहींत, तर मी त्यांना रणांत तीक्ष्ण बाणांनीं बलात्कारानें ती देण्यास भाग पाडीन. मी त्या दुर्बुद्धि कौरवांना महात्म्या कौंतेयांच्या पायां पडावयास लावीन आणि ते जर धीमान् युधिष्ठिराला शिरसा वंदन न करतील, तर मी त्यांना अमात्यांसह यमसदनीं पाठवून देईन

हे रोहिणेया, क्रुद्ध होऊन युद्ध करणाऱ्या या युयुधानाचा वज्रासारखा वेग सहन करण्यास ते महीपाल समर्थ नाहींत. गांडीवधारी अर्जुनाचा व चक्रधारी कृष्णाचा वेग रणांत कोण सहन करूं शकणार ! त्याचप्रमाणें दुरासद भीम, क्रुद्ध झालेला मी व यमासारखे महाद्युतिमान् धनुर्धर उभयतां माद्रीसुत यांना सहन करण्यास कोण समर्थ आहे ! विराट व द्रुपद हे दोघे वीर यम व काल यांच्या तोडीचे आहेत. पार्षत धृष्टद्युम्न अलौकिक योद्धा आहे. यांना कोण जिंकूं शकणार !

हे द्रौपदीचे पांचपुत्र कुलाची कीर्ति वाढविणारे आहेत. हे कुमार आपल्या पित्यांप्रमाणेंच वीर्यवान् व मदोत्कट आहेत. हा धनुर्धर सौभद्रेय देवांनाहि दुःसह आहे. शिवाय हे गद, प्रद्युम्न व सांब तर काल, सूर्य व अग्नि, यांच्या तुल्य आहेत.

याप्रमाणें सामर्थ्यसंपन्न असलेले आम्ही सर्व कर्ण व शकुनि यांसह धृतराष्ट्रपुत्रांचा समरांत संहार करून या ज्येष्ठ पांडवाला राज्याभिषेक करूं.

१आततायी शत्रूंचा वध करण्यांत अधर्म होत नसतो; उलट शत्रूच्या जवळ याचना करणेंच अधर्म्य व अयशस्कर आहे. यास्तव दुर्योधनाचें हृद्गत काय आहे तें जाणून घ्यावें व तो जर युद्धावांचून राज्य देण्याची इच्छा करीत नसेल तर आपण निरलसपणें पुढील कार्याला लागावें. आज पांडुपुत्र युधिष्ठिराला राज्य तरी मिळालें पाहिजे किंवा ते सर्व धार्तराष्ट्र युद्धांत निधन पावून भूतलावर निजले तरी पाहिजेत. ५. १. ३.

---

## अध्याय ४ था.

[ १ द्रुपदाचें सात्यकीच्या मताला अनुमोदन. २ स्वपुरोहिताला धृतराष्ट्राकडे पाठविण्याची सूचना. ]

( १ ) **द्रुपद**—हे महाबाहो, तूं म्हणतोस तसेंच होईल, यांत संशय नाहीं. तो दुर्योधन सामयुक्त मधुर वचनानें राज्य कदापि देणार नाहीं आणि पुत्रवत्सल धृतराष्ट्र, कौरवांच्या अन्नानें दीन झालेले भीष्म-द्रोण, आणि मूर्ख कर्ण

१ नाधर्मो विद्यते कश्चिच्छत्रून्हत्वाऽऽततायिनः ।
अधर्म्यमयशस्यं च शात्रवाणां प्रयाचनम् ॥

व शकुनि हे सर्व त्या सुयोधनालाच अनुसरतील. बलरामाचें सांगणें माझ्या मनाला रुचत नाहीं. समंजस ज्ञानवानांच्या समाजांत असें भाषण करणें अयुक्त आहे. सुनीतीची इच्छा करणाऱ्या पुरुषानें हेंच कार्य प्रथम करावें.

मृदु वचनानें त्या दुर्योधनाची प्रार्थना कदापि करूं नये. कारण तो पापबुद्धि मार्दवानें साध्य आहे, असें मला वाटत नाहीं. दुष्टबुद्धि दुर्योधनाशीं मृदु भाषण करणें म्हणजे गर्दभाला प्रेमानें गोंजारणें व युधिष्ठिराला दोष देणें म्हणजे गायीला निर्दयतेनें ताडन करण्यासारखेंच आहे. मृदु भाषण करणारास तो दुरात्मा असमर्थ समजेल. मार्दवानें वागलें असतां अबुद्धिमान् मनुष्य आपलें कार्यच साधलें असें मानतो. यास्तव आपण असेंच करूं या. यावेळीं यत्नच केला पाहिजे.

आपण आपल्या मित्रांना निरोप पाठवून सैन्य जमवूं या. हे विभो, शल्य, धृष्टकेतु, जयत्सेन व सर्व केकय राजे, यांच्याकडे शीघ्रगामी दूत सत्वर जाऊं देत. कारण तो दुर्योधनहि सर्वत्र दूत पाठवील आणि सज्जन ज्याचें निमंत्रण प्रथम येतें त्याच्याच पक्षाचा स्वीकार करितात. यास्तव कौरवांचें निमंत्रण जाण्यापूर्वीं नरेंद्रांकडे तुमचे दूत पाठविण्याची त्वरा करा. आपल्या शिरावर फार मोठ्या कार्याचा हा भार येऊन पडला आहे, असें मला वाटतें.

हे युधिष्ठिरा, शल्य व त्याचे अनुयायी नृप यांच्याकडे दूताला शीघ्र पाठीव. तसेंच पूर्व सागरवासी राजा भगदत्त, अमित तेजस्वी उग्र हार्दिक्य, अंधक, दीर्घप्रज्ञ, शूर, रोचमान, बृहन्त, सेनाबिन्दु, या नृपालांना बोलावून आणा. त्याचप्रमाणें सेनजित्, प्रतिविन्ध्य, चित्रवर्मा, सुवास्तुक, बाल्हीक, मुञ्जकेश, चैद्याधिपति, सुपार्श्व, सुबाहु, महारथ पौरव, शक, पल्हव, दरदांचे सर्व नृपति, सुरारि, नदीज, कर्णवेष्ट, नील, वीरधर्मा, भूमिपाल, वीर्यवान्, दुर्जय, दन्तवक्र, रुक्मी, जनमेजय, आषाढ, वायुवेग, पूर्वपाली, भूरितेजा, देवक, पुत्रांसह एकलव्य, कारुषक राजे, पराक्रमी क्षेमधूर्ति, काम्बोज, ऋषिक, पंचनदांतील भूपाल, दुर्धर्ष क्राथपुत्र, पार्वतीय राजे, जानकी, सुशर्मा, मणिमान, मत्सक, पांशुराष्ट्राधिप, वीर्यवान् धृष्टकेतु, पुंड्र, दंडधार, बृहत्सेन, निषाद, श्रेणिमान्, वसुमान्, बृहद्बल, बाहु, पुत्रांसह समुद्रसेन राजा, उद्भव, क्षेमक, वाटधान, श्रुतायु, दृढायु, साल्वपुत्र, कुमार व कलिङ्गाधिप या सर्व महीपालांकडे सत्वर दूत पाठवावे, हेंच मला योग्य वाटतें.

(२) हे राजन्, माझा हा पुरोहित विद्वान् ब्राह्मण आहे. याला कौरवसभेंत पाठीव. त्यानें धृतराष्ट्र, दुर्योधन, शान्तनव भीष्म व रथिश्रेष्ठ द्रोण, या सर्वांस काय काय सांगावें, तें सर्व त्याला यथाक्रम सांग. ५. १. ४.

---

## अध्याय ५ वा.

[ १ श्रीकृष्णाचें द्रुपदाच्या मताला प्रशंसापूर्वक अनुमोदन. पुरोहिताला 'दूत' म्हणून पाठविण्यास संमति व द्वारकेस गमन. २ विराट व द्रुपद यांच्या दूतांनीं निमंत्रण केलेल्या राजांचें आगमन, दुर्योधनाच्या दूतांनीं बोलाविलेल्या राजांचें कौरवांकडे गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा द्रुपदाचें हें विचारपरिप्लुत भाषण ऐकून वक्त्यांतील श्रेष्ठ वसुदेवपुत्र माधव म्हणाला—"धुरंधर सोमकाचें अमित तेजस्वी पांडवांची अर्थसिद्धि करणारें हें भाषण युक्तच आहे. न्यायाची इच्छा करणाऱ्या आमचें हेंच पहिलें कर्तव्य आहे. कारण याच्या विरुद्ध वागणारा मनुष्य महामूर्खच ठरेल.

शिवाय, पांडव व कौरव यांच्याशीं योग्य वर्तन ठेवणाऱ्या आम्हां यादवांचा त्या दोघांशींहि तुल्य आप्तसंबंध आहे. कुंती व सुभद्रा यांच्या द्वारा पांडव आमचे आप्त आहेत, आणि सांबानें दुर्योधनाच्या कन्येचें हरण केल्यापासून धार्तराष्ट्रांशींहि आमचा संबंध जडला आहे. या पांडुपुत्रांनीं आम्हां सर्वांना अभिमन्यूच्या विवाहासाठीं निमंत्रण करून आणलें होतें. तो विवाहसमारंभ आतां पार पडला आहे. तेव्हां आपण सर्व आनंदानें आपापल्या गृहीं जाऊं या.

हे पांचालराज, आपण सर्व नृपालांत वयानें व ज्ञानानें वृद्ध आहां, आम्ही सर्व आपणांस शिष्यवत् आहों, यांत संशय नाहीं. द्रोण व कृपाचार्य यांचे आपण मित्र आहां. यास्तव पांडवांना हितावह होईल असा निरोप आपणच त्यांस पाठवावा. आपण जो संदेश पाठवाल तो आम्हां सर्वांना निश्चयानें संमत होईल. दुर्योधन जर न्यायानें वागून शम करील, तर कुरु-पांडवांचा भ्रातृभाव दृढ होऊन क्षत्रियकुलांचा महान्क्षय होणार नाहीं.

परंतु तो दृप्त धृतराष्ट्रपुत्र मोहानें शम जर न करील तर अन्य राजांना साह्यार्थ बोलाविण्यासाठीं प्रथम दूत पाठवा व शेवटीं आम्हांला बोलवा. हा

गांडीव धनुष्यधारी अर्जुन एकदा क्रुद्ध झाला म्हणजे तो मंदमति मूढ दुर्योधन अमात्य व बांधव यांसह नाश पावेल."

( २ ) वैशंपायन—हे पारिक्षिता, त्यानंतर पृथिवीपाल विराट-राजानें वार्ष्णेय कृष्णाचा सत्कार केला व त्याच्या आप्तगणांसह त्याला स्वनगरीस पाठवून दिलें. श्रीकृष्ण द्वारकेस गेला असतां विराट व युधिष्ठिरादि प्रमुख नृपति यांनीं युद्धाची सर्व सामग्री सज्ज केली.

नंतर द्रुपदराजा व विराटराजा यांनीं सर्व भूपतींना त्यांच्या आप्तांसह बोलावणें पाठविलें. तेव्हां मत्स्य, पांचालराजा व कुरुश्रेष्ठ पांडव यांच्या निमंत्रणावरून ते सर्व महाबलाढ्य राजे हृष्ट चित्तानें तेथें जमले. पांडवांनीं फार मोठें सैन्य जमा केल्याचें ऐकतांच धृतराष्ट्रपुत्रांनींहि विविध महीपतींना निमंत्रण केलें. त्यावेळीं पांडवांच्या कार्यासाठीं सर्व दिशांतून येणाऱ्या राजांनीं पृथ्वीला व्यापून सोडलें. त्या वीरांची महाबलाढ्य चतुरंग सेना चोहोंकडून आली असतां सर्व भूमि भरून गेली. त्यायोगें वन व पवत यांसह ही देवी भूतधात्री जणुकाय हलूं लागली. नंतर युधिष्ठिराच्या मतांत स्थित असलेल्या पांचालराज द्रुपदानें ज्ञान व वय या दोन्ही लक्षणांनीं वृद्ध असलेल्या आपल्या पुरोहितास कौरवसभेंत पाठविलें. ५. १. ५.

---

## अध्याय ६ वा.

[ १ द्रुपदाचें धृतराष्ट्राकडे स्वपुरोहितप्रेषण. २ पुरोहिताचें हस्तिनापुरांत गमन. ]

( १ ) द्रुपद्—हे ब्रह्मन्, सर्व भूतांमध्यें प्राणी श्रेष्ठ आहेत. प्राण्यांत बुद्धियुक्त श्रेष्ठ, बुद्धिमानांत मानव श्रेष्ठ व मनुष्यांमध्यें द्विज श्रेष्ठ मानले आहेत. द्विजांमध्यें विद्यावान् श्रेष्ठ, विद्यावानांत सिद्धान्तज्ञ वरिष्ठ, सिद्धान्तज्ञांत कार्यकर्ता उत्तम व त्यांत ब्रह्मवेत्ता उत्कृष्ट होय. तूं सिद्धान्तज्ञांतील प्रमुख आहेस, असें माझें मत आहे.

तूं कुल, वय व ज्ञान यांत विशिष्ट आहेस. तुझी बुद्धि आङ्गिरस शुक्रासारखी आहे. कौरवांचें सर्व वृत्त तुला ठाऊक आहे व कुंतीपुत्र युधिष्ठिराचा वृत्तान्तहि तूं जाणतोस. धृतराष्ट्राच्या समक्ष शत्रूंनीं पांडवांची वंचना केली

आहे; विदुरानें राजाला परोपरीनें उपदेश केला. पण तो अंध राजा पुत्रालाच अनु-सरतो. अक्षनिपुण शकुनीनें अनक्षज्ञ, शुचि व क्षत्रधर्मात स्थित असलेल्या कुंतीपुत्राला बुद्धिपूर्वक द्यूताचें आह्वान केलें. याप्रमाणें धर्मराज युधिष्ठिराला फसवून ते धार्तराष्ट्र आतां कोणत्याहि अवस्थेंत स्वतः होऊन पांडवांचें राज्य परत देणार नाहींत.

यास्तव तूं धृतराष्ट्राशीं असें धर्मसंयुक्त भाषण कर कीं, ज्यायोगें त्या योद्ध्यांचीं मनें युद्धापासून निश्चयानें निवृत्त होतील. तुझें वाक्य विदुर प्रथम मान्य करील, भीष्म, द्रोण, कृपादिक यांच्या मनांत भेद उत्पन्न करील आणि अमात्यांत भेद उत्पन्न झाला असतां व योद्धे विमुख झाले असतां पुनः त्यांचें एकमत करणें भाग पडेल.

याप्रमाण शत्रु भेद पावलेल्या वीरांचें एकीकरण करण्यांत गुंतले असतां त्या अवधींत पार्थांना एकाग्र चित्तानें सेनेची व्यवस्था व द्रव्यसंचय सुखानें करतां येईल. तूं अशाप्रकारें भेद उत्पन्न करून त्यांच्या कार्याला विलंब केलास, म्हणजे ते सैन्य जमविण्याकडे दुर्लक्ष करतील, यांत संशय नाहीं. सांप्रत हेंच कर्तव्य प्रामुख्यानें उपस्थित झालेलें दिसत आहे. तुझ्या गमनानें राजा धृतराष्ट्र तुझें धर्म्य वचन मान्य करील.

यास्तव धर्मनिष्ठ असलेला तूं त्याच्याशीं धर्म्य आचरणच कर. त्या कृपालु वीरांना पांडवांच्या क्लेशांचें कथन कर. वृद्धजनांना पूर्वजांनीं आचरिलेला कुल-धर्म सांग. म्हणजे तुझ्या वचनानें त्यांच्या मनांत भेद उत्पन्न होईल, यांत संशय नाहीं. तुला त्यांच्यापासून यत्किंचित्‌हि भय नाहीं. कारण तूं वेदवेत्ता ब्राह्मण आहेस, दूतकर्मांत नियुक्त झालेला आहेस व विशेषतः वृद्ध आहेस. यास्तव कौंतेयांच्या अर्थसिद्धीसाठीं तूं पुष्यनक्षत्राच्या विजयी सुमुहूर्तावर कौर-वांकडे प्रयाण कर.

(२) **वैशंपायन**—राजा, महात्म्या द्रुपदानें याप्रमाणें प्रेरणा केली असतां तो विद्वान् व नीतिशास्त्रज्ञ पुरोहित शिष्यांच्या परिवारासह हस्तिनापुरांत येऊन पोहोंचला व पांडवांच्या हितासाठीं कौरवसभेंत गेला. ५. १. ६.

---

## अध्याय ७ वा.

[ १ दुर्योधन व अर्जुन यांचें कृष्णदर्शनार्थ यदृच्छेनें एकाच वेळीं द्वारकेंत गमन. २ दुर्योधनाचें 'नारायण-'गणाला स्वीकारून स्वनगरीस प्रयाण. ३ अर्जुनाचें सारथ्य स्वीकारून त्याच्यासह कृष्णाचें युधिष्ठिरासमीप आगमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें पांडवांनीं पुरोहिताला हस्तिनापुरींत पाठवून भिन्न भिन्न देशांतील नृपालांकडे अनेक दूत पाठविले. नंतर पुरुषश्रेष्ठ धनंजय स्वतः द्वारकेस जावयास निघाला. वृष्णि, अंधक व भोज यांसह कृष्ण व बलराम द्वारकेस गेले असतां धृतराष्ट्रात्मजानें गुप्त हेरांच्या द्वारा पांडवांचा सर्व कर्तव्यसंकेत जाणला व कृष्ण आपल्या नगरीला परत गेला आहे, असें ऐकून दुर्योधन अल्प सैन्यासह वायूसारख्या वेगवान् अश्वावर आरूढ होऊन द्वारकेस आला.

त्याच दिवशीं पांडुनंदन धनंजयहि रम्य आनर्तनगरीस जाऊन पोंचला. ते दोघेहि कुरुनंदन द्वारकेंतील राजभवनांत गेले. त्यावेळीं श्रीकृष्ण आपल्या शयनमंदिरांत शयन करीत असल्याचें त्यांच्या दृष्टीं पडलें. दुर्योधन वासुदेवाच्या मंदिरांत प्रथम पोंचला होता. तो त्याच्या मस्तकाजवळील श्रेष्ठ आसनावर बसला. त्याच्या मागून महात्म्या धनंजयानें प्रवेश केला व कृष्णाला निद्रित पाहून तो पार्थ त्याच्या बाजूला नम्रपणें हात जोडून उभा राहिला.

कांहीं वेळानें वार्ष्णेय जागा झाला. तों त्याला पुढें उभा असलेला अर्जुन प्रथम दिसला व मान वळवून पाहिल्यानंतर सिंहासनस्थ दुर्योधन त्याच्या दृष्टीं पडला. तेव्हां मधुसूदनानें त्या दोघांचेंहि स्वागत व यथाविधि सत्कार केला आणि त्यांच्या आगमनाचें कारण विचारिलें.

त्यावेळीं **दुर्योधनानें** हंसून कृष्णाला म्हटलें—हे माधवा, या युद्धामध्यें तूं मला साह्य कर. तुझ्याशीं अर्जुनाचें व माझें सारखेंच सख्य आहे. त्याचप्रमाणें आम्हां दोघांचा संबंधहि तुल्य आहे. शिवाय हे मधुसूदना, आज तुझ्याकडे मी प्रथम आलों आहें आणि प्रथम येणाराच्या पक्षाचाच सज्जन स्वीकार करीत असतात. श्रेष्ठ लोकांमध्यें तूं सज्जनांना सर्वदा संमत आहेस. यास्तव तूं सज्जनांच्या या शिष्टाचाराचें पालन कर.

**कृष्ण**—हे राजन्, तूं येथें पूर्वींच आला असशील, यांत संशय नाहीं. परंतु मला पार्थच प्रथम दिसला. यास्तव तूं प्रथम आलास म्हणून आणि पार्थाला मीं प्रथम पाहिलें म्हणून, तुम्हां दोघांनाहि मी साह्य करीन,

शिवाय इष्ट वस्तु लहानाला अगोदर द्यावी, अशी श्रुति आहे. तस्मात् हा पृथापुत्र धनंजय तुझ्याहून वयानें कनिष्ठ असल्यामुळें त्याला इष्ट दान प्रथम देणें योग्य आहे. मजसारख्याच सुदृढ 'नारायण'-नामक गोपांची मजपाशीं फार मोठी सेना आहे. ते सर्व एक अब्ज सैनिक क्षत्रिय व देवदानव ती यांच्याहि समक्ष संग्रामांत युद्ध करणारे आहेत. युद्धामध्यें दुराधर्ष असलेली प्रचंड सेना एकाला देतों व शस्त्रत्याग करून संग्रामांत युद्ध न करणारा मी एकटा एका पक्षाला येतों. या दोहोंतील हे पार्था, तुला जें संमत असेल तें तूं प्रथम मागून घे. कारण धर्मतः तुला इष्ट वर अगोदर देणें उचित आहे.

**वैशंपायन**—राजा, कृष्ण असें बोलला असतां कुंतीपुत्र धनंजयानें युद्ध न करणाऱ्या एकट्या केशवालाच पत्करिलें. तो हृषीकेश 'नारायण'-नांवानें प्रसिद्ध असून शत्रूंचा हन्ता, मनुष्यामध्यें स्वेच्छेनें उत्पन्न झालेला, अज व देव-दानव आणि सर्व क्षत्रिय यांत श्रेष्ठ होता.

( २ ) दुर्योधनानें त्या माधवाचें तें प्रचंड सैन्य मागून घेतलें. त्यावेळीं सहस्रावधि योद्धे प्राप्त झाल्यामुळें त्या धार्तराष्ट्राला परम संतोष झाला व 'श्रीकृष्णाला मी आज पूर्णपणें रिक्त केलें,' असें जाणून हृष्ट झालेला तो कौरव त्या सैन्याचा स्वीकार करून महाबलाढ्य बलरामाकडे आला आणि त्यानें बलरामाला आपल्या येण्याचा हेतु निवेदन केला. तो ऐकून शौरि त्या धार्तराष्ट्राला असें वचन बोलला.

**बलदेव**—हे नरश्रेष्ठा, पूर्वीं विराटाच्या विवाहप्रसंगीं मीं जें म्हटलें होतें, तें सर्व तुला ठाऊकच आहे व त्याप्रमाणेंच सर्व होणार आहे. मीं तुझ्यासाठीं गोविंदाचा पुनः पुनः निग्रह करून आमचा तुल्य संबंधहि व्यक्त केला, परंतु केशवाला माझें तें वचन रुचलें नाहीं. हे कुरुनंदना, मी कृष्णापासून एक क्षणभरहि दूर रहाण्यास समर्थ नाहीं. यास्तव वासुदेवाकडे पाहून मीं 'दुर्योधन किंवा पार्थ यांतील कोणत्याच पक्षाला साह्य करावयाचें नाहीं' असा निश्चय केला आहे. हे नरव्याघ्रा, सर्व पार्थिवांना पूज्य असलेल्या भरतवंशांत तुझा जन्म झाला आहे. यास्तव जा, क्षत्रधर्मानें युद्ध कर.

**वैशंपायन**—हलधराचें हें भाषण ऐकून दुर्योधनानें त्याला आलिंगन दिलें आणि महाबाहु कृष्णाचाहि निरोप घेतला. तेथून तो धृतराष्ट्रपुत्र कृतवर्म्याकडे गेला. तेव्हां कृतवर्म्यानें त्याला एक अक्षौहिणी सेना दिली. तिचाहि स्वीकार

करून, तो कौरव त्या सर्व प्रचंड सेनेसह सुहृदांना आनंद देत मोठ्या हर्षानें आपल्या नगरीस परत आला.

( ३ ) दुर्योधन परत गेला असतां जगत्स्रष्टा जनार्दन अर्जुनाला म्हणाला—"पार्था, तूं कोणत्या हेतूनें युद्ध न करणाऱ्या माझा स्वीकार करीत आहेस !"

अर्जुन—हे मुकुंदा, तूं त्या सर्वांचा संहार करण्यास समर्थ आहेस, यांत संशय नाहीं. मीहि एकटा त्यांचा वध करण्यास समर्थ आहें. लोकांत तुझें यश प्रसिद्ध आहे, तेव्हां तूं युद्ध केल्यास तुलाच यश मिळेल. परंतु मला कीर्तीची महत्त्वाकांक्षा असल्यामुळें तुज युद्ध न करणाराचाच मीं स्वीकार केला. तथापि हे कृष्णा, तूं माझें सर्वदा सारथ्य करावेंस अशी माझी फार दिवसांची उत्कट इच्छा आहे, यास्तव एवढी माझी मनीषा पूर्ण कर.

वासुदेव—हे कौंतेया, तूं माझ्याशीं स्पर्धा करावीस हें योग्यच आहे. ठीक आहे, मी तुझें सारथ्य करीन. तुझा हा मनोरथ पूर्ण होईल.

वैशंपायन—जनमेजया, याप्रमाणें आपला मनोरथ पूर्ण झाल्यामुळें संतुष्ट झालेला पार्थ यादवश्रेष्ठांनीं परिवेष्टित झालेल्या कृष्णासह युधिष्ठिराकडे परत आला. ५. १. ७.

---

## अध्याय ८ वा.

[ १ शल्याचें मोठ्या सेनेसह पांडवांकडे प्रस्थान. २ दुर्योधनाचें कपटोपचारांनीं केलेलें त्याचें वशीकरण. ३ शल्य व पांडव यांची भेट. ४ त्यास युधिष्ठिराची कर्णतेजोभंगाविषयीं विज्ञप्ति. ५ शल्यानें केलेला त्याचा स्वीकार. ]

( १ ) वैशंपायन—हे राजन्, पांडव युद्धाची तयारी करीत आहेत ही वार्ता दूतांच्या मुखांनीं ऐकून शल्य आपले महारथ पुत्र व महत्सैन्य यांसह पांडवांच्या साह्यार्थ येण्यास निघाला. त्याची सेना इतकी प्रचंड होती कीं तिच्या मार्गांतील निवेशप्रसंगीं अर्ध योजन भूमि व्यापली जात असे. तो महापराक्रमी अक्षौहिणीपति नृपश्रेष्ठ त्या विपुल सैन्यानें शोभत होता. त्याच्या सैन्यांतील सर्व योद्धे शूर असून त्या सर्वांनीं विचित्र कवचें, आभरणें, ध्वज, धनुष्यें व पुष्पमाला धारण केल्या होत्या. ते सहस्रावधि वीर स्वदेशांतील वेष व भूषणें यांनीं युक्त असून विचित्र रथ-वाहनांवर आरूढ झाले होते. क्षत्रियश्रेष्ठ त्याचे सेनापति होते.

( २ ) याप्रमाणें तो श्रेष्ठ नृपाल प्रचंड सैन्यासह सर्व भूतांना व्यथित व भूमीला कंपित करीत सैन्याला विश्रांति देत हळुहळू पांडवांकडे येण्यास निघाला. पण तो महारथ सैन्यासह येत असल्याचें ऐकून दुर्योधन स्वतःच त्याच्या मार्गांतील स्वास्थ्याची योजना करण्यांत तत्पर राहिला. त्यानें प्रत्येक रमणीय प्रदेशांत विविध शिल्प्यांकडून उत्तम प्रकारें अलंकृत केलेल्या अनेक रत्नजडित सभा व क्रीडास्थानें निर्माण करविलीं. तेथें पुष्पमालादि भोग्य वस्तु, व मांसादि भक्ष्य व पेय पदार्थ यांची समृद्धि केली. मार्गांमध्यें जागजागीं मनाचा हर्ष वाढविणारीं विविधाकार जलगृहें, जलाशयें व सरोवरें तयार करविलीं.

शल्यराज पहिल्या दिवशीं त्यांतील प्रथम सभेपाशीं ससैन्य आला, तों दुर्योधनाचे अमात्य त्याचा देवाप्रमाणें सत्कार करूं लागले. तेव्हां त्या दिवशीं त्यांच्याकडून सर्व प्रकारें सन्मान पावलेला तो राजा पुढें निघाला. तो सायंकाळीं देवमंदिराप्रमाणें शोभणाऱ्या दुसऱ्या सभास्थानीं येऊन पोंचला. ती सभाहि अलौकिक व हितावह विषयांनीं युक्त होती.

याप्रमाणें परम सुखप्रद व अतिमानुष विषयांचा उपभोग घेणारा तो राजा स्वतःला पुरंदराहूनहि श्रेष्ठ मानूं लागला. नंतर संतुष्ट झालेल्या त्या नृपालानें त्या अमात्यांना विचारिलें कीं, युधिष्ठिराच्या कोणत्या कुशल पुरुषांनीं या सभा निर्माण केल्या आहेत ! त्या शिल्पकारांना येथें घेऊन या. कारण ते द्रव्यादिकांनीं सन्मान करण्यास योग्य आहेत, असें मला वाटतें. त्यांना पारितोषिकें देण्याची युधिष्ठिरानें मला अनुज्ञा द्यावी.

शल्याचें हें भाषण ऐकून विस्मित झालेल्या त्या राजसेवकांनीं दुर्योधनाला हा सर्व वृत्तान्त कळविला व संतुष्ट झालेला शल्य स्वतःचा जीवहि देऊन टाकण्यास तयार झाला आहे, हें पाहून आतांपर्यंत गुप्त राहिलेला दुर्योधन त्या माद्रेयांच्या मातुलाला येऊन भेटला. त्याला पाहून व त्याचा हा सर्व यत्न जाणून शल्यानें मोठ्या प्रीतीनें त्याला आलिंगन दिलें व 'तुला जें कांहीं इष्ट असेल तें मागून घे' असें म्हटलें.

तेव्हां दुर्योधन म्हणाला—हे विभो, तूं आपलें वचन सत्य कर व मला वर दे. माझ्या सैन्याचा सेनापति होण्यास तूंच योग्य आहेस. यास्तव माझी ही विज्ञप्ति मान्य कर.

वैशंपायन—राजा, दुर्योधनाचें हें वचन ऐकून शल्यानें 'ठीक आहे, मीं तुझी ही इच्छा मान्य केली आहे,' असें वारंवार म्हटलें व 'आणखीं काय करूं तें सांग' असें त्याला विचारिलें.

शल्य—हे नरश्रेष्ठा दुर्योधना, तूं आतां आपल्या नगरीला परत जा. मी प्रथम अरिंदम युधिष्ठिराला भेटावयास जातों, त्या धर्मराजाला भेटून मी सत्वर परत येईन. मला पुरुषश्रेष्ठ युधिष्ठिराची भेट अवश्य घेतली पाहिजे.

दुर्योधन—हे राजन्, पांडवांना भेटून तूं लवकर परत ये. आम्ही सर्वस्वी तुझ्या अधीन आहों, आम्हांस दिलेल्या वचनाचें स्मरण ठेव.

शल्य—हे कुरुश्रेष्ठा, ठीक आहे. मी सत्वर परत येतों. आतां तूं आपल्या नगरीला जा. तुझें कल्याण असो.

(३) वैशंपायन—नंतर त्या दोघां शल्य-दुर्योधनांनीं परस्परांस आलिंगन दिलें व दुर्योधन शल्याचा निरोप घेऊन आपल्या नगरीस परत गेला. इकडे शल्य कौंतेयांना दुर्योधनाचें हें कर्म निवेदन करण्यासाठीं विराटनगरीच्या समीप असलेल्या उपप्लव्य नगरीस गेला व तेथें सेनानिवेशस्थानीं जाऊन सर्व पांडवांना भेटला. त्या पांडुपुत्रांनीं महाबाहु शल्याचें स्वागत केलें व श्रौत विधीनें पाद्य, अर्घ्य व गाय इत्यादि अर्पण करून त्याचा सत्कार केला.

नंतर त्या मद्रराजानें त्यांस आपलें कुशल निवेदन करून युधिष्ठिर, हृष्ट झालेले भीमार्जुन व भागिनेय माद्रीसुत या सर्वांस परम प्रीतीनें आलिंगन दिलें. त्यानंतर आसनावर बसलेल्या शल्यानें पार्थाला विचारिलें—"हे राजन्, तुझें कुशल आहेना? तूं वनवासाच्या प्रतिज्ञेतून मुक्त झालास, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. खरोखर, हे राजेंद्रा, तूं भ्राते व पांचाली यांसह निर्जन वनांत रहाण्याचें मोठें दुष्कर कर्म केलेंस ! अज्ञातवास तर त्याहूनहि अधिक दुष्कर असतां, त्यांतूनहि तूं पार पडलास !!

हे भारता, राज्यभ्रष्ट झालेल्या पुरुषास दुःखच भोगावें लागतें! त्याला सौख्य कोठलें ! त्या धार्तराष्ट्रानें तुला अतिशय क्लेश दिले आहेत. पण आतां तूं त्या शत्रूंना मारून सुखाला प्राप्त होशील. हे महाराज, तुला लोकव्यवहार विदित आहेतच. हे वत्सा, यास्तव तूं लोभानें कोणतेंहि कार्य करूं नको. पुरातन राजर्षींच्या मार्गाचेंच अनुवर्तन कर.

हे युधिष्ठिरा, तूं दान, तप, सत्य, क्षमा, दम व अहिंसा यांत स्थित हो. हे राजा, हा अद्भुत लोक तुझ्या ठिकाणीं प्रतिष्ठित आहे, त्याला तुझाच आधार आहे. तूं मृदु भाषण करणारा असून ब्राह्मणभक्त, दाता व धर्मपरायण आहेस, अशी लोकांत तुझी प्रसिद्धि आहे. लोकांच्या प्रत्ययाला आलेले अनेक धर्म तुला विदित आहेत. या सर्व जगाचें यथार्थ स्वरूपहि तूं जाणतोस. हे राजन्, तूं या सर्व संकटांतून पार पडलास व भ्रात्यांसह मला भेटलास हें मोठें भाग्य होय. तूं हें मोठें दुष्कर कर्म केलें आहेस. खरोखर तूं धर्माचा निधिच आहेस."

**वैशंपायन**—राजा, नंतर शल्यानें दुर्योधनाची भेट, त्यानें मार्गांत केलेला सत्कार व त्याला दिलेला वर, हा सर्व वृत्तान्त युधिष्ठिराला निवेदन केला.

**युधिष्ठिर**—हे राजन्, तूं हें मोठें सत्कृत्य केलें आहेस. मला तें ऐकून फार संतोष झाला. तूं संतुष्ट चित्तानें दुर्योधनाला जो वाणीनें वर दिलास तो कृतीनें सत्य करून दाखीव. तुझें कल्याण असो. पण तूं एक कार्य करावेंस अशी माझी इच्छा आहे. माझ्यासाठीं तूं एक अकर्तव्यहि करावेंस,-असा मी तुला आग्रह करितों.

हे महाराज, मी तुला एक विज्ञप्ति करतों ती ऐक. तूं युद्धांत वासुदेवाच्या समान आहेस. कर्ण व अर्जुन यांचें जेव्हां द्वैरथ युद्ध होईल, तेव्हां तूं कर्णाचें सारथ्य करशील, यांत संशय नाहीं. हे राजन्, तुला जर माझें प्रिय करण्याची इच्छा असेल, तर तूं त्या वेळीं पार्थाचें संरक्षण कर. तूं त्या सूतपुत्राचा तेजोभंग केल्यास तो आम्हांला जयावह होईल. हे मातुला, तुला हें जरी अकर्तव्य असलें तरी तूं तें अवश्य कर.

**शल्य**—हे पांडवा, तुझें कल्याण असो, तुझ्या सांगण्याप्रमाणें मी महात्म्या सूतपुत्राचा तेजोभंग करण्याच्या हेतूनें संग्रामांत निश्चयानें त्याचा सारथि होईन. तो नेहमीं मला वासुदेवाच्या तुल्य समजत असतो. युद्धामध्यें मी त्याला प्रसंगाला अनुकूल व परिणामीं विरुद्ध असें भाषण करीन. त्यामुळें दर्प व तेज यांनीं रहित झालेल्या त्याचा वध तुम्ही सहज करूं शकाल. हें मी तुला सत्य सांगतों. तूं सांगतोस त्याप्रमाणें मी अवश्य करीन. या खेरीज तुझें आणखींहि कांहीं प्रिय करणें शक्य असेल, तर तेंहि मला सांग.

हे धर्मनिष्ठा, द्यूतामुळें तुजवर ही आपत्ति आली, कृष्णेसह तुला अतिशय दुःख भोगावें लागलें, सूतपुत्राचे कठोर शब्द ऐकावे लागले, जटासुर

व कीचक यांनीं दिलेले क्लेश सहन करावे लागले. खरोखर दमयंतीप्रमाणेंच द्रौपदीवर हें संकट ओढवलें; परंतु हे वीरा, या सर्व दुःखाचा परिणाम सुखकारक होईल. यास्तव तूं खिन्न होऊं नको. कारण दैवच बलवत्तर आहे. हे युधिष्ठिरा, महात्म्यांना असेच क्लेश सहन करावे लागतात. देवांनाहि दुःखें प्राप्त झालीं आहेत. देवराज इंद्रानेंहि भार्येसह महद्दुःख अनुभविलें आहे. ५. १. ८.

---

## अध्याय ९ वा.

[ १ इंद्राच्या दुःखाचा वृत्तांत सांगण्याविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न. २ इंद्रवधार्थ त्रिशिरसाची उत्पत्ति. ३ त्याचा तपोभंग करण्यासाठीं इंद्रानें अप्सरांकडून करविलेला प्रयत्न. ४ त्याचें जितेंद्रियत्व पाहून इंद्रानें केलेला त्याचा वध. ५ वृत्राची उत्पत्ति, इंद्र-वृत्रांचें युद्ध, इंद्राचा पराभव. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे राजेंद्रा, महात्म्या इंद्राला भार्येसह घोर दुःख कसें प्राप्त झालें, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे.

( २ ) **शल्य**—हे भारता, भार्येसह इंद्राला कसें दुःख भोगावें लागलें तो पुरातन इतिहास सांगतों, ऐक. पूर्वी महातपस्वी देवश्रेष्ठ त्वष्टा प्रजापति होता. त्यानें इंद्राच्या वधेच्छेनें ‘ विश्वरूप-’नामक अतिशय तेजस्वी पुत्र उत्पन्न केला! तो तीन शिरांनीं युक्त होता. त्याचीं तीं तीन मुखें सूर्य, चंद्र व अग्नि यांच्या तुल्य होतीं. तो एका मुखानें वेदाध्ययन, दुसऱ्या मुखानें सुरापान व तिसऱ्या मुखानें जणु काय सर्व दिशांचें प्राशन करीतच निरीक्षण करीत असे. तो तपस्वी, दान्त, मृदु आणि धर्म व तप यांत नित्य तत्पर असे. त्यानें अतिशय तीव्र व दुश्चर तप आचरिलें. त्या अमित तेजस्वी त्रिशिरसाचें तप, वीर्य व सत्य पाहून इंद्राला ‘ हा शक्र तर होणार नाहीं ना! हा वृद्धि पावणारा ‘ त्रिशिरस् ’ सर्व पृथ्वीला ग्रासून टाकील’ अशी चिंता वाटूं लागली. तो ‘ हा महातपस्वी भोगांत आसक्त होऊन तपश्चरणापासून निवृत्त कसा बरें होईल ’ असा विचार करूं लागला. बराच विचार करून त्यानें अप्सरागणांना त्या त्वष्ट्याच्या पुत्राला मोहित करण्याची आज्ञा केली.

( ३ ) **इंद्र**—हे वरांगनांनो, सत्वर जा व ज्यायोगें तो त्रिशिरस् निश्चयानें विषयभोगांत प्रसक्त होईल, अशा प्रकारें त्याला मोहित करा. विलंब लावूं नका.

तुम्ही शृंगारयुक्त वेष धारण करा, मनोहर मुक्ताहारांनीं भूषित व्हा, सर्व सौंदर्यानें युक्त होऊन शृंगारचेष्टांनीं त्याला मोहित करा व माझें भय घालवा. तुमचें कल्याण असो. माझें मन अतिशय अस्वस्थ झालें आहे. यास्तव हे अबलांनो, माझें हें घोर भय तुम्ही सत्वर नष्ट करा.

अप्सरा—हे बलनिषूदना, तुला त्या त्रिशिरसापासून भय प्राप्त होणार नाहीं, अशाप्रकारें आम्ही त्याला मोहित करण्याचा यत्न करूं. जेथें तो तपोनिधि आपल्या दृष्टिक्षेपानेंच सर्व दिशांना जणुकाय दग्ध करीत आहे, तेथें आम्ही सर्वजणी मिळून जाऊं आणि तुझें भय दूर करण्यासाठीं त्याला वश करण्याचा प्रयत्न करूं.

शल्य—युधिष्ठिरा, याप्रमाणें इंद्रानें अनुज्ञा दिलेल्या त्या वराङ्गना त्रिशिरसाच्या समीप गेल्या व तेथें त्यांनीं विविध भावांनीं त्याला मोहित करण्याचा प्रयत्न चालविला. त्या अप्सरांनीं नानाप्रकारचें शरीरसौंदर्य प्रकट करीत त्याच्यापुढें नृत्य केलें, परंतु तो महातपस्वी त्यांना पाहून ‘ मला हा विषयभोग प्राप्त झाला ’ म्हणून हृष्ट झाला नाहीं. इंद्रियांचा पूर्णपणें निग्रह करून तो महात्मा परिपूर्ण सागराप्रमाणें अक्षुब्धच राहिला.

तेव्हां पराकाष्ठेचा प्रयत्न करूनहि निराश झालेल्या त्या अप्सरा शक्राजवळ आल्या व इंद्राला म्हणाल्या—“ हे देवराज, तो तपस्वी अतिशय दुर्धर्ष आहे. त्याला धैर्यापासून च्युत करतां येणें शक्य नाहीं. यास्तव हे प्रभो, तुला अन्य कांहीं उपाय योजावयाचा असल्यास, तसा यत्न कर. ”

अप्सरांचें हें भाषण ऐकून महामति इंद्रानें त्यांना सत्कारपूर्वक निरोप दिला व त्याच्या वधोपायाचा विचार चालविला. त्या प्रतापी देवराजानें त्रिशिरसाच्या वधाचा निश्चय केला. तो मनांत म्हणाला—“मी आतां त्यावर वज्र सोडतों, म्हणजे तो या जगांतून नाहींसा होईल. दुर्बल शत्रु प्रवृद्ध होऊं लागल्यास बलवानानेंहि त्याची उपेक्षा करूं नये.” असा शास्त्रबुद्धीनें विचार करून त्यानें त्याच्या वधाचा दृढ निश्चय केला.

( ४ ) नंतर पुरंदरानें क्रुद्ध होऊन आपलें अग्नितुल्य घोर व भयानक वज्र त्रिशिरसावर सोडिलें. तेव्हां वज्राच्या भयंकर प्रहारानें मृत झालेला तो त्रिशिरस पर्वतशिखराप्रमाणें भूमीवर पडला. पण त्याचा तो पर्वतप्राय देह धरणीवर

१ शत्रुः प्रवृद्धो नोपेक्ष्यो दुर्बलोऽपि बलीयसा ॥

पडलेला पाहूनहि शक्राच्या मनाला शांति प्राप्त झाली नाहीं. कारण तो देवेंद्र त्याच्या तेजानें दीप्त झाला होता. तो त्रिशिरस जरी गतप्राण झाला होता तरीहि आपल्या दीप्तीनें जिवंत असल्याप्रमाणेंच दिसत होता. हत झालेल्या त्याचीं मस्तकें आपल्या अद्भुत तेजानें जिवंतच भासत होतीं.

तें पाहून शक्र भयभीत होत्साता विचार करीत उभा राहिला. इतक्यांत जेथें तो मृत होऊन पडला होता त्या अरण्यांत खांद्यावर परशु टाकून तक्षा-देवांचा सुतार तेथें आला. तेव्हां तो भ्यालेला शचीपति त्याला पाहून म्हणाला— "हे तक्षा, याचीं मस्तकें सत्वर तोडून टाक. येवढें माझें कार्य कर."

तक्षा—याचे स्कंध फार मोठे आहेत. त्यांचा छेद करितांना माझा हा परशु मोडून जाईल. शिवाय सज्जनांनीं निंद्य मानलेलें हें कर्म करण्यास मी समर्थ नाहीं.

इंद्र—भिऊं नको. माझ्या सांगण्याप्रमाणें कर. माझ्या प्रसादानें तुझा हा परशु वज्रतुल्य होईल.

तक्षा—आज हें घोर कर्म करणारे आपण कोण आहांत, हें ऐकण्याची माझी इच्छा आहे. यास्तव मला तत्त्वतः कथन करा.

इंद्र—हे तक्षन्, मी देवराज इंद्र आहें असें समज आणि माझ्या सांगण्याप्रमाणें कर. आतां अधिक विचार करूं नको.

तक्षा—हे शक्रा, तुला या क्रूर कर्माची लज्जा कशी वाटत नाहीं? या ऋषिपुत्राचा वध करून तूं या ब्रह्महत्येच्या पातकाला कसा भ्याला नाहींस?

इंद्र—या पातकाच्या क्षालनार्थ मी मागाहून दुश्चर तप आचरीन. या महावीर्यवान् शत्रूचा मीं वज्रानें वध केला आहे. तरीहि अद्यापि मला त्याचें भय वाटतें व मन उद्विग्न होतें. यास्तव तूं याच्या मस्तकांचा सत्त्वर छेद कर. मी तुजवर अनुग्रह करितों. हे तक्षन्, यज्ञामध्यें मानव पशूचें शीर तुझा भाग म्हणून तुला अर्पण करतील. हा मी तुजवर अनुग्रह केला आहे. आतां तूं सत्त्वर माझें प्रिय कर.

शल्य—धर्मराजा, महेंद्राचें हें वचन ऐकून तक्षानें त्याच्या सांगण्यावरून त्रिशिरसाच्या मस्तकांचे आपल्या कुठारानें तुकडे केले. तेव्हां त्या तोडलेल्या मस्तकांपासून कपिंजल, तित्तिर व कलविङ्क असे पक्षी उत्पन्न झाले. तो त्रिशिरस ज्या मुखानें वेदाध्ययन व सोमपान करीत असे, त्या मुखांतून कपिंजल

बाहेर पडले; ज्या मुखानें जणुंकाय सर्व दिशांना प्राशन करीत निरीक्षण करीत असे, त्या मुखांतून तित्तिर पक्षी बाहेर पडले आणि त्या त्रिशिरसाच्या सुरापान करणाऱ्या मुखांतून कलविङ्क व श्येनपक्षी उत्पन्न झाले. त्या त्रिशिरसाचा पूर्णपणें नाश झाला असतां इंद्रानें निश्चिंत होऊन स्वर्लोकीं गमन केलें व तक्षाहि स्वगृहीं निघून गेला.

( ५ ) याप्रमाणें शत्रूचा वध करून देवेंद्रानें स्वतःला कृतकृत्य मानिलें. पण त्वष्ट्या प्रजापतीनें आपल्या पुत्राचा शक्रानें वध केल्याचें जेव्हां ऐकलें, तेव्हां तो क्रोधानें नेत्र आरक्त करून असें बोलला—

" माझा पुत्र क्षान्त, दान्त, जितेंद्रिय व नित्य तपश्चरणांत स्थित होता. देवेंद्रा, ज्याअर्थीं तूं त्याचा कांहीं अपराधावांचून वध केला आहेस, त्याअर्थीं मी तुझ्या नाशासाठीं वृत्राला उत्पन्न करितों. सर्व लोक व तो दुरात्मा पापबुद्धि देवेंद्रहि आज माझें वीर्य व तपाचें बल पाहोत."

असें बोलून त्या महायशस्वी क्रुद्ध तपस्व्यानें आचमन केलें, अग्नींत आहुत्या दिल्या व घोर वृत्राला उत्पन्न करून त्याला म्हटलें—" हे इंद्रशत्रो, माझ्या तपःप्रभावानें तुझी वृद्धि होवो." त्यानें हे शब्द उच्चारतांच सूर्य व अग्नि यांच्या तुल्य असलेला तो वृत्र स्वर्गापर्यंत वाढत गेला व कालसूर्याप्रमाणें उदय पावणाऱ्या त्यानें 'मीं काय करावें ?' असा प्रश्न केला.

तेव्हां प्रजापतीनें 'शक्राचा वध कर' असें म्हटलें. त्याबरोबर तो वृत्र इंद्रलोकीं निघून गेला. त्यानंतर क्रुद्ध झालेले वृत्र व वासव यांचें महाघोर युद्ध प्रवृत्त झालें. त्या युद्धांत वीर वृत्रानें देवेंद्राला धरिलें व स्वतःचें मुख पसरून क्रोधानें त्याला तोंडांत टाकिलें. याप्रमाणें वृत्रानें शक्राला ग्रासलेलें पाहून सर्व देव भ्रांत झाले आणि त्या महाबलाढ्य देवांनीं वृत्राचा नाश करणारी जृम्भिका उत्पन्न केली. तेव्हां वृत्रानें जांभई देतांच, त्याच्या उघडलेल्या मुखांतून शक्र आपलें अंग संकुचित करून बाहेर पडला.

राजा, तेव्हांपासून जांभई लोकांच्या प्राणांचा आश्रय करून राहिली आहे. शक्राला बाहेर पडलेलें पाहून सर्व देवांना संतोष झाला. त्यानंतर पुनः इंद्र व वृत्र यांचें दीर्घकाल घोर युद्ध झालें. त्या संग्रामांत बलाढ्य वृत्र जेव्हां वृद्धिंगत होऊं लागला. तेव्हां त्वष्ट्या प्रजापतीचें तेज व बल यांनीं विद्ध झालेला शक्र युद्धापासून निवृत्त झाला.

याप्रमाणें इंद्राला युद्धपराङ्मुख झाल्याचें पाहून देवांना अतिशय विषाद वाटला. ते देव त्वष्टयाच्या तेजानें मोहित झालेल्या इंद्राला भेटले व सर्व मुनींसह विचार करूं लागले. ते सर्व भयानें मोहित होऊन 'आतां काय करावें' असा विचार करूं लागले. वृत्राच्या वधाची इच्छा करणारे ते सर्व देव मंदरपर्वताच्या शिखरावर बसून मनानें महात्म्या अव्यय विष्णूकडे गेले. ५.१.९.

---

## अध्याय १० वा.

[ १ देवांचा संकेत व विष्णूची वृत्रवधार्थ प्रार्थना. २ विष्णूच्या आज्ञेनें वृत्राशीं नियमपूर्वक संधि. ३ समुद्रतीरावर वृत्राला पाहून शक्रानें केलेला त्याचा वध. ४ इंद्राचा जलप्रवेश व त्यामुळें देवलोक व पृथ्वी यांची अराजकता. ]

(१) इंद्र—हे देवहो, वृत्रानें हें सर्व अव्यय जगत् व्यापिलें आहे. या बलाढ्य वृत्राचा पराभव करणारा मला कोणीहि दिसत नाहीं. मी पूर्वी समर्थ होतों, पण सांप्रत असमर्थ झालों आहें. तुमचें कल्याण असो. आतां आपण काय करावें ! हा वृत्र दुर्धर्ष आहे, असें मला वाटतें. हा महात्मा तेजस्वी असून युद्धांत अमितविक्रमी आहे. परंतु तो दुष्टबुद्धि आहे. त्यानें देव, असुर व मनुष्य यांसह हें त्रिभुवन ग्रासिलें आहे. यास्तव हे सुरश्रेष्ठहो, माझा हा निश्चय ऐका. आपण सर्व महात्म्या विष्णूच्या भवनांत जाऊन त्याच्याशीं संकेत करूं. म्हणजे आपल्याला त्या दुरात्म्याच्या वधाचा उपाय कळेल.

शल्य—राजा, इंद्राचें हें भाषण ऐकून ऋषिगणांसह सर्व देव महाबलवान् व शरण्य विष्णूला शरण गेले आणि वृत्राच्या भीतीनें व्याकुल झालेले ते त्या वैकुंठाधीशाला म्हणाले—"हे भगवन्, तूं पूर्वी तीन पावलांनीं त्रैलोक्याचें आक्रमण केलेंस. रणांत दैत्यांचा वध करून अमृताचें हरण केलेंस. महादैत्य बलीला बांधून शक्राला देवांचा अधिपति केलेंस. तूं सर्व देवांचा प्रभु असून हें सर्व जगत् व्यापिलें आहेस. तूंच देव, महादेव व सर्व लोकांना वंद्य आहेस. हे विभो, इंद्रासह तूं सर्व देवांची आज गति हो. हे दैत्यनिषूदना, वृत्रानें हें सर्व जगत् व्यापिलें आहे."

विष्णु—हे अमरहो, तुमचें श्रेष्ठ हित मला अवश्य कर्तव्य आहे. यास्तव मी तुम्हांला एक उपाय सांगतों, त्याच्या योगानें तो वृत्र निश्चयानें नाश पावेल.

जेथें तो विश्वरूप धारण करणारा वृत्र आहे, तेथें तुम्ही गंधर्व व ऋषि यांसह जा आणि त्याच्याशीं संधि करा. म्हणजे तुम्ही त्याला जिंकाल. माझ्या तेजानें शक्राचा जय होईल. मी अदृश्य राहून त्याच्या श्रेष्ठ वज्रांत प्रवेश करीन. यास्तव तुम्ही सर्व जाऊन प्रथम वृत्राचा शक्राशीं संधि करा. आतां उशीर लावूं नका.

शल्य—देवाधिदेवानें असें सांगितलें असतां शक्राला पुढें करून ऋषींसह देव एकसंघानें त्या महाबलाढ्य वृत्रासुराच्या समीप आले. त्यावेळीं तो वृत्र चंद्र-सूर्यांप्रमाणें आपल्या तेजानें दाही दिशा प्रज्वलित व प्रदीप्त करीत जणुंकाय त्रैलोक्याला ग्राशीत असल्याप्रमाणेंच भासला. तथापि शक्रासह देवतांनीं अशा त्या वृत्राला पाहिलें.

( २ ) तेव्हां ऋषि वृत्राच्या समीप जाऊन त्याच्याशीं असें प्रिय भाषण करीत म्हणाले—"हे दुर्जया, तुझ्या तेजानें हें सर्व जगत् व्यापिलें आहे. तरीहि तूं वासवाला जिंकण्यास समर्थ नाहींस. तुम्हीं दोघांनीं युद्धामध्यें दीर्घ काल घालविल्यामुळें देव, असुर, मानव व सर्व प्रजा या सर्वांना अतिशय पीडा होत आहे. यास्तव हे वृत्रा, तुझें शक्राशीं नित्य सख्य होऊं दे. त्यायोगें तुला शाश्वत शक्रलोकाची प्राप्ति होऊन तूं सुखी होशील."

ऋषींचें हें वाक्य ऐकून तो महाबलाढ्य वृत्र त्या सर्व ऋषींना शिरसा प्रणाम करून म्हणाला—" गंधर्वांसह तुम्ही सर्वहि महाभाग अहां. तुमचें सर्व भाषण मीं ऐकून घेतलें, आतां माझें म्हणणें ऐकून घ्या. शक्राशीं माझा संधि कसा होणार ! आम्ही दोघेहि तेजानें तुल्य असतां आमचें सख्य होणें कसें शक्य आहे !"

ऋषी—एकदा सज्जनांची संगति अवश्य करावी. पुढें जें होणार असेल तें होईलच. सज्जनांचा समागम अनायासानें होत असेल, तर त्याचें अतिक्रमण केव्हांहि करूं नये. त्याची अवश्य इच्छा करावी. शिवाय सज्जनांची संगति दृढ व नित्य असते. बुद्धिमान् पुरुषानें एखाद्याला कर्तव्याचा मोह पडला असतां त्याला कर्तव्याची जाणीव करून द्यावी, असा न्याय आहे. सत्पुरुषांचा समागम महाफल देणारा आहे. यास्तव बुद्धिमान् पुरुषानें संताला मारण्याची इच्छा करूं नये.

इंद्र सज्जनांना संमत असून तो महात्म्यांचें निवासस्थान आहे. तो सत्य-वादी, अनिंद्य, धर्मवेत्ता व सूक्ष्मनिश्चयी आहे. तस्मात् त्या वासवाशीं तुझा

नित्य संधि होवो. आमच्या या सांगण्यावर तूं विश्वास ठेव. याविषयीं तुझी बुद्धि अन्यथा न होवो.

शल्य—महर्षीचें हें वचन ऐकून तो महाद्युति वृत्र म्हणाला—" हे भगवन्, तुम्ही तपस्वी मला मानार्ह अहां. मी तुमच्या सांगण्याप्रमाणें अवश्य करीन. परंतु मी जें सांगत आहें, तें जर तुम्ही मान्य केलेंत, तर तुम्ही म्हणतां तसा संधि मी करीन. हे विप्रहो, शक्रासह या सर्व देवांना शुष्क, आर्द्र, पाषाण, लाकुड, शस्त्र किंवा अस्त्र यांनीं मी दिवसा किंवा रात्रीं वध्य होऊं नये. या प्रतिज्ञेवर मी शक्राशीं नित्य संधि करण्यास तयार आहें."

हे भरतश्रेष्ठा, त्यावर ते ऋषि ' ठीक आहे ' असें म्हणाले. नंतर वृत्र व इंद्र यांचा संधि झाला. ऋषींच्या मध्यस्थीनें इंद्राशीं सख्य–संधि झाला असतां वृत्र संतुष्ट झाला. इंद्रहि हर्षयुक्त मनानें वृत्राच्या वधाचा विचार करूं लागला. तो देवराज त्या असुराचें छिद्र शोधीत निरंतर उद्विग्न होऊन राहिला.

( ३ ) त्यानंतर एकदा वासवानें समुद्राच्या तीरावर वृत्रासुराला पाहिलें. त्यावेळीं संध्याकाळ झाला असून तो घोर मुहूर्त होता. तेव्हां देवेंद्राला भगवानाच्या वरदानाचें स्मरण झालें. तो मनांत म्हणाला—" हा क्रूर संध्यासमय आहे, आतां दिवस नाहीं व रात्रहि नाहीं. यास्तव माझ्या सर्वस्वाचें हरण करणाऱ्या या शत्रूचा मला यावेळीं अवश्य वध केला पाहिजे. या महाबलाढ्य व प्रचंड देहधारी वृत्राचा मीं जर अशा वंचनेनें वध न केला, तर माझें कल्याण कदापि होणार नाहीं."

शक्र मनांत असा विचार करून विष्णूचें स्मरण करीत आहे, तोंच समुद्राचा पर्वतोपम फेन त्याला दिसला. तेव्हां ' हा फेन शुष्क नाहीं व आर्द्रहि नाहीं, तसेंच हें शस्त्रहि नाहीं, यास्तव हा फेन फेंकूनच मी या वृत्राला एका क्षणांत नाहींसें करितों ' असा विचार करून इंद्रानें वज्रासह तो फेन मोठ्या त्वरेनें वृत्रावर फेंकला. त्यावेळीं श्रीविष्णूच्या दिव्य शक्तीनें त्यांत प्रवेश केला व वृत्राचा तत्काल नाश केला.

याप्रमाणें वृत्र मृत झाला असतां सर्व दिशांतील अंधकार नाहींसा झाला. सुखकर वारे वाहूं लागले. प्रजा संतुष्ट झाल्या. देव, गंधर्व, यक्ष, राक्षस, ऋषि इत्यादिकांनीं विविध स्तवनांनीं महेंद्राची स्तुति केली. सर्व भूतांनीं त्याला नमस्कार केला. तेव्हां त्या वासवानें सर्व भूतांचें सान्त्वन केलें आणि

शत्रूला मारून हृष्ट झालेल्या धर्मवेत्त्या पुरंदरानें सर्व देवांसह त्रिभुवनश्रेष्ठ विष्णूचें पूजन केलें.

( ४ ) परंतु याप्रमाणें देवांचा भयंकर शत्रु जो महा पराक्रमी वृत्र तो हत झाला असतां शक्र अतिशय खिन्न झाला. पूर्वी त्यानें अनृताचा आश्रय करून असाच त्रिशिरसाचाहि वध केला होता. त्या ब्रह्महत्येच्या दोषानें तो भ्रांत झाला व संज्ञाहीन होऊन एकान्तांत राहूं लागला. या पूर्व पापकर्मामुळें देवेंद्राचें भान नाहींसें झालें. तो शचीपति जलांत राहून सर्पाप्रमाणें तळमळूं लागला.

इकडे ब्रह्महत्येच्या दोषानें भयार्त झालेला शक्र स्वर्गांतून नाहींसा होतांच सर्व पृथ्वी प्रलयकालासारखी उद्ध्वस्त झालेली दिसूं लागली. भूमि वृक्षरहित झाली, अरण्यें शुष्क झालीं, नद्यांचे प्रवाह विच्छिन्न झाले व सरोवरादि जलाशय जलशून्य झाले. अनावृष्टि झाल्यामुळें सर्व प्राण्यांमध्यें क्षोभ उत्पन्न झाला. देव आणि महर्षि अतिशय त्रस्त झाले. अराजक झालेल्या या सृष्टीला सर्व भूतांकडून पीडा होऊं लागली. हा सर्व अनर्थ पाहून देव भयभीत झाले व 'आतां आमचा राजा कोण होईल !' असें म्हणूं लागले. स्वर्गलोकांतहि देवर्षि 'आतां देवराजावांचून कसें होईल ?' याचा विचार करूं लागले. परंतु देवांतील कोणीं एकानेंहि इंद्रपद स्वीकारून देवराज होण्याचें मनांत आणिलें नाहीं. ५. १. १०.

---

## अध्याय ११ वा.

[ १ देव व ऋषि यांनीं वरदानपूर्वक नहुषाला केलेला इंद्रपदाभिषेक. २ इंद्रपदावर आलेल्या नहुषाचा इंद्राणीविषयीं अभिलाष. ३ बृहस्पतीचें इंद्राणीला अभयदान.]

( १ ) शल्य—राजा, त्यानंतर ऋषि व सर्व देव म्हणाले—"हा श्रीमान् नहुषराजा इंद्रपदाला योग्य आहे. तो तेजस्वी, यशस्वी व नित्य धार्मिक आहे. त्याला देवराज्याचा अभिषेक करावा." युधिष्ठिरा, आपसांत असा संकेत करून ते सर्व नहुषाकडे गेले व त्याला म्हणाले—"हे पार्थिवा, तूं आमचा राजा हो."

तेव्हां पितरांसह स्वतःच्या हिताची इच्छा करणारा नहुष त्या देवर्षिगणांस म्हणाला—"मी दुर्बल आहें. तुमचें परिपालन करण्यास मी समर्थ नाहीं. राजा बलवान् असावा लागतो. इंद्र नित्यबलानें युक्त आहे."

तें ऐकून ऋषिपुरःसर सर्व देव त्याला म्हणाले—"हे भूपते, आमच्या तपानें युक्त होऊन तूं स्वर्गाचें राज्य कर. कारण आम्हांला परस्परांपासून घोर भय आहे, यांत संशय नाहीं. यास्तव हे राजेंद्रा, तूं स्वतःला राज्याभिषेक करून घे व स्वर्गाचा राजा हो. तुझ्या चक्षूंचे विषय होणारे देव, दानव, यक्ष, ऋषि, राक्षस, पितर व गंधर्वादि भूतें, या सर्वांचें तेज तूं केवल अवलोकनानेंच आकर्षण करून घेशील व त्यांच्याकडे नुस्तें पाहूनच तूं बलानें युक्त होशील. यास्तव तूं धर्माचा पुरस्कार करून सर्वलोकाधिपति हो आणि स्वर्गांतील ब्रह्मर्षि व देवर्षि यांचें पालन कर."

शल्य—हे राजा, त्यानंतर स्वर्गामध्यें अभिषिक्त झालेला तो नहुष धर्माचा पुरस्कार करून सर्व लोकांचा अधिपति झाला. अतिशय दुर्लभ वराच्या प्राप्तीनें त्याला स्वर्गलोकाचें राज्य प्राप्त झालें. तो प्रथम सतत धर्मात्मा होऊन राहिला. पण कांहीं काल लोटल्यावर विषयासक्त झाला. तो देवराज नहुष देवांचीं सर्व उद्यानें, नंदनवनें, उपवनें, कैलास, हिमालयाचें शिखर, मंदर, श्वेतपर्वत, सह्य, महेंद्र, मलयपर्वत, समुद्र व नद्या या सर्व रम्य क्रीडास्थानीं अप्सरा व देवकन्या यांनीं परिवेष्टित होऊन अनेक प्रकारच्या क्रीडा करूं लागला. बहुविध श्रुतिमनोहर दिव्य कथा, सर्व प्रकारचें वादन व मधुर सुस्वर गायन यांचें श्रवण करूं लागला. विश्वावसु, नारद, गंधर्व, अप्सरागण व सहा ऋतु त्या देवेंद्रासमोर मूर्तिमंत उपस्थित होऊं लागले व शीत, मंद आणि सुगंधयुक्त सुखकर वायु वाहूं लागला.

( २ ) याप्रमाणें क्रीडा करणाऱ्या त्या दुरात्म्या नहुपाच्या दर्शनाला एकदा इंद्राची प्रिय सम्राज्ञी शची आली असतां त्या दुष्टाच्या मनांत तिजविषयीं अभिलाष उत्पन्न झाला. तो देवराज सर्व सभासदांना म्हणाला—" हे सदस्यहो, ही इंद्रमहिषी मला कां प्राप्त होत नाहीं ? मी आतां इंद्र असून देवांचा व सर्व लोकांचा ईश्वर झालों आहें. यास्तव ही देवी आज माझ्या मंदिरांत सत्वर येवो. "

( ३ ) नहुषाचें हें दुर्वचन ऐकून खिन्न झालेली इंद्राणी बृहस्पतीकडे गेली व त्याला म्हणाली—" हे ब्रह्मन्, मी तुला शरण आल्यें आहें. माझें रक्षण कर. हे देवगुरो, तूं पूर्वीं मला वारंवार ' सर्वलक्षणसंपन्न ' म्हटलें आहेस. तसेंच ' तूं देवराजाची अत्यंत प्रिय राज्ञी असून सुखभागिनी आहेस. तूं सर्व

सौभाग्यलक्षणांनीं युक्त, एकपत्नी व पतिव्रता आहेस.' इत्यादि तूं जें मला पूर्वी म्हटलें आहेस तें तुझें वचन आतां असत्य होऊं देऊं नको. हे द्विजश्रेष्ठा, तूं पूर्वी कदापि असत्य भाषण केलेलें नाहींस, यास्तव तुझें हें वचन सत्य होऊं दे."

इंद्रपत्नीचें हें भाषण ऐकून भयभीत झालेल्या त्या साध्वीला बृहस्पति म्हणाला—"हे देवि, मी तुला जें बोललों होतों, तें सर्व निश्चयानें सत्य होईल. तूं अल्पावधींतच त्या देवेंद्राला परत आलेलें पहाशील. तुला नहुषापासून यत्किंचित्हि भय नाहीं. हें मी तुला सत्य सांगतों. इंद्र तुझा लवकरच स्वीकार करील, असें मी घडवून आणीन."

इकडे इंद्राणी बृहस्पतीला शरण गेल्याची वार्ता नहुषाच्या कानीं जातांच तो राजा क्रुद्ध झाला. ५. १. ११.

---

## अध्याय १२ वा.

[ १ नहुषाला इंद्राणीच्या अभिलाषापासून परावृत्त होण्याविषयीं देवादिकांचा उपदेश. २ क्रुद्ध झालेल्या नहुषाची शचीला आणून देण्याची आज्ञा. ३ देवांनीं शचीला अर्पण करण्याविषयीं बृहस्पतीची केलेली प्रार्थना. ४ शरणागताचा त्याग न करण्याची त्याची प्रतिज्ञा. ५ बृहस्पतीच्या उपदेशानुसार शचीचें नियमपूर्वक नहुषाकडे गमन. ]

( १ ) शल्य—युधिष्ठिरा, तो देवराज क्रोधानें उग्र दिसूं लागला. तेव्हां त्याचें तें घोर स्वरूप पाहून देव भयत्रस्त झाले व ऋषींना पुढें करून त्यास म्हणाले—" हे देवराज, हा क्रोध सोडून दे. तूं क्रुद्ध झालास म्हणजे असुर, गंधर्व, किन्नर, उरग इत्यादि सर्व त्रस्त होतात. यास्तव हे सुरेश्वरा, या क्रोधाचा त्याग कर. तुझ्यासारखे श्रेष्ठ महात्मे असे क्षुब्ध होत नसतात. हे प्रभो, ती देवी परक्याची भार्या आहे. तूं असा परदाराभिलाष करूं नको. या पातकापासून आपलें मन निवृत्त कर. तूं देवराज आहेस. तुझें कल्याण असो. तूं धर्मानें प्रजेचें रक्षण कर."

( २ ) परंतु त्या काममोहित झालेल्या नहुषानें त्यांचें हें सांगणें मान्य केलें नाहीं. त्यानें देवांना म्हटलें—" हे देवांनो, तुमच्या पूर्वीच्या इंद्रानें यशस्विनी अहल्येचें कसें ग्रहण केलें ? त्या ऋषिपत्नीचा पति जिवंत असतांनाहि त्यानें

तिला फसविलें. त्या वेळीं तुम्हीं त्याचें निवारण कां केलें नाहीं! पूर्वी त्या शक्रानें अनेक क्रूर कर्में केलीं. त्वष्टयाच्या पुत्राचा निष्कारण वध केला. वृत्राशीं सख्य केल्याचें भासवून कपटानें त्याचा नाश केला. तेव्हां तुम्हीं त्याचें निवारण कां केलें नाहीं? आतां ही देवी माझ्या सेवेंत तत्पर राहो. त्यांतच तिचें हित आहे आणि हे देवहो, त्यायोगें तुमचेंहि कल्याण होईल."

देव—हे सुरेश्वरा, तुझ्या इच्छेप्रमाणें आम्ही इंद्राणीला घेऊन येतों. पण तूं या क्रोधाचा त्याग करून प्रसन्न हो.

( ३ ) शल्य—हे भारता, नहुषाला असें बोलून ते सर्व देव ऋषिगणांसह बृहस्पति व इंद्राणी यांस ही अशुभ वार्ता सांगावयास गेले. ते बृहस्पतीला म्हणाले—" हे विप्रश्रेष्ठा, इंद्राणी तुझ्या गृहीं येऊन तुला शरण आली आहे व तूं तिला अभय दिलें आहेस, हें आम्हांला कळलें आहे, यास्तव तूं या देवीला नहुषाच्या स्वाधीन करावेंस अशी आम्ही सर्व–देव, गंधर्व व ऋषि तुझी प्रार्थना करीत आहों. हा देवराज नहुष इंद्राहून विशिष्ट असून महा तेजस्वी आहे, त्याला ही इंद्राणी पतित्वानें वरो. "

देवांचें हें भाषण ऐकून ती देवी शोकाकुल झाली. तिच्या नेत्रांतून दुःखाश्रु वाहूं लागले व ती अत्यंत दीन होऊन रोदन करीत बृहस्पतीला म्हणाली, " हे देवर्षिश्रेष्ठा, मला नहुषाला वरण्याची इच्छा नाहीं. मी त्याची पत्नी कदापि होणार नाहीं. हे ब्रह्मन्, मी तुला शरण आलें आहें. तूं या महद्भयापासून माझें रक्षण कर."

(४) बृहस्पति—हे इंद्राणि, शरणागताचा कदापि त्याग करावयाचा नाहीं, हा माझा दृढ निश्चय आहे. हे अनिंदिते, तूं धर्मज्ञा व सत्यशीला आहेस. मी ब्राह्मण आहें व विशेषतः अकार्य करण्याची माझी इच्छा नाहीं. मीं धर्मतत्त्वें ऐकलीं आहेत. मी सत्यनिष्ठ आहें. तेव्हां धर्माचें अनुशासन जाणणारा मी हें अकार्य करणार नाहीं. हे देवश्रेष्ठहो, तुम्ही जा. पूर्वी ब्रह्मदेवानें या विषयीं एक गाथा म्हटलेली आहे, ती ऐका.

जो मनुष्य भीतीनें शरण आलेल्यास शत्रूच्या स्वाधीन करतो तो जेव्हां स्वसंरक्षणाची इच्छा करितो, तेव्हां त्याला कोणीहि त्राता मिळत नाहीं. त्यानें

१ न तस्य बीजं रोहति रोहकाले न तस्य वर्षं वर्षति वर्षकाले ।
भीतं प्रपन्नं प्रददाति शत्रवे न स त्रातारं लभते त्राणमिच्छन् ॥

पेरलेलें बीज उगवत नाहीं व त्याच्या शेतावर योग्य कालीं वृष्टि होत नाहीं. तो मूढ व्यर्थ अन्न भक्षण करितो. तो नष्टबुद्धि नर स्वर्गलोकांतून भ्रंश पावतो आणि देव त्यानें दिलेल्या हवीचें ग्रहण करीत नाहींत. त्याची प्रजा अकालीं मरण पावते. त्याचे पितर अधोलोकीं जातात आणि इंद्रासह देव त्यावर वज्र-प्रहार करितात.

हे सुरश्रेष्ठहो, हें जाणणारा मी या शचीला त्याच्या स्वाधीन करणार नाहीं. ही शक्राची प्रिय महिषी इंद्राणी लोकांत प्रसिद्ध आहे. यास्तव ज्यायोगें तिचें व माझेंहि हित होईल, अशी कांहीं उपाययोजना करा. मी कांहीं त्या नहुषाला ही शची अर्पण करणार नाहीं.

शल्य—राजा, त्या देवगुरूचें हें भाषण ऐकून गंधर्वांसह देव त्याला म्हणाले—" हे बृहस्पते, या सर्वांचा सुपरिणाम होईल, असा कांहीं उपाय तूं आम्हांला सुचीव. "

बृहस्पती—या शचीनें नहुषाकडे जाऊन त्याच्यापासून कालावधि मागून घ्यावा. म्हणजे या शुभ इंद्राणीचें व आमचेंहि हित होईल. हा नहुष वरदानामुळें अतिशय गर्वित व बलवान् झाला आहे.

शल्य—बृहस्पति असें बोलला असतां संतुष्ट झालेले ते सर्व देव त्याला म्हणाले—" हे ब्रह्मन्, हें तूं फार चांगलें सांगितलेंस. यांत सर्व देवांचें हित होईल. हे द्विजश्रेष्ठा, आतां ही देवी अशा प्रकारेंच त्या नहुषाला प्रसन्न करो."

नंतर अग्निपुरस्सर ते सर्व अव्यग्र देव लोकांचें हित करण्याच्या इच्छेनें इंद्राणीला म्हणाले—" हे देवि, तूं हें सव स्थावरजङ्गम जगत् धारण केलें आहेस. तूं एकपत्नी असून सत्यनिष्ठा आहेस. तस्मात् तूं नहुषाकडे जा. तुझा अभिलाष करणारा तो पापी नहुष सत्वर नाश पावेल आणि शक्र लवकरच सुरैश्वर्याला प्राप्त होईल. "

( ५ ) राजा, देव व बृहस्पति यांनीं याप्रमाणें निश्चय केला असतां इंद्राणी कार्यसिद्धीसाठीं सलज्ज होत्साती त्या घोरस्वरूपी नहुषाकडे गेली. तेव्हां काममोहित झालेला तो दुरात्मा नहुष वय आणि रूप यांनीं अप्रतिम असलेल्या शचीला पाहून अत्यंत संतुष्ट झाला. ५. १. १२.

## अध्याय १३ वा.

[ १ इंद्राचें वृत्त कळल्यावर मी तुझा स्वीकार करीन, असा शचीचा नहुषाशीं संकेत. २ विष्णूच्या आज्ञेनें देवांनीं इंद्राच्या ब्रह्महत्यानिवृत्तीसाठीं करविलेला अश्वमेध. ३ पापरहित झालेल्या इंद्राचें नहुषभीतीनें पुनः अदर्शन व दुःखित शचीचें उपश्रुतिपूजन. ]

( १ ) **शल्य**—युधिष्ठिरा, त्यानंतर तो देवराज नहुष शचीला पाहून म्हणाला—" हे सुहासिनि, मी तिन्ही लोकांचा इंद्र आहें. मला तूं पतित्वानें वर. "

नहुषाचें हें पापवचन ऐकून वाऱ्यानें कंपित होणाऱ्या कदलीप्रमाणें ती देवी थरथरां कापूं लागली. ती इंद्राणी ब्रह्मदेवाला शिरसा प्रणाम करून हात जोडून त्या घोर स्वरूपी देवराज नहुषाला म्हणाली—" हे सुरेश्वरा, मी तुझ्यापासून कांहीं कालावधि मिळावा, अशी इच्छा करीत आहें. कारण शक्राचें काय झालें व तो कोठें गेला, याचा अद्यापि कांहींच शोध लागला नाहीं. यास्तव त्याचा शोध करून, त्याचें कांहींच वृत्त जर कळलें नाहीं, तर मी तुझ्या स्वाधीन होईन. हें मी तुला सत्य सांगत्यें. "

इंद्राणीचें हें भाषण ऐकून नहुष अतिशय संतुष्ट झाला व म्हणाला—" हे सुंदरि, ठीक आहे, तूं म्हणतयेस तसेंच होऊं दे. वासवाचें वृत्त जाणून तूं मजपाशीं ये. या वचनाचें तुला स्मरण असूं दे."

तेव्हां नहुषाची अनुज्ञा घेऊन ती यशस्विनी तेथून निघाली व बृहस्पतीच्या भवनांत आली. नंतर तिचा वृत्तान्त ऐकून अग्निप्रभृति देव शक्रासाठीं एकाग्र चित्तानें विचार करूं लागले. ते सर्व सुरश्रेष्ठ जगत्स्रष्ट्या अव्यय विष्णूकडे गेले व उद्विग्न होत्साते असें वचन बोलले—" देवाधिपते, सुरेश्वर शक्र ब्रह्महत्त्येच्या दोषामुळें स्वपदापासून च्युत झाला आहे. आतां तूंच आमची गति आहेस. तूं सर्व जगताचा प्रभु व पूर्वज आहेस. सर्व भूतांच्या रक्षणार्थ व्यापकत्वाला प्राप्त झाला आहेस. तुझ्याच सामर्थ्यानें वासवानें वृत्राचा वध केला. तो पुरंदर ब्रह्महत्त्येच्या पापापासून कसा मुक्त होईल, हें आम्हांला सांग."

विष्णु म्हणाला—मला उद्देशून यज्ञ केला असतां मी वज्रधारी शक्राला पावन करीन. पुण्यप्रद अश्वमेधयज्ञानें माझें यजन केलें असतां तो पाकशासन पुनः देवांच्या इंद्रत्वाला निर्भयपणें प्राप्त होईल आणि दुर्मति नहुष स्वक-

मांनींच नाश पावेल. यास्तव हे देव हो, तुम्ही निरलस होऊन पूर्वोक्त उपाय योजा व किंचित्काल हे क्लेश सहन करा.

( २ ) विष्णूची ही शुभ, सत्य व अमृतोपम वाणी ऐकून उपाध्याय व ऋषि यांच्यासह ते सर्व देव जेथें इंद्र भयानें उद्विग्न होऊन राहिला होता तेथें गेले आणि त्यांनीं त्या प्रदेशीं महात्म्या इंद्राच्या पापक्षालनार्थ महान् अश्वमेध यज्ञ केला. युधिष्ठिरा, त्यांनीं ब्रह्महत्त्येचें पातक वृक्ष, नद्या, पृथ्वीवरील पर्वत व स्त्रिया यांच्या ठिकाणीं विभागून वासवाला पावन केलें. याप्रमाणें सर्व भूतांमध्यें पातकाचा विभाग करून दिला असतां तो इंद्र निष्पाप व पापरहित होऊन देहभानावर आला.

( ३ ) परंतु सर्व भूतांना दुःसह झालेला तो नहुष वरदानामुळें आपल्या स्थानापासून च्युत होणें शक्य नाहीं, त्याचा तेजोभंग करतां येणार नाहीं, असें पाहून तो देव शचीपति पुनः गुप्त झाला. सर्व भूतांना अदृश्य होऊन तो कालाची अपेक्षा करीत संचार करूं लागला.

याप्रमाणें शक्र नष्ट झाला असतां शची पुनः शोकाकुल झाली. ती देवी अत्यंत दुःखित होऊन असा विलाप करूं लागली.—"हे प्रभो, मीं जर दान दिलें असेल, आहुत्या दिल्या असतील, गुरूंना संतुष्ट केलें असेल व सत्यामध्यें स्थित असेन, तर माझें एकभर्तृत्वच कायम राहो. या पुण्यप्रद दिव्य रात्रीदेवीला मी नमस्कार करतें. माझे मनोरथ पूर्ण होवोत."

असें बोलुन शचीनें शुचिर्भूत होऊन त्या देवीची उपासना केली. त्या इंद्राणीनें आपलें पातिव्रत्य व सत्य यांच्या प्रभावानें त्या देहनिर्णायिका उपश्रुती देवीला 'आनोऽऽयाहि०' या मंत्रानें बोलाविलें आणि तिला म्हटलें—"जेथें तो देवराज असेल, तो प्रदेश मला दाखीव. सत्याच्या बलानेंच मला सत्य प्रतीत होवो. ५. १. १३.

---

१ या मंत्राचा अर्थ--हे उपश्रुति, आमच्यासमीप ये व आमच्या काम्य कर्मांत आम्हांला इष्ट अर्थ प्राप्त करून दे. स्वर्गाचें शासन करणाऱ्या आमच्या बुद्धिस्थ इंद्राला प्रकाशित कर. तो इंद्र सूर्याप्रमाणें तमोग्रस्त अर्थाला प्रकाशित करण्यास समर्थ आहे.

## अध्याय १४ वा.

[ १ स्तवनानें प्रकट झालेल्या उपश्रुतीचें शचीसह इंद्रापाशीं गमन. २ शचीनें इंद्राची स्तुति करून त्याला निवेदन केलेला नहुषवृत्तान्त.]

( १ ) **शल्य**—युधिष्ठिरा, इंद्राणीच्या स्तवनानें प्रसन्न झालेली उपश्रुति मूर्तिमंत तिच्या पुढें प्रकट झाली. त्या वय व रूप यांनीं संपन्न असलेल्या देवीला पाहून इंद्राणी अत्यंत संतुष्ट झाली व तिचें पूजन करून म्हणाली— "हे देवि, तुला जाणण्याची माझी इच्छा आहे. तूं कोण आहेस ! तें सांग."

**उपश्रुति**—मी उपश्रुति देवी तुझ्यासमीप आलें आहें. हे भामिनि, तुझ्या सत्यामुळें तूं माझें दर्शन घेण्यास समर्थ झाली आहेस. तूं पतिव्रता असून नित्य यम-नियमांनीं युक्त आहेस. मी तुला वृत्रनिषूदन शक्र दाखवीन. तूं सत्वर माझ्या मागोमाग ये. म्हणजे त्या सुरसत्तमाला पहाशील. तुझें कल्याण असो.

असें बोलून ती देवी निघाली असतां शची तिला अनुसरली. त्यांनीं अनेक देवारण्यें व पर्वत यांचें उल्लंघन केलें. हिमालयाचें अतिक्रमण केलें व उत्तरेच्या मागच्या बाजूला अनेक योजनें विस्तीर्ण असलेल्या समुद्राच्या समीप येऊन एका महाद्वीपांत प्रवेश केला. तें द्वीप अनेक वृक्ष-वेलींनीं आवृत्त झालें होतें. तेथें त्यांनीं एक पवित्र सरोवर पाहिलें. तें शत योजनें विस्तीर्ण व लांब असून विविध जातीच्या पक्ष्यांनीं व्याप्त होतें.

हे भारता, त्या सरोवरांत पंचरंगी दिव्य कमलें होतीं. त्यांवर सहस्रावधि भ्रमर गुंजारव करीत होते. त्यांत एका सुंदर, शुभ्रवर्ण व उन्नत देंठ असलेल्या विशाल पद्मिनीवर एक प्रफुल्ल कमल होतें. त्या कमलनालाचा छेद करून शचीसह त्या देवीनें त्यांत प्रवेश केला. तेथें त्या बिसतंतूंत प्रविष्ट झालेला शक्र त्यांना दिसला. अशा प्रकारें अत्यंत सूक्ष्मरूप धारण करून तेथें राहिलेल्या त्या प्रभूला पाहून उपश्रुति देवी व शची या दोघींनीं सूक्ष्मरूप धारण केलें आणि इंद्राणीनें शक्राची प्रसिद्ध पूर्वकर्मांनीं स्तुति केली.

( २ ) तेव्हां स्व-स्तवनानें संतुष्ट झालेला इंद्र शचीला म्हणाला—" हे देवि, तूं येथें कशासाठीं आली आहेस ? आणि मी येथें आहें हें तुला कसें कळलें ?"

पुरंदराचा हा प्रश्न ऐकून इंद्राणीनें नहूषाचें सर्व दुर्वृत्त त्याला कथन केलें. ती म्हणाली—" हे शतक्रतो, तो दुरात्मा नहुष सामर्थ्यसंपन्न होऊन त्रिभुव-

नाच्या इंद्रत्वाला प्राप्त झाला आहे. तो पापबुद्धि दर्पयुक्त होऊन माझी इच्छा करूं लागला आहे. तेव्हां मीं त्या क्रूरापासून कालावधि मागून घेतला आहे. यास्तव हे प्रभो, आतां तूं जर माझें रक्षण केलें नाहींस, तर तो दुष्ट मला वश केल्यावांचून रहाणार नाहीं. या भीतीनें मी तुझ्यासमीप आल्यें आहें. त्या पापनिश्चयी नहुषाचा वध कर आणि स्वतः प्रकाशित हो. हे विभो, तूं स्वतेजानें युक्त होऊन या देवराज्याचें पालन कर." ५. १. १४.

---

## अध्याय १५ वा.

[ १ शचीच्या प्रेरणेनें नहुषानें सप्तर्षींची शिबिका वहाण्याकडे केलेली योजना. २ बृहस्पतीच्या होमानें संतुष्ट झालेल्या अग्नीचें इंद्रशोधार्थ प्रेषण. ३ जलावांचून सर्वत्र शोध करून आलेल्या अग्नीचें इंद्रादर्शनत्वकथन. ]

( १ ) शल्य—राजा, शचीचें हें भाषण ऐकून तो भगवान् तिला पुनः म्हणाला—" हे भामिनि, हा पराक्रमाचा काल नाहीं. ऋषींच्या हव्य-कव्यांच्या योगानें बलवत्तर झालेला नहुष वृद्धि पावला आहे. यास्तव हे देवि, मी तुला एक उपाय सांगतों, त्याप्रमाणें तूं आचरण कर. हें गुह्य तूं कोणालाहि सांगूं नको. हे सुंदरि, त्या नहुषाला एकान्तांत भेट व ' हे जगत्पते, तूं ऋषींनीं वाहून आणलेल्या दिव्य वहानांत बसून मजकडे ये. म्हणजे मी मोठ्या प्रेमानें तुला वश होईन ' असें त्याला सांग. "

इंद्राचें हें वचन ऐकून ती कमललोचना इंद्राणी ' ठीक आहे ' असें बोलून नहुषाकडे गेली. तेव्हां तिला पाहून संतुष्ट झालेला नहुष स्मितपूर्वक म्हणाला—"हे सुंदरि, तुझें स्वागत असो. मी काय करूं तें सांग. मज भक्तावर अनुग्रह कर. तुझी काय इच्छा आहे ! हे देवि, तुझें जें कार्य असेल, तें मी करीन. यास्तव तूं यत्किंचित्हि लज्जा बाळगूं नको. मजवर विश्वास ठेव. मी तुला शपथपूर्वक सत्य सांगतों कीं, तुझ्या इच्छेप्रमाणें मी वागेन."

इंद्राणी—हे जगत्पते, मीं तुझ्यापासून जो कालावधि मागून घेतला आहे, त्या कालाची मी वाट पहात आहें, योग्य कालीं तूं माझा भर्ता होशील. हे राजन्, तूं जर खरोखरच माझें प्रिय करणार असशील, तर मी तुला माझ्या अंतःकरणांतील इच्छा सांगत्यें आणि तें माझें प्रणययुक्त कार्य केल्यानंतर मी तुला वश होईन. हे सुराधिपा, शक्राचीं अश्व, गज, रथ इत्यादि अनेक वाहनें आहेत. तथापि तुझें वाहन त्याहून अपूर्व असावें, अशी माझी इच्छा आहे.

विष्णु, रुद्र, देव किंवा राक्षस यांनाहि जे वाहक कधीं प्राप्त झालेले नाहींत, ते महाभाग ऋषि एकत्र जमून तुझी शिबिका वाहून आणोत. हीच माझी उत्कट इच्छा आहे. देव किंवा असुर यांच्यामध्यें तुझ्या तुल्य कोणीहि नाहीं. तूं स्वतःच्या सामर्थ्यानें—केवल दर्शनानेंच सर्वांचें तेज आकर्षण करून घेतोस. कोणीहि बलवान् तुझ्या समोर उभा रहाण्यास समर्थ नाहीं.

शल्य—शचीचें हें भाषण ऐकून नहुष अत्यंत हृष्ट झाला आणि त्या अनिंदितेला म्हणाला—" हे देवि, तूं सांगत असलेलें हें वाहन खरोखरच अपूर्व आहे. मला तें अतिशय रुचलें. हे लावण्यवति, मी तुझ्या वश झालों आहें. कोणीहि अल्प सामर्थ्यवान् पुरुष मुनींना वाहक करूं शकणार नाहीं. मी तेजस्वी व बलवान् असून भूत, वर्तमान व भविष्यत् या तिन्ही कालांचा प्रभु आहें. मी क्रुद्ध झालों असतां सर्व जगाचा नाश होईल. माझ्यामध्येंच सर्व प्रतिष्ठित आहे.

हे मंदहासिनि, क्रुद्ध झालेल्या मला शांत करण्यास देव, दानव, गंधर्व, किन्नर, उरग, राक्षस किंवा हे सर्व लोकहि समर्थ नाहींत. तस्मात् हे देवि, मी तुझ्या इच्छेप्रमाणें करीन, यांत संशय नाहीं. सप्तर्षि व सर्व ब्रह्मर्षि मला वाहून आणतील. आज माझा माहात्म्ययोग व ऋद्धि तूं पहाशील."

शल्य—युधिष्ठिरा, असें बोलून नहुषानें शचीला परत जाण्याची अनुज्ञा दिली आणि नियमांत स्थित असलेल्या ऋषींना आपलें विमान वाहून नेण्याच्या कार्यांत नियुक्त केलें. तो कामवृत्त नहुष बलानें उन्मत्त व मदबलानें गर्वित झाला होता. ब्राह्मणांचा अनादर करणाऱ्या त्या दुष्टात्म्यानें पूज्य ऋषींना स्वतःला वाहून नेण्यास लाविलें.

इकडे इंद्राणी नहुषाची अनुज्ञा घेऊन बृहस्पतीकडे आली व त्याला म्हणाली—" हे देवगुरो, नहुषापासून मीं जो काल मागून घेतला होता, त्यांतील आतां अल्पावधि राहिला आहे. यास्तव शक्राचा सत्वर शोध करून मज भक्तावर दया कर."

तें ऐकून बृहस्पति तिला म्हणाला—" ठीक आहे. हे देवि, त्या दुष्टबुद्धि नहुषापासून तुला मुळींच भय नाहीं. तो नराधम आतां फार वेळ रहात नाहीं. लवकरच नष्ट होईल. हे शुभे, महर्षींना वाहक केल्यामुळें तो अधर्मज्ञ हत झालाच आहे, असें समज. आतां त्या दुर्मतीच्या विनाशासाठीं मी इष्टि करितों व शक्राचाहि शोध लावितों. तूं भिऊं नको. तुझें कल्याण असो."

( २ ) शल्य— युधिष्ठिरा, असें बोलून बृहस्पतीनें अग्नि प्रज्वलित केला, महा तेजस्वी शक्राच्या उपलब्धीसाठीं त्यांत श्रेष्ठ हवीचें विधिवत् हवन केलें व आहुत्या देऊन अग्नीला ' शक्राचा शोध कर ' असें म्हटलें. तेव्हां भगवान् हुताशन स्वतःच अद्भुत स्त्रीरूप धारण करून प्रगट झाला व तेथंचें अंतर्धान पावला. तो अग्नि सर्व दिशा, उपदिशा, पर्वत, वनें, पृथ्वी व अंतरिक्ष या सर्व ठिकाणीं मनोवेगानें संचार करून निमेषमात्रांत बृहस्पतीच्या समीप आला.

( ३ ) अग्नि—हे बृहस्पते, मीं जलमय प्रदेश वगळून बाकी सर्वत्र देवराज इंद्राचा शोध केला, पण तो कोठेंच दृष्टीं पडला नाहीं. जलांत प्रवेश करण्यास मी सवदा असमर्थच आहें. हे ब्रह्मन्, माझी तेथें गति होणें शक्य नाहीं. यास्तव मी तुझें अन्य कोणतें कार्य करूं तें सांग.

बृहस्पति—हे महाद्युते, तूं उदकांत प्रवेश कर.

अग्नि—हे ब्रह्मन्, मी जलांत प्रवेश करण्यास समर्थ नाहीं. कारण तेथें माझा नाश होईल. मी तुला शरण आलों आहें. तुझें स्वस्ति असो. हे बृहस्पते, जलापासून अग्नि, ब्राह्मणापासून क्षत्रिय आणि पाषाणापासून लोह उत्पन्न झालें आहे. त्यांचें सर्वत्र संचार करणारें तेज आपापल्या कारणांत लीन होत असतें. ५. १. १५.

---

## अध्याय १६ वा.

[ १ बृहस्पतीनें स्तुतिपूर्वक ब्राह्ममंत्रानें संवर्धित केलेल्या अग्नीला कमलनालांतील इंद्राचें दर्शन. २ बृहस्पतीला त्याचें निवेदन. बृहस्पतीचें तेथें गमन व स्तुति. ३ कुबेरादिकांचें तेथें आगमन. इंद्रानें नहुषाच्या पराभवासाठीं लोकपालांना केलेला अभिषेक. ]

( १ ) बृहस्पति—हे अग्ने, तूं सर्व देवांचें मुख व हवि वहाणारा आहेस. तूं सर्व भूतांच्या अंतःकरणांत कूटस्थ साक्षिवत् गुप्त राहून संचार करितोस. विद्वान् लोक तुला एक जाठर अग्नि म्हणतात व पुनः गार्हपत्य, दक्षिणाग्नि व आहवनीय या रूपांनीं तुला त्रिविधहि कल्पितात. हे हुताशना, तूं त्याग केलेल्या या सर्व जगाचा तत्काल नाश होईल. तुज त्रिविध अग्नीला नमस्कार करून पत्नी व पुत्र यांसह विप्र स्वकर्मांनीं संपादन केलेल्या शाश्वत गतीला प्राप्त होतात.

हे अग्ने, तूंच हव्यवाह व परम हवि आहेस. श्रेष्ठ क्रतूंमध्यें यज्ञ व सत्रें यांच्या योगानें तुझेंच यजन करितात. तूं या त्रिभुवनाला उत्पन्न करितोस व योग्य काल प्राप्त झाला असतां तूंच प्रदीप्त होऊन त्यांचा नाश करितोस. हे हव्यवाट्, तूं सर्व जगताचें उत्पत्तिस्थान असून तूंच पुनः त्याचें लयस्थानहि होतोस. विद्वान् तुलाच मेघ व विद्युत् असें म्हणतात. तुझ्यापासून निघालेल्या ज्वाला सर्व भूतांना वहातात. तुझ्यामध्येंच हें जल व हें जगत् स्थित आहे. या त्रिभुवनांत तुला अविदित असें कांहींच नाहीं. हे पावका, सर्व तत्त्वें आपल्या कारणांचीच सेवा करीत असतात, यास्तव तूं निःशंकपणें जलांत प्रवेश कर. मी सनातन ब्राह्म मंत्रांनीं तुझी वृद्धि करीन.

बृहस्पतीनें याप्रमाणें स्तुति केली असतां भगवान् अग्नि संतुष्ट होऊन म्हणाला—"हे ब्रह्मन्, मी तुला शक्र दाखवीन, हें सत्य सांगत आहें."

( २ ) शल्य—हे कुंतीपुत्रा, नंतर त्या वह्नीनें जलांत प्रवेश केला व समुद्र, डबकीं इत्यादि जलाशयांतून संचार करीत तो जेथें शक्र लपून राहिला होता, त्या सरोवरांत आला. तेथें अनेक कमलांत शोध करीत असतां त्याला कमल-नालांत स्थित असलेला शतक्रतु दिसला. तेव्हां त्यानें मोठ्या त्वरेनें परत येऊन 'इंद्र सूक्ष्मरूपानें कमलाचा आश्रय करून राहिला आहे' अशी वार्ता त्यास निवेदन केली.

हें वृत्त ऐकतांच देवर्षि व गंधर्व यांसह बृहस्पति तेथें गेला व वासवाच्या पूर्वपराक्रमाचें वर्णन करून त्याला संतुष्ट करूं लागला.

बृहस्पति—हे शक्रा, तूं महा भयंकर नमुचि-दैत्याचा वध केलास. त्याच-प्रमाणें घोर पराक्रमी शम्बर व बल यांनाहि तूं गतप्राण केलेंस. तस्मात् हे पुरंदरा, तूं वृद्धि पावून सर्व शत्रूंचा नाश कर. हे इंद्रा, ऊठ. तुजकडे आलेल्या या देवर्षींना पहा. हे विभो, तूं दानवांचा संहार करून त्रिभुवनाचें रक्षण केलें आहेस. विष्णूच्या तेजानें युक्त असलेल्या समुद्रफेनानें तूं पूर्वी वृत्राचा नाश केला आहेस.

तूं सर्व भूतांना शरण्य व स्तुत्य आहेस. तुझ्यासारखें श्रेष्ठ सत्त्व या त्रिभुव-नांत दुसऱ्या कोणामध्येंहि नाहीं. तूंच सर्व भूतांना धारण करितोस व देवांचा महिमा वाढवितोस. हे शक्रा, तूं बलिष्ठ हो व सर्व लोकांचें रक्षण कर.

( ३ ) याप्रमाणें बृहस्पतीनें स्तुति केली असतां पुरंदर हळुहळू वाढूं लागला व आपल्या पूर्वस्वरूपाला प्राप्त होऊन बलयुक्त झाला. नंतर तो देवेंद्र

पुढें उभ्या असलेल्या बृहस्पतीला म्हणाला—"हे गुरो, तुमचें कोणतें कार्य अवशिष्ट राहिलें आहे ? मीं त्वष्ट्याचा पुत्र महा असुर व सर्व लोकांचा नाश करणारा विशाल देहधारी वृत्र यांचा वध केला आहे."

बृहस्पति—हे देवपते, नहुष-नामक एक मानवराजा देवर्षिगणांच्या तेजानें युक्त होऊन देवराज्याला प्राप्त झाला आहे. तो सर्वांना अतिशय पीडा देत आहे.

इंद्र—हे बृहस्पते, देवांच्या अत्यंत दुर्लभ राज्याला नहुष कसा प्राप्त झाला ? तो कोणत्या तपानें किंवा सामर्थ्यानें युक्त आहे ?

बृहस्पति—हे शक्रा, तूं जेव्हां इंद्रपदाचा त्याग करून निघून गेलास, तेव्हां भयभीत झालेल्या देवांनीं इंद्राची इच्छा केली. ते सर्व देव, गंधर्व, पितर व महर्षि एकसंघानें नहुषाकडे गेले व त्याला म्हणाले—"तूं आमचा राजा व त्रिभुवनाचा पालक हो." तेव्हां त्यांना नहुषानें सांगितलें कीं, मी समर्थ नाहीं, यास्तव तुमचें तपस्तेज मला द्या.

त्याचें तें वचन ऐकून देवादिकांनीं आपल्या तेजानें त्याच सामर्थ्य वाढविलें असतां तो नहुष देवांचा राजा झाला व भयंकर वीर्यवान् झालेल्या त्या दुरात्म्यानें त्रैलोक्याच्या राज्याला प्राप्त होऊन महर्षींना स्वतःला वाहून नेण्यास लाविलें. त्या नहुषाच्या दृष्टींत विष आहे. तो अतिशय घोरस्वरूपी मूढबुद्धि व इतरांचें तेज हरण करणारा आहे. त्याला तूंहि कदाचित् पाहूं शकणार नाहींस. गूढरूपानें संचार करणारे सर्व देवहि अतिशय आर्त होऊन नहुषाला पाहूं शकत नाहींत.

शल्य—राजा अङ्गिरसांतील वरिष्ठ बृहस्पति असें बोलला असतां लोकपाल कुबेर, वैवस्वत सूर्य, यम, सनातन, देव, सोम व वरुण हे सर्व तेथें आले. ते सर्व एकत्र जमून इंद्राला म्हणाले—"हे महेंद्रा, तूं त्वाष्ट्र व वृत्र यांचा वध केलास, हें फार उत्तम झालें. शत्रुरहित झालेल्या तुला आम्ही अक्षत व कुशल पहात आहों, हें आमचें मोठें भाग्य होय."

तेव्हां त्या लोकपालांना भेटून शक्र संतोषानें म्हणाला—"त्या घोरस्वरूपी नहुषाचा बुद्धिभेद करण्यांत तुम्ही सर्व मला साह्य करा."

देव—तो नहुष घोररूपी असून त्याच्या दृष्टींत विष आहे. त्याचें आम्हांला भय वाटतें. हे इंद्रा, तूं नहुषाचा पराजय केलास कीं, मग आम्हांला आमचे भाग दे.

इंद्र—ठीक आहे. हे वरुणा, तूं जलाचा अधिपति हो, त्याचप्रमाणें यम आणि कुबेर यांनाहि मी अभिषेक करितों. तुम्हां देवतांच्या साह्यानें मी घोरदृष्टि नहुष-शत्रूचा नाश करीन.

शक्राचें हें भाषण ऐकून अग्नि त्याच्यापाशीं येऊन म्हणाला—"हे वासवा, मलाहि तूं माझा भाग दे. म्हणजे मीहि तुला साह्य करीन."

त्यावर शक्र म्हणाला—हे अग्ने, तुलाहि भाग मिळेल. महाक्रतूमध्यें इंद्र व अग्नि यांचा एक भाग राहील.

शल्य—असा विचार करून पाकशासनानें कुबेराला सर्व यक्ष व धन यांचा स्वामी केलें. त्याचप्रमाणें वरद शक्रानें त्यांचा सत्कार करून सूर्याला पितरांचें व वरुणाला जलाचें आधिपत्य दिलें. ५. १. १६.

---

## अध्याय १७ वा.

[ १ लोकपालांसह इंद्राचा नहुषनाशाविषयीं संकेत चालला असतां अगस्त्याचें आगमन व नहुष इंद्रपदापासून च्युत झाल्याचें कथन. ]

( १ ) शल्य—युधिष्ठिरा, त्यानंतर बुद्धिमान् देवेंद्र लोकपाल व देव यांच्यासह नहुषवधाच्या उपायाचा विचार करीत असतां तपस्वी भगवान् अगस्त्य तेथें प्रकट झाला व महेंद्राचा सत्कार करून त्याला म्हणाला—"हे देवेशा, तूं विश्वरूपाचा नाश व वृत्राचा वध करून वृद्धि पावलास, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. हे पुरंदरा, नहुष देवराज्यापासून भ्रष्ट झाला असून तू शत्रुरहित झालास, हें महद्भाग्य होय."

इंद्र—हे महर्षे, तुझें स्वागत असो. तुझ्या दर्शनानें मला आनंद वाटला. मीं अर्पण केलेलें हें पाद्य, आचमनीय, गाय व अर्घ्य यांचा स्वीकार कर.

शल्य—राजा, याप्रमाणें त्या श्रेष्ठ मुनीचा सत्कार केल्यावर त्याला उत्कृष्ट आसनावर बसवून संतुष्ट झालेला देवेश म्हणाला—"हे भगवन्, तो पापबुद्धि नहुष स्वर्गांतून कसा भ्रष्ट झाला, तें आपल्या मुखानें ऐकण्याची माझी इच्छा आहे."

अगस्त्य—हे शक्रा, तो दुराचारी बलदर्पित नहुष स्वर्गच्युत कसा झाला, त्याविषयींचा प्रिय वृत्तान्त मी तुला सांगतों, ऐक. त्या दुर्मति नहुषाला

वाहून नेत असतां श्रमार्त झालेले महाभाग देवर्षि व निष्पाप ब्रह्मर्षि यांनीं त्याला असा एक संशय विचारिला. ऋषि म्हणाले—"हे वासवा, गायीच्या प्रोक्षणविधीमध्यें जे ब्राह्मणोक्त मंत्र सांगितले आहेत, ते तुला प्रमाण आहेत किंवा नाहींत !"

तेव्हां तमोग्रस्त झालेला मूढबुद्धि नहुष त्यांना 'नाहीं' असें म्हणाला.

ऋषि—अधर्मांत प्रवृत्त झालेला तूं धर्म जाणत नाहींस. पूर्वींच्या महर्षींनीं सांगितलेले हे मंत्र आम्हांला प्रमाण आहेत.

अगस्त्य—हे वासवा, त्यावेळीं मुनींबरोबर वादविवाद करीत असतां त्या अधार्मिकानें माझ्या मस्तकाला आपल्या पायाचा स्पर्श केला. त्यामुळें तो पृथ्वीपति निस्तेज व ऐश्वर्यहीन झाला. तेव्हां अत्यंत पीडित झालेला मीं मोहग्रस्त झालेल्या त्या नहुषाला म्हटलें—" ज्याअर्थीं तूं पूर्वींच्या ब्रह्मर्षींनीं अनुष्ठिलेल्या मंत्रांना दोष देत आहेस, माझ्या मस्तकाला पादस्पर्श करीत आहेस आणि ब्रह्मतुल्य व दुराधर्ष अशा ऋषींना स्वतःचें वाहन वाहण्यास लाविलें आहेस, त्याअर्थीं तेजोहीन झालेल्या तुझा स्वर्गांतून भ्रंश होवो. तुझें पुण्य क्षीण होऊन हे मूढा, तूं दहा हजार वर्षें पृथ्वीवर महान् सर्प होऊन पडशील व हा काल पूर्ण झाल्यावर पुनः स्वर्गाला प्राप्त होशील.

याप्रमाणें हे शक्रा, तो दुरात्मा देवराज्यापासून भ्रष्ट झाला आहे. तो ब्रह्मर्षिकंटक हत झाल्यामुळें आमची अतिशय वृद्धि झाली आहे, हें महद्भाग्य होय. तूं जितेंद्रिय असून शत्रुरहित झाला आहेस. महर्षि तुझी स्तुति करीत आहेत. हे शचीपते, तूं स्वर्गाला प्राप्त हो व लोकांचें रक्षण कर."

शल्य—हे विशांपते, त्यानंतर महर्षिगणासहित संतुष्ट झालेले सर्व देव, पितर, यक्ष, भुजग, राक्षस, गंधर्व, देवकन्या, सर्व अप्सरागण आणि सरोवरें व पर्वतादिकांच्या देवता इंद्राच्या समीप येऊन म्हणाल्या—" देवपते, तुझा हा उत्कर्ष पाहून आम्हांला परम हर्ष वाटत आहे. ज्ञानसंपन्न अगस्त्याच्या शापानें पातकी नहुष हत झाला व भूतलावर सर्प होऊन पडला, हें उत्तम झालें." ५. १. १७.

---

## अध्याय १८ वा.

[ १ इंद्राचें देवलोकीं गमन व त्रिभुवनाचें पालन. २ शल्यानें इंद्रवृत्तान्ताचा दृष्टान्त देऊन पांडवांचें केलेलें आश्वासन. ३ फलश्रुति व शल्याचें दुर्योधनाकडे प्रयाण. ]

( १ ) शल्य—हे पांडुनंदना, त्यानंतर गंधर्व व अप्सरागण स्तुति करीत असतां शक्र सर्व लक्षणांनीं युक्त असलेल्या श्रेष्ठ ऐरावतावर आरूढ झाला व महातेजस्वी अग्नि, महर्षि बृहस्पति, यम, वरुण, धनेश्वर, कुबेर सर्व देव व गंधर्व-अप्सरा यांच्या परिवारासह स्वर्गलोकीं आला. तेथें इंद्राणीला भेटून तिच्यासह तो देवराज परम आनंदानें त्रैलोक्याचें पालन करूं लागला. त्यानंतर भगवान् अंगिरसानें तेथें येऊन अथर्ववेदाच्या मंत्रांनीं देवेंद्राचें पूजन केलें. तेव्हां संतुष्ट झालेल्या इंद्रानें अथर्व-अंगिरसाला असा वर दिला. "या वेदाचें अथर्व-अङ्गिरस हें नांव प्रसिद्ध होईल व या नांवानें तुला यज्ञभाग मिळत जाईल."

हे महाराज, असें बोलून इंद्रानें अङ्गिरसाचा सत्कार करून त्याला निरोप दिला. त्यानंतर सर्व देव व तपोधन ऋषि यांचा सत्कार करून हृष्ट झालेल्या शतक्रतूनें प्रजेचें पालन केलें.

( २ ) युधिष्ठिरा, याप्रमाणें इंद्राला भार्येसह दुःख प्राप्त झालें होतें व शत्रुवधाच्या इच्छेनें त्यानें अज्ञातवासहि अनुभविला होता. यास्तव तुला भ्राते व द्रौपदी यांच्यासह महावनांत जे क्लेश भोगावे लागले, त्यांविषयीं तूं खिन्न होऊं नको. हे भारता, पांचाली व तुझे महात्मे बंधु यांसह तूंहि इंद्राप्रमाणें राज्याला प्राप्त होशील. हे कुरुश्रेष्ठा, ज्याप्रमाणें शक्रानें वृत्राचा वध केला व ब्रह्मद्वेष्टा दुराचारी नहुष अगस्त्यशापानें दीर्घ काल नष्ट झाला, त्याप्रमाणेंच तुझे शत्रु दुरात्मे कर्ण-दुर्योधन सत्वर नाश पावतील. त्यानंतर हे वीरा, द्रौपदी व भ्राते यांसह तूं या सागरान्त पृथ्वीचें राज्य भोगशील.

हे विजयी राजा, वेदाला संमत असलेलें हें शक्रविजय-उपाख्यान युद्धाला निघालेल्या विजयेच्छु राजानें श्रवण करावें. म्हणून तुझ्या विजयाच्या इच्छेनें

---

१ अंगिराऋषीनें अथर्ववेदमंत्रांनीं इंद्राची स्तुति केल्यामुळें अथर्ववेद त्याच्या नांवानें प्रसिद्ध झाला. ज्याचें वचन असतें तें त्याच्या नांवानेंच प्रसिद्ध होतें, अशी व्याकरणपरिभाषा आहे.

मीं तें तुला कथन केलें आहे. हे युधिष्ठिरा, महात्म्यांची स्तुति केली असतां त्यांची वृद्धि होत असते. राजा, दुर्योधनाच्या अपराधानें व भीमार्जुनांच्या बलानें महात्म्या क्षत्रियांचा अभाव होईल.

( ३ ) या इंद्रविजय-आख्यानाचें जो नित्य पठन करितो, तो निष्पाप होऊन स्वर्ग जिंकितो व इहलोकीं सुखी होतो. त्याला शत्रूपासून भय नसतें, तो पुत्रवान् होतो, त्यावर कदापि आपत्ति येत नाहीं व तो पुरुष दीर्घायु होतो, सर्वत्र त्याचा जय होतो व कदापि पराजय होत नाहीं.

**वैशंपायन**—हे भरतश्रेष्ठा, शल्यानें याप्रमाणें समाधान केलें असतां धर्मराजानें शल्याचा सत्कार केला व त्या मद्रराजाला म्हटलें—"हे राजन्, तूं कर्णाचें सारथ्य करशील यांत संशय नाहीं. त्यावेळीं अर्जुनाची स्तुति करून तूं कर्णाचा तेजोभंग अवश्य कर."

**शल्य**—हे पांडवा, तूं सांगतोस तसें मी अवश्य करीन. तुझें आणखींहि मला करण्यासारखें कार्य असल्यास सांग. म्हणजे मी तेंहि करीन.

**वैशंपायन**—राजा, नंतर त्या सर्व पांडुपुत्रांची अनुज्ञा घेऊन तो श्रीमान् मद्राधिपति शल्य आपल्या सैन्यासह दुर्योधनाकडे निघून गेला. ५. १. १८.

---

## अध्याय १९ वा.

[ १ सात्यकिप्रभृति राजांचें आपापल्या सैन्यासह युधिष्ठिराकडे आगमन. २ भगदत्तादिकांचें दुर्योधनाच्या साह्यार्थ गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, त्यानंतर सात्वतांचा महारथ वीर सात्यकि फार मोठें चतुरंग सैन्य घेऊन युधिष्ठिराकडे आला. त्याच्या नानादेशांतून आलेल्या महावीर्यवान् व विविध आयुधांनीं युक्त असलेल्या योद्ध्यांनीं तें सैन्य शोभविलें. तें सर्व सैन्य शूल, तोमर, मुद्गर, पाश इत्यादि विविध तीक्ष्ण धारेच्या चकाकणाऱ्या शस्त्रांनीं शोभिवंत दिसत होतें. मेघप्रकाशासारख्या शोभणाऱ्या सुवर्णांनीं भूषित झालेलें तें सैन्य विद्युद्युक्त मेघाप्रमाणें भासत होतें. पण अशा प्रकारची ती अक्षौहिणी सेना सागरांत प्रवेश करणाऱ्या क्षुद्र नदीप्रमाणें युधिष्ठिराच्या सैन्यांत अंतर्भूत झाली. त्याचप्रमाणें अमित तेजस्वी चेदिराज धृष्टकेतु एक अक्षौहिणी सैन्यासह पांडवांच्या साह्यार्थ आला. जरासंधाचा महाबलाढ्य पुत्र मागधाधिप जयत्सेन अक्षौहिणी सैन्य घेऊन धर्मराजाकडे

आला. समुद्रतीरावरील पांड्य-राजा बहुविध योद्ध्यांसह कौंतेयाच्या पक्षाला येऊन मिळाला. हे राजन्, त्याचें सैन्य येऊन मिळालें असतां सुंदर वेष धारण केलेली ती महासेना अधिकच रमणीय दिसूं लागली.

द्रुपदराजाची सेना नानादेशांतील शूर पुरुष व त्याचे महारथ पुत्र यांनीं अतिशय शोभत होती. तसाच मत्स्यराज विराट विपुल सैन्याचा अधिपति होता. तो पर्वतवासी महीपालांसह पांडवांकडे आला. याप्रमाणें महात्म्या पांडवांच्या पक्षाला सर्व बाजूंनीं सात अक्षौहिणी सैन्य जमा झालें व कौरवांशीं युद्धाची इच्छा करणारें तें विविध सैन्य पांडवांना संतोष देऊं लागलें.

(२) इकडे धार्तराष्ट्राचा हर्ष वाढविणाऱ्या महीपाल भगदत्तानें दुर्योधनाला एक अक्षौहिणी सैन्य दिलें. चीन व किरात यांचें तें सुवर्णालंकृत अनाधृष्य सैन्य कर्णिकार वनाप्रमाणें शोभलें. त्याचप्रमाणें शूर भूरिश्रवा व शल्य पृथक् पृथक् अक्षौहिणी सैन्यासह दुर्योधनाच्या साह्यार्थ आले. भोज व अन्ध यांसह कृतवर्मा अक्षौहिणी सैन्य घेऊन आला. त्यांच्या वनमाला धारण करणाऱ्या योद्ध्यांनीं तें सैन्य क्रीडा करणाऱ्या मत्त गजांनीं युक्त असलेल्या वनाप्रमाणें भासलें.

जयद्रथप्रमुख सिंधु व सौवीर देशांतील इतर नृपालहि जणुं काय पर्वतांना कांपवीतच तेथें आले. त्यांची एक अक्षौहिणी सेना वायूनें उडविलेल्या अनेक आकारयुक्त मेघांप्रमाणें दिसली. सुदक्षिण, कांबोज, यवन, शक, हेहि नृपति अक्षौहिणी सैन्यासह कौरवांकडे आले. तो सर्व सेनासमुदाय शलभांप्रमाणें शोभला व कौरवांकडे येऊन त्यांच्या सैन्यांत अंतर्भूत झाला. तसेच, माहिष्मतीवासी नील भूपाल दक्षिण देशांतील महावीर्यवान् नीलायुधासह दुर्योधनास येऊन मिळाला. अवंती देशांतील महाबलाढ्य भूपाल विंद व अनुविंद हे एकेक अक्षौहिणी सैन्य घेऊन सुयोधनाकडे आले.

पांच सहोदर भ्राते केकय एक अक्षौहिणी सैन्यासह दुर्योधनाला संतुष्ट करीतच त्याच्याकडे आले. दुसऱ्याहि भिन्न भिन्न देशांतील महात्म्या भूपतींचें मिळून आणखी तीन अक्षौहिणी सैन्य तेथें जमलें. याप्रमाणें दुर्योधनाच्या पक्षाला एकंदर अकरा अक्षौहिणी सैन्य मिळालें.

राजा, कौंतेयाशीं युद्धाची इच्छा करणारें व ध्वजयुक्त असलेलें तें सैन्य इतकें प्रचंड होतें कीं कौरवांच्या मुख्य सेनेलाहि हस्तिनापुरांत जागा पुरेनाशी

झाली. तेव्हां पंचनद, समग्र कुरुजांगल देश, केवल मरुभूमि असलेलें रोहितकारण्य, अहिच्छत्र, कालकूट, गंगाकूल, वारण, वाटधान व यमुनेच्या तीरावरील पर्वत, हे धनधान्यांनीं समृद्ध असलेले अतिशय विस्तीर्ण देश कौरवांच्या प्रचंड सैन्यांनीं व्यापून टाकिले. हे भारता, पांचाल राजानें कौरवांकडे जो पुरोहित पाठविला होता, त्यानें हें सर्व सैन्य अशाप्रकारें पसरलेलें पाहिलें. ५. १. १९.

येथें पहिलें सेनोद्योगपर्व समाप्त झालें.

---

# संजययानपर्व २.



## अध्याय २० वा.

[ १ द्रुपदपुरोहिताचें राजसभेंत गमन. २ द्रुपदवचनाचें कथन. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, तो द्रुपदाचा पुरोहित कौरवांच्या सभेंत आला असतां धृतराष्ट्र, भीष्म व विदुर यांनीं त्याचा सत्कार केला. तेव्हां त्यानें प्रथम त्यांस पांडवांचें कुशल निवेदन केलें, कौरवांचें कुशल विचारिलें व नंतर त्या सभेमध्यें सर्व सेनापतींच्या समक्ष बोलण्यास आरंभ केला.

( २ ) **पुरोहित**—हे कुरुश्रेष्ठहो, आपण सर्व सनातन राजधर्म जाणतच आहां. परंतु सर्व वृत्तान्त विदित असलेल्या तुम्हीं कांहीं तरी बोलावें या हेतूनें मी हें हितवचन सांगत आहें. धृतराष्ट्र व पांडु हे दोघे एकाचेच पुत्र आहेत, हें प्रसिद्धच आहे. यास्तव त्या दोघांचें पितृधन समान आहे, यांत संशय नाहीं. असें असतांना एकटे धृतराष्ट्राचे पुत्र मात्र पूर्वजांच्या ऐश्वर्याला प्राप्त झाले आहेत आणि पांडुपुत्र ऐश्वर्यहीन होऊन वनवास भोगीत आहेत. पण पांडुपुत्रांना पितरांची संपत्ति कां मिळूं नये, हें मोठें आश्चर्य आहे !

धृतराष्ट्रानें आत्मसात् केलेलें पैतृकधन पांडवांना पूर्वींच कसें मिळालें नाहीं, हें तुम्हांला ठाऊक आहे. त्याच्या पुत्रांनीं पांडवांचा नाश करण्याचा प्रयत्न अनेक प्रकारें केला. परंतु त्या महात्म्यांचें आयुष्य क्षीण झालें नसल्यामुळें त्यांचे शत्रु त्यांस यमसदनीं पाठवूं शकले नाहींत.

त्या पांडुपुत्रांनीं पुनः स्वपराक्रमानें राज्याची वृद्धि केली, परंतु सौबलासह क्षुद्रबुद्धि धार्तराष्ट्रांनीं कपटानें त्यांच्या राज्याचें हरण केलें. त्यांच्या या अयुक्त कर्मालाहि तुम्हीं अनुमति दिलीत. त्या वीरांनीं भार्येसह तुमच्या सभेंत अतिशय मानहानि सहन करून तेरा वर्षें महारण्यांतील क्लेश भोगिले. त्या धर्मनिष्ठ पांडवांवर वनांमध्यें अतिशय दारुण व विविध संकटें आलीं. त्याचप्रमाणें विराटनगरींतील अज्ञातवासांत तर त्यांना अत्यंत क्लेश भोगावे लागले. पण त्या निष्पाप महात्म्यांनीं पातकी जीवांना जसे दारुण क्लेश भोगावे लागतात, तसें हें परम दुःख सहन केलें. तथापि जीव जन्मान्तरींचे क्लेश जसे विसरतात, त्याप्रमाणें हे पांडवहि सर्व पूर्व क्लेश विसरले आहेत.

परंतु त्यांच्याशीं केलेलें पूर्वींचें हें सर्व पापी आचरण मागें सारून त कुरुश्रेष्ठ कौरवांशीं सामानें संधि करण्याची इच्छा करीत आहेत. तस्मात् त्यांचें व दुर्योधनाचें वृत्त लक्षांत आणून आपण सर्व सुहृज्जन या धृतराष्ट्रपुत्राला योग्य मार्गानें जाण्याचा उपदेश करा. ते पांडववीर कौरवांशीं युद्धाची आकांक्षा करीत नसून लोकांचा क्षय न होतां आपलें गत वैभव व राज्य मिळविण्याची इच्छा करीत आहेत.

पण असें असतांहि हा धार्तराष्ट्र जरी युद्धाचीच इच्छा करीत असला, तरी तुम्ही त्याला प्रोत्साहन देऊं नका. कारण पांडव अधिक बलवान् आहेत. कौरवांशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें आज धर्मराजाच्या सेवेंत सात अक्षौहिणी सैन्य जमलें असून तें केवल युधिष्ठिराच्या आज्ञेची वाट पहात आहे. शिवाय सहस्र अक्षौहिणीच्या तुल्य दुसरेहि पुरुषव्याघ्र त्यांच्याकडे आहेत. सात्यकि, भीमसेन व दोघे माद्रेय यांतील एकेकच वीर तुमच्या अक्षौहिणी सेनेच्या बरोबरीचा आहे. हें सर्व जमलेलें सैन्य एका बाजूला व महाबाहु धनंजय एका बाजूला अशी वस्तुस्थिति आहे.

ज्याप्रमाणें एकटा अर्जुन सर्व सैन्याचें अतिक्रमण करण्यास समर्थ आहे, त्याचप्रमाणें महाद्युति वासुदेवहि आहे. अशाप्रकारें विपुल सैन्य, किरीटीचा पराक्रम व कृष्णाची बुद्धिमत्ता, हें जाणत असून कोणता पुरुष युद्धाला उभा राहील! तस्मात् आपण सर्व स्वधर्म व सांप्रतचा काल लक्षांत घेऊन हा धार्तराष्ट्र पांडवांचा न्याय्य विभाग त्यांस देईल, असें करा. ही संधि घालवूं नका. ५. २. २०.

———

## अध्याय २१ वा.

[ १ पुरोहिताच्या वचनाला भीष्माचें अनुमोदन. २ कर्णाचा आक्षेप. ३ भीष्मानें केलेला त्याचा धिक्कार व अर्जुनाची प्रशंसा. ४ संजयाला पाठविण्याचें आश्वासन देऊन धृतराष्ट्रानें केलेलें पुरोहिताचें सत्कारपूर्वक प्रेषण. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, त्या पुरोहिताचें तें वचन ऐकून ज्ञानवृद्ध महाद्युतिमान् भीष्म त्याचा सत्कार करून योग्य कालीं असें वचन बोलला—" हे ब्रह्मन्, दामोदरासह सर्व पांडव कुशल आहेत, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. त्यांना विपुल सैन्य व शूर योद्धे यांचें साह्य मिळालें आहे, हें मोठें भाग्य होय. पांडव धर्मांत रत असून ते कुरुनंदन संधि करण्याची इच्छा करीत आहेत व ते सर्वहि भ्राते आपल्या बांधवांशीं युद्धाची इच्छा करीत नाहींत, ही खरोखर मोठ्या समाधानाची गोष्ट आहे.

हे विप्रश्रेष्ठा, तूं जें म्हटलेंस तें सत्य आहे, यांत संशय नाहीं. तुझें हें भाषण अतिशय तीव्र आहे, पण तें ब्राह्मण्यामुळें आहे, असें मला वाटतें. वनांमध्यें पांडवांनीं निःसंशय दारुण क्लेश भोगिले आहेत. यास्तव ते धर्मतः आपल्या पितृधनाच्या प्राप्तीला योग्य झाले आहेत. धनंजय बलवान्, कृतास्त्र व महारथ आहे. त्या पार्थाला युद्धांत सहन करण्यास साक्षात् इंद्रहि समर्थ नाहीं, मग इतर शस्त्रधारी मानवांची काय कथा! तो तिन्ही लोक जिंकण्यास समर्थ आहे, असें माझें निश्चित मत आहे."

( २ ) **वैशंपायन**—राजा, भीष्म असें बोलत असतां कर्णानें त्याच्याकडे तिरस्कारानें पाहिलें व दुर्योधनाकडे अवलोकन करून तो क्रोधानें म्हणाला— " हे ब्रह्मन्, तूं आतां पांडवांविषयीं जें म्हटलेंस तें कांहीं या लोकीं कोणालाहि अज्ञात नाहीं. मग पुनः पुनः तेंच तें बोलून पुनरुक्ति करण्यांत काय अर्थ आहे! पूर्वी शकुनीनें दुर्योधनासाठीं द्यूत खेळून पांडवांना जिंकलें. तेव्हां युधिष्ठिर प्रतिज्ञापूर्वक अरण्यांत निघून गेला. त्या वेळीं ' तेराव्या वर्षाच्या अज्ञातवासांत पांडव जर ओळखले गेले, तर त्यांनीं पुनः वनवास करावा ' अशी प्रतिज्ञा असतांहि तो नियतकाल पूर्ण होण्यापूर्वींच ते प्रकट झाले आहेत. त्यामुळें ते पितरांच्या राज्याची न्यायानें अपेक्षा करीत नसून मत्स्य व पांचाल यांच्या बलाच्या आश्रयावर मूर्खांप्रमाणें राज्याची मागणी करीत आहेत.

परंतु दुर्योधन अशा केवल भीतीनें चतुर्थांशराज्यहि देणार नाहीं मग अर्ध्या विभागाविषयीं काय सांगावें ! तो धर्मतः शत्रूला समग्र पृथ्वीहि देईल, पण अधर्मानें काडीहि देणार नाहीं. यास्तव पांडवांना जर आपल्या पितृ-पितामहांच्या राज्याची इच्छा असेल तर त्यांनीं आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें पुनः तेरा वर्षें वनाचा आश्रय करून रहावें. नंतर मग त्यांनीं निर्भयपणें दुर्योधनाच्या अंकावरहि येऊन बसावें. त्या पांडवांना केवल मूर्खपणानें ही अधार्मिक बुद्धि सुचली आहे. ते पांडुपुत्र जर धर्म सोडून युद्धाची इच्छा करतील, तर त्यांना समराङ्गणांत या कुरुश्रेष्ठांच्या समोर आल्यावर माझ्या या वचनाचें स्मरण होईल.''

(३) **भीष्म**—हे राधेया, व्यर्थ बडबड कशाला करतोस ! एकट्या पार्थानें सहा महारथ्यांना युद्धांत जिंकलें आहे, याचें स्मरण कर. तूं त्यावेळीं आम्हांला अनेक प्रकारें जिंकणाऱ्या त्याचें कर्म प्रत्यक्ष पाहिलेंच आहेस. यास्तव हा ब्राह्मण सांगत आहे, त्याप्रमाणें जर आम्हीं केलें नाहीं तर युद्धामध्यें पार्थाकडून हत झालेले आम्ही निश्चयानें धूळ खात पडूं.

( ४ ) **वैशंपायन**—नंतर धृतराष्ट्र राजानें भीष्माला अनुमोदन देऊन त्याला प्रसन्न केलें व कर्णाची निर्भर्त्सना करीत म्हटलें—"या शांतनव भीष्मानें आतां जें म्हटलें, तें आमच्या, पांडवांच्या व सर्व जगाच्या हिताचें आहे. तस्मात् मी विचार करून पांडवांकडे संजयाला पाठवितों. हे विप्रश्रेष्ठा आतां आपण पांडवांकडे सत्वर परत जा. उशीर लावूं नका."

असें बोलून त्या राजानें ब्राह्मणाचा सत्कार करून त्याला पांडवांकडे पाठवून दिलें आणि सभेमध्यें संजयाला बोलावून असें भाषण केलें. ५. २. २१.

---

## अध्याय २२ वा.

[ १ धृतराष्ट्रानें केलेली दुर्योधनाची निंदा व पांडवांची प्रशंसा. २ पांडवाकडे संजयप्रेषण. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—संजया, पांडुपुत्र उपप्लव्य देशांत आले आहेत असें ऐकतों. यास्तव तूं तेथें जाऊन त्यांना पाहून ये. तो अजातशत्रु वनासारख्या अस्थानांतून ग्रामांतील योग्य स्थानीं प्राप्त झाला, ही मोठ्या समाधानाची गोष्ट आहे. हे संजया, त्या अजातशत्रूचा सत्कार करून त्या सर्वांना आमचें

कुशल कथन कर. संकटें भोगण्यास योग्य नसलेल्याहि त्यांनीं तेरा वर्षें अत्यंत क्लेश सहन केले तथापि ते निष्कपट व परोपकारी साधु आम्हांवर क्रुद्ध झाले नसून त्यांनीं शांतीचाच स्वीकार केला आहे. मीं पांडवांचें यत्किंचित्हि मिथ्याचरण पाहिलेलें नाहीं. त्यांनीं माझ्यासाठीं स्वपराक्रमानें सर्व ऐश्वर्य संपादन करून तें मला अर्पण केलें. ज्याच्या योगानें ते पार्थ निंद्य होतील, असा यत्किंचित् सूक्ष्म दोषहि मला कधीं आढळला नाहीं. ते पांडुपुत्र नित्य धर्म व अर्थ यांसाठींच कर्म करितात. ते महात्मे पुत्रादि जे प्रियजन त्यांच्या अनुरोधानें धर्माचा त्याग करीत नाहींत.

त्याचप्रमाणें ते पार्थ क्षुधा, तृषा, निद्रा, मूढत्व, क्रोध, हर्ष व प्रमाद यांचा धृतीनें व प्रज्ञेनें पराभव करून धर्म व अर्थ यांसाठीं यत्न करितात. ते धर्मज्ञ योग्य कालीं मित्रांना धन देतात. सहवासानें त्यांची मैत्री कधींहि क्षीण होत नाहीं. ते कौंतेय मानार्ह लोकांचा सर्वदा योग्य सत्कार करितात. हा मंदमति दुर्योधन व क्षुद्रबुद्धि पापी कर्ण यांच्यावांचून त्या आजमीढाचा अन्य कोणी द्वेष्टा नाहीं.

हे दोघे—दुर्योधन व कर्ण हीन सुखाच्या इच्छेनें त्या महात्म्या पांडवांना क्रुद्ध करीत आहेत. हे माझे पुत्र आरंभशूर आहेत. हा मूढ सुयोधन पांडवांच्या भागाचें हरण करणें शक्य आहे व तें युक्तहि आहे, असें जरी मानीत आहे, तथापि पांडव जिवंत असतांना त्याला त्यांचा विभाग हरण करतां येणें शक्य नाहीं. ज्या अजातशत्रु युधिष्ठिराचे अर्जुन, केशव, वृकोदर, सात्यकि, उभयतां माद्रीपुत्र व सृंजय हे अनुचर असून त्याच्या आधीं हे सर्व समरांगणांत युद्धाला पुढें येतात, त्या धर्मराजाचा विभाग युद्धाच्या आधींच द्यावा, हें योग्य होय. गांडीव धनुष्यधारी एकच सव्यसाची पृथ्वीला जिंकणारा आहे.

जयशील केशवहि तसाच दुराधर्ष आहे. तो महात्मा त्रिभुवनाचा अधिपति आहे. तो एकटाच सर्व लोकांना भोग-मोक्षादि वर देणारा आहे. तो शरांची वृष्टि करूं लागला असतां पर्जन्य घोषासारखा प्रचंड ध्वनि निघतो आणि त्याचे शर पतंगाच्या संघाप्रमाणें शीघ्रगामी असतात.

गांडीवधन्व्या धनंजयानें एका रथानें मध्यदेशाच्या अपेक्षेनें केवल उत्तर दिशाच जिंकली असें नाहीं, तर हिमाचलावरील स्वर्गभूमिरूप उत्तर कुरु-देशांनाहि पादाक्रांत केलें, त्यांतील धन हरण करून आणिलें व द्रविडांना आपल्या

सेनेला अनुसरण्यास लाविलें. त्या सव्यसाचीनें खांडववनांत इंद्रासह सर्व देवांना जिंकिलें आणि पांडवांचें यश व मान यांस वाढविणाऱ्या त्या कुंतीपुत्रानें अग्नीला खांडववन दग्ध करावयास दिलें. या लोकीं भीमसेनासारखा गदाधारी व हत्तीवर बसणारा कोणी नाहीं. बाहुबलांत तो दहा हजार हत्तींच्या बलानें युक्त आहे. रथामध्येंहि तो अर्जुनाहून न्यून नाहीं. त्यानें अश्वविद्या उत्तमप्रकारें संपादन केली आहे. माझ्या पुत्रांशीं त्याचें हाडवैर आहे. तो वेगवान् व नित्यक्रोधी पांडव या क्षुद्र धार्तराष्ट्रांचें क्रोधानें भस्म करून टाकील. सर्वदा अत्यंत अमर्षी असलेल्या त्याला साक्षात् इंद्रहि युद्धांत केवल बलानें जिंकण्यास समर्थ नाहीं.

अत्यंत तेजस्वी, बलाढ्य, चपल व अर्जुनानें शस्त्रास्त्रांचें शिक्षण दिलेले नकुल-सहदेव हे दोघे भ्राते, पक्ष्यांच्या समूहावर श्येन जशी झडप घालतो, तसे शत्रूंना निःशेष करून टाकतील.

आमचें हें अकरा अक्षौहिणी सैन्य व भीष्म-द्रोणादिक सामर्थ्यसंपन्न आहेत, हें जरी सत्य असलें, तरी पांडवांच्या बलापुढें आमचें सामर्थ्य तुच्छ आहे, असें मला वाटतें. पांडवांच्या पक्षामध्यें सोमकांतील श्रेष्ठ धृष्टद्युम्न अमात्यांसह अतिशय उत्साही आहे. तो पांडवांसाठीं स्वतःचे प्राणहि देईल, असें मीं ऐकलें आहे.

ज्याच्या पक्षामध्यें वृष्णिश्रेष्ठ वासुदेव अग्रणी आहे त्या अजातशत्रु युधिष्ठिराला सहन करण्यास कोण समर्थ आहे! शिवाय ज्याच्या सहवासांत पांडवांनीं एक वर्ष घालविलें तो वृद्ध मत्स्यराज विराट पुत्रांसह युधिष्ठिराला साह्य करील. तो धर्मराजाचा निस्सीम भक्त आहे, असें मी समजतों. आमच्या पक्षाला जे केकय राजे मिळाले आहेत, त्यांतील पांच भ्राते स्वतःचें राज्य आपल्या बांधवांकडून परत मिळविण्याच्या इच्छेनें पांडवांना अनुसरले आहेत.

पांडवांकडे जेवढे पृथ्वीपाल गेले आहेत, ते सर्व शूर व युधिष्ठिराचे भक्त आहेत, असें मी ऐकतों. पर्वत, दुर्ग, यांचे अधिपति, नाना आयुधांनीं युक्त असलेले वीर्यवान् म्लेच्छ राजे व पृथ्वीवरील कुलीन नृपति मोठ्या प्रेमानें युधिष्ठिराच्या साह्यार्थ जमले आहेत. इंद्रतुल्य पराक्रमी पांड्यराजा अनेक शूर योद्ध्यांसह पांडवांच्या साह्यार्थ आला आहे.

ज्यानें द्रोण, अर्जुन, वासुदेव, कृप व भीष्म यांच्याकडून अस्त्रें संपादन केलीं आहेत व जो प्रद्युम्नाच्या तुल्य समजला जातो, तो सात्यकी पांडवांच्या

पक्षाला मिळाला आहे. तेथें चेदि, करुषक इत्यादि जे भूपाल जमले आहेत त्यांमध्यें सूर्याप्रमाणें तळपत असणारा चेदिपति आपल्या ऐश्वर्यानें प्रकाशत आहे. स्वतःला युद्धांत अजिंक्य समजणारा, प्रत्यंचा ओढणारांत भूलोकीं श्रेष्ठतम असलेला, सर्व क्षत्रियांचा उत्साह नष्ट करणारा जो प्रसिद्ध शिशुपाल, त्याचें कृष्णानें मर्दन केलें. पूर्वी पांडवांचें यश व मान यांस वाढविणाऱ्या चेदिपतीचें शिर कृष्णानें भर सभेंत तोडलें. करुपराजप्रभृति नरेंद्र ज्याचा मान वाढवीत होते, तो शिशुपाल कृष्णाच्या हातून वध पावला. त्यावेळीं सिंहाला पाहून क्षुद्र मृग जसे पळून जातात, त्याप्रमाणें ' सुग्रीव '-नामक श्रेष्ठ अश्वांनीं युक्त असलेल्या रथावर आरूढ झालेला केशव दृष्टीं पडतांच ते करुषराजादि नरेंद्र चेदिपतीला सोडून निघून गेले. कर्णिकार वृक्ष जसा वायूनें समूल उपटून पडतो, तसा कृष्णाच्या समोर त्याच्याशीं द्वैरथ युद्ध करण्यासाठीं वेगानें जो जो वीर गेला तो तो गतप्राण होऊन पडला.

हे संजया, याप्रमाणें कृष्णाचे अनेक पराक्रम मीं ऐकले आहेत. त्यामुळें पांडवांच्या पक्षाला गेलेल्या त्या केशवाचीं अपूर्व कर्मे आठवलीं म्हणजे माझ्या मनाची शांति नाहींशी होते. ज्याच्या सैन्याच्या अग्रभागीं वृष्णिसिंह माधव आहे, त्यांना सहन करण्यास कोणताहि शत्रु समर्थ होणार नाहीं. कृष्णार्जुन एकत्र होऊन एका रथावर आरूढ होणार आहेत, हें ऐकतांच माझें हृदय भयानें कांपूं लागतें. माझे मंदबुद्धि पुत्र युद्धाला जर जाणार नाहींत, तरच त्यांना कृष्णार्जुनापासून शांति मिळेल. परंतु माझ्या या दुराग्रही पुत्रानें जर ऐकलें नाहीं, तर इंद्र व विष्णु यांनीं जसा दैत्यसेनेचा संहार केला, तसा हे दोघे वीर कौरवांचा नाश करतील.

धनंजय इंद्रतुल्य आहे व वृष्णिवीर वासुदेव तर सनातन विष्णुच आहे, अशी माझी दृढ समजूत आहे. कुंतीपुत्र युधिष्ठिर धर्माचें निवासस्थान असून तो अकर्माविषयीं लज्जा बाळगणारा आहे. दुर्योधनानें ज्याची वंचना केलेली आहे असा तो जितात्मा अजातशत्रु जर क्रुद्ध झाला तर सर्व धार्तराष्ट्रांस दग्ध करून टाकील. मी त्या धर्मराजाला जितका भितों, तितका अर्जुन, कृष्ण, भीम व माद्रेय यांनाहि भीत नाहीं. हे सूता, तो महातपस्वी निरंतर ब्रह्मचर्यानें युक्त आहे. केवळ संकल्पानेंच त्याच्या मनांतील हेतु सिद्ध होईल. यास्तव क्रोधानें संतप्त झालेल्या त्या राजाची मला अतिशय भीति वाटते. शिवाय युधिष्ठिराचा क्रोध योग्य आहे, हें जाणूनहि मी अतिशय भयभीत झालों आहें.

( २ ) यास्तव हे संजया, जेथें पांचालराजाचा सेनानिवेश आहे तेथें तूं वेगवान् रथानें सत्वर जा आणि अजातशत्रूला पुनः पुनः मधुर शब्दानें कुशल विचार. त्याचप्रमाणें माझ्या वतीनें महाभाग उदार जनार्दनाचेंहि कुशल विचार. धृतराष्ट्र पांडवांशीं संधीची इच्छा करीत आहे असें त्याला निवेदन कर.

श्रीकृष्ण पांडवांना स्वतःच्या आत्म्याइतका प्रिय आहे. तो कर्मामध्यें नित्ययुक्त असून विद्वान् आहे. त्यानें सांगितलेलें कोणतेंहि कार्य पांडव करणार नाहींत, असें कधीं होणार नाहीं.

त्याचप्रमाणें सृंजय, जनार्दन, युयुधान व विराट इत्यादि जे नृपश्रेष्ठ पांडवांकडे जमले आहेत, त्यांस व त्याचप्रमाणें द्रौपदीच्या पांची पुत्रांना मीं कुशल विचारिलें आहे, असें सांग. संजया, तेथें योग्य कालीं जें बोलणें अवश्य असेल व जें भारतांना हितावह होईल, असें तुला वाटेल आणि ज्याच्या योगानें युद्धाचें निमित्त वाढणार नाहीं, असेंच भाषण तूं त्या राजांच्या समक्ष कर. ५. २. २२.

---

## अध्याय २३ वा.

[ १ संजयाचें पांडवांकडे गमन. २ त्याला युधिष्ठिराचे सत्कारपूर्वक कुशल प्रश्न. ]

( १ ) वैशंपायन—राजा, धृतराष्ट्राच्या आज्ञेप्रमाणें अमित तेजस्वी संजय पांडवांना भेटण्यासाठीं उपप्लव्य नगरीस प्राप्त झाला. त्या गावल्गणि सूतपुत्रानें कुंतीपुत्र युधिष्ठिराच्या समीप जाऊन त्याला अभिवादन केलें व प्रेमानें म्हटलें— " हे राजन्, मी तुला कुशल पहात आहें व इंद्रतुल्य साह्यानें तूं युक्त झाला आहेस, हें मोठें भाग्य होय. वृद्ध मनीषी अंबिकापुत्र धृतराष्ट्रानें तुझें कुशल विचारलें आहे.

हे अजातशत्रो, पांडवांतील मुख्य भीमसेन, धनंजय, दोघे माद्रीपुत्र आणि राजकन्या व वीरपत्नी कृष्णा पुत्रांसह कुशल आहेना ! ती वीरसू मनस्विनी तुझ्या इष्ट कामना पूर्ण करणारी आहे. "

( २ ) युधिष्ठिर—हे संजया, तुझें स्वागत असो, तुला पाहून मला संतोष झाला. मी तुझें अभिनंदन करितों. हे विद्वन्, मी भ्रात्यांसह कुशल आहें. हे सूता, दीर्घ कालानें त्या कुरुवृद्ध राजाचें कुशल वृत्त ऐकून व तुला पाहून तुझ्यावरील प्रेमामुळें आम्हांला साक्षात् तो नरेंद्रच भेटल्याप्रमाणें वाटत आहे.

हे गावल्गणे, आमचा महाज्ञानी वृद्ध पितामह सर्व धर्मांनीं युक्त आहे ना ! तो विद्वान् भीष्म सर्व कौरवांसह कुशल आहे ना ! त्याचा आम्हांवर पूर्ववत् स्नेह आहे ना ? पुत्रांसह महात्म्या धृतराष्ट्राचें क्षेम आहे ना ? प्रतिपपुत्र महाराज बाह्लिक, सोमदत्त भूरिश्रवा, सत्यसंध, शल, पुत्रांसह महेष्वासा द्रोण, व विप्रश्रेष्ठ कृप या सर्वांचें अनामय आहे ना ? ते सर्वहि महाप्राज्ञ, शास्त्रवेत्ते, व पृथ्वींतील धनुर्धरांत श्रेष्ठ आहेत. ते युद्धावांचूनच कौरवांचें कुशल इच्छितात ना ? कौरव त्यांचा सन्मान करतात ना ? या सर्व धनुर्धरांचें क्षेम आहे ना ?

कौरवांच्या राज्यांत रहाणाऱ्या धनुर्धर व शीलसंपन्न द्रोणपुत्राचा ते धार्तराष्ट्र बहुमान करितात ना ? महाज्ञानी राजपुत्र युयुत्सु कुशल आहे ना ? मंदबुद्धि सुयोधन ज्याच्या अधीन होऊन वागत आहे, त्या मानी अमात्य कर्णांचें अनामय आहे ना ? हे सूता, भारतांच्या माता, वृद्ध स्त्रिया, पाकशालेंतील परिचारिका व दासभार्या निष्कपट वृत्तीनें वागत आहेत ना ? त्याचप्रमाणें राजस्नुषा, भगिनीपुत्र, भगिनी व कन्यापुत्र, हीं सर्व कौरवांशीं सरलवृत्तीनें वागतात ना ?

संजया, धार्तराष्ट्र ब्राह्मणांच्या देणग्या पूर्ववत् चालू ठेवतो ना ! मीं ब्राह्मणांना दिलेले ग्रामादिक त्यानें हरण करून घेतले नाहींतना ? हे सूता, पुत्रांसह तो राजा विप्रांचा अपराध करणारांची उपेक्षा करीत नाहींना ! विप्रांची वृत्ति स्वर्गाचा मार्गच आहे, त्याकडे तो दुर्लक्ष करीत नाहीं ना ! ब्राह्मणांना दिलेल्या वृत्तीचें पालन परलोकीं प्रकाश देणारें व इहलोकीं यश वाढविणारें आहे. यास्तव ते मंदमति धार्तराष्ट्र विप्रांच्या वृत्तीला जर विघात करीत असले व त्यांना त्यांच्या निर्वाहाचें साधन देत नसले, तर कौरवांचा सर्वस्वी नाश होईल.

त्याचप्रमाणें हे संजया, धृतराष्ट्रराजा पुत्रांसह आपल्या अमात्यांना योग्य वेळीं वेतन देतो ना ! ते अमात्य बाह्यतः स्नेह दाखवून आंतून शत्रूला वश होऊन भेदानें स्वतःची उपजीविका करीत नाहीं ना ! ते सर्व कौरव पांडवांचे दोष कथन करीत नाहींत ना ? विशेषतः अश्वत्थामा, द्रोणाचार्य व विप्रश्रेष्ठ कृप हे तरी आम्हांला दोष देत नाहींत ना ?

हे सूता, दस्युसंघ एकत्र जमला असतां अग्रणी गांडीवधारी पार्थ आकर्ण धनुष्य ओढून जेव्हां बाणवृष्टि करीत असे, तेव्हां त्या सरळ जाणाऱ्या बाणांचा मेघाप्रमाणें ध्वनि होत असे. त्या धनुर्धर धनंजयाच्या शरसंधानाचें कौरवांना

कधीं स्मरण होतें काय ? संजया, या पृथ्वीतलावर अर्जुनतुल्य किंवा त्यांहून अधिक योद्धा मीं एकहि पाहिला नाहीं. तो सव्यसाची जेव्हां तीक्ष्ण धारेचे पुंखयुक्त एकसष्ट बाण एकसारखे सोडतो, त्यावेळीं त्याचें हस्तचापल्य काय वर्णावें !

हे सूता, त्या धार्तराष्ट्रांना बलाढ्य भीमसेनाची कधीं आठवण होते काय ? तो वृकोदर तृणयुक्त प्रदेशांत संचार करणाऱ्या मदोन्मत्त गजाप्रमाणें संग्रामांत हातीं गदा घेऊन शत्रुसमुदायाला कांपवीत असतो. त्या वीराचें अतिमानुष कर्म कौरव कधीं स्मरतात काय ?

त्याचप्रमाणें ज्या वीरानें दोन्ही हातांनीं बाण सोडून कलिंगदेशांतील योद्ध्यांना संग्रामांत जिंकिलें, त्या सहदेवाचें त्यांना स्मरण आहे का ? तसेंच हे संजया, पूर्वीं शिबि व त्रिगर्त यांना जिंकण्यासाठीं नकुलाला पाठविलें असतां, तुझ्या समक्षच त्यानें समग्र पश्चिम दिशा वश करून घेतली; त्या माद्रेयाची त्यांना आठवण आहे ना ?

कौरव दुष्ट संकेत करून घोषयात्रेला निघाले, तेव्हां द्वैतवनांत त्यांचा पराभव झाला असतां शत्रूंच्या हातीं सांपडलेल्या त्या मूर्खांना भीमार्जुनांनीं सोडविलें. त्यावेळीं माद्रेयांचें रक्षण भीमानें केलें व अर्जुनाला मीं प्रेरणा केली आणि तो गांडीवधारी धनंजय शत्रूंचा पराभव करून अक्षत शरीरानें परत आला. याप्रमाणें आम्हीं पांचीजणांनीं त्यांना शत्रूंच्या हातून सोडविलें, तो प्रसंग ते धार्तराष्ट्र विसरले नाहींत ना ! हे सूता, ही सर्व पूर्वस्मृति देण्याचें कारण इतकेंच कीं, सुयोधन सामोपचारानें ऐकेल असें दिसत नाहीं. यास्तव आम्ही सर्व उपायांचें अवलंबन करून त्याला जिंकण्यास समर्थ आहों. आम्ही दान व भेद यांनीं त्या धार्तराष्ट्राला जिंकूं शकलों नाहीं आणि सामानेंहि त्याला जिंकणें अशक्य झालें, तर मग एक दंडच काय तो साध्य आहे, हें तूं लक्षांत ठेव. ५. २. २३.

## अध्याय २४ वा.

[ १ युधिष्ठिराच्या प्रश्नांचीं उत्तरें व धृतराष्ट्रसंदेश श्रवण करण्याची विज्ञप्ति. ]

( १ ) **संजय**—पांडवा, तूं म्हणतोस, तशीच सर्व सुस्थिति आहे. तूं ज्या कुरुश्रेष्ठांचें अनामय विचारीत आहेस, ते सर्व मानी विद्वान् कुशल आहेत. युधिष्ठिरा, धार्तराष्ट्रांच्या पदरीं जसे वृद्ध सज्जन आहेत, तसेच पापीहि आहेत, हें तुला ठाऊकच आहे. दुर्योधन शत्रूलाहि द्रव्यादि देत असतो, मग तो ब्राह्मणांची वृत्ति कशी काढून घेईल ! तो सुयोधन निरपराध असलेल्या तुमच्याशीं द्रोह करून अधर्मानें वागतो, हें योग्य नव्हे. सदाचरणी असलेल्या तुमचा द्वेष करणारे धृतराष्ट्रपुत्र मित्रद्रोही आहेत.

धर्मराजा, तो वृद्ध धृतराष्ट्र हें सर्व जाणतो, संतप्त होतो व खेद पावतो. कारण तो प्रज्ञाचक्षु मित्रद्रोहाचें पातक किती घोर असतें, हें ब्राह्मणांना जमवून त्यांच्या मुखानें ऐकत असतो. हे राजा, कौरव तुझें स्मरण करीत असतात. युद्धामध्यें योद्ध्यांना जिंकणाऱ्या पार्थाचेंहि त्यांना स्मरण होत असतें.

दुंदुभि आणि शंख यांचा घोष होऊं लागला असतां हातांत गदा धारण करणाऱ्या भीमसेनाचीहि ते आठवण काढतात व युद्धामध्यें सर्व दिशांतून चाल करून जाणाऱ्या माद्रीसुतांनाहि ते विसरले नाहींत. शत्रुसैन्यावर सतत शरवर्षाव करणाऱ्या व युद्धांत दुष्प्रकंप्य असणाऱ्या त्या महारथांचें त्यांना चांगलें स्मरण आहे.

हे राजन्, ज्याअर्थी तुझ्यासारख्या सर्व धर्मांनीं युक्त असलेल्या धर्मात्म्यालाहि हे संकटरूप क्लेश सोसावे लागले, त्याअर्थी कोणावर भविष्यत्कालीं काय प्रसंग येईल, हें सांगतां येत नाहीं. हे अजातशत्रो, तूं अनेक क्लेशांतून बाहेर पडला आहेस, यास्तव तूंच आतां विचारपूर्वक कौरवांशीं सख्य कर. इंद्रतुल्य असलेले तुम्ही सर्व पांडुपुत्र कोणत्याहि स्वार्थासाठीं धर्माचा त्याग करणार नाहीं, अशी तुमची प्रसिद्धि आहे. यास्तव सर्व धार्तराष्ट्र, पांडव, सृंजय व इतरहि जे नरेंद्र युद्धार्थ जमले आहेत, त्या सर्वांचें ज्याच्या योगानें हित होईल, असाच शम तूं त्यांच्याशीं प्रज्ञापूर्वक कर. आतां हे राजन्, तुझ्या पितृतुल्य धृतराष्ट्रानें पुत्र व अमात्य यांच्यासमक्ष त्या रात्रीं जो संदेश मजपाशीं दिला आहे, तो मी तुला सांगतों ऐक. ५. २. २४.

---

## अध्याय २५ वा.

[ १ संजयानें केलेला युद्धाचा निषेध. २ संक्षिप्त संदेशकथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे सूतपुत्रा, येथें जनार्दन, विराट, सृंजय, युयुधान व पांडव हे सर्व जमले आहेत. यास्तव धृतराष्ट्राचा काय संदेश आहे, तो आम्हांला निवेदन कर.

**संजय**—हे पांडुपुत्रांनो, याज्ञसेनि, वासुदेव, युयुधान, विराट, पांचालराज द्रुपद, धृष्टद्युम्न व सर्व नृपालहो, कुरूंचें कल्याण इच्छिणाऱ्या माझें हें भाषण तुम्ही लक्षपूर्वक ऐका. राजा धृतराष्ट्राला शम करणेंच संमत आहे आणि त्यानें याच कार्यासाठीं मला मोठ्या त्वरेनें रथांत बसवून येथें पाठविलें आहे. तस्मात् भ्राते, पुत्र व स्वजन यांच्यासह धृतराष्ट्रानें तुम्हांला जो शमाचा निरोप पाठविला आहे, तो पांडवांना रुचून शम व्हावा, असें मी प्रार्थितों.

हे पृथापुत्र सर्व धर्मांनीं युक्त असून आकार, दयालुत्व व सरलत्व या गुणांनीं संपन्न आहेत. ते उच्च कुलांत उत्पन्न झाले असून कदापि कठोर भाषण करीत नाहींत. ते धर्मज्ञ अकर्माविषयीं सर्वदा लज्जा बाळगतात व ते उदार अंतःकरणाचे राजपुत्र कार्याचा निर्णय योग्यप्रकारें जाणतात.

हे पांडवहो, तुम्ही प्रचंड सैन्यानें युक्त असून शत्रूंना जिंकण्यासहि जरी समर्थ आहां, तरी युद्धासारखें हिंस्रकर्म तुमच्यासारख्या सज्जनांना योग्य नाहीं. कारण तुमच्या ठिकाणीं साधुत्व वास करीत आहे.

तुमच्यासारख्या निष्पाप धर्मात्म्यांच्या हातून यत्किंचित्‌हि हीन कर्म घडलें, तर तें शुभ्र वस्त्रावरील काजळाच्या बिंदूप्रमाणें तत्काल तुमच्या उज्वल चरित्राला कलंक लावील. ज्या युद्धांत सर्वांचा पापावह क्षय स्पष्ट दिसत आहे आणि ज्यांत जयहि वस्तुतः पराजयच आहे, अशा कर्मांत कोणता सुज्ञ मनुष्य प्रवृत्त होईल !

ज्यांत कुरूंचा उत्कर्ष आहे, तें कार्य करण्यांत जे प्रसंगीं आपल्या जीविताचाहि त्याग करितात, तेच खरे पुत्र, सुहृद् व ज्ञातिबांधव होत.

घोषयात्राप्रसंगीं तुम्ही दुर्योधनादिकांस गंधर्वांच्या हातून सोडविलेंत; असलें ज्ञातिकार्य जे करितात, ते धन्य होत. आतां तेच तुम्ही युद्धाचा निश्चय व सर्व शत्रूंचा निग्रह करून जर कौरवांचा नाश कराल, तर तुमचें जीवितहि

मृत्युतुल्यच होईल. कारण ज्ञातीचा वध करून जिवंत रहाणें, हें प्रशस्त जीवित नव्हे.

ज्यांच्या पक्षाचें रक्षण साक्षात् केशव, सात्यकि, चेकितान व धृष्टद्युम्न आपल्या बाहुबलानें करीत आहेत, त्यांना जिंकण्यास कोण समर्थ आहे ! शत्रूला इंद्रासह देवांचें जरी साह्य असलें तरीहि ते युद्धांत या वीरांना सहन करूं शकणार नाहींत.

त्याचप्रमाणें हे राजन्, ज्या कौरवांचें द्रोण, भीष्म, अश्वत्थामा, शल्य, कृप व इतर भूपालांसह राधेय रक्षण करीत आहे, त्यांना रणांत पराभूत करण्यास कोण समर्थ आहे ! केव्हांहि क्षय न पावणाऱ्या प्रचंड कौरवसेनेचा नाश कोण करूं शकणार ! या युद्धांत जय किंवा पराजय झाला असतां त्यांत मला यत्किंचित्हि उत्कर्ष दिसत नाहीं. दुष्कुलोत्पन्न नीच लोकांप्रमाणें धर्म व अर्थ यांच्या विरुद्ध असलेलें कर्म पार्थ कसें करतील !

( २ ) तस्मात् वासुदेव व वृद्ध पांचालाधिप यांना प्रसन्न करून मी नम्रपणें हात जोडून तुम्हांला शरण आलों आहें. कुरु आणि सृंजय यांचें स्वास्थ्य कसें होईल, याचा विचार करा. माझें हें वचन वासुदेव व धनंजय यांस कदापि अमान्य होणार नाहीं. हा श्रीकृष्ण मजसारख्या दीन याचकाला आपले प्राणहि अर्पण करील. मग अन्य वस्तूंची काय कथा ! त्या महात्म्याची ही उदार वृत्ति मी जाणतों व म्हणूनच भीष्मादिकांना संमत असलेलें राजा धृतराष्ट्राचें ‘ या प्रसंगीं शांतिच उत्तम होय ’ हें वचन तुम्हांला कथन करीत आहें. हे कौंतेयहो, संधि करण्याच्या सदिच्छेनें मी हें भाषण करीत आहें. तुम्हांला भय दाखविण्यासाठीं नव्हे. ५. २. २५.

---

## अध्याय २६ वा.

[ १ युधिष्ठिराचें स्व-परहितविवेचन. २ इंद्रप्रस्थाचें राज्य परत देऊन शम करण्याचा प्रतिसंदेश. ]

( १ ) **युधिष्ठिर—हे संजया, युद्धाची इच्छा दर्शविणारें असें माझें कोणतें भाषण तूं ऐकलेंस कीं, ज्यामुळें तुला युद्धाची इतकी भीति वाटत आहे ! अरे बाबा, युद्धाहून अयुद्ध केव्हांहि श्रेयस्करच आहे. युद्धावांचून जर**

इष्टार्थ प्राप्त होत असले तर कोणता सुज्ञ मनुष्य युद्धाची इच्छा करील ! हे सूता, मनुष्याच्या मनांतील इच्छा कार्य केल्यावांचून केवल संकल्पानेंच जर सिद्ध होऊं लागल्या तर कर्म करण्याची काय गरज आहे ! युद्ध न करतां एखाद्या क्षुद्र कर्मानें जर कार्यसिद्धि होत असली, तर पुरुष तेंहि गौण कर्म करील, पण युद्धाची इच्छा करणार नाहीं.

सुखाची इच्छा करणारा कोणता मनुष्य युद्धाला तयार होईल ! देवाचा ज्याला शाप झाला असेल तोच युद्धाला वरील. सुखाची इच्छा करणारे पार्थ धर्मबाह्य नसलेलें व इहलोकाच्या अविरुद्ध, असेंच कर्म करीत असतात. ( याप्रमाणें स्वतःचें शील सांगून युधिष्ठिर आतां धृतराष्ट्राच्या स्वभावाचें वर्णन करितो. ) ज्यापासून धर्माचा उदय होतो तेंच कर्म गंगास्नानाप्रमाणें सुखद होतें. तें परधनापहारादिक हिंसाजन्य अधर्माप्रमाणें दुःखद होत नाहीं. वस्तुतः सर्वच कर्म कष्टसाध्य आहे. परंतु विषयसुखाची इच्छा करणारे लोक धर्माधर्माकडे लक्ष न देतां दुःखाचा द्वेष करून केवल सुखाचीच इच्छा करितात. परंतु विषयांच्या विस्मरणांत महत्सुख आहे, हें न जाणून विषयचिंतनानें लोक स्वशरीराला क्लेश देतात. प्रदीप्त अग्नीमध्यें घृताची आहुति दिली असतां तो अग्नि जसा अधिकच प्रज्वलित होतो, त्याप्रमाणें कामी जनांची विषयेच्छा इष्ट कामार्थलाभानें तृप्त न होतां, अधिकच वाढत जाते.

संजया, धृतराष्ट्राचेंच उदाहरण पहा. आम्ही पांच व शंभर कौरव मिळून एकशेंपांच पुत्रांसह धृतराष्ट्राचें ऐश्वर्य केवढें विपुल होतें ! पण तें सर्व स्वतः-लाच प्राप्त व्हावें, या स्वार्थी बुद्धीनें त्यानें आम्हांला दूर केलें. प्राप्त संपत्तीनें त्याची तृप्ति झाली नाहीं. तथापि त्याचें दैव बलवत्तर खरें. त्यावांचून कलहांत यश येत नसतें. आमच्याशीं वैर उत्पन्न करून, आम्हांला कपटानें जिंकून त्यांतहि त्याचा उत्कर्ष झाला ! इतर कोणी असता तर तो निश्चयानें नाश पावला असता. यावरूनच त्याचें श्रेष्ठ पूर्वपुण्य सिद्ध होतें. आम्हीच भाग्य-हीन, म्हणून आम्हांला वनवासादिकांचे क्लेश भोगावे लागले. भाग्यहीन दरिद्री पुरुषाला मधुर गीतध्वनि, पुष्पमाला, सुगंधि अनुलेपन किंवा उत्तम वस्त्रें-भूषणें यांचा लाभ कदापि होत नाहीं. धार्तराष्ट्र भाग्यवान् आहे, म्हणूनच त्याला हे सर्व भोग प्राप्त झाले आहेत. आमचें पुण्य जर बलवत्तर असतें, तर कौरव आम्हांला राज्यापासून दूर करण्यास कसे समर्थ झाले असते ! पुण्यवान्

पुरुषच शत्रूला राज्यच्युत करण्यास समर्थ होतात. तें कर्म दैवहीनाला साध्य होत नाहीं.

तथापि अंतःकरणाचा दाह करणारें हें कर्म असमंजसपणाचें आहे. तें दुर्योधनासारख्या मूढालाच उचित आहे. आमच्या सारख्यांना योग्य नव्हे. विषयतृष्णा अंतःकरणाचा खेद वाढवीत असते. हा दुर्योधनराजा संकटांत सांपडला असतां कर्णादिकांच्या साह्यानें त्यांतून पार पडण्याची इच्छा करितो. तो मूर्ख स्वकीयांप्रमाणें परकीयहि आपल्या हितामध्यें तत्पर आहेत, असें समजत आहे, पण तें योग्य नव्हे.

तृणयुक्त गहन वनांत मध्याह्नसमयीं अग्नि टाकून वायुवेगानें तो सर्वत्र पसरला, म्हणजे त्याच्या समीप असलेल्या मनुष्यावर त्यांतून मुक्त होण्यासाठीं शोक करण्याचा जसा प्रसंग येतो, तद्वत्च या अविचारी धार्तराष्ट्राची स्थिति झाली आहे.

संजया, धृतराष्ट्राला सर्व ऐश्वर्य प्राप्त असतां, त्याला आत्मदुःखाच्या शमासाठीं असें दीनवत् भाषण करण्याचें काय कारण ! तो राजा मंदबुद्धि, दुराग्रही, मूढ व अयोग्य सल्ला देणाऱ्या कुटिल पुत्रांच्या अधीन झाल्यामुळेंच त्याला असा खेद करावा लागत आहे. हा मूढ दुर्योधन बुद्धिमान् विदुराच्या हितवचनाचा अनादर करीत आहे व पुत्राला प्रसन्न ठेवण्याची इच्छा करणारा धृतराष्ट्र राजा हें जाणत असूनहि त्या मूर्खाचें अनिष्ट वचन मान्य करून अधर्मांत प्रवेश करीत आहे.

हे सूता, विदुर अतिशय बुद्धिमान् असून बहुश्रुत आहे. तो कुरूंचा हितचिंतक, शीलसंपन्न व श्रेष्ठ वक्ता आहे. परंतु धृतराष्ट्रानें पुत्रलोभानें त्या ज्ञानी धर्मात्म्याचें हितवचन मान्य केलें नाहीं व पुत्राचें प्रिय करण्याच्या इच्छेनें धर्म व काम या दोहोंचाहि त्याग केला.

उलटपक्षीं दुर्योधन परोत्कर्ष सहन न करणारा व क्रोधी आहे. दुसऱ्याचा सन्मान न करणारा व स्वतः मानाची इच्छा करणारा आहे. तो दुरात्मा क्रोधवश होऊन दुर्भाषण करणारा असून कर्णादि दुर्जनांकडून पूजिला जातो. तो संस्कारशून्य अभागी धार्तराष्ट्र सर्वदा परद्रोहचिंतनांतच व्यग्र असून मित्रद्रोही व दीर्घद्वेषी आहे. हें सर्व जाणत असूनहि पापबुद्धि पुत्राचें प्रिय करण्यासाठीं धृतराष्ट्रानें, सभेंत चाललेला अन्याय समक्ष पहात असूनहि त्याच्याकडे दुर्लक्ष केलें व धर्माचा त्याग केला.

संजया, त्या कपटद्यूतप्रसंगीं ज्ञानी विदुरानें इतकें प्रशंसनीय व धर्मयुक्त भाषण केलें असतांहि धृतराष्ट्रानें त्या भाषणाची प्रशंसा केली नाहीं. त्याचवेळीं ' आतां कुरूंचा विनाशकाल समीप आला आहे. ' असा मीं मनांत निश्चय केला. हे सूता, जोंपर्यंत कौरव विदुराच्या बुद्धीनें वागत होते, तोंपर्यंत त्यांच्या राष्ट्राचा उत्कर्ष होत होता; परंतु ते विदुराच्या बुद्धीचा अवमान करूं लागल्यापासून त्यांच्यावर संकटें येऊं लागलीं आहेत.

हे गावल्गणे, त्या धनलुब्ध धृतराष्ट्रपुत्राचे दुर्मंत्री कोण कोण आहेत, ते सांगतों ऐक. दुःशासन, शकुनि व सूतपुत्र कर्ण, हे त्याचे मंत्री आहेत. विदुरासारखा ज्ञाता सोडून या अविचारी मूढांच्या सल्ल्यानें चालणाऱ्या दुर्योधनाचा केवढा हा संमोह ! आतां 'कुरु-सृंजयांचें स्वास्थ्य कसें होईल ?' याचा विचार करूनहि मला कांहीं उपाय दिसत नाहीं. कारण धृतराष्ट्रानें दीर्घदर्शी विदुराला दूर घालवून आमच्या ऐश्वर्याचा अपहार केला आणि आतां तो राजा पुत्रांसह समग्र पृथ्वीचें निष्कंटक राज्य भोगण्याची इच्छा करीत आहे !

संजया, मी वनवासाला गेलों असतां जो कौरवाधिप माझी सर्व संपत्ति स्वतःचीच मानूं लागला, तो शमाची इच्छा करीत असेल हें संभवत नाहीं. कर्ण शस्त्रधारी अर्जुनाला युद्धांत जिंकण्यास समर्थ आहे, असें जर तो मानीत असेल तर त्याचा तो केवल भ्रम आहे. गोग्रहणादि युद्धप्रसंगीं कृतास्त्र पार्थाचा पराक्रम सर्वांनीं पाहिलाच आहे. पूर्वीं अनेक महान् संग्राम झाले, परंतु त्यांत कर्ण कौरवांना आधारभूत होऊन विजयी झाल्याचें केव्हांच कसें आढळलें नाहीं ! अर्जुनासारखा अन्य धनुर्धर नाहीं, हें गंधर्वांकडून पराभूत व बद्ध झालेले कर्ण व दुर्योधन जाणून आहेत. तसेंच द्रोणाचार्य व पितामह भीष्म यांसहि हें विदित आहे. इतर कौरवहि धनंजयाचें सामर्थ्य ओळखून आहेत.

ही गोष्ट सर्व कौरव आणि येथें जे अन्य भूमिपाल जमले आहेत, ते जाणतात. आजपर्यंत दुर्योधनाच्या हातीं राज्य राहिलें, तें शत्रुनाशक अर्जुन येथें विद्यमान नव्हता, त्यामुळेंच होय. पण हें तत्त्व न जाणतां दुर्योधनानें स्वबाहुबलानेंच तें संपादन केलें आहे, असें धृतराष्ट्र मानतो व त्यावरील पांडवांचें स्वामित्व हरण करणें शक्य आहे, असेंहि तो समजत आहे. अर्जुनाचें गांडीव धनुष्य चार हात लांब असून, तो श्रेष्ठ धनुर्धर आहे. जोंवर त्या श्रेष्ठ गांडीवाचा टणत्कार कानीं पडला नाहीं, तोंवरच धार्तराष्ट्र जिवंत आहेत. जोंवर

क्रुद्ध भीमसेन दृष्टीं पडला नाहीं, तोंवरच सुयोधनाला ‘ स्वतःचा हेतु सिद्धीस गेला ’ असें वाटत आहे.

( २ ) हे सूता, वीर भीमसेन, धनंजय व दोघे असहिष्णु माद्रीनंदन जोंवर जिवंत आहेत, तोंवर साक्षात् इंद्रहि आमचें ऐश्वर्य हरण करण्यास उद्युक्त होणार नाहीं. संजया, ‘ पांडवांचें राज्य परत न दिल्यास आपला नाश होईल, यास्तव शम करावा. ’ हा विचार पुत्रांसह तो वृद्ध राजा जर वेळींच मनांत आणील, तर युद्धामध्यें धार्तराष्ट्र पांडवांच्या कोपाग्नीनें दग्ध होऊन नाश पावणार नाहींत. संजया, आम्हीं कशा प्रकारचे क्लेश सहन केले, तें तूं जाणतोसच तसेंच कौरवांनीं पूर्वीं भीमाचें बंधन, जतुगृहदाह इत्यादिकांनीं आमचे कसे अपराध केले व त्यावेळीं आम्हीं धार्तराष्ट्रांशीं किती क्षमाशील वृत्ति ठेविली, हेंहि तुला ठाऊकच आहे. आतां आम्हांला त्यांचा कोणताच संदेश ऐकण्याचीहि गरज नाहीं. तथापि संजया, तूं आम्हांला मान्य आहेस, म्हणूनच मी यत्किंचित्हि अप्रिय भाषण न करतां तुला सांगतों ऐक. तूं म्हणतोस तशी अद्यापिहि शांति होईल. माझें इंद्रप्रस्थाचें राज्य माझ्या स्वाधीन करा व मग दुर्योधन हस्तिनापुरींतील मुख्य साम्राज्याचा खुशाल उपभोग घेवो. ५. २. २६.

---

## अध्याय २७ वा.

[ १ युद्धांत गुरुजनांचा वध करून राज्य मिळविण्यांत अधर्म आहे, असा संजयानें युधिष्ठिराला केलेला उपदेश. ]

( १ ) **संजय**—हे पांडवा, तुझें आचरण सर्वदा धर्मयुक्त असतें, अशी लोकांत प्रसिद्धि आहे व मला तसें प्रत्यक्ष दिसतहि आहे. शिवाय हे महाकीर्तिमान् राजा, जीवितहि अशाश्वत आहे. या अनित्य जीविताचा मोठ्या त्वरेनें क्षय होत असतो, याकडे लक्ष देऊन तूं क्रोधानें कौरवांचा नाश करूं नको. हे अजातशत्रो, कौरवांनीं जर तुझा राज्यविभाग युद्धावांचून देण्याचें नाकारिलें, तर तूं वृष्णि व अंधक यांच्या राज्यांत भिक्षाचरण करावेंस, पण युद्धानें राज्य परत मिळविणें तुला युक्त नव्हे, असें माझें मत आहे.

हे धर्मराजा, मनुष्याचें जीवित अल्पकाल टिकणारें असून नवद्वारांनीं युक्त असलेला हा देह अनित्य, दुःखप्रद व अस्थिर आहे. शिवाय हे पांडवा, युद्धांत बांधवांचा क्षय करून राज्य मिळविणें तुझ्या उज्ज्वल कीर्तीला योग्य

नाहीं, तस्मात् तूं हें पाप करूं नको. हे नरेंद्रा, मूळ विषयवासना धर्माला विघ्न करणाऱ्या आहेत. त्या मनुष्याला आपल्या अधीन करून ठेवीत असतात. परंतु बुद्धिमान् मनुष्य त्यांतील दोष जाणून आरंभींच त्या कामनांना निर्मूल करून सोडितो. त्यामुळें लोकांत त्याला निर्मल कीर्ति प्राप्त होते.

हे पार्था, इहलोकीं धनतृष्णा बंधन करणारी आहे. संपत्तीची इच्छा करणाऱ्या मनुष्याचा धर्मच आधीं बाधित होतो. यास्तव जो धर्माची आकांक्षा करितो तोच पंडित होय. तो ज्ञाता कामनांचा त्याग करून श्रेयाला प्राप्त होतो. परंतु विषयाभिलाषी पुरुष शेवटीं अर्थालाहि मुकतो.

बा युधिष्ठिरा, जो बुद्धिमान् नर सर्व कर्मांमध्यें धर्मच श्रेष्ठ मानतो, तो महाप्रतापी सूर्याप्रमाणें प्रकाशतो. उलटपक्षीं पापबुद्धि धर्महीन पुरुष समग्र पृथ्वी प्राप्त झाली तरीहि दुःखीच असतो. हे धर्मराजा, तूं ब्रह्मचर्याचें पालन करून वेदाध्ययन केलें आहेस. श्रेष्ठ यज्ञ-यागादि करून ब्राह्मणांना विपुल दक्षिणा दिल्या आहेस. सर्व ऐश्वर्यापेक्षां परलोकालाच श्रेष्ठ मानणाऱ्या तूं तेथील अक्षय सुखाच्या इच्छेनें आत्मसमर्पणहि केलें आहेस.

राजा, जो मनुष्य निरंतर स्त्री-पुत्रादि सुखोपभोगांत निमग्न राहून यमनियमादि चित्तवृत्तिनिरोधाचा अभ्यास करीत नाहीं, त्याचा वित्तक्षय झाला असतां तो सुखाला मुकतो व कामवेगानें व्याकुल होऊन चिरकाल दुःखमग्न होऊन रहातो. त्याचप्रमाणें 'परलोकच नाहीं' असें मानणारा, वेदद्वेष्टा, श्रद्धाहीन, नास्तिक पुरुषहि आत्मानुसंधान न करतां अधर्मच आचरितो. तो मंदमति मूढ देहत्यागानंतर परलोकीं क्लेशानें संतप्त होतो.

इहलोकीं आचरिलेलें पुण्य किंवा पापकर्म परलोकीं कदापि नष्ट होत नाहीं. किंबहुना तें कर्म कर्त्याच्या पूर्वीच परलोकांत जाऊन पोंचतें व त्याच्या मागून कर्ता तेथें जातो. मानव आपल्या पुण्यपापरूप कर्मांच्या वश होऊन त्याला अनुसरतो याविषयीं श्रुति प्रमाण आहे. केलेलें कर्म भोगावांचून किंवा आत्मज्ञानावांचून कदापि क्षीण होत नाहीं. प्रायश्चित्तानें पापाचा नाश होतो, अशी जरी प्रसिद्धि असली, तरी ती व्यवहारापुरतीच आहे, परलोकांतील पापफलाचा क्षय करण्यास तें ( प्रायश्चित्त ) समर्थ नसतें.

---

१ 'नाभुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटिशतैरपि' । व 'क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे'॥

राजा, न्यायानें द्रव्यार्जन करून मासिक श्राद्धादि प्रसंगीं ब्राह्मणांना षड्रस अन्न व विपुल दक्षिणा दिली असतां परम पुरुषार्थसाधनरूप फल प्राप्त होतें, तशाप्रकारचें राजसूययज्ञादि पुण्यकर्म तूं केलें आहेस, अशी तुझी प्रसिद्धि आहे. बा कुंतीपुत्रा, इहलोकीं या भारतभूमींतच कर्म केलें जातें. मरणोत्तर परलोकीं यत्किंचित्‌हि कर्म आचरितां येत नाहीं. महात्म्यांनीं ज्याची प्रशंसा केली आहे, तें परलोकीं श्रेयस्कर होणारें अद्भुत कर्म तूं केलें आहेस. परलोकीं जरा, मृत्यु, भय, क्षुधा, तृषा व मनाला अप्रिय असणारे विकार, यांचा पूर्ण अभाव असून केवल सुखोपभोगावांचून तेथें अन्य कांहींहि नाहीं.

हे नरेंद्रा, कर्मफल हें अशाप्रकारचें आहे. हृदयांतील कामना तृप्त करणारें क्षणिक कर्मफल या लोकीं मिळविण्याची तूं इच्छा करूं नको. कारण कामवश होऊन केलेल्या कर्मांचें फल परलोकीं मिळत नसतें. तस्मात् तूं निष्काम कर्म कर. पुनर्जन्माला कारण होणारा क्रोधजन्य नरक व हर्षजन्य स्वर्ग, या दोन लोकांची चिरकाल प्राप्ति करून देणारें कर्म तूं कदापि करूं नको. युद्धांत बांधवांचा नाश करून राज्यलाभांत काय अर्थ आहे ? त्यापेक्षां कामजन्य फलाचा त्याग करून, परम वैराग्यानें युक्त होऊन मोक्षार्थ योगाभ्यासच कर. याप्रमाणें ज्ञानानें कर्मांचा नाश करून तूं कृतार्थ झालास तरी सत्यादिकांचा त्याग करूं नको. अश्वमेधादि कर्में लोकसंग्रहार्थ कर. परंतु पुनः पापकर्मांच्या समीप जाऊं नको.

हे पांडवहो, तुम्ही जर द्वेषरूपानें गोत्रवधरूप पातक करणार असाल तर त्यापेक्षां दीर्घकाल दुःख भोगीत वनांत वास करणेंच धर्म्य आहे. राज्यासाठीं सर्व लोकांचा नाश करण्याची इच्छा करणाऱ्या तुम्हांला दुर्योधनानें वनवासाला पाठविलें, तें योग्यच झालें.

( त्यावेळीं असहाय असल्यामुळें आम्हीं वनवास स्वीकारला. दुर्योधनाच्या आज्ञेनें नव्हे, असें जर म्हणशील तर ) तुम्ही वनवासाचे क्लेश तरी कां सहन केलेत ! हें सर्व सैन्य तुमच्या वश असल्यामुळें तुम्हीं प्रथमच हें राज्य आपल्या स्वाधीन करून घ्यावयाचें होतेंत.

शिवाय तुझे सचिव निरंतर तुझ्या अधीन होतेच. जतार्दन, वीर सात्यकि, मत्स्यराज विराट, पुत्रासह रुक्मरथ आणि तूं जिंकलेले इतर नृपति या सर्वांनीं तुझ्या पक्षाचाच आश्रय केला असता. यास्तव तूं त्यावेळींच कृष्ण व अर्जुन

यांच्या प्रोत्साहनानें महाबलाढ्य साह्यकर्त्या वीरांचा आश्रय करून, स्वसैन्यांत स्थित होऊन, शत्रुसैन्यांतील श्रेष्ठ वीरांना ताप देऊन व त्यांचा नाश करून पूर्वींच धृतराष्ट्रपुत्रांचा गर्व हरण करावयाचा होतास. आतां तेरा वर्षें क्लेश भोगून शत्रूचें बल वाढवून व स्वतःचें बल क्षीण करून अकालीं युद्ध करण्याची इच्छा कां करितोस!

हे पांडवा, जो मूढ व अधर्मज्ञ असतो तोच युद्धानें राज्यलक्ष्मी संपादन करितो. पण जो विद्वान् व धर्मज्ञ असतो, तो युद्ध न करतां ऐश्वर्या-पासून च्युतहि होतो. धर्मबुद्धि पुरुष युद्धासारख्या क्रूर कर्मानें ऐश्वर्य मिळविण्याची इच्छा करीत नाहीं. हे युधिष्ठिरा, तुझी बुद्धि अधर्मामध्यें केव्हांहि प्रवृत्त होत नाहीं. तूं क्रोधवश होऊन आजपर्यंत कोणतेंहि पाप कर्म केलेलें नाहींस, असें असतांना तूं आतांच हें प्रज्ञाविरुद्ध कर्म करण्याची इच्छा कां करीत आहेस! हें युद्धाख्य घोर कर्म करण्याची बुद्धि तुला आतांच कां सुचली, हें मला सांग.

पित्तादि व्याधींवांचूनच कटु, मस्तकामध्यें तिडिक उठविणारें, यशाचा अप-हार करणारें, पापफलाला कारण होणारें व सज्जनांना अप्रिय असलेलें पेय असज्जन मोठ्या आसक्तीनें प्राशन करितात. यास्तव हे महाराज, तूं आपल्या क्रोधाचा त्याग करून शांत हो.

हे पृथापुत्रा, पापाचें मूल असा जो क्रोध, त्याचा कोण आश्रय करील! तुझ्या सारख्या धर्मज्ञाला राज्योपभोगापेक्षां क्षमाच अधिक श्रेयस्कर आहे. या समृद्ध राज्याची इच्छा करणाऱ्या तुझ्या हातून शान्तनव भीष्म व पुत्रासह द्रोणाचार्य यांचा वध होईल. शिवाय कृप, शल्य, सौमदत्ति, विकर्ण, विविंशति, कर्ण, व दुर्योधन यांचाहि युद्धांत नाश झाल्यावर तुला कोणतें सुख प्राप्त होणार आहे, तें मला सांग.

हे राजन्, तुला ही समुद्रवलयांकित पृथ्वी जरी प्राप्त झाली तरी जरा-मृत्यु, प्रिय-अप्रिय व सुख-दुःख हीं सोडणार नाहींत, हें तूं जाणतच आहेस. तस्मात् हे विद्वन्, तूं युद्धाला प्रवृत्त होऊं नको. अमात्यांच्या आग्र-हास्तव तूं जर हें क्रूर कर्म करण्याची इच्छा करीत असशील, तर तुझें सर्व ऐश्वर्य परत मिळविण्याचें कार्य त्यांच्याकडेच सोंपवून तूं वनांत निघून जा.

गोत्रद्रोहासारखें हिंसायुक्त कर्म करून अर्चिरादि मार्गापासून च्युत होऊं नको. ५. २. २७.

## अध्याय २८ वा.

[ १ मी 'धर्मानेंच माझ्या भागाची इच्छा करितों. अधर्मानें मला देवांच्या राज्याचीहि इच्छा नाहीं' असें युधिष्ठिराचें भाषण. ]

( १ ) **युधिष्ठिर**—संजया, कर्मापेक्षां धर्म श्रेष्ठ आहे, हें तुझें म्हणणें निःसंशय सत्य आहे. परंतु मी धर्मानें वागतों किंवा अधर्माचरण करतों, याचा आधीं निश्चय करून मग तूं मला दोष दे. धर्माधर्मांच्या निर्णयाचे तीन प्रकार आहेत. दंभादिकांनीं युक्त असलेल्या पुरुषांतील अधर्म म्हणजे शत्रुनाशादिकासाठीं केलेला मंत्रजपादि, हा धर्मच आहे, असें दुसरे लोक जाणतात. दत्तात्रेयादि प्रच्छन्न योग्यांतील राग-द्वेषादिशून्यतारूप योगधर्महि उन्मत्तवत् आचरणामुळें बाह्यदृष्ट्या अधर्मरूप दिसतो आणि वसिष्ठादिकांचा धर्म धर्मरूपच असतो.

यास्तव हे संजया, तूं माझ्या ठिकाणीं या तीन प्रकारच्या धर्मांतील कोणता धर्म स्थित आहे, याचा विचार कर. कारण विद्वान् आपल्या सूक्ष्मबुद्धीनेंच धर्माधर्मांचा निश्चय करीत असतात. पूर्वोक्त धर्माधर्मपरीक्षेच्या तीन प्रकारांतील पहिले दोन प्रकार प्रच्छन्न असल्यामुळें त्यांच्या स्वरूपाचा निश्चय दीर्घकालानें होतो. शेवटच्या तिसऱ्या प्रकाराचें स्वरूप जरी स्पष्ट असलें, तरी आपत्कालवशात् त्याच्या स्वरूपांत बदल होतो.

स्वाध्याय-प्रवचनादि हें ब्राह्मणाच्या धर्माचें प्रत्यक्ष स्वरूप आहे. शौर्यादि हें क्षत्रियाच्या व कृष्यादि हें वैश्याच्या धर्माचें स्वरूप आहे. आपत्कालाच्या अभावीं त्यांचे धर्माधर्मादि नित्यवृत्ति असतात. पण आपत्कालीं त्यांच्या स्वरूपाचा व्यत्यास होतो. म्हणजे त्यांचें स्वरूप बदलतें. जसें—आपत्कालीं ब्राह्मण व वैश्य यांचा क्षत्रलिंग हा धर्म होतो, पण आपत्ति नसतांना तोच त्यांचा अधर्म होतो. यावरून एका वर्णाचें चिह्न इतर वर्णाचे ठिकाणीं अवस्थाभेदामुळें नित्य धर्मत्व व अधर्मत्व यांस प्राप्त होतें. पण त्यांतहि असा विशेष आहे. याजन, अध्यापन व प्रतिग्रह हें ब्राह्मणधर्माचें नित्य लिंग आहे. त्यामुळें क्षत्रियानें तें आपत्तीमध्येंहि करूं नये.

---

१ या अर्चिरादिमार्गालाच देवयान किंवा उत्तरायणमार्ग म्हणतात. अप्रतीकोपासक या मार्गानेंच ब्रह्मलोकीं जातात व त्या लोकापासून ते पुनः या लोकीं परत येत नाहींत. सु. ब्र. अ. ४ पृ. ४४८ पहा.

संजया, अशाप्रकारचा हा आपद्धर्म तूं शास्त्रावरून समजून घे. [ असें ज आहे, तर ' तुम्हीं ब्राह्मणांना असाधारण धर्म म्हणून विहित असलेलें भिक्षाटन कसें केलेंत ! ' असें म्हणशील तर सांगतों ऐक. ] भूमि, शस्त्र इत्यादि हें क्षत्रियाच्या जीविकेचें साधनभूत धन आहे. धन, पशु इत्यादि हें वैश्याचें जीविकासाधन आहे. पण आम्हांजवळ असलेलें तें दोन्ही प्रकारचें जीविकासाधन सर्वथा नष्ट झालें असतांना ज्याच्या योगानें संध्योपासनादि कर्म करतां येईल, तें भिक्षाटनादिकहि करणें, हें आम्हांला त्या वेळीं कालप्राप्तच होतें. कारण आम्हीं त्यावेळीं जर भिक्षाटन केलें नसतें, तर उपजीविकेच्या अभावीं आमच्या नित्यकर्मांचा लोप व प्राणांचा नाश झाला असता. यास्तव अत्यंत आपत्तीमध्यें अब्राह्मणांनींहि तेवढा ब्राह्मणधर्म स्वीकारण्यांत कांहीं दोष नाहीं.

पण आपत्तीमध्यें नसलेला जो कोणी लोभानें आपद्धर्माला अनुसरतो, तो जसा निंद्य होतो, तसाच जो आपत्तीमध्येंहि स्वधर्मालाच अनुसरतो, तोहि स्वजीवितलोप व कुटुंबहिंसा या दोन कारणांनीं निंद्य होतो. ज्याअर्थीं विधात्यानें आपल्या ब्राह्मण्याचा नाश होऊं नये, अशी इच्छा करणाऱ्या ब्राह्मणांना क्षत्रियादिकांच्या साधनानें उपजीविका करावयास सांगून आपत्तींतून उत्तीर्ण झालेल्या त्यांना प्रायश्चित्ताचें विधान केलें आहे, त्याअर्थीं आपत्तीमध्यें अन्य वर्णाच्या पुरुषालाहि अन्य वर्णाच्या धर्माचा आश्रय करणें विहितच आहे, असा निश्चय होतो. तस्मात् आम्हीं एकचक्रानगरींत केलेलें भिक्षाटन अनुचित ठरत नाहीं.

यास्तव हे संजया, आपत्काल नसतांना स्वकर्मांत स्थित होऊन आपत्कालींच आम्हीं जें ब्राह्मणकर्म आचरिलें तें योग्यच होतें. तुला जर निंदाच करावयाची असेल तर ती आपत्तीमध्येंहि स्वकर्मामध्यें स्थित होऊन आपली व इतरांची हिंसा करणाऱ्या किंवा आपत्ति नसतांना इतर वर्णाच्या कर्माचें अनुष्ठान करणाऱ्या अति लोभ्यांची निंदा कर. आम्ही पांडव सर्वथा तुझ्या निंदेस पात्र नाहीं.

शिवाय मनाचा नाश करण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषांना बुद्धिसत्त्वाचें चिदात्म्याशीं झालेल्या तादात्म्याचा विच्छेद करण्यासाठीं शिष्टांच्या गृहांतून आपल्या जीविकेचें साधन भिक्षाचर्यानें मिळविण्याविषयीं शास्त्रांत विधान

आहे. ही ब्राह्मी वृत्ति कोणालाहि निषिद्ध नाहीं. जे अब्राह्मण असूनहि विद्यानिष्ठ नसतात, त्यांच्यासाठीं भिक्षाचर्य विहित नाहीं. त्यांना त्यांचा त्यांचा धर्मच विहित आहे व तो आपत्ति व तिचा अभाव या दोन्ही कालीं त्यांना हितावह होतो.

संजया, यज्ञाची इच्छा करणारे आमचे पितर व पूर्वपितामह याच मार्गाला अनुसरले होते, हें प्रसिद्धच आहे. कर्म न करणारे संन्यासी त्याच मार्गानें जातात. यास्तव स्वतःला आस्तिक मानणाऱ्या मींहि तोच मार्ग स्वीकारिला आहे. त्याहून अन्य मार्ग मी जाणत नाहीं.

[ युधिष्ठिर आतां स्वतःचें स्वभाववर्णन करीत म्हणतो—] हे संजया, या समग्र पृथ्वींतील सर्व वित्त, देवांचें श्रेष्ठ राज्य, प्राजापत्य पद, स्वर्गलोक किंवा ब्रह्मलोक यांतील कोणतेंहि ऐश्वर्य अधर्मानें संपादन करण्याची मला इच्छा नाहीं. [ स्वतःचें श्रीकृष्णाधीनत्व दर्शवितो—] श्रीकृष्ण धर्मफलाचा दाता आहे. तो कुशल व नीतिमान् असून ब्राह्मणांची उपासना करणारा विद्वान् आहे. कृष्ण महाबलाढ्य विविध भूपालांचें अनुशासन करीत असतो.

यास्तव मीं जर तुम्हांला इष्ट असलेल्या सामाचा त्याग केला तर निंद्य होईन. तसेंच युद्ध करीत असतांना स्वधर्माचा त्याग केला तरी निंद्यच होईन. तस्मात् मला साम व स्वधर्म हीं दोन्ही इष्टच आहेत. याप्रसंगीं महायशस्वी वासुदेवच आम्हां उभयतांस हितावह असे अर्थकाम सांगो. हा सात्यकि, हे अंधक, वार्ष्णेय, भोज, कुकुर व सृंजय केशवाच्या मताला प्रमाण मानून शत्रूचा निग्रह करितात व सुहृदांचा हर्ष वाढवितात.

कृष्णाच्या उपदेशाप्रमाणें वागणारे हे उग्रसेनादि सर्वच वृष्णि-अंधक इंद्रतुल्य आहेत. ते यादव विद्वान्, सत्यपरायण, महाबलाढ्य व ऐश्वर्यसंपन्न आहेत. वासुदेवाचा कनिष्ठ भ्राता काश्य बभ्रु हा आपल्या भ्रात्याच्या नियंत्रणामुळें श्रेष्ठ ऐश्वर्याला प्राप्त झाला आहे. ग्रीष्म ऋतु संपला असतां प्रजेवर पर्जन्यवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें कृष्ण त्याच्या सर्व कामना पूर्ण करितो.

हे गावल्गणे, हा केशव अशाप्रकारचा विद्वान् आहे. तो सर्व कर्मांचा निश्चय जाणणारा आहे, असें समज. हा कृष्ण अत्यंत सज्जन असून आम्हांला अतिशय प्रिय आहे. या केशवाच्या वचनाचें आम्ही कदापि अतिक्रमण करणार नाहीं. ५. २. २८.

---

## अध्याय २९ वा.

[ १ वासुदेवाचें भाषण. २ चातुर्वर्ण्याचें कर्तव्य. ३ कौरवांचा निषेध व वासुदेवाचा हस्तिनापुरीं येण्याविषयींचा संदेश. ]

( १ ) **वासुदेव**—हे संजया, पांडवांचा विनाश न होतां त्यांचा उत्कर्ष व प्रिय व्हावें, त्याचप्रमाणें धृतराष्ट्राच्या अनेक पुत्रांचीहि वृद्धि व्हावी, अशीच माझी इच्छा आहे. यास्तव हे सूता, तुम्ही शम करा, असेंच त्यांस नित्य सांगावें, याच्या विपरीत सांगूं नये, अशीच माझी मनीषा आहे. पांडवांच्या समक्ष युधिष्ठिराच्या मुखानें मी हेंच ऐकत आहें व मलाहि तें मान्य आहे. परंतु हे संजया, या ज्येष्ठ पांडवानें प्रदर्शित केलेला शम मात्र अतिशय दुष्कर आहे. कारण हा धृतराष्ट्र राज्यामध्यें फार लोलुप झाला आहे. तेव्हां या कुरुकुमारांत कलह कां उद्भवूं नये !

संजया, हा युधिष्ठिर किंवा मी धर्मापासून च्युत झालों आहों, असें तुला कदापि आढळणार नाहीं. असें असतां स्वकर्माचें पालन करणाऱ्या या उत्साही पांडवाला तूं दोष कसा देतोस ! तो प्रख्यात गृहस्थाश्रमांत स्थित आहे. तेव्हां 'त्याच्या धर्माचा लोप झाला आहे,' असें म्हणण्याचा तुला काय अधिकार ! या कुटुंबाश्रमांत शुचि, अद्रोही व पवित्र प्रदेशीं यथाविधि आसन घालून यावज्जीव स्वाध्याय करणारा गृहस्थहि श्रेष्ठ आहे. या गार्हस्थ्याविषयीं ब्राह्मणांच्या उच्च-नीच भावना आहेत. त्यानें गृहस्थाश्रमी असूनहि परिग्रह करूं नये, नैष्ठिक ब्रह्मचर्याचा स्वीकार करावा, अथवा संन्यास करावा, असे अनेक विकल्प संभवतात. कारण जनकादिकांना कर्मानेंच सिद्धि मिळाली, असें कित्येक म्हणतात आणि कर्म, प्रजा व धन यांतील एकाहि साधनानें साक्षात् मोक्ष मिळत नाहीं. तर केवल त्यागानेंच अमृतत्व प्राप्ति होते, असेंहि कित्येक म्हणतात.

याप्रमाणें कुटुंबांतील अवस्थान व संन्यास या दोहोंचेंहि शास्त्रानें एक सारखेंच विधान केलें आहे. तथापि आश्रमान्तरानें साध्य होणारें ज्ञान गृहस्थालाहि साधतां येणें शक्य आहे. पण गृहस्थाश्रमांतच साध्य होणारे यज्ञादि धर्म इतर आश्रमांत साध्य नाहींत. त्यामुळें समग्र धर्म गृहस्थाश्रमांतच प्राप्त होतो, यांत कांहीं शंका नाहीं. कारण ब्रह्मतत्त्वज्ञहि भोजनावांचून तृप्त होत नाहीं. ब्राह्मण व संन्यासी यांचें भोजनादिक गृहस्थांच्या घरांतच विहित आहे.

शिवाय ज्या विद्या कर्मांना अनुकूल असतात, त्याच फलद्रूप होतात. कर्मप्रतिकूलविद्या फलद्रूप होत नाहींत. भूतांच्या उत्पत्ति, स्थिति व लय या चिह्नांवरून जगत्कारणत्वानें निश्चित होणाऱ्या प्राणाख्य परमात्म्याच्या विद्येला प्रस्तावकर्मसाधकत्व आहे, हें आपण प्रत्यक्ष पहातों. यावरून कर्मसाधक विद्यांचेंच फल मिळतें. स्वतंत्र विद्यांचें फल कांहीं नाहीं. संजया, गृहस्थ स्वतःचा व इतर पितरादिकांचा उद्धार करितो व यतींचेंहि पोषण करितो. पण यति स्वतःलाच तारितो, पित्रादिकांना तारीत नाहीं. तो भिक्षोपजीवी असल्यामुळें स्वतःचेंहि स्वतःच पोषण करूं शकत नाहीं. यास्तव गार्हस्थ्यच श्रेष्ठ आहे. शिवाय नैष्कर्म्य दृष्ट फलाच्याहि विरुद्ध आहे. कारण कर्म व कर्माभाव यांच्या तारतम्याविषयीं विचार करूं लागलें असतां कर्म दृष्टफल आहे, असाच निश्चय होतो. तें आपलें फल या लोकींच देतें. तृषेनें आर्त झालेला पुरुष जलप्राशन करून शांत होतो.

हा ज्ञानविधि कर्मासह विहित आहे. त्याचें अनुष्ठान केलें असतां कर्माचा उच्छेद होतो. असें असतांना जो पुरुष ' कर्माहून शम श्रेष्ठ आहे ' असें मानितो, त्या दुर्बलाचें तें भाषणहि व्यर्थ आहे. [ ज्ञानकर्मसमुच्चयाची स्तुति करितो—] हे सर्व देव कर्मामुळेंच स्वर्गलोकांत प्रकाश पावत आहेत. कर्मानेंच वायु वहातो. रात्र व दिवस यांचा विभाग करणारा सूर्य कर्मानेंच निरलसपणें नित्य उदय पावतो. चंद्रहि कर्मानेंच मास, पक्ष, नक्षत्र, योग, इत्यादिकांचें दक्षतेनें आक्रमण करितो.

इंधनानें समिद्ध झालेला अग्नि प्रजेचें कार्य करीत सतत प्रज्वलित होतो. कर्मामुळेंच पृथ्वी हा सर्व प्रचंड भार सदैव धारण करिते, नद्या मोठ्या त्वरेनें जल वाहून नेतात व सव प्राण्यांना तें अर्पण करून तृप्त करतात. मेघ अंतरिक्ष व दिशा यांना नादित करीत निरलसपणें वृष्टि करितो. इंद्रानें देवतांचें श्रेष्ठत्व मिळविण्यासाठीं सतत ब्रह्मचर्याचें पालन केलें. त्या शक्रानें मनाचें प्रिय व सुख यांचा त्याग करून, त्या कर्मानेंच श्रेष्ठत्व संपादन केलें. तो मघवन् अप्रमत्तपणानें सत्य धर्माचें पालन करून दम, तितिक्षा, समता व प्रिय या गुणांचें सेवन करून प्रमुख देवराज्याला प्राप्त झाला.

त्याचप्रमाणें बृहस्पतीनें समाहित व शुद्धचित्त होऊन ब्रह्मचर्य आचरिलें. त्यानें इंद्रियनिग्रह करून सुखाचा जेव्हां त्याग केला तेव्हांच तो देवांच्या गुरुत्वाला

पात्र झाला. तशींच हीं नक्षत्रें स्वकर्मांमुळेंच स्वर्गांत चमकत आहेत. हे सूता, रुद्र, आदित्य, इंद्र, विश्वेदेव, यमराजा, वैश्रवण कुबेर, गंधर्व, यक्ष, अप्सरा आणि ब्रह्मविद्या व ब्रह्मचर्य यांत स्थित असलेले ऋषि कर्मानेंच परलोकांत आपल्या तेजानें प्रकाशत आहेत.

हे संजया, विप्रश्रेष्ठ, क्षत्रिय व वैश्य या सर्व लोकांचे धर्म तूं जाणतोस. तूं ज्ञानी आहेस, असें असतां कौरवांचा पक्ष घेऊन तूं असें कसें बोलतोस ! हा युधिष्ठिर नित्य वेदाभ्यासांत निमग्न असून अश्वमेध व राजसूय यांतहि नियुक्त झालेला आहे. त्याच्या ठिकाणीं धर्म व शौर्य हीं दोन्ही वास करितात. त्याच्यापाशीं हत्ती, अश्व, रथ, व धनुष्य-कवचादि विपुल शस्त्रास्त्रें आहेत. त्याला जिंकणें कोणालाहि शक्य नाहीं. तथापि तो धार्मिक असल्यामुळें कदापि हिंसा करीत नाहीं. कौरवांचा वध केल्यावांचून जर पार्थांना राज्यप्राप्तीचा उपाय कोणीं सांगितला तर त्यांत धर्मरक्षणच होईल आणि भीमसेनाचा निग्रह करून त्याला जर अहिंसेंत नियुक्त केलें तर तेंहि पुण्यकार्यच होईल.

उलटपक्षीं यथाशक्ति स्वकम आचरणाऱ्या या पांडवांना क्षत्रधर्माचें पालन करीत असतां दुर्दैवानें युद्धांत जर मृत्यु आला, तर त्यांचें तें निधनहि प्रशस्तच होईल. संजया, ' शमच करावा ' असें जर तुला वाटत असेल, तर क्षत्रियांची स्वधर्मनिष्ठा युद्ध करण्यांत आहे किंवा युद्ध न करण्यांत आहे, याचा तूं प्रथम निर्णय कर. मग मी तुझें म्हणणें मान्य करीन. संजया, तूं अगोदर चातुर्वर्ण्याचा विभाग आणि स्वकर्म यांकडे लक्ष दे, पांडवांचें कर्म ऐकून घे आणि नंतर तुला योग्य वाटेल त्याप्रमाणें त्यांची निंदा किंवा प्रशंसा कर.

( २ ) ब्राह्मणानें अध्ययन व यजन करावें, दान द्यावें व घ्यावें, प्रमुख तीर्थांचें सेवन करावें. अध्यापन करून दुसऱ्यांकडून याग करवावे. प्रतिग्रहाचा स्वीकारहि त्यांना विहित आहे. त्याचप्रमाणें क्षत्रियानें प्रजेचें रक्षण करावें. अप्रमत्तपणें धर्मानें दान द्यावें. यज्ञ व सर्व वेदांचें अध्ययन करावें आणि भार्यापरिग्रह करून पुण्याचरण करीत गृहस्थाश्रम स्वीकारावा. त्यायोगें तो धर्मात्मा धर्म व पुण्य संपादन करितो व त्याला इच्छा असली तर तो क्षत्रिय धर्मबलानें ब्रह्मलोकीं जातो किंवा जनकादिकांप्रमाणें इहलोकींच कृतकृत्य होतो. असा हा भोग व मोक्ष देणारा क्षात्रधर्म दुस्त्यज आहे.

वैश्यानें वेदाध्ययन करून कृषि-गोरक्ष-वाणिज्य करावें आणि संपादन केलेल्या वित्ताचें अप्रमत्तपणें संरक्षण करावें. ब्राह्मण व क्षत्रिय यांचें प्रिय करणाऱ्या धर्मशील वैश्यानें पुण्याचरण करून गृहस्थाश्रमी व्हावें. शूद्रानें द्विजांची परिचर्या करून त्यांना वंदन करावें. त्यानें वेदाध्ययन किंवा यज्ञ करूं नये. याप्रमाणें स्वतःच्या उत्कर्षांत निरलसपणें तत्पर असणाऱ्या शूद्रासाठीं हा पुरातन शूद्रधर्म स्मृत आहे.

ज्याप्रमाणें सर्व आश्रमांच्या पालकत्वामुळें गृहस्थाला श्रेष्ठत्व आहे, त्याप्रमाणें सर्व वर्णांच्या पालकत्वामुळें धर्मानें राज्य करणें हें अति श्रेष्ठ कर्म आहे. कारण वर्णाश्रमाचें रक्षण करणारा, प्रजापालनांत दक्ष असणारा, सर्व वर्णांना स्वधर्मांत नियुक्त करणारा व सर्व प्रजांशीं समबुद्धीनें वागणारा, निष्काम राजा सर्व मानवजातीमध्यें श्रेष्ठ होय. हे सर्व राजधर्म युधिष्ठिरामध्यें आहेत. त्याच्यामध्यें अधर्माचा लेशहि नाहीं, हें तूं निश्चयानें जाण. या श्रेष्ठ पांडवाहून अधिक ज्ञाता पुरुष जर त्याच्याकडे आला व याला ज्ञात नसलेला अधिक श्रेष्ठधर्म सांगूं लागला तर तो त्याचेंहि म्हणणें मान्य करून त्याप्रमाणें वर्तन करील, याविषयीं मुळींच संशय नाहीं.

( ३ ) संजया, युद्ध हें कर्म उत्पन्न कसें झालें, तें मी तुला सांगतों. एखादा चोरासारखा दुष्ट राजा दैवाच्या प्रातिकूल्यामुळें दुसऱ्याच्या ऐश्वर्याची इच्छा करूं लागला, तर धार्मिक राजाला तो वध्य होतो. राजांचें परस्पर युद्ध उत्पन्न होण्याचें हें कारण आहे. दुर्योधन अतिशय दुष्ट राजा आहे. तो विधीच्या प्रकोपामुळें पांडवांच्या ऐश्वर्याचा अपहार करण्याची इच्छा करीत आहे. त्यामुळें या धर्मनिष्ठ राजाला तो वध्य झाला आहे. इंद्रानें या युद्धाख्य कर्माच्या अनुषंगानेंच कवच, खड्गादि शस्त्रें व धनुष्य या तीन वस्तु चोरांच्या वधासाठीं उत्पन्न केल्या आहेत. यास्तव देवेंद्रानें उत्पन्न केलेल्या युद्धाख्य कर्मांचा व कवचादि साधनांचा आश्रय करून युधिष्ठिरानें या प्रच्छन्न बांधवरूप दुर्योधन चोराचा जर नाश केला, तर तो त्याचा धर्मच होईल. त्यापासून या महाराजाला अधर्म स्पर्शहि करणार नाहीं.

हे संजया, धर्म न जाणणाऱ्या अप्रबुद्ध कौरवांनीं अशाप्रकारच्या तीव्र स्वरूपाचा दोष प्रकट केला आहे, हें योग्य नव्हे. पुत्रांसह राजा धृतराष्ट्रानें पांडवांना पित्यापासून धर्मानें प्राप्त झालेलें राज्य अकस्मात् हरण केलें, त्यानें

सनातन राजधर्माकडे दृष्टि दिली नाहीं आणि हे सर्व कौरव त्यालाच अनुसरले. हे सूता, चोरीचे दोन प्रकार आहेत. चोर गुप्तपणें धनाचें हरण करितात किंवा उघडपणें बलात्कारानें त्याचा अपहार करितात. हे दोन्ही मार्ग निंद्य आहेत. परंतु धृतराष्ट्राच्या पुत्रांनीं या दोहोंचेंहि अवलंबन केलें आहे. ( त्यांनीं या पांडुपुत्रांना गुप्तपणेंहि पीडा दिली आहे व उघडहि त्यांचे अपराध केले आहेत. )

दुर्योधनानें कपटानें राज्यापहार केला. तेव्हां 'वनवासानंतर आपलें राज्य परत मिळावें,' या हेतूनें ठेव म्हणून ठेवलेलें पांडवांचें राज्य त्यांना आतां परत कां मिळूं नये ? त्या आमच्या राज्याचा कौरवांनीं अपहार कां करावा ? या आमच्या पितृराज्यासाठीं युद्ध करीत असतांना आमचा वध जरी झाला तरी तोहि श्लाघ्यच होय. कारण परराज्यापेक्षां पूर्वजांच्या राज्याची प्राप्ति विशिष्ट आहे.

हे संजया, कौरवांच्या राजसभेमध्यें तूं हे सर्व सनातन धर्म कथन कर. धार्तराष्ट्रानें हे सर्व मदानें मृत्युवश झालेले मूढ नृपाल साह्यार्थ जमा केले आहेत. शिवाय त्यांच्या आणखींहि पापकर्मांचें स्मरण कर. कौरवांचें द्यूतसभेंतील आचरण लक्षांत घे. सच्छील व सदाचार यांनीं युक्त असलेली पांडवांची प्रिय भार्या यशस्विनी द्रौपदी दुःशासनाच्या बलात्कारामुळें सभेंत आली असतां भीष्मादि प्रमुख कौरवांनीं तिची उपेक्षा केली.

त्यावेळीं तेथें जमलेल्या सर्व कुमारांसह वृद्ध कौरवांनीं जर दुःशासनाचें या पापकर्मांपासून निवारण केलें असतें तर त्यायोगें त्यांनीं व स्वतः धृतराष्ट्रानें माझें प्रिय व दुर्योधनादि पुत्रांचें कल्याण केलें असतें. परंतु ज्याअर्थीं त्यांनीं किंवा त्यानें दुःशासनाच्या त्या निंद्य कर्माचा प्रतीकार केला नाहीं व माझें अप्रिय केलें, त्याअर्थीं त्याच्या पुत्रांचा आतां निःसंशय नाश होईल !

संजया, दुःशासनानें कृष्णेला श्वशुरांच्या समक्ष जेव्हां राजसभेंत बलात्कारानें नेलें, तेव्हां तिनें दीनाप्रमाणें करुण दृष्टीनें सर्वांकडे पाहिलें, परंतु एका विदुरावांचून दुसरा कोणीहि तिला त्राता दिसला नाहीं. त्या सभेंत जमलेले सर्व भूपाल वेतनलोभानें व दैन्यानें कौरवांच्या विरुद्ध एक शब्दहि बोलूं शकले नाहींत. धर्म व अर्थ जाणणारा एकटा धर्मज्ञ विदुरच काय तो त्या मंदमति दुर्योधनाचा प्रतिषेध करण्यास समर्थ झाला. हे संजया, सभेंतील या सर्व

प्रकारांकडे लक्ष न देतां तूं पांडवांनाच उलट धर्माचा उपदेश करण्याची इच्छा कशी करितोस ! तुझें हें कृत्य न्याय्य आहे कीं काय, याचा तूंच आपल्याशीं विचार कर.

त्या सभेमध्यें जाऊन साध्वी कृष्णेनेंच अतिशय दुष्कर पुण्य कर्म केलें आणि सागराच्या ओघांतून उद्धार करणाऱ्या नौकेप्रमाणें त्या मानिनीनें पांडवांचा व स्वतःचा त्या संकटांतून उद्धार केला. भीष्मादि श्वशुरांच्या समीप स्थित असलेल्या कृष्णेला सूतपुत्र जें निंद्य वचन बोलला तें तूंहि ऐकलें आहेस. " हे याज्ञसेनि, तुला आतां अन्य गति राहिली नाहीं, तूं आतां दुर्योधनाची दासी झाली आहेस, यास्तव त्याच्या मंदिरांत जाऊन गृहकार्य कर. तुझे पति पराभूत झाले आहेत. ते आतां तुझे पतिच नव्हेत. यास्तव हे भाविनि, तूं आतां अन्य पति वर. "

कर्णाचा हा कठोर शब्दरूपी तीक्ष्ण शर अर्जुनाच्या हृदयांत त्याच्या अस्थींचा व मर्माचा छेद करीत राहिला आहे.

हे पांडव कृष्णाजिनें परिधान करीत असतांना दुःशासन त्यांना अशीं कर्णकटु वचनें बोलला—" हे सर्व पांडव निष्फल तिल आहेत; त्यांचा नाश झाला आहे; ते क्षय पावले आहेत; ते दीर्घकाल नरकांत पडले आहेत. " गांधारराज शकुनि कपटद्यूताच्या प्रसंगीं ' युधिष्ठिरा, तुला अतिशय आनंद देणाऱ्या या तुझ्या कनिष्ठ भ्रात्याला मीं जिंकून घेतलें आहे. आतां तुजपाशीं कोणतें द्रव्य शिल्लक राहिलें आहे ! तूं आतां याज्ञसेनी कृष्णेचा पण लावून द्यूत खेळ. ' असें मर्मभेदक दुर्वचन बोलला.

संजया, मीं आतां सांगितलेलीं द्यूताच्या वेळचीं हीं सर्व निंद्य वचनें तूं प्रत्यक्ष ऐकलींच आहेस. तथापि हें नष्ट झालेलें कार्य पुनः साधण्यासाठीं मी स्वतःच हस्तिनापुरास जाण्याची इच्छा करीत आहें. पांडवांच्या अर्थाचा नाश होऊं न देतां मला जर या कुरुकुमारांचा शम साधतां आला आणि मी जर हें महत्कार्य करूं शकलों, तर मीं फार मोठें पुण्यप्रद कर्म केलें, असेंच होईल. शुक्राच्या नीतीला व धर्माला अनुसरणारी, स्वार्थसिद्धि करणारी व अहिंस्र अशी माझी शुभ वाणी जर धृतराष्ट्राच्या पुत्रांनीं मान्य करून तिचा योग्य विचार केला व तेथें समक्ष गेलेल्या माझा सत्कार केला तरच ते मृत्युपाशांतून सुटतील !

पण त्यांनीं माझ्या भाषणाचा विचार न करितां माझा जर अवमान केला तर रथी अर्जुन व युद्धासाठीं सज्ज झालेला भीम यांच्या हातून धृतराष्ट्रपुत्र ऐश्वर्यभ्रष्ट होऊन नाश पावतील. ते पापी धार्तराष्ट्र आपल्या पापानेंच दग्ध झाले आहेत, असें तूं समज. द्यूतामध्यें पराभूत झालेल्या पांडवांना दुर्योधन जे मर्मभेदक व निष्ठुर शब्द बोलला, त्याचें स्मरण हा गदाधर भीमसेन त्याला योग्य वेळीं देईल ! !

सुयोधन क्रोधमय महावृक्ष आहे, कर्ण त्याचा स्कंध असून शकुनि शाखा आहे. दुःशासन समृद्ध पुष्पफळें व मूढ धृतराष्ट्रराजा त्याचें मूळ आहे. इकडे युधिष्ठिर हा धर्ममय महाद्रुम आहे. अर्जुन हा त्याचा स्कंध, भीमसेन त्याच्या शाखा व माद्रीपुत्र समृद्ध पुष्पफलें असून मी, वेद व ब्राह्मण, हें त्याचें मूळ आहे. [ धृतराष्ट्रपुत्रांचा नाश झाल्यास एकटा धृतराष्ट्रच शोच्य होईल. पण पांडवांचा नाश झाल्यास आम्हीं तिघे शोच्य होऊं. पण मी, वेद व ब्राह्मण यांचा उच्छेद होणें शक्य नाहीं हें तुझ्या लक्षांत असूं दे. ]

संजया, पुत्रांसह राजा धृतराष्ट्र हें वन आहे व पांडव त्यांतील व्याघ्र आहेत. यास्तव व्याघ्रांसह वनाचा उच्छेद करूं नको व व्याघ्रांचाहि नाश करूं नको. कारण वनरहित व्याघ्रांचा वध होत असतो आणि व्याघ्ररहित वनहि तोडलें जातें. तस्मात् व्याघ्रांनीं वनाचें रक्षण करावें व वनानें व्याघ्रांचें पोषण करावें, हेंच उचित होय.

धृतराष्ट्राचे पुत्र लतांसारखे असून पांडव शालवृक्षांसारखे आहेत. महाद्रुमाचा आश्रय न केलेली लता जशी कधींहि वृद्धि पावत नाहीं, त्याप्रमाणें पांडवांच्या आश्रयानेंच धार्तराष्ट्र जिवंत राहतील. त्यावांचून त्यांचें जीवन अशक्य आहे.

सारांश, हे शत्रुनाशक पार्थ धृतराष्ट्राची शुश्रूषा करण्यासहि तयार आहेत व युद्धालाहि सज्ज आहेत. यास्तव राजा धृतराष्ट्राला जें योग्य दिसेल तें त्यानें

---

१ वनं राजा धृतराष्ट्रः सपुत्रो व्याघ्रास्ते वै सञ्जय पाण्डुपुत्राः ।
मा वनं छिन्धि सव्याघ्रं मा व्याघ्रा नीनशन्वनात् ॥
निर्वनो वध्यते व्याघ्रो निर्व्याघ्रश्छिद्यते वनम् ।
तस्माद्व्याघ्रो वनं रक्षेद्वनं व्याघ्रं च पालयेत् ॥
लताधर्मा धार्तराष्ट्राः शालाः सञ्जय पाण्डवाः ।
न लता वर्धते जातु महाद्रुममनाश्रिता ॥

करावें. धर्माचरण करणारे महात्मे पांडव शमामध्येंहि स्थित आहेत व युद्ध करण्यासहि समर्थ आहेत. तस्मात् हे विद्वन्, तूं कौरवांना असेंच जाऊन सांग. ३. ५. २९.

---

## अध्याय ३० वा.

[ १ संजयानें प्रयाणार्थ घेतलेली अनुज्ञा. २ युधिष्ठिरानें केलेली संजयाची प्रशंसा व त्याला सर्वांचें कुशल विचारण्याची आज्ञा. ३ दुर्योधनाला इंद्रप्रस्थ परत देण्याचा संदेश. ]

( १ ) **संजय**—हे नरदेवश्रेष्ठा पांडवा, मी तुमची अनुज्ञा घेऊन आतां जातों. तुमचें स्वस्ति असो. बोलण्याच्या आवेशांत माझ्या मुखांतून एखादी दुरुक्ति किंवा कठोर शब्द निघून गेला नाहींना ? भान न राहून मी जर कांहीं अप्रिय वचन बोललों असलों, तर आपण सर्व मला त्याबद्दल क्षमा करा. जनार्दन, भीमार्जुन, उभय माद्रीसुत, सात्यकि व चेकितान या सर्वांची अनुज्ञा घेऊन मी जात आहें, तुमचें कल्याण असो. हे नृपहो, मजवर कृपादृष्टि ठेवा.

( २ ) **युधिष्ठिर**—हे विद्वन्, तुला आमची अनुज्ञा आहे. तूं सुखानें परत जा. आम्हीं तुझें कांहीं अप्रिय केल्याचें तुला स्मरत नाहीं ना ? हे संजया, आम्ही सर्व तुला शुद्धात्मा व सभेंतील मध्यस्थ समजतों. तूं शीलसंपन्न, संतुष्ट व हितवचन सांगणारा आहेस, तुझ्यासारखा आप्त दूत आम्हांला फार प्रिय आहे. तुझी बुद्धि कदापि मोहित होत नाहीं. तूं दुरुक्तीनेंहि कदापि क्रुद्ध होत नाहींस. तूं मर्मभेदक, कर्णकटु, रूक्ष व नीरस भाषण केव्हांहि करीत नाहींस. हे सूता, तूं नेहमीं धर्मार्थयुक्त, रसाळ व प्रेमळ वचन बोलत असतोस. हे दूता, तूंच आम्हांला अतिशय प्रिय आहेस. एक तूं किंवा दुसरा विदुर यांनींच येथें यावें. आम्हीं तुला पूर्वी पुष्कळ वेळां पाहिलें आहे. शिवाय तूं धनंजयाचा प्राणाहून प्रिय मित्र आहेस.

हे संजया, तूं येथून सत्वर जाऊन निरंतर वनांत वास करणारे तपस्वी व स्वाध्यायशील ब्राह्मण, भिक्षु आणि इतरहि ब्रह्मचर्य व अध्ययन यांत निरत असलेले द्विज यांची भेट घे आणि त्या वृद्धांना माझ्या वतीनें अभिवादन करून कुशल विचार. त्याचप्रमाणें धृतराष्ट्राचा पुरोहित, ऋत्विज, आचार्य,

आमची प्रशंसा करणारे, आमचें स्मरण करणारे, यथाशक्ति धर्माचरण करणारे, शील व बल यांनीं युक्त असलेले, मानी व वृद्ध असे जे अत्रैवर्णिक शूद्रादि असतील त्यांसहि माझ्या नांवें यथान्याय कुशल विचार. त्यांना प्रथम माझें क्षेम कळीव व नंतर त्यांचें अनामय विचारून घे. तसेंच राष्ट्रांत जे वाणिज्यावर निर्वाह करितात व पशुपालन करून रहातात त्यांनाहि मीं कुशल विचारलें आहे, म्हणून सांग.

हे सूता, द्रोणाचार्य नीतिज्ञ व आमच्या इच्छेप्रमाणें वागणारा आहे. त्यानें ब्रह्मचर्य पाळून वेदाध्ययन केलें आहे. तसेंच मंत्र, उपचार, प्रयोग व उपसंहार या चार पादांनीं युक्त असलेली अस्त्रविद्याहि संपादन केली आहे. त्या आमच्या पूज्य आचार्याला शरण जाऊन अभिवादन कर. पित्याप्रमाणेंच अस्त्रविद्येंत प्रवीण व गंधर्वपुत्रवत् सौंदर्य व संगीत यांनीं संपन्न अशा तरस्वी अश्वत्थाम्याला कुशल विचार.

हे संजया, शारद्वत कृपाचार्य आत्मवेत्त्यांत वरिष्ठ आहे. त्या महारथाच्या घरीं तूं जा आणि हे सूता, त्याच्या चरणांना स्पर्श करून त्याला माझें क्षेम कथन कर. त्याचप्रमाणें आमचा पितामह भीष्म शौर्य, दया, तप, अनृत इत्यादि गुणांनीं युक्त आहे. त्याची प्रज्ञा, शील व धृति हीं प्रसिद्ध आहेत. त्या कुरुसत्तमाच्या चरणांना वंदन करून त्याला माझें कुशल निवेदन कर.

कुरूंचा प्रणेता प्रज्ञाचक्षु धृतराष्ट्र वृद्धांची सेवा करणारा असून मानी व बहुश्रुत आहे. त्या वृद्ध राजाला अभिवादन करून हे संजया, माझें अनामय कथन कर. धृतराष्ट्राचा ज्येष्ठ पुत्र मंदबुद्धि, मूर्ख, शठ व पापाचरणी आहे. तो सर्व पृथ्वीचें अनुशासन करीत आहे. त्या सुयोधनाला माझ्या नांवें कुशल विचार. त्या मंदमति दुर्योधनाचा कनिष्ठ भ्राता दुःशासन त्याच्याच सारखा दुःशील आहे. तो कौरवांत शूरतम असून महा धनुर्धर आहे. त्या दुःशासनालाहि कुशल विचार.

संजया, जो भारतांच्या शमावांचून दुसरी कसलीहि इच्छा करीत नाहीं त्या विवेकसंपन्न व प्रसन्न बाल्हिकश्रेष्ठाला माझ्या वतीनें अभिवादन कर. सोमदत्त अनेक श्रेष्ठ गुणांनीं युक्त असून विचारी आहे. तो निष्ठुर नसल्यामुळें स्नेहास्तव क्रोधहि सहन करितो. तो नरश्रेष्ठ माझ्या मतें पूज्य आहे. त्याचप्रमाणें संजया, सौमदत्ति माझा भ्राता व सखा आहे. तो महा धनुर्धर श्रेष्ठ रथी कौरवांमध्यें मानार्ह आहे. त्यालाहि अमात्यांसह कुशल विचार.

त्याचप्रमाणें कौरवांकडे जे अन्य प्रमुख कुरुकुमार, पुत्र, पौत्र व भ्राते असतील आणि इतरहि ज्यांना कुशल विचारणें तुला योग्य वाटेल, त्या सर्वांस त्यांच्या योग्यतेप्रमाणें कुशल विचार. हे गावल्गणे, पांडवांशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें धार्तराष्ट्रानें जे नृपति एकत्र जमविले असतील, त्या सर्वांना आणि वशाति, शाल्वक, केकय, अंबष्ठ, त्रिगर्त, चारी दिशांतील शूर भूपाल, पर्वतवासी सत्यनिष्ठ शीलसंपन्न योद्धे, माहूत, रथी, पदाति, आर्यांचे संघ, राजामात्य, द्वारपाल, सेनानायक व इतर सर्व अधिकारी या सर्वांना प्रथम माझें कुशल वृत्त कथन करून त्यांचें अनामय विचार.

संजया, युयुत्सु अतिशय धर्मज्ञ, विचारी व कुरूमध्यें श्रेष्ठ आहे. त्या राजपुत्राला हें युद्ध संमत नाहीं. चित्ररथ द्यूतप्रवीण असून कपटविद्यापरायण आहे. त्याला द्यूताची अतिशय आवड असून तो युद्धांत देवरथालाहि अजिंक्य आहे. गांधारराज शकुनि कपटद्यूत खेळण्यांत अद्वितीय आहे. तो पर्वताधिप पापबुद्धि दुर्योधनाचा सन्मान करीत असतो. त्याचप्रमाणें वैकर्तन कर्ण पांडवांशीं एकरथानें युद्ध करण्यास सदैव उद्युक्त असतो व मूर्ख कौरवांना अधिकच मूढ बनवितो. तो राधासुत अद्वितीय वीर आहे. या सर्वांना माझ्या वतीनें कुशल विचार. बा संजया, अगाधबुद्धि विदुर दीर्घदर्शी असून तो आमचा भक्त, गुरु, पालक, पिता, माता, सुहृद् व मंत्री आहे. त्याला अवश्य कुशलप्रश्न कर. सूता, सर्व सदाचारी व वृद्ध स्त्रियांना मी मातेसमान पूज्य मानितों. त्या सर्व वृद्ध स्त्रियांना एकत्र जमवून तूं त्यांची भेट घे आणि त्यांना माझा प्रणाम कथन कर. ‘तुमचे पुत्र व पौत्र कुशल असून ते तुमच्याशीं प्रेमानें वागतात ना?’ असें प्रथम विचारून नंतर ‘अजातशत्रु पुत्रांसह कुशल आहे’ असें त्यांना सांग.

त्याचप्रमाणें हे संजया, तेथें ज्या राजस्त्रिया असतील त्या सर्व साध्वींना ‘हे पतिव्रतांनों, तुम्ही आपल्या गृहांत सुरक्षित, निर्भय व निष्पाप असतां ना? आपल्या श्वशुरादि वृद्धजनांशीं तुम्ही नम्रतेनें वागतां ना? तुम्ही वडिलांशीं आदरानें वागा व ज्यायोगानें तुमचे पति तुम्हांला अनुकूल होतील, अशीच वृत्ति त्यांच्याशीं ठेवा.’ असें सांगून त्यांचें क्षेम विचार.

संजया, तेथें माझ्या अनेक स्नुषा आहेत. त्या सर्व श्रेष्ठ कुलोत्पन्न व गुणवती असून आतां अपत्यवती झाल्या आहेत. त्या सर्वांना ‘युधिष्ठिरानें तुम्हांला प्रसन्न मनानें आशीर्वाद दिले आहेत’ असें सांग. त्याचप्रमाणें आमच्या कुलांतील ज्या कन्या तेथें असतील त्यांचेंहि माझ्या नांवें ‘मुलींनो, तुमचें

कल्याण असो. तुमचे पति तुम्हांला अनुकूल आहेत ना? तुम्ही पतींशीं प्रतिकूल वर्तन करीत नाहींना, तुम्ही त्यांना प्रिय आहांत ना,' असें अनामय विचार.

संजया, तेथील वेश्याजन, वस्त्र-भूषणांनीं अलंकृत असून पुष्पादि सुगंधी द्रव्याचा उपभोग घेणारा आहे. तरीहि त्या सुखोपभोगांत निमग्न असलेल्या वारांगना बीभत्स नाहींत. त्यांचें भाषण व दर्शन मनोहर आहे. त्यांसहि कुशल विचार. बा सूता, कौरवांचे जे दास व दासी आहेत, आणि त्यांच्या आश्रयानें रहाणारे जे अनेक लंगडे, पांगळे, कुबडे आहेत त्या सर्वांना भेटून त्यांना माझें कुशल कळीव आणि 'धृतराष्ट्रपुत्रानें तुमची पूर्वापर वृत्ति कायम ठेवली आहेना? तो दयाळु दुर्योधन राजा तुम्हां अंध, पंगु व निराधार जनांना पुरेसें अन्न देऊन तुमचें पोषण करतो ना?' असें विचारून नंतर त्यांचेंहि अनामय विचारून घे.

त्याचप्रमाणें आमच्या प्रदेशांत अंध, वृद्ध व याचना करणारे जे असंख्य जन आहेत, त्यांनाहि माझें क्षेम कळवून नंतर त्यांचेंहि कुशल विचार आणि त्यांना असें सांग—"दीनजनहो, तुम्ही भिऊं नका. तुम्ही पूर्वजन्मीं कांहीं तरी पातक आचरिल्यामुळें तुम्हांला असें कष्टकर जीवित प्राप्त होऊन दुःख भोगावें लागत आहे. परंतु मी आतां लवकरच या धार्तराष्ट्र शत्रूचा निग्रह करून सुहृदांवर अनुग्रह करीन आणि तुमचें अन्न-वस्त्रादिकांनीं पोषण करीन."

संजया, मीं ब्राह्मणांना अनेक प्रकारचीं वर्षासनें दिलेलीं होतीं. तीं कौरवांच्या अधिकाऱ्यांनीं चालू ठेवलीं आहेत किंवा बंद केलीं, हें मला कांहींच कळलें नाहीं. यास्तव, 'मीं दिलेलीं वर्षासनें तशींच चालू आहेत व त्याकडे राजाचें लक्ष आहे, असें दूतद्वारा मला कळीव.' असा दुर्योधनाला माझा निरोप सांग.

याशिवाय चारी दिशांतून इतरहि जे अन्नार्थी अनाथ, दुर्बल, मूढ व कृपण जन दुर्योधनाच्या आश्रयाला येऊन राहिले असतील व सर्व दिशांतून दुर्योधनाचे जे दूत एकत्र जमले असतील, त्या सर्वांना भेटून त्यांचें कुशल व अभ्युदय विचार व नंतर माझेंहि अनामय कथन कर.

(३) संजया, धार्तराष्ट्राच्या पक्षाला जे योद्धे मिळाले आहेत, त्यांच्यासारखे दुसरे वीर समग्र पृथ्वीवर नाहींत. परंतु धर्मच अविनाशी फलदायी आहे. यास्तव शत्रूचा निग्रह करण्यास माझें धर्मबलच समर्थ आहे. धर्मबलानेंच जय होईल. सहायबलानें होणार नाहीं. तस्मात् हे संजया, माझें हें

वचन तूं पुनः पुनः दुर्योधनाला ऐकीव. त्याला म्हणावें—' कुरूंचा देश शत्रुरहित करून मीच निष्कंटक राज्याचा उपभोग घेईन, ' अशी जी तीव्र इच्छा तुझ्या हृदयाला टोंचीत आहे, ती कदापि सफल होणार नाहीं. मी तुझें हें प्रिय सिद्ध होऊं देणार नाहीं, यास्तव एकतर माझें इंद्रप्रस्थाचें राज्य परत दे, किंवा युद्धाला सज्ज हो. ५. २. ३०.

---

## अध्याय ३१ वा.

[ १ युधिष्ठिराची धृतराष्ट्र-भीष्मादिकांना संधि करण्याविषयीं विनयपूर्वक प्रार्थना. २ पांच ग्राम देऊन संधि करण्याविषयीं दुर्योधनाला संदेश. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे संजया, प्राणी सज्जन असो किंवा दुर्जन असो, बाल असो किंवा वृद्ध असो, दुर्बल असो किंवा बलाढ्य असो, ईश्वर त्या सर्वांना आपल्या अधीन ठेवीत असतो. पूर्वकर्माला फलोन्मुख करणारा तो परमात्मा मूर्खाला पांडित्य देतो व पंडिताला मूढ बनवितो. हे गावल्गणे, आमचें बल जाणण्याची ज्यांची इच्छा असेल, त्यांना तूं तें यथार्थ कथन कर. आतां हे संजया, तूं आमच्याशीं असा संकेत करून संतुष्ट चित्तानें कुरु-देशास गमन कर.

हे संजया, तूं आतां कौरवांकडे जाऊन महाबलाढ्य धृतराष्ट्राला अभिवादन कर व त्याचें अनामय विचारून सर्व कौरवांच्या परिवारांत बसलेल्या त्या प्रज्ञाचक्षु नृपतीला असें सांग कीं " हे राजन्, तुझ्याच प्रभावानें पांडव सुखानें रहात आहेत. तुझ्याच प्रसादानें त्या बालकांना राज्य प्राप्त झालें. यास्तव हे राजा, प्रथम त्यांना राज्यावर स्थापन करून आतां त्यांचा विनाश होत असतांना त्यांची उपेक्षा करणें तुला योग्य नव्हे.

हे संजया, हें समग्र ब्रह्माण्ड जरी एकट्याच पुरुषाला प्राप्त झालें तरीहि त्याची तृष्णा पूर्ण होणार नाहीं. यास्तव, आपण सर्व मिळून जिवंत राहूं या. तूं शत्रूंच्या वश होऊं नको.

त्याचप्रमाणें शान्तनव भीष्म भारतांचा पितामह आहे. त्याला माझें नांव सांगून शिरसा वंदन कर आणि त्या आमच्या पितामहाला सांग कीं, शान्तनूचा वंश बुडत असतां तूंच आपल्या कुलाचा उद्धार केलास. यास्तव आतां ज्यायोगानें तुझे हे पौत्र कौरव-पांडव परस्परांशीं प्रेमानें वागतील, अशीच स्व-मतानें योजना कर.

संजया, विदुर कौरवांना सल्ला देणारा श्रेष्ठ मंत्री आहे. त्याला म्हणावें— ' हे सौम्य, तूं युधिष्ठिराचा हितचिंतक आहेस. यास्तव युद्ध न करण्याविषयीं कौरवांना उपदेश कर. '

त्यानंतर हे सूता, कौरवांच्या समुदायांत बसलेल्या अमर्षी दुर्योधनाकडे जा व त्याचें पुनः पुनः सान्त्वन करून त्याला माझा असा संदेश सांग—

" हे राजपुत्रा, या निष्पाप पांचालीला राजसभेंत आणून तिची अवहेलना होत असतां तूं उपेक्षा केलीस. त्या अक्षम्य अपराधाबद्दल आम्हांला अत्यंत दुःख वाटत आहे. परंतु केवल कौरवांचा नाश होऊं नये, याच हेतूनें आम्ही तो अपमान सहन करून तुला क्षमा करण्यास तयार झालों आहों. आम्ही पांडव समर्थ असून पूर्वींपासून किती क्लेश सहन करीत आलों हें सर्व कौरव जाणतच आहेत.

तूं आम्हांला अजिनें पांघरून वनवासास पाठविलेंस, तरीहि आम्हीं ते क्लेश सोसले. आर्या कुंतीचें अतिक्रमण करून दुःशासनानें तुझ्या अनुमतीनें कृष्णेला केंस धरून ओढलें, तेंहि अपमानास्पद दुःख आम्हीं सहन केलें. आमच्या हातून कुरूंचा नाश होऊं नये, याच इच्छेनें आम्ही या सर्वांबद्दल तुम्हांला क्षमा करीत आहों.

यास्तव हे दुर्योधना, तूं आतां परद्रव्याभिलाषापासून आपल्या बुद्धीला निवृत्त कर व माझा यथान्याय भाग मला दे. म्हणजे शम होऊन परस्परांचा प्रेमभाव वाढेल.

हे नरश्रेष्ठा, आम्ही शमाची इच्छा करीत आहों. यास्तव राज्याचा एखादा विभाग जरी आम्हांला दिलास, तरीहि आम्ही त्यांत संतोष मानूं. आम्ही पांच भ्राते आहोंत, आम्हां पांच जणांना अविस्थल, वृकस्थल, माकन्दी, वारणावत व पांचवें तुला जें इष्ट वाटेल तें स्थान अशीं पांच गांवें दे. याहून अधिक आम्ही कांहीं मागत नाहीं.

कारण हे महाप्राज्ञ संजया, ज्ञातिबांधवांशीं आमची शांति असावी, भ्रात्यांचें परस्पर सख्य असावें, पिता-पुत्रांची एकी असावी, पांचाल व कौरव यांनीं हंसत-खेळत प्रेमानें रहावें आणि कुरु-पांचालांना मीं अक्षत पहावें, अशी माझी मनीषा आहे. संजया, आम्हीं सर्व प्रसन्नचित्त असावें, आम्हां

आत्यांत शांति नांदावी हीच माझी उत्कट इच्छा आहे. संजया, यांप्रमाणें मी शमाला तत्पर आहें व युद्धालाहि सज्ज आहें. मी धर्म व अर्थ पूर्णपणें जाणतों. शमाचा मृदु उपाय मला मान्य असून युद्धासारख्या दारुण प्रसंगालाहि मी सिद्ध आहें." ५. २. ३१.

---

## अध्याय ३२ वा.

[ १ संजयाचें धृतराष्ट्राकडे रात्रीं आगमन व युधिष्ठिराच्या कुशलप्रश्नादिकांचें कथन. २ धृतराष्ट्राची निंदा करून संजयाचें 'युधिष्ठिराचा संदेश उदयिक सांगण्याचें आश्वासन' देऊन स्वगृहीं प्रयाण. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, याप्रमाणें महात्म्या धृतराष्ट्राच्या आज्ञेप्रमाणें कार्य करून, पांडवांची अनुज्ञा घेऊन, संजय परत आला. महावेगवान् व शीघ्रगामी अश्वांच्या रथांतून त्वरेनें हस्तिनापुरांत प्रवेश करून तो सूत धृतराष्ट्राच्या अंतःपुराच्या समीप आला व द्वारपालाला म्हणाला—" हे द्वारपाला, धृतराष्ट्रापाशीं जाऊन ' पांडवांकडून मी संजय आलों आहें ' असें त्याला सत्वर कळीव. जा, विलंब लावूं नको. यावेळीं राजा जर जागत असला तर मी आल्याचें कळतांच तो मला तत्काळ आंत बोलावील. भूपतीला अवश्य निवेदन करण्यासारखें महत्त्वाचें काम आहे."

संजयाचें हें वचन ऐकून द्वारपाल नृपतीकडे जाऊन म्हणाला—" हे भूपते, तुला नमस्कार असो. आपण पांडवांकडे पाठविलेला दूत संजय आला आहे व तो आपल्या दर्शनेच्छेनें द्वारीं उभा आहे. यास्तव त्याला काय ती आज्ञा व्हावी."

**धृतराष्ट्र**—उत्तम झालें. संजयाचें स्वागत असो. त्याला माझें स्वास्थ्य निवेदन करून सत्वर आंत पाठवून दे. माझ्या दर्शनाचा त्याला केव्हांहि प्रतिबंध नसतांना आजच तो बाहेर कां उभा राहिला आहे ?

**वैशंपायन**—राजा धृतराष्ट्राच्या ज्या अंतःपुराचें शूर, बुद्धिमान्, कुलीन व सज्जन पुरुष संरक्षण करीत होते त्यांत संजयानें राजाज्ञेनें प्रवेश केला व तो सूत सिंहासनारूढ असलेल्या वैचित्रवीर्याच्या समीप जाऊन हात जोडून

---

१ अलमेव शमायास्मि तथा युद्धाय संजय ।
धर्मार्थयोरलं चाहं मृदवे दारुणाय च ॥

म्हणाला—"हे भूमिपते, मी संजय तुला नमस्कार करितों. मी पांडवांची भेट घेऊन आलों आहें. विद्वान् युधिष्ठिरानें तुला प्रथम अभिवादन करून तुझें कुशल विचारलें आहे. त्याचप्रमाणें त्या धर्मराजानें तुझे पुत्र व पौत्र, यांचेंहि क्षेम विचारलें असून तुझे इष्टमित्र, मंत्रि व तुझ्या आश्रयानें रहाणारे इतर सर्व यांवर तूं प्रसन्न असतोस ना? असाहि प्रश्न केला आहे."

धृतराष्ट्र—संजया, अजातशत्रूचें व तुझें आनंदानें अभिनंदन करून मी तुला विचारितों कीं, तो धर्मराज भ्राते, पुत्र व अमात्य यांसह कुशल आहेना?

(२)संजय—राजा, तो पांडुपुत्र अमात्यांसह कुशल आहे. तुझ्यापाशीं त्याचें पूर्वींचें जें राज्यधनादि आहे, तें पुनः प्राप्त व्हावें अशी त्याची इच्छा आहे. तो युधिष्ठिर निर्मल मनाचा व निष्कपट आहे. तो धर्मार्थनिरत असून उदार व दूरदृष्टि आहे. तो शीलसंपन्न बहुश्रुत कौंतेय वित्तसाध्य यज्ञादिकांपेक्षां भूतदया श्रेष्ठ मानितो. अधर्मरहित सुखाचीच त्याला अपेक्षा आहे. त्याची बुद्धि धर्मरहित सुख व प्रिय यांमध्यें कधींहि आसक्त होत नाहीं.

हे कुरुश्रेष्ठा, लाकडाच्या कळसूत्री बाहुलीप्रमाणें ईश्वराच्या प्रेरणेनें मनुष्याचे व्यापार होत असतात. मनुष्याला स्वातंत्र्य नाहीं. मानवाच्या कर्तृत्वापेक्षां दैवच श्रेष्ठ आहे, असें पांडवांचा हा निग्रह पाहून मला वाटूं लागलें आहे. राजा, तुझें हें अवाच्य घोर पापयुक्त कर्म पाहून माझ्या मनाचा हाच ग्रह दृढ होतो. बलवान् शत्रु जोंवर कांहीं काल स्वस्थ बसण्याची इच्छा करितो, तोंवरच तुझ्यासारख्याची प्रशंसा होत असते.

सर्प जीर्ण कात टाकून आपल्या स्वाभाविक नव्या त्वचेनें, जसा शोभतो, तसा शूर युधिष्ठिर तुझ्या ठिकाणीं सर्व अकीर्ति स्थापून आपल्या स्वाभाविक निर्दोष वृत्तीनें विराजमान होत आहे. हे राजन्, आर्यांचें वर्तन धर्मार्थयुक्त असतें, त्याच्याविरुद्ध असलेल्या आपल्या कर्मांचा तूं विचार कर. अरेरे! हे कुरुश्रेष्ठा, इहलोकीं तर तुझी निंदा होतच आहे, पण परलोकींहि तुला या पातकामुळें अधोगतीला जावें लागेल!

---

१ जो आपल्या स्वाभाविक स्वरूपामध्यें स्थित होतो, त्याचें पाप शत्रूला लागतें, याविषयीं 'तस्य पुत्रा दायमुपयन्ति सुहृदः साधुकृत्यां द्विषन्तः पापकृत्याम्' म्ह० आत्मज्ञाचें धन पुत्रांना, पुण्य सुहृदांना व पाप शत्रूंना प्राप्त होतें, अशी श्रुति आहे. कौ. १. ४ पहा.

हे भरतश्रेष्ठा, पांडवांनीं जें राज्यादि ऐश्वर्य प्राप्त केलें तें त्या वीर पांडुपुत्रांवांचून इतर कोणालाहि मिळवितां येणें शक्य नव्हतें. त्यांच्या सामर्थ्यावांचून हें पृथ्वीचें राज्य दुर्लभ होतें. असें असतांना तूं पुत्रांच्या अधीन होऊन त्यांच्या संपत्तीचा अभिलाष करतोस, हें कर्म तुझ्यासारख्याला योग्य नव्हे. त्यामुळें तुझी पृथ्वीवर मोठी अकीर्ति होईल.

हे राजेंद्रा, आपत्ति बुद्धिशून्य, हीनकुलोत्पन्न, क्रूर, दीर्घद्वेषी, युद्धकलारहित व पुरुषार्थरहित, अशा अधर्मयुक्त पुरुषाचा आश्रय करितात. जो भाग्यवान् नर उच्चकुलांत उत्पन्न होऊन बलाढ्य, यशस्वी व बहुश्रुत असतो तो सुखानें उपजीविका करणारा जितेंद्रिय पुरुष धर्माधर्मांचा विचार करून वागतो आणि या सद्गुणांच्या बलावर उत्कर्ष पावतो. परंतु हे महाराज, तूं श्रेष्ठ कुलांत जन्म पावूनहि कपटाचरणानें द्रव्यापहार करण्याच्या दुष्ट बुद्धीमुळें गुणहीन झाला आहेस !

त्यावांचून हे राजा, भीष्मादिकांसारखे विपत्कालींहि धर्मार्थांचा त्याग न करणारे विवेकी मंत्री असतांना तूं अधर्मांत कसा प्रवृत्त झाला असतास ! भीष्मादिकांसारख्या श्रेष्ठ मंत्र्यांनीं द्यूताचा निषेध केला असतांहि त्यांची उपेक्षा करून कपट द्यूताला संमति कशी दिली असतीस व पांडवांना वनवासाला पाठविण्याचें निष्ठुर कर्म तरी केलें असतेंस ! सर्व मंत्र्यांनीं निषेध केला असतांहि कोणता सुज्ञ मनुष्य असलें क्रूर कर्म करील ! परंतु तूं भीष्मादिकांच्या उपदेशाकडे दुर्लक्ष केलेंस व कर्णादिकांचा मंत्र ऐकलास ! हे तुझे विश्वासांतील मंत्री नित्य एकत्र जमून पांडवांचें राज्य परत न देण्याचा संकेत करीत असतात. परंतु यांत कुरूंचा क्षय निश्चित आहे, हें लक्षांत असूं दे.

हे वैचित्र्यवीर्या, भवितव्यताच जर तशी असेल तर अकस्मात् सर्व कौरव नष्ट होतील. तुझ्या या पापकर्मानें प्रेरित झालेला अजातशत्रु तुझ्या विनाशाची इच्छा करील. यावर तूं कदाचित् असें म्हणशील कीं, आमच्या नाशानें धर्मराजाला गोत्रवधाचें पातक लागेल, तर युधिष्ठिराला तो दोष लागणार नाहीं. कारण तूं एखाद्या चोराप्रमाणें स्वतःच्या नाशाला कारण होणारा अधर्म करीत आहेस. यास्तव तुजवर या पापाचा सर्व दोष लादून धर्मराजा निष्पापच राहील आणि तुझी मात्र लोकांत निंदा होईल.

हे आंबिकेया, देवांना कांहीं असाध्य आहे काय ? सर्व ईश्वराच्याच अधीन आहे. ज्याअर्थी धनंजय परलोक पहाण्यासाठीं सशरीर स्वर्गलोकीं गेला व

तेथें देवांना मान्य झाला आणि नारदादिकाप्रमाणें उभय लोकसंचाराची योग्यता असतांहि त्या महात्म्यानें वनवासादिकांचे क्लेश सहन केले, त्याअर्थी तो सामान्य मानव नाहीं, यांत संशय नाहीं.

हे नृपश्रेष्ठा, हे शौर्यादि गुण पूर्वकर्मानुसार वृद्धि व ऱ्हास यांनीं युक्त आहेत. ते न्यूनाधिक होत असतात. तसेंच ऐश्वर्य व अनैश्वर्य हीं दोन्ही प्राप्त होऊन नाश पावणारीं असल्यामुळें तीं अनित्य आहेत, हें पाहून बलिराजाला पूर्व-पूर्व-कर्मांच्या कारणांचा अंत लागला नाहीं. शेवटीं अभ्युदयादिकांचें कारण ईश्वरावांचून अन्य नाहीं, असें मानून तो स्वस्थ बसला. तस्मात् सर्व गोष्टी ईश्वराच्याच हातीं आहेत.

हे प्रभो, प्राण्यांचीं चक्षु, श्रोत्र, नासिका, त्वक् व जिह्वा हीं ज्ञानेंद्रियें आहेत. तीं तृष्णेचा क्षय होईल, तेव्हांच तृप्त होतात. यास्तव तृष्णेचा क्षय करूनच इंद्रियप्रीति संपादन करावी. नाना यत्नांनीं संपादन केलेले विषय इंद्रियांना समर्पण करून त्यांना तृप्त करूं नये. ( शंका—अहो पण आपापला विषय प्राप्त झाल्यावांचून तीं तृप्त कशीं होणार ! उत्तर–निग्रहानें इंद्रियें वश करून घ्यावीं. ) लाभ व हानि यांविषयीं हर्ष-विषाद न मानतां इंद्रियांना स्व-विषयांपासून निवृत्त करावें.

तथापि हे भारता, कांहीं लोक यावर दोष देतात. ते म्हणतात कीं, सर्वच दैवायत्त नसून तें कर्मायत्तहि आहे. शुभकर्म करणाऱ्या पुरुषाला शुभ फल प्राप्त होत असतें. कर्मामुळेंच माता-पितरांपासून प्राण्याची उत्पत्ति होते व यथाविधि अन्नपान सेवन केल्यानें त्याची वृद्धि होते. कर्मच जर नसतें तर जन्म व वृद्धि संभवलीच नसती. हे राजन्, प्रिय-अप्रिय, सुख-दुख, निंदा-स्तुति इत्यादि द्वंद्वें प्रत्येक मनुष्याला प्राप्त होतात. एखाद्याच्या सदाचरणाची एक मनुष्य प्रशंसा करितो, तर दुसरा त्याच्याच दुष्कृत्याची निंदा करीत असतो.

हे राजा, कौरव-पांडवांच्या या विरोधानें प्रजेचा क्षय होईल. तस्मात्, मी तुला दोष देत आहें. पांडवांचा राज्यविभाग सरळपणानें त्यांच्या स्वाधीन कर. हें माझें सांगणें तुला जर रुचलें नाहीं तर तृणाला दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें तुझ्या या अपराधामुळें संतप्त झालेला अर्जुन कौरवांना दग्ध करून टाकील ! हे नरेंद्रा, द्यूतप्रसंगीं कपटानें पांडवांना जिंकून तूं स्वतःला कृतार्थ मानलेंस व

पुत्रांच्या मतानें पांडवांशीं शम करण्याचें नाकारिलेंस. परंतु तेंच कर्म आतां कसें फळाला आलें आहे, तें पहा.

राजा, तूं विदुरासारख्या आप्तांना दूर करून कर्णासारख्या अनाप्तांना जवळ केलें आहेस. ही भूमि केवढी विस्तीर्ण पसरली आहे. तूं दुर्बल असल्यामुळें तिचें संरक्षण करण्यास समर्थ नाहींस. हे कुरुराजा, रथवेगानें मी श्रांत झालों आहें. यास्तव मला आतां जाण्याची अनुज्ञा असावी. मी जाऊन शयन करितों. उदयिक सर्व कौरवांच्या समक्ष सभेमध्यें अजातशत्रूचें वचन तुला निवेदन करीन.

धृतराष्ट्र—हे सूतपुत्रा, माझी तुला अनुज्ञा आहे. तूं आतां स्वगृहीं जा व शयन करून विश्रांति घे. उद्यां प्रातःकाळीं सर्व कौरव सभेंत जमून तुझ्या मुखानें युधिष्ठिराचा संदेश ऐकतील. ५. २. ३२.

येथें दुसरें संजययानपर्व समाप्त झालें.

# प्रजागरपर्व ३.



## अध्याय ३३ वा.

[ १ धृतराष्ट्राचें विदुराला रात्रींच पाचारण २ चिंतेनें धृतराष्ट्राचा प्रजागर, त्याविषयीं विदुराला प्रश्न. ३ विदुराचा नीतिकथनपूर्वक पांडवांना राज्य देण्याचा उपदेश. ]

( १ ) वैशंपायन—राजा, याप्रमाणें संजय अनुज्ञा घेऊन स्वगृहीं निघून गेला असतां इकडे धृतराष्ट्राचें चित्त अतिशय अस्वस्थ झालें. त्याला झोंप येईना, किंवा कांहीं सुचेना. तेव्हां तो महाप्राज्ञ महीपति धृतराष्ट्र द्वारपालाला म्हणाला—" हे द्वाररक्षका, मी आतां विदुराची भेट घेऊं इच्छितों, यास्तव सत्वर जा व त्याला घेऊन ये."

धृतराष्ट्रानें पाठविलेला तो दूत वेगानें विदुराकडे गेला व त्याला म्हणाला—" हे धर्मज्ञा, आमचा प्रभु महाप्राज्ञ धृतराष्ट्रमहाराज तुला बोलावीत आहे."

दूताच्या संदेशाप्रमाणें विदुर तत्काल राजमंदिरांत आला व तेथें असलेल्या द्वारपालाला म्हणाला—' मी विदुर आलों आहें,' असें धृतराष्ट्राला निवेदन कर.

तेव्हां द्वारपाल अंतर्गृहांत जाऊन म्हणाला—हे राजेंद्रा, तुझ्या आज्ञेप्रमाणें विदुर आला असून तो तुझ्या चरणांच्या दर्शनाची इच्छा करीत आहे. तरी त्याला काय सांगावें, याची मला आज्ञा व्हावी.

**धृतराष्ट्र**—महाप्राज्ञ दूरदर्शी विदुराला सत्वर आंत येऊं दे. त्याच्या आगमनाची मला सूचना देण्याची कांहीं गरज नाहीं. विदुराला माझ्या दर्शनाची सर्वदा मोकळीकच आहे.

राजाचें हें वचन ऐकून द्वारपाल बाहेर येऊन विदुराला म्हणाला—" हे क्षत्त्या, धीमान् महाराजांच्या अंतःपुरांत तूं निःशंकपणें प्रवेश कर. तूं महाराजांच्या दर्शनाला सर्वकाल समर्थ आहेस. तुला कोणताहि प्रतिबंध नाहीं, असें राजानें मला सांगितलें आहे."

**वैशंपायन**—जनमेजया, नंतर विदुरानें धृतराष्ट्राच्या अंतःपुरांत प्रवेश केला व चिंतातुर झालेल्या राजाला तो हात जोडून म्हणाला—" हे महाप्राज्ञ राजा, मी हा विदुर तुझ्या आज्ञेप्रमाणें आलों आहें. माझ्या हातून होण्यासारखें कांहीं कार्य असल्यास मला अवश्य आज्ञा कर."

( २ ) **धृतराष्ट्र**—हे विदुरा, आपण पांडवांकडे पाठविलेला संजय नुकताच परत आला व माझीच निंदा करून निघून गेला. तो अजातशत्रूचें म्हणणें उद्यां सभेमध्यें सांगणार आहे. त्या पांडुपुत्राचा संदेश न कळल्यामुळें माझें मन अतिशय अस्वस्थ झालें आहे, माझ्या सर्व शरीराचा दाह होत आहे व त्यामुळें मला झोंपहि येईनाशी झाली आहे. बा विदुरा, आम्हां सर्वांपेक्षां तूंच अधिक धर्मार्थकुशल आहेस, यास्तव जाग्रणानें व चिंतेनें तळमळणाऱ्या मला कांहीं तरी श्रेयोमार्ग सांग.

पांडवांकडून संजय जेव्हां परत आला, तेव्हांच माझ्या मनाची शांति नष्ट झाली, सर्व इंद्रियें व्याकुळ झालीं व 'तो आतां काय सांगणार' याचीच मला अतिशय चिंता लागून राहिली आहे.

**विदुर**—हे महाराज, ज्यावर बलवान् शत्रु चालून आला आहे असा दुर्बल व साधनहीन पुरुष, ज्याचें सर्वस्व हरण केलें आहे, असा दीन मानव, विषयासक्त पुरुष व चोर या चौघांच्या ठिकाणीं निद्रेचा अभाव होतो. यास्तव हे नराधिपा, या महादोषांनीं तर तुला स्पर्श केला नाहीं ना ? परद्रव्याच्या अभिलाषानें तर तूं संतप्त होत नाहींस ना ?

धृतराष्ट्र—हे धर्मज्ञा, या राजर्षींच्या कुलांत तूंच एक ज्ञानसंपन्न आहेस. यास्तव तुझ्या मुखानें परम निःश्रेयसकर व धर्म्य वचन ऐकण्याची माझी इच्छा आहे.

( ३ ) विदुर—हे धृतराष्ट्रा, युधिष्ठिर जन्मतःच राजलक्षणांनीं युक्त आहे. शेवटीं तोच त्रैलोक्याचा अधिपति होईल. वस्तुतः पांडवांना त्यांचें राज्य परत देऊन त्यांचा संग्रह करणेंच तुला उचित होतें. परंतु तूं त्यांस वनवासाला पाठविलेंस व आतां चिंतामग्न होऊन बसला आहेस.

राजा, युधिष्ठिराच्या उलट तूं राजलक्षणांनीं हीन आहेस, सर्वांच्या द्वेषाला पात्र झाला आहेस आणि तूं जरी स्वतःला मोठा धर्मात्मा मानीत असलास तरी तुझ्या चक्षूंची ज्योति नष्ट झालेली असल्यामुळें तुला राज्यांश मिळणें शास्त्रसंमत नाहीं. युधिष्ठिराच्या ठिकाणीं क्रूरत्व नाहीं. तो दयालु, धर्मनिष्ठ, सत्यपरायण व पराक्रमी आहे. तरीहि तुझ्या महत्त्वाकडे लक्ष देऊन तो तेरा वर्षें राज्यहीन होऊन अनेक क्लेश सहन करीत राहिला आहे.

असें असतांना हे कुरुश्रेष्ठा, तूं दुर्योधन, कर्ण, शकुनि व दुःशासन यांच्या अधीन होऊन ऐश्वर्याची इच्छा कशी करितोस ? ते चौघेहि मूर्ख असून त्यांच्या ठिकाणीं पांडित्याचा पूर्ण अभाव आहे. यास्तव मी आतां तुला पंडिताचें लक्षण सांगतों तें ऐक—"जो शास्त्रयुक्त आत्मज्ञान, शक्तियुक्त कर्म, वैराग्ययुक्त तितिक्षा व श्रद्धायुक्त धर्मनित्यता या गुणांना यथार्थ जाणतो, तोच पंडित म्हटला जातो. याच्या उलट अयथार्थ गुणांनीं मूढ झालेले पुरुष पुरुषार्थापासून भ्रंश पावतात. पण पंडित त्यापासून च्युत होत नाहींत. प्रशस्त कर्मांचा स्वीकार, निंद्य कर्मांचा त्याग, अनास्तिकत्व आणि श्रद्धालुत्व हीं पंडिताचीं लक्षणें होत. क्रोध, धनमदानें होणारा हर्ष, दर्प, पूज्याच्या सत्काराविषयीं लज्जा, अनम्रता, अहंमन्यता इत्यादि पुरुषार्थाची हानि करणारे दोष ज्याला स्ववश करूं शकत नाहींत, म्ह० जो या दोषांच्या अधीन होत नाहीं, त्याला पंडित म्हणतात.

ज्याचें कार्य व गुप्त संकेत, पूर्वीं कोणालाहि कळत नाहीं, तर त्याचें तें कार्य व संकेत सिद्ध झाल्यावर लोकांना कळतात तो पंडित होय. ज्याच्या कार्याला शीत, उष्ण, भय, आसक्ति, समृद्धि किंवा असमृद्धि विघ्न करूं शकत नाहींत, तो पंडित म्हटला जातो. ज्याचें स्वभावतःच अस्थिर असलेलें चित्त ऐहिक सुखापेक्षां उभयलोकसुखावह धर्म व अर्थ यांनाच वरितें, तो पंडित होय.

धर्मार्थापेक्षां काम निकृष्ट आहे, यास्तव कामाचा त्याग करून जो सुज्ञ पुरुष अर्थ संपादन करितो व अर्थाहून धर्म श्रेष्ठ मानतो, तो अर्थार्थी मोक्षापर्यंत सर्व अर्थांना प्राप्त होतो. ज्ञानफल जो मोक्ष त्यांत सर्व अर्थांचा अंतर्भाव होत असल्यामुळें तो जनकादितुल्य पंडितच म्हटला जातो. बुद्धिमान् पंडित आपलें सामर्थ्य जाणून त्याप्रमाणें इच्छा करितात व कर्म आरंभितात आणि कोणाचाहि अवमान करीत नाहींत.

कोणत्याहि गोष्टीचें सत्वर ग्रहण करून आपलें ज्ञान दृढ होण्यासाठीं दीर्घकाल श्रवण करावें, आपलें कर्तव्य जाणून कामासक्त न होतां अर्थ संपादन करावा आणि कोणीं विचारिल्यावांचून दुसऱ्याच्या कामांत व्यर्थ उपदेश करण्यास प्रवृत्त होऊं नये; कारण हीं पंडिताचीं मुख्य लक्षणें आहेत. पंडितबुद्धि पुरुष अप्राप्य वस्तूंची कधीं इच्छा करीत नाहीं. नष्ट झालेल्या विषयांविषयीं शोक करीत नाहीं व आपत्प्रसंगीं मोहित होत नाहीं.

जो सुज्ञ मनुष्य ‘आपल्याला हें कार्य यत्नसाध्य आहे’ असा मनाचा निश्चय झाल्यावरच मग तें हातीं घेतो, आरंभिलेलें कार्य मध्येंच न सोडतां शेवटास नेतो आणि जितेंद्रिय होऊन सर्वदा सत्कर्मांतच व्यग्र असतो, तो पंडित म्हटला जातो.

हे भरतश्रेष्ठा, पंडिताला शिष्टांना मान्य असलेलीं कर्मेंच रुचतात. तो ऐश्वर्यप्राप्तीसाठीं कर्मे करीत असतो. दुसऱ्याच्या उत्कर्षाचा द्वेष करीत नाहीं. स्वतःचा सन्मान झाल्यास हृष्ट व अवमान झाला असतां संतप्त होत नाहीं. त्याची वृत्ति गंगेच्या डोहाप्रमाणें अक्षुब्ध असते. तो पृथिव्यादि सर्व भूतांचें ‘विनाशित्व’ हें तत्त्व आहे, असें जाणतो. ऐश्वर्यादिकांचा रचनाप्रकार व उपाय त्याला अवगत असतो. मनुष्यांतील असा पुरुषच पंडित म्हटला जातो. जो मधुर वक्ता, प्राचीन चित्रविचित्र कथा जाणणारा बहुश्रुत, प्रतिभासंपन्न, तर्कज्ञ व ग्रंथाचा अर्थ तत्काल समजून सांगणारा असतो तोच खरा पंडित होय. ज्याचें शास्त्राध्ययन बुद्धीच्या अधीन असतें व बुद्धि शास्त्रानुसारिणी असते आणि जो शिष्टांच्या मर्यादेचें उल्लंघन करीत नाहीं अशा गुणवान् मनुष्याला ‘पंडित’ हें नांव प्राप्त होतें.”

हे महाराज, आतां मूर्खांचीं लक्षणें सांगतों तीं ऐका—“जो मूढ मनुष्य शास्त्रश्रवणरहित असून उद्धतपणानें वागतो, दरिद्री असून महत्त्वाकांक्षी

असतो आणि दुर्योधनाप्रमाणें द्यूतादि हीनकर्मांनें अर्थ संपादन करण्याची इच्छा करितो त्याला विद्वान् लोक ' मूढ ' असें म्हणतात. शकुनीप्रमाणें जो स्वतःचें राज्यादि सोडून दुसऱ्याच्या लाभासाठीं झटत असतो, मित्रांसाठीं मिथ्याचरण करितो, तो मूढ म्हटला जातो.

हे राजा, तुझ्याप्रमाणें जो कर्णादि भक्तिहीनांची इच्छा करितो व तुजवर भक्ति ठेवणाऱ्या पांडवांना दूर करितो, युधिष्ठिरासारख्या बलवानांचा द्वेष करितो, तो मूढमति होय. भरतश्रेष्ठा, मूढ मनुष्य अमित्राला मित्र समजतो, मित्राचा द्वेष करून त्याचा नाश करितो. जतुगृहासारखें दुष्ट कर्म आरंभितो, भृत्यांच्या द्वारा निंद्य कार्यांचा लोकांत प्रसार करितो आणि तत्काल सिद्ध होणाऱ्या कार्याला दीर्घकाल लावितो.

जो अधार्मिक पुरुष पितरांचें श्राद्ध व देवतांचें अर्चन करीत नाहीं, त्या मूढमतीला सुहृद् व मित्र लाभत नाहींत. तो मूढबुद्धि नराधम बोलाविल्या-वांचूनच दुसऱ्याच्या घरांत प्रवेश करितो, न विचारतांच पुष्कळ बडबड करितो आणि ज्याचा विश्वास ठेवूं नये, त्यावर विश्वास ठेवतो. स्वतः सदोष आचरण करतो व दुसऱ्यांना मात्र तसें वागल्याबद्दल दोष देतो. हातीं कांहीं अधिकार नसतांहि क्रुद्ध होतो. धर्मार्थरहित असलेल्या स्वतःचें बल न जाणतां यत्नां-वांचून दुष्प्राप्य वस्तूची इच्छा करितो. हे राजन्, जो अप्रबुद्ध पुरुष शिष्य नसलेल्यास उपदेश करितो, सुपीक नसलेल्या प्रदेशाची मशागत करितो, राजस्त्रियांची गुप्तपणें उपासना करितो आणि दातृत्वहीन कृपणाची सेवा करितो, तो मूढमति म्हटला जातो.

हे धृतराष्ट्रा, याच्या उलट जो विचारवान् पुरुष फार मोठा अर्थ, विद्या किंवा ऐश्वर्य यांची प्राप्ति झाली असतांहि नम्रतेनें वागतो, तो पंडित म्हटला जातो. परंतु आपल्या आश्रित वर्गाला अन्न-वस्त्र न देतां जो स्वतः उत्तम अन्न व उंची वस्त्र यांचें सेवन करितो, त्याच्यासारखा निर्दय प्राणी दुसरा कोणता असणार !

राजा, एक मनुष्य पापाचरणानें धन मिळवितो आणि अनेक लोक त्याचा उपभोग घेतात. परंतु शेवटीं फल भोगणारे दोषमुक्त होतात व त्या पापाचा कर्ता मात्र दोषानें लिप्त होतो. याच न्यायानें हे आंबिकेया, तूंच मुख्य पाप-कर्ता आहेस, शकुनिप्रभृति नाहींत. यास्तव तुला पुत्र-धनादिकांचा नाश व

नरक हीं पापफळें भोगावीं लागतील. तुझे साह्यकर्ते या दोषांनीं लिप्त होणार नाहींत.

धनुर्धरानें सोडलेला बाण एका मनुष्याला विद्ध करील किंवा मुळींच कोणाला वेध करणार नाहीं. परंतु बुद्धिमानानें योजिलेली बुद्धि राजासह राष्ट्राचा नाश करिते. ऐका बुद्धीनें कार्य व अकार्य यांचा चांगला निश्चय करून साम, दान, भेद व दंड यांनीं मित्र, उदासीन व शत्रु यांना आपल्या स्वाधीन ठेवावें. त्यांतील मित्राला केवल सामानेंच आपलेंसें करून घ्यावें. उदासीनाला दान आणि भेद या उपायांनीं वश करून घ्यावें व शत्रूला सामादि चारी उपायांनीं स्वाधीन ठेवावें. पंच-इंद्रियांना जिंकून संधि-विग्रहादि सहा उपाय उत्तम प्रकारें योजावे आणि स्त्री, द्यूत, मृगया, मद्यपान, कठोरवाक्, निर्दयपणानें केलेला दंड व अर्थदूषण म्ह० द्रव्याची अफरातफर किंवा वित्तशाठ्य हीं सात व्यसनें सोडून तूं सुखी हो. विषाचा रस एकाच मनुष्याचे प्राण हरण करितो. शस्त्रानें एखाद्याचाच वध होतो. परंतु राजाच्या गुप्त संकेताचा स्फोट झाला असतां समग्र राष्ट्र व प्रजा यांच्यासह राजाचा नाश होतो.

हे पृथ्वीपाला, एकट्यानेंच स्वादु अन्न कदापि भक्षण करूं नये, कारण त्यांत त्यापासून पापोत्पत्ति होते. अर्थप्राप्तीविषयींचा विचार एकट्यानेंच करूं नये. त्यांत चित्तभ्रम होण्याचा संभव आहे. प्रवासांत अनेक अनर्थ व अडचणी यांचा संभव असल्यामुळें एकट्यानेंच प्रवासाला जाऊं नये. रात्रीं प्रेतादि-

१ एकया द्वे विनिश्चित्य त्रींश्चतुर्भिर्वशे कुरु । पंच जित्वा विदित्वा षट् सप्त हित्वा सुखी भव ॥ हा श्लोक राजनीतिपर व अध्यात्मपरहि आहे. त्याचा राजनीतीपर अर्थ वर दिला आहे. अध्यात्मपर अर्थ असा—'**एकया**'—विवेकयुक्त बुद्धीनें '**द्वे**'-नित्य व अनित्य यांचा '**विनिश्चित्य**'—यथार्थ निश्चय करून '**त्रीन्**'-काम, क्रोध व लोभ यांस '**चतुर्भिः**'—शम, दम, उपरम व श्रद्धा या चार उपायांनीं '**वशे कुरु**'०वश करून घे. '**पंच जित्वा**'—श्रोत्रादि पंचेंद्रियांना जिंकून '**षट् विदित्वा**'—अशनाया, पिपासा, शोक, मोह, जरा व मृत्यु यांस जाणून '**सप्त हित्वा**'—पंचेंद्रियें, मन व बुद्धि यांचा त्याग करून '**सुखी भव**'—सुखी हो. 'यदा पंचावतिष्ठन्ते०' या काठक श्रुतींत पंचेंद्रियें, बुद्धि व मन यांच्या निग्रहालाच परागति म्हटलें आहे.

दर्शन किंवा बीभत्स दर्शन-श्रवणादिक यांपासून भय उत्पन्न झाल्यास त्यावेळीं त्याचा प्रतिकार करणाराचा असंभव असल्यामुळें सर्व लोक निजले असतां एकट्यानेंच जागत बसूं नये.

राजा, समुद्राच्या परतीरावर नेणाऱ्या नौकेप्रमाणें सत्य म्हणजे यथार्थभाषण हें स्वर्गाचें साधन आहे. किंवा सत्य म्ह० ब्रह्म हाच मोक्ष आहे. हे राजन्, अशा या 'एकमेव अद्वितीय' सत्याला तूं जाणत नाहींस व कपटाचा आश्रय करितोस.

राजा धृतराष्ट्रा, आतां क्षमेचें महत्त्व ऐक. क्षमाशीलांचा फक्त एकच दोष मानला जातो. लोक क्षमावान् मनुष्याला दुर्बल समजतात. यावांचून त्याच्या ठिकाणीं अन्य कोणताहि दोष संभवत नाहीं. परंतु सुज्ञांनीं हा दोष मानूं नये. कारण 'क्षमा' हेंच श्रेष्ठ बल आहे. 'क्षमा हा दुर्बलाचा गुण व सबलाचें भूषण आहे. क्षमा हें एक वशीकरण आहे. या लोकीं क्षमेनें काय साध्य होणार नाहीं ! ज्यांच्या हातीं शांतिरूप खड्ग आहे, त्याला दुर्जन काय करूं शकणार ! तृणरहित स्थलीं पडलेला अग्नि स्वतःच शांत होत असतो.

परंतु अक्षमावान् पुरुष आपल्या निष्ठुरतादि दोषांनीं शत्रूला व स्वतःलाहि संताप देतो. धर्म हें एकच परम श्रेय आहे, क्षमा हीच उत्तम शांति आहे, विद्या हीच परम तृप्ति आहे आणि एक अहिंसाच सुखावह आहे. यास्तव हे राजा, कुमारांच्या युद्धानें तूं कुलक्षय करूं नको. राजा, बिळांत पडून रहाणाऱ्या मूषकादि प्राण्यांस सर्प जसा ग्रासून टाकितो, तसा शत्रूशीं विरोध न करणारा राजा व प्रवास न करणारा ब्राह्मण यांचा पृथ्वी नाश करिते. कठोर वचन व दुर्जनांचा सन्मान हीं दोन कर्म निंद्य आहेत. तीं न करणारा मनुष्य या लोकीं उत्कर्ष पावतो. परंतु राजा, तूं तर शकुन्यादि असज्जनांचा मोठा सत्कार करीत आहेस. हे भरतश्रेष्ठा, दुसऱ्याच्या बुद्धीनें चालणारे दोन प्रकारचे लोक आहेत. एकानें एखाद्याला पूज्य मानतांच स्वतःहि विचार न करितां त्याला पूज्य मानणें हा एक प्रकार, राजा तूंहि त्या अप्रबुद्ध माणसाप्रमाणें दुर्योधनानें कर्णाला मानार्ह मानतांच त्याला सन्मान्य समजूं लागलास. कांहीं स्त्रियाहि अशा वृत्तीच्या असतात. एखाद्या पुरुषावर एका स्त्रीची प्रीति

---

१ एको धर्मः परं श्रेयः क्षमैका शान्तिरुत्तमा ।
विद्यैका परमा तृप्तिरहिंसैका सुखावहा ॥

जडलेली पाहतांच अनेक स्त्रियांनीं त्याच पुरुषावर आसक्त होणें हें परप्रत्ययानें वागणाराचें दुसरें लक्षण आहे. या वृत्तीचीं माणसें दुसऱ्याच्या मतानें कर्मे करीत असतात. त्यांना स्वतःची बुद्धि नसते.

हे राजन्, दरिद्री माणसाची महत्त्वाकांक्षा व हातीं कसलाहि अधिकार नसलेल्या तुझ्या पुत्रांप्रमाणें असमर्थाचा क्रोध हे दोन मनोविकार त्याचें शरीरशोषण करणारे तीक्ष्ण कंटकच आहेत.

हे राजन्, तुझ्यासारखे पुत्रकलहाच्या निवारणाविषयीं उदासीन असलेले गृहस्थ व व्यवहारासक्त यति हे दोघे आपापल्या वृत्तीच्या विपरीत कर्मांमुळें लोकांत सत्कीर्तीला प्राप्त होत नाहींत. परंतु हे कुरुसत्तमा, ज्येष्ठ पांडवासारखा समर्थ असूनहि क्षमावान् आणि दरिद्री असूनहि दातृत्ववान् अशा दोन श्रेष्ठ गुणांनीं युक्त असलेले पुरुष स्वर्गाचेंहि अतिक्रमण करून विराजमान होतात.

धृतराष्ट्रा, न्यायप्राप्त द्रव्याच्या विनियोगांत दोन प्रकारचा दोष संभवतो. तूं जसें दुर्योधनाला राज्यार्पण केलें आहेस तसें अपात्रीं समर्पण आणि युधिष्ठिरासारख्या सत्पात्रास त्याचें अप्रदान, हे दोन मुख्य दोष आहेत. यास्तव तुझ्या पुत्रासारखा धनवान् असून अदाता व दरिद्री असून अतपस्वी या दोघांना गळ्यांत दृढ शिला बांधून जिवंतपणींच समुद्रांत बुडवावें. हे पुरुषव्याघ्रा, योगयुक्त परिव्राजक संन्यासी व रणांत युद्धाला तोंड देऊन गतप्राण झालेला वीर हे दोघे सूर्यमंडलाचा भेद करून ऊर्ध्वलोकीं जातात."

हे भरतर्षभा, मनुष्यांचे तीन उपाय श्रुत आहेत. ते सांगतों ऐक—सर्व उपायांमध्यें युद्ध निकृष्ट, भेद व दान मध्यम आणि साम हा उत्कृष्ट उपाय आहे, असें वेदवेत्ते विद्वान् म्हणतात. उत्तम, मध्यम व अधम असे तीन प्रकारचे पुरुष असतात. त्यांची त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्रिविध कार्यांत योजना करावी. परंतु तूं कर्णादि अधमांना श्रेष्ठ कार्यांत नियुक्त केलें आहेस.

भार्या, दास आणि सुत हे तिघे धनाचे स्वामी नसतात. ते जें वित्त मिळवितात त्यावर त्यांच्या धन्याची सत्ता असते. यास्तव तूं विद्यमान असतांना तुझ्या पुत्राचा राज्यावर अधिकार नाहीं. पांडवांचें राज्य त्यांना परत देण्यास तूं धर्मतः समर्थ आहेस. धृतराष्ट्रा, परद्रव्याचा अपहार, परदारहरण आणि सुहृदांचा परित्याग हे तीन दोष क्षय करणारे आहेत. तसेंच काम, क्रोध व लोभ हें तीन प्रकारचें नरकाचें द्वार आपला नाश करणारें आहे, तस्मात् या

तिर्हींचा त्याग करावा. हे राजा, तूं परद्रव्यहरणादि तीन दोष आचरिले आहेस व कामादि दोषांनींहि युक्त आहेस.

हे कुरुश्रेष्ठा, वरदान, राज्य व पुत्रजन्म या तिर्हींचें पुण्य 'शत्रूला संकटांतून मुक्त करणें' या एका सत्कर्माच्या तुल्य आहे. यास्तव तूं युधिष्ठिराला गोत्रवधाच्या पातकापासून सोडीव.

ज्यानें पूर्वीं सेवा केली आहे, असा भक्त, सांप्रत भक्ति करीत असलेला भक्त आणि 'मी तुमचा आहें' असें बोलून शरण आलेला पुरुष, या तिघांचा आपल्या आपत्कालींहि त्याग करूं नये. तथापि तुझी भक्ति करणाऱ्या पांडवांना त्यांच्या संकटांतहि तूं आश्रय दिला नाहींस.

मंदमति, दीर्घसूत्री म्ह० चेंगट व चंचल मनुष्य आणि स्तुतिपाठक यांच्याशीं बलवान् राजानें कदापि संकेत करूं नये, असें पंडितांचें मत आहे. बा धृतराष्ट्रा, गृहस्थधर्मांत स्थित असलेल्या तुझ्या ऐश्वर्यसंपन्न गृहांत सर्वदा चार प्रकारचे लोक निवास करोत. १ वृद्ध ज्ञातिबांधव, २ आपद्ग्रस्त कुलीन, ३ द्रव्यहीन मित्र व ४ अपत्यरहित भगिनी हीं चौघें तत्काल उपकार करणारीं आहेत. कारण वृद्ध कुलधर्मांचा उपदेश करीत असतात. आपत्तींत असलेले कुलीन आचार्य मुलांना शिष्टाचार शिकवीत असतात. दरिद्री सखा हिताचा उपदेश करीत असतो आणि पुत्ररहित भगिनी गृहांतील धनादिकांचें रक्षण करीत असते. यास्तव या सर्वांना सतत आश्रय द्यावा. तुझ्या गृहांत हीं सर्व आहेत, परंतु त्यांच्या उपदेशाचें तूं ग्रहण करीत नाहींस.

महाराज, पूर्वीं एकदा इंद्रानें विचारिलें असतां बृहस्पतीनें त्याला चार प्रकारचीं सद्यःफल साधनें सांगितलीं. तीं मी तुला सांगतों ऐक—देवतांचा शापानुग्रहरूप संकल्प सद्यःफल देणारा आहे. २ अगस्त्यादि ज्ञात्यांचा समुद्रपानादि प्रभावहि सद्यःफल देणारा असल्यामुळें तेहि देवतुल्यच आहेत. ३ विद्यासंपन्न विद्वानांचा विनय गुरुप्रसादरूप सद्यःफल देतो आणि ४ चौर्यादिकांसारखें पापकर्म विनाशरूप सद्यःफल देत असतें. अशा प्रकारचें चौर्यकर्म तूं केलें आहेस.

अग्निहोत्र, मौन, शास्त्राध्ययन व यज्ञ हीं चार कर्में भयरहित आहेत, परंतु त्यांचें विपरीत आचरण भयावह आहे. तीं मानासाठीं आचरिलीं असतां भयंकर फल देतात आणि हे नृपश्रेष्ठा, तूं तर सर्व कर्में मानार्थंच करीत असतोस.

हे भरतश्रेष्ठा, मनुष्यानें मोठ्या यत्नानें पिता, माता, अग्नि, आत्मा व गुरु या पंचाग्नींची नित्य परिचर्या करावी. कारण हे सर्व अग्नितुल्य पूज्य आहेत. परंतु तुझा पुत्र पित्याप्रमाणें पूज्य असलेल्या ज्येष्ठ युधिष्ठिर भ्रात्याचा सत्कार करीत नाहीं. 'ज्येष्ठो भ्राता पितुःसमः' म्ह० ज्येष्ठ भ्राता पितृतुल्य आहे, असें श्रुत आहे. या लोकीं देव, पितर, मनुष्य, यति व अतिथि या पांच जणांचें केवळ पूजन केल्यानेंच यशःप्राप्ति होते.

हे राजन्, मित्र, अमित्र, मध्यस्थ, गुरुजन आणि आश्रित हे पांचजण तूं जेथें जेथें जाशील, तेथें तेथें तुला अनुसरतील. इहलोकीं संपादन केलेले मित्रादिक या लोकीं, परलोकीं व जन्मांतरींहि आपापलीं कार्यें करतील. यास्तव तुझ्याशीं मित्रत्वानें वागणारे जे पांडव त्यांच्याशीं मैत्रीनें वागणेंच योग्य होय. परंतु अंधत्वामुळें दुर्जनांच्या वचनानें फसलेल्या तुला पांडवांचे गुण दिसत नाहींत. मानवांच्या पंचेंद्रियांतील एक इंद्रिय जरी नष्ट झालें, तरी कातड्याच्या पिशवीला पडलेल्या बारीकशा एका छिद्रांतून वाहून जाणाऱ्या जलाप्रमाणें त्याची बुद्धि नाहींशी होते.

हे राजा, उत्कर्षाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें निद्रा, तंद्रा, भय, क्रोध, आलस्य व दीर्घसूत्रता हे सहा दोष टाकावे. मनुष्यानें १ शास्त्राचें रहस्य न सांगणारा आचार्य, २ वेदाध्ययन न करणारा ऋत्विज, ३ रक्षण न करणारा राजा, ४ अप्रिय भाषण करणारी भार्या, ५ गांवांत भटकणारा गोपाल आणि ६ वनांत जाऊन बसणारा नापित या सहाजणांचा फुटक्या नौकेप्रमाणें त्याग करावा, अशी नीति आहे. तिला अनुसरून तुझे प्रजाजन हे राजा, पांडवांचें रक्षण न करणाऱ्या तुझाहि त्याग करितील.

सत्य, दान, अनालस्य, अनसूया, क्षमा व धृति या सहा गुणांचा पुरुषानें कदापि त्याग करूं नये. परंतु तूं धृतिशून्य असल्यामुळें दुर्योधनाचा त्याग करण्याचें धैर्य तुझ्या ठिकाणीं दिसत नाहीं. १ द्रव्यप्राप्ति, २ नित्य आरोग्य, ३ प्रियवादिनी भार्या, ४ प्रिय पत्नी, ५ आज्ञाधारक पुत्र व ६ अर्थप्राप्ति करून देणारी विद्या, हीं सहा या लोकांतील सुखें आहेत. जो मनुष्य चित्तामध्यें नित्य वास करणाऱ्या काम-क्रोध, शोक-मोह व मद-मान या सहा विकारांना जिंकतो तो जितेंद्रिय पुरुष हिंसादि पापांनीं कदापि युक्त होत नाहीं. परंतु राज्याची इच्छा करणारा तूं या पापानें व अनर्थानें युक्त झाला आहेस.

चोर प्रमत्तावर उपजीविका करितात, वैद्य व्याधिग्रस्त जनतेवर आपला निर्वाह चालवितात. कामिनी कामासक्तावर अवलंबून असतात. याजक यजमानावर आपला चरितार्थ चालवितात. राजा नित्य कलह करणाऱ्या लोकांपासून द्रव्य संपादन करितो. ( भांडणाऱ्या लोकांना न्याय देणारा न्यायाधीश राजाचाच असतो. ) आणि पंडित मूर्खांवर आपलें कार्य साधितात. या सहा विषयांवर आपापलें जीवित चालविणारे हे असे सहाच प्रकारचे लोक आहेत. त्यांहून सातवा कोणी उपलब्ध होत नाहीं. या चोरादि सहा लोकांत तुझा अंतर्भाव होत नसतांना हे राजा, तूं पांडवांच्या धनावर उपजीविका कशी करितोस !

धृतराष्ट्रा, १ धेनु २ सेवा ३ कृषि ४ भार्या ५ विद्या आणि ६ शूद्रांची संगति या सहा वस्तूंकडे क्षणभर जरी दुर्लक्ष झालें तरी त्यांचा विनाश होत असतो आणि हे राजा, तूं तर पुत्रस्नेहानें मोहित होऊन सद्विद्येकडे दुर्लक्ष केलेंस व आतां स्वतःचा नाश करून घेत आहेस! तूं सत्याचा त्याग करूं नको. हे राजन्, ज्यांचें शिक्षण समाप्त झालें आहे, असे शिष्य आचार्यांचा अवमान करितात, विवाहानंतर पुत्र मातेला अवमानितात, अवाप्तकाम स्त्रिया पुरुषांची उपेक्षा करितात, कृतार्थ झाल्यावर प्रयोजकाचा, परतीराला गेल्यावर नावेचा व रोग नाहींसा झाल्यावर वैद्याचा, अशा पूर्वी उपकार केलेल्या सहा जणांचा नित्य अवमान होत असतो. त्याच न्यायानें हे प्रभो, तूंहि समग्र राज्यलाभानें कृतकृत्य झाला आहेस, म्हणून पांडवांची अशी उपेक्षा करीत आहेस.

१ आरोग्य, २ अनृणित्व, ३ अप्रवास, ४ सत्संगति, ५ स्वाधीन वृत्ति व ६ निर्भय निवास, हीं जीवलोकाचीं सहा सुखें आहेत. परंतु तुला सत्संग नाहीं.

ईर्षावान्, निंदक, असंतुष्ट, क्रोधी, नित्यशंकी, परभाग्यावर उपजीविका करणारा, असे हे सहा प्रकारचे मानव नित्य दुःखी असतात. तूं ईर्षावान् आहेस, तुला दया नाहीं व तुझे पुत्र तुझ्या अधीन नाहींत.

१ स्त्रिया, २ द्यूत, ३ मृगया, ४ मद्यपान, ५ कठोरवचन, ६ निर्दयपणानें केलेला दंड व ७ द्रव्याचा अपव्यय, हे सात दोष दृढमूल झालेल्या पृथ्वीपतीचाहि प्रायः नाश करितात. यास्तव दुःखाचें निमित्त होणाऱ्या या सात दोषांचा राजानें सदा त्याग करावा. परंतु तुझ्या पुत्रांनीं पांडवांना वाक्पारुष्य व दंडपारुष्य यांनीं क्लेश दिले आहेत.

राजा, विनाश पावणाऱ्या पुरुषाचीं हीं आठ पूर्वचिन्हें आहेत—१ तो प्रथम ब्राह्मणांचा द्वेष करूं लागतो. २ त्यांच्याविरुद्ध आचरण करितो. ३ त्यांच्या सर्वस्वाचा अपहार करितो. ४ त्यांना ताडन करितो. ५ ब्राह्मणांच्या निंदेंत आनंद मानितो. ६ त्यांची प्रशंसा त्याला रुचत नाहीं. ७ आपल्या कर्तव्यांत त्यांचें स्मरण करीत नाहीं. व ८ याचना करणाऱ्या ब्राह्मणाची त्याच्या समक्ष निर्भर्त्सना करितो. सुज्ञ मनुष्यानें हे आठ दोष आहेत असें जाणून, ते आचरूं नयेत. परंतु हे राजन्, तुझ्या पुत्रानें मैत्रेय-ऋषीचा अवमान केल्यामुळें त्याला या आठांतील शेवटला दोष लागेल, असें मला वाटतें.

हे भारता, स्वसुखाला कारण होणारे आठ प्रकारचे विषय मी तुला सांगतों ते ऐक—१ प्रिय मित्राची भेट, २ विपुल द्रव्यप्राप्ति, ३ पुत्राचें आलिंगन, ४ दांपत्यसमागमसुख, ५ समयोचित प्रिय भाषण, ६ ज्ञातिवर्गाचा उत्कर्ष, ७ इष्ट वस्तूचा लाभ आणि ८ बहुजन समाजांत सन्मान, या आठ गोष्टी नवनीताप्रमाणें हर्षाचें सार आहेत. परंतु हे राजन्, तूं द्रौपदीला सभेंत आणवून आपला स्वतःचा मान नष्ट केलास. १ बुद्धि, २ कुलीनत्व, ३ इंद्रियनिग्रह, ४ अध्ययन, ५ पराक्रम, ६ मितभाषण, ७ यथाशक्ति दान व ८ कृतज्ञता या आठ गुणांनीं पुरुष या लोकीं प्रकाशित होतो. पण तुझ्या पुत्रामध्यें यांतील एकहि गुण नाहीं व तूंहि त्यालाच अनुसरतोस !

श्रोत्रादि पंच ज्ञानेंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार व स्थूल शरीर हीं जणुं काय नवद्वारेंच म्ह० विषयग्रहणाचे मार्गच ज्या मध्यें आहेत, अविद्या, काम व कर्म हे जणु काय तीन विधारक स्तंभच ज्यांत आहेत, शब्दादि पांच विषय हे ज्यामध्यें साक्षिवत् उदासीन आहेत व क्षेत्रज्ञ चिदात्म्याकडून जे अधिष्ठित आहेत, अशा या देहद्वयरूप एका देहाला म्ह० क्षेत्राला जो जाणतो तो उत्कृष्ट ब्रह्मवेत्ता होय.

हे धृतराष्ट्रा, १ मद्यादिकांनीं मत्त झालेला, २ प्रमत्त, ३ उन्मत्त, ४ श्रांत, ५ क्रुद्ध, ६ बुभुक्षित, ७ उतावीळ, ८ लोभी, ९ भ्यालेला व १० कामी, असे दहा प्रकारचे लोक धर्म जाणत नाहींत. या दहांतील तूं लोभी असल्या-मुळें धर्म जाणत नाहींस. पण या सर्व दोषांत पंडितानें आसक्त होऊं नये. याविषयीं एका पुरातन इतिहासाचें उदाहरण प्रसिद्ध आहे. पूर्वीं सुधन्वा असुरानें पुत्रार्थ अशी गाथा गायिली आहे. जो राजा काम-क्रोधाचा त्याग करून

सत्पात्रीं धनाचा व्यय करितो, तारतम्य जाणतो व कोणतेंहि कार्य तत्काल करून टाकितो, लांबणीवर टाकीत नाहीं, त्याला सर्व लोक प्रमाण मानितात. जो नृपति कोणत्या माणसावर विश्वास ठेवावा हें जाणतो, ज्यांचा दोष कळला आहे त्यांना उचित दंड करितो, अपराधानुसार दंडाचें प्रमाण व ब्राह्मणादिकांच्या कोणत्या अपराधाची क्षमा करावी हें जाणतो, त्या-अशाप्रकारच्या राजाची समग्र श्री सतत सेवा करीत असते.

जो भूपति दुर्बलांचा अवमान करीत नाहीं, शत्रूचें छिद्र पहाण्यांत दक्ष राहून बुद्धिपुरस्सर त्याच्याशीं प्रेमानें वागतो, बलवानाशीं युद्ध करीत नाहीं आणि योग्यकालीं पराक्रम दाखवितो, तोच खरा धीर होय. जो महात्मा संकट प्राप्त झालें असतां व्यथित होत नाहीं, दक्ष राहून उद्योग करितो, प्रसंगीं दुःख सहन करितो, अशा कार्यभार सहन करणाऱ्या धुरंधराचे सर्व शत्रु पराभूत झालेच आहेत, असें समजावें.

जो मनुष्य कारणावांचून घरांतून बाहेर जात नाहीं ( निष्कारण भटकत फिरत नाहीं ), पापी लोकांशीं सख्य करीत नाहीं, परदाराभिलाष, दंभ, चोरी, चहाडी व मद्यपान, या दोषांपासून दूर रहातो, तो सदैव सुखी होतो. धर्म-काम-अर्थ या तिहींचा क्रोधानें आरंभ करीत नाहीं, कोणीं विचारिलें असतां सत्य वार्ताच कथन करितो, अल्पप्राप्तीसाठीं कदापि कलह करीत नाहीं, किंवा मित्राशीं वाद करीत नाहीं आणि तो विवेकी मनुष्य सत्कार न केल्यास क्रुद्ध होत नाहीं. जो कोणाची असूया करीत नाहीं, उलट अनुकंपाच करितो, दुर्बलाशीं विरोध करीत नाहीं, अमर्याद भाषण करीत नाहीं, वादांत क्षमा करितो, अशा पुरुषाची सर्वत्र प्रशंसा होते. जो उद्धत वेष धारण करीत नाहीं, तर सर्वदा नम्र वेषांतच राहतो, स्वतः पराक्रम करूनहि दुसऱ्यांच्या पुढें आत्मश्लाघा करीत नाहीं, स्वतः क्रुद्ध झाला असतांहि इतरांस कटु वचन बोलत नाहीं, असा मनुष्य लोकांना सर्वदा प्रिय होतो.

जो शांत झालेलें वैर पुनः उपस्थित करीत नाहीं, उत्कर्षानें दर्पयुक्त व अपकर्षानें लज्जित होत नाहीं, ' मी आतां आपत्तींत सांपडलों आहें ' असें म्हणून अकार्य करीत नाहीं, अशा मनुष्याला श्रेष्ठ लोक शीलसंपन्न म्हणतात. जो स्वतः-च्या सुखानें संतुष्ट होत नाहीं किंवा दुसऱ्याच्या दुःखानें आनंद मानीत नाहीं, एकदा एखाद्याला दान दिल्यानंतर त्याबद्दल पश्चात्ताप करीत नाहीं, असा मनुष्यच

शीलवान् सत्पुरुष म्हटला जातो. जो परावरज्ञ म्ह० उत्तमाधम विवेकवान् मनुष्य देशाचार, त्यांचे नियम, भाषाभेद व जातिधर्मादि जाणतो, तो जेथें जेथें जातो, तेथें तेथें सदैव महाजनांचा अधिपति होतो. दंभ म्ह० परवंचनेच्या इच्छेनें धर्मानुष्ठान करणारा, मोह म्ह० अनात्म्यामध्यें आत्मबुद्धि ठेवणारा, इतरांचा द्वेष करणारा, पापकर्म आचरणारा, राजाचें अप्रिय करणारा, चहाडखोर, सर्वांशीं वैर करणारा, मत्त, उन्मत्त व दुर्जन यांच्याशीं वाद करणारा, अशा लोकांना जो प्रज्ञावान् वर्ज करितो तो श्रेष्ठ होय. दान, मोह, देवकार्य, मंगलाचरण, प्रायश्चित्त व विविध लोकांवर उपकार, हीं कार्यें जो नित्य करितो, त्याचा देवता उत्कर्ष करितात. जो बुद्धिमान् पुरुष समानाशींच विवाह, सख्य, व्यवहार व संभाषण करितो, हीनजनांशीं करीत नाहीं; विशिष्ट गुणांनीं युक्त असलेल्या लोकांना अग्रस्थान देऊन त्याचा सन्मान करितो, त्या विद्वानाचे सर्व संकल्प उत्तमप्रकारें सिद्धीस जातात. जो आत्मवेत्ता विद्वान् आपल्या सर्व आश्रित वर्गास अन्न विभागून देऊन मग स्वतः परिमित आहार करितो, दिवसभर पुष्कळ कार्य करून अल्प निद्रा घेतो, शत्रूनें जरी याचना केली, तरी त्याला इष्ट वस्तु देतो, त्या धर्मात्म्यापासून सर्व अनर्थ दूर पळतात.

ज्या बुद्धिमानाचें इष्टकार्य किंवा सिद्ध न झालेलें कृत्य, यांची बाहेरच्या इतर लोकांना यत्किंचित्‌हि वार्ता कळत नाहीं, ज्याचे सर्व गुप्त संकेत योग्य प्रकारें योजले जातात, त्याचें अल्पहि कार्य विफल होत नाहीं. जो सर्व प्राणिमात्रांशीं मैत्री ठेवितो, सत्य व मृदु भाषण करितो, शुद्धचित्तानें दुसऱ्याचा आदर करितो, तो आपल्या प्रसन्नतेनें ज्ञातिबांधवांमध्यें उत्तम खाणींतील श्रेष्ठ रत्नाप्रमाणें अतिशय प्रकाशतो.

जो सज्जन स्वतःचे दोष लोकांना अज्ञात असले, तरीहि त्याविषयीं मनांत लज्जित होतो, तो सर्व लोकांचा गुरु होतो आणि तो समाहितचित्त उदारात्मा तेजस्वी पुरुष स्वतेजानें सूर्याप्रमाणें भासतो.

बा धृतराष्ट्रा, शापदग्ध झालेल्या पांडूचे हे पंचेंद्रतुल्य असलेले पांच पुत्र वनांत जन्म पावले, तूंच त्यांना बालपणापासून वाढविलेंस व शिक्षण दिलेंस, ते तुझी आज्ञा अवश्य पाळतील. यास्तव हे आंबिकेया, त्यांचें उचित राज्य त्यांना दे आणि आपल्या पुत्रांसह आनंदानें सुखोपभोग घे. म्हणजे देव किंवा मनुष्य यांतील कोणीहि तुझ्याविषयीं साशंक होणार नाहींत. ५. ३. ३३.

## अध्याय ३४ वा.

[ १ कौरवांच्या श्रेयःसाधनाविषयीं धृतराष्ट्राचा प्रश्न. २ विदुरानें त्याला केलेला नीतीचा उपदेश. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे विदुरा, आज माझें मन चिंताग्नीनें जळत आहे, त्यामुळें मला झोंपहि येत नाहीं. तूं धर्मार्थ जाणण्यांत कुशल आहेस, यास्तव या प्रसंगीं मला आमच्या कर्तव्याचा उपदेश कर. हे धर्मज्ञा, अजातशत्रु युधिष्ठिराला जें पथ्यकर व कौरवांना श्रेयस्कर असेल तें मला सांग. माझ्या पूर्वापराधाचें स्मरण होऊन भावि दुःखाच्या विचारानें माझें मन उद्विग्न झालें आहे. माझ्या पापशंकी मनांत एकसारखे अशुभ विचारच येत आहेत. त्यामुळें व्याकुल होऊन मी तुला हें विचारीत आहें. हे सर्वज्ञा, तूं ज्ञानी आहेस. यास्तव युधिष्ठिराचें मनोगत काय आहे तें मला यथार्थ निवेदन कर.

( २ ) **विदुर**—राजा, ज्याचा पराभव होऊं नये अशी आपली इच्छा असेल, त्यानें जरी विचारिलें नसलें तरी त्याला त्याच्या हिताचें वचन सांगावें, मग तें शुभ असो किंवा अशुभ असो. त्याला तें प्रिय वाटो किंवा अप्रिय वाटो. सज्जनानें या आपल्या कर्तव्यास कधींहि चुकूं नये. यास्तव हे राजन्, ज्यांत कौरवांचें हित आहे, असेंच धर्म्य व श्रेयस्कर वचन मी तुला सांगतों तें ऐक.

हे भारता, कपटद्यूतादि असदुपायांनीं साध्य होणारीं कर्में जरी तात्कालिक यश देणारीं असलीं तरी तीं परिणामीं दुःखफल देणारीं असतात. यास्तव तूं अशा कर्मांत प्रवृत्त होऊं नको. त्याचप्रमाणें योग्य साधनानें केलेलें शास्त्रविहित कर्म जरी साध्य झालें नाहीं, तरी बुद्धिमंतानें त्याविषयीं मन खिन्न होऊं देऊं नये. एका मुख्य कर्माच्या अनुषंगानें अनेक गौण क्रिया असतात. यास्तव विचारी मनुष्यानें प्रथम त्या सर्वांच्या परिणामाचा निश्चय करून त्या कराव्या. उतावीळपणा करूं नये. आपण आरंभिलेलें कर्म सिद्ध होईल, असें निश्चयानें वाटत असलें तरच त्याचा आरंभ करावा. एरवीं तें हातीं घेऊं नये.

कर्माचा परिणाम व त्याचाहि भावी परिणाम यांचा विचार करून मग त्यासाठीं उद्यम करणें किंवा न करणें, यांचा निश्चय करावा.

हे राजन्, जो भूपाल आपला द्रव्यकोश, प्रजाजन, दंड व सैन्य यांची क्षय व वृद्धि जाणत नाहीं, तो राज्यावर स्थिर रहात नाहीं. लवकरच राज्या-

पासून च्युत होतो. परंतु धर्मार्थज्ञानानें युक्त असलेला जो सुज्ञ नृपति कोशादि तिन्ही विभागांची यथार्थ स्थिति स्वतः पाहतो, जमाखर्चादि हिशोब अवलोकन करितो, तोच निरंतर राज्योपभोग घेतो. राज्य प्राप्त झालें असतां गर्वानें अयोग्य वर्तन कदापि करूं नये. कारण जरा जशी अत्यंत सुंदर स्वरूपहि नष्ट करिते, त्याप्रमाणें अनम्रता श्रीचा नाश करिते.

राजा धृतराष्ट्रा, भक्ष्याच्या दर्शनानेंच लोलुप झालेला मत्स्य परिणामाकडे लक्ष न देतां आमिषानें युक्त असलेला लोहगळ गिळतो व प्राणास मुकतो. यास्तव उत्कर्षाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें आरंभीं मधुर वाटणारें परंतु परिणामीं मृत्यु देणारें कर्म कधीं करूं नये. आपणांस जो पदार्थ खातां येणें शक्य आहे, जो खाल्ल्यावर पचवितां येईल व शेवटीं हितावह होईल, त्याच पदार्थांचें सेवन करावें.

जो मूढ मनुष्य वृक्षाचीं अपक्व फलें तोडतो, त्याला त्या फलाचा स्वादु रस तर मिळत नाहींच, पण त्या फलापासून उत्पन्न होणाऱ्या बीजाचाहि नाश होतो. परंतु जो सुज्ञ पुरुष योग्यकालीं परिपक्व झालेल्या फलाचें ग्रहण करितो, त्याला मधुर रसाचा आस्वाद मिळून त्या फलापासून बीजाचा लाभ होतो व त्यापासून पुनः फलप्राप्ति होते. हे राजश्रेष्ठा, भ्रमर ज्याप्रमाणें पुष्पांचें रक्षण करून त्यांपासून मध संपादन करितो, त्याप्रमाणें सुखार्थी पुरुषानें हिंसा केल्यावांचून मनुष्यांकडून अर्थ संपादन करावा.

ज्याप्रमाणें मालाकार वृक्षांचें निर्मूलन न करतांच उद्यानांतील एकेक पुष्प वेंचून घेतो, त्याप्रमाणें कार्याच्या मूलावर आघात न करतां अर्थसंपादन करावा. कोळसे पाडणारा लोणारी मूलासह वृक्ष तोडून व त्याचीं काष्ठें जाळून कोळसे करितो. त्याचें अनुकरण करूं नये.

'हें कार्य केलें असतां काय होईल? आणि न केल्यास काय परिणाम होईल?' याचा पूर्णपणें विचार करून मगच पुरुषानें तें कार्य करावें. प्रबलाशीं वैर करणें इत्यादि कांहीं कर्में आरंभिण्यास अयोग्यच असतात. अशा कार्याविषयीं केलेला सर्व पुरुषार्थ व्यर्थ होतो.

हे कुरुश्रेष्ठा, स्त्रिया ज्याप्रमाणें क्लीब पतीची इच्छा करीत नाहींत, त्याप्रमाणें प्रजा दुर्बल राजाची इच्छा करीत नाहींत. कारण अशा राजाचा प्रसाद निष्फल असतो व क्रोधहि निरर्थक ठरतो. कांहीं कर्में अल्प उपायांनीं साध्य होऊन

महाफल देणारीं असतात. विचारी पुरुष अशा कार्याला तत्काल आरंभ करितात. त्यांत विघ्नें येत नाहींत. हे भारता, जो नृपति प्रजेकडे प्रेमयुक्त दृष्टीनें पाहून तिच्याशीं सरळ वागतो, तो कांहीं पराक्रम न करतांच स्वस्थ बसून जरी राहिला, तरी प्रजा त्याच्यावर अनुरक्त असते.

वृक्षानें प्रफुल्लित व्हावें पण फलित होऊं नये. फल जर आलें तरी तें उंचावर यावें. हातीं येण्यासारखें नसावें आणि तें जरी अपक्व असलें, तरीहि बाह्यतः परिपक्वच दिसावें म्हणजे त्या वृक्षाचा नाश कदापि होत नाहीं. याच न्यायानें राजानें पुष्पित वृक्षाप्रमाणें प्रसन्न वृत्ति ठेवावी. भृत्य वर्गाला कृपादृष्टि व मधुर वाणी यांनीं संतुष्ट करावें. त्याच्यावर आपला पूर्ण अनुग्रह आहे, असें दाखवावें. पण धनादिकांनीं त्यांचें बल वाढवूं नये आणि जरी धनादिक दिलें, तरीहि भृत्याच्या वश होऊं नये. अपक्व फलाप्रमाणें नृपति आंतून जरी बलहीन असला तरी त्यानें बाह्यतः प्रबल असल्याप्रमाणेंच भासवावें, म्हणजे तो कदापि विनाश पावत नाहीं. जो नरेंद्र प्रसन्न दृष्टीनें, प्रेमल मनानें, मधुर वाणीनें व दानादि कर्मांनीं लोकांचें प्रेम संपादन करितो, तो लोकांनाहि प्रिय होतो आणि जो भूमिपाल मृगांना भयभीत करणाऱ्या व्याधाप्रमाणें प्राणिमात्रांस त्रस्त करितो, त्याला सागरान्त पृथ्वीचें राज्य जरी प्राप्त झालें, तरी सत्वरच त्याचा नाश होतो.

धृतराष्ट्रा, अनीतिमान् राजाला-पितृपितामहांचें राज्य जरी प्राप्त झालें, तरी त्याचा वायूनें भ्रंश पावणाऱ्या छिन्न अभ्राप्रमाणें स्वकर्मानेंच सत्वर नाश होतो. अनादिकालापासून सज्जनांनीं आचरिलेल्या धर्माला अनुसरणाऱ्या राजाची धनसंपन्न पृथ्वी उत्कर्ष पावते. परंतु तोच राजा जर धर्माचा त्याग करून अधर्मानें वागूं लागला तर भूमि अग्नींत टाकलेल्या चर्माप्रमाणें संकोच पावून अल्प फल देऊं लागते.

नृपति परराष्ट्राचा नाश करण्यासाठीं जितका यत्न करितात, तितकाच त्यांनीं स्वराष्ट्राचें पालन करण्यासाठीं प्रयत्न करावा. धर्मानें राज्य संपादन करावें व धर्मानेंच त्याचें परिपालन करावें. धर्मयुक्त साधनांनीं प्राप्त झालेली संपत्ति कदापि नष्ट होत नाहीं किंवा क्षय पावत नाहीं.

हे कुरुसत्तमा, उन्मत्ताच्या वल्गना आणि बालकाची बडबड यांतूनहि दगडांतील सुवर्णाप्रमाणें सार असल्यास त्याचें ग्रहण करावें. शिलोञ्छवृत्तीचा

मनुष्य जसा धान्याचे कण वेंचून घेत असतो, तसा सुज्ञानें मातृ-पितृ-गुरु इत्यादिकांच्या उपदेशाचा, सदाचरणाचा व पंडितांच्या वचनांचा संग्रह करावा. यास्तव हे राजा, तूंहि आमच्यासारख्यांच्या भाषणाचें ग्रहण कर. गायी वासावरून ओळखतात, ब्राह्मण वेददृष्टीनें सर्व जाणतात, राजा हेरांच्या योगानें सर्वत्र दृष्टि ठेवितो आणि सामान्यजन मात्र नेत्रांनीं पाहतात. तस्मात् तूं पांडवांचें बल जाणण्यासाठीं हेरांची योजना कर.

राजा, सुखानें धार काढूं देणाऱ्या गायीला कदापि मार बसत नाहीं, परंतु द्वाड गायीला बलवान् पुरुष बांधतात व तिला अतिशय क्लेश देऊन दोहन करितात. जी वस्तु तापविल्यावांचून वांकते, तिला लोखंडादिकांप्रमाणें कोणीहि तापवीत नाहीं. स्वभावतःच लवचिक असलेल्या काठीला शेकून वांकवावें लागत नाहीं. विचारी मनुष्यानें या उपमा लक्षांत घेऊन बलिष्ठाशीं नम्रतेनें वागावें. जो बलवानाशीं नम्र असतो, तो इंद्रालाच वंदन करितो, असें समजावें. तस्मात् तूं पांडवांशीं नम्र हो, म्हणजे बलाधिष्ठात्री देवता इंद्र तुजवर अनुग्रह करील. पर्जन्य पशूंचा नाथ आहे. मंत्री राजाचे बांधव आहेत. पति स्त्रियांचे बांधव आहेत, म्हणजे ते स्त्रियांचें संरक्षण करितात. वेद यज्ञादि अनुष्ठानानें ब्राह्मणांचें रक्षण करितात. सत्यानें धर्माचें, अभ्यासानें विद्येचें, नित्य अभ्यंगस्नानानें रूपाचें आणि सद्वर्तनानें कुलाचें संरक्षण होतें. धान्याचें माप करून ठेवल्यानेंच तें सुरक्षित रहातें. व्यायाम, शिक्षण इत्यादिकांच्या योगानें अश्वांचें रक्षण होतें. वारंवार दर्शनानें गायीचें रक्षण होतें. कारण त्यांना तृणादि भक्ष्य विपुल मिळतें किंवा नाहीं, तें त्यामुळें कळतें, तसेंच साध्या वस्त्रानें स्त्रियांचें रक्षण करावें.

सत्कुलोत्पन्न मनुष्य जर दुर्वर्तनी निपजला तर केवल त्याच्या कुलासाठीं त्याला मान्य समजूं नये. उलट सदाचरणी पुरुष हीनकुलांत जरी जन्मला असला तरी तो मानार्ह समजावा. कारण केवल कुल हें धर्माचें कारण नव्हे तर कुल व वृत्त हीं दोन्ही धर्माचीं कारणें आहेत. ज्याला परक्याचें वित्त, रूप, पराक्रम, कुल, सुख, उत्कर्ष व सत्कार हीं सहन होत नाहींत, तो निरंतर व्याधिग्रस्तच असतो. ज्याला अकार्यानुष्ठान, कर्तव्यत्याग व अकालीं मंत्रभेद यांची भीति वाटत असेल, त्यानें ज्यायोगें चित्त प्रमत्त होईल अशा लोभादिकांचा आश्रय करूं नये.

राजा, मद तीन प्रकारचा आहे. १ विद्यामद, २ द्रव्यमद आणि ३ उच्च कुलाचा मद. या त्रिविध मदाच्या योगानें स्वभावतःच गर्विष्ठ असलेले लोक

अधिक उन्मत्त होतात. परंतु याच्या उलट सज्जन विद्या, धन व सत्कुल यांच्या योगानें विनयशील होतात. क्वचित् प्रसंगीं—एखाद्या संकटसमयीं सज्जनानें जर दुर्जनापाशीं साह्याची याचना केली, तर तो आपल्याला फार मोठा मानूं लागतो. त्यापूर्वी त्यानें जरी यत्किंचित्हि सुकृत केलेलें नसलें व त्याची 'असज्जन' अशी प्रसिद्धि असली, तरीहि तो स्वतःला मोठा सज्जन समजतो. जितात्मे, सज्जन व दुर्जन यांची गति सज्जनच आहेत. परंतु दुर्जन मात्र सज्जनांची गति होऊं शकत नाहीं. याच न्यायानें पांडवांनीं तुमच्यावर अनेक उपकार केले आहेत व पुढेंहि करतील. पण याच्या उलट तूं मात्र त्यांचा त्राता होणार नाहींस.

उंची वस्त्रें परिधान करणाराचा सभेंत आदर होतो. ज्याच्या घरांत गोरसाची समृद्धि असते, त्याला मिष्टान्नाचा निरंतर लाभ होतो, वहानानें युक्त असलेला मनुष्य मार्गाला जिंकतो, पण शीलवान् सर्वांनाच जिंकतो. तस्मात् हे राजा, तूं शीलसंरक्षण कर. यालोकीं पुरुषाचें शीलच श्रेष्ठ आहे. जो शीलभ्रष्ट झाला आहे त्याचें जीवित, वित्त किंवा बांधव व्यर्थ होत.

हे भरतश्रेष्ठा, धनिकांचें भोजन मांसप्रधान, मध्यमांचें गोरसप्रधान व दरिद्र्यांचें अन्न तैलप्रधान असतें. (मांसाचे पदार्थ खर्चाचे असल्यामुळें धनवानाकडे ते अधिक असतात. गोरसाची त्या कालीं सर्वत्र समृद्धि असल्यामुळें सामान्य जनांसहि त्याचें यथेच्छ सेवन करतां येत असे व कनिष्ठ प्रतीच्या दरिद्री वर्गास मात्र तेलाच्या पदार्थांवर निर्वाह करावा लागत असे) तथापि हे राजा, दरिद्री लोकच मिष्टान्नापेक्षांहि अधिक स्वादु अन्नाचा आस्वाद घेतात. कारण श्रमांमुळें त्यांची क्षुधा सतत उद्दीपित झालेली असते व तीच अन्नांत रुचि उत्पन्न करते. परंतु धनिकांना क्षुधा दुर्लभ असल्यामुळें षड्रस अन्नहि नीरसच लागतें. हे महीपाला, धनवानांना प्रायः अल्पाहार करण्याचीहि शक्ति

---

१ संपन्नतरमेवान्नं दरिद्रा भुञ्जते सदा । क्षुत्स्वादुतां जनयति सा चाढ्येषु सुदुर्लभा ॥ प्रायेण श्रीमतां लोके भोक्तुं शक्तिर्न विद्यते । जीर्यन्त्यपि हि काष्ठानि दरिद्राणां महीपते ॥ २ अर्जुनमिश्रीयदीपिका व दुर्घटार्थप्रकाशिनी या दोन टीकाकारांनीं या श्लोकांचा असा अभिप्राय दिला आहे—दुर्योधन श्रीमंत असूनहि तो दुर्नीतीमुळें राज्यैश्वर्य भोगण्यास समर्थ नाहीं. परंतु पांडव दारिद्र्यावस्थेंत असले तरी ऐश्वर्य भोगण्यास समर्थ आहेत. त्यांनीं काष्ठवत् अति निष्ठुर असलेल्या हिडिंब-बकप्रभृतींचा वधहि पचविला आहे.

नसते. त्यांना तत्काल अपचन होतें, पण दरिद्री लोक काष्ठेंहि पचविण्यास समर्थ असतात, असेंच या लोकीं सर्वत्र दिसून येतें.

हे राजा, निकृष्ट स्थितींतील लोकांना उपजीविकेच्या साधनाच्या अभावाचें भय असतें, मध्यामांना मरणाचें भय असतें आणि उत्तमावस्थेंतील श्रीमानांस शीलाच्या अभावीं लोकांकडून अवमान होण्याची अतिशय भीति वाटते. कारण त्यांना अवमानानें परम क्लेश सहन करावे लागतात. राजा, मद्यपानादि जे अनेक प्रकारचे मद आहेत, त्या सर्वांत ऐश्वर्यमद अत्यंत निंद्य होय. कारण ऐश्वर्यमदानें मत्त झालेला मनुष्य अधःपात झाल्यावांचून सावध होत नाहीं.

हे अंबिकापुत्रा, शब्दादि विषयांत आसक्त होणाऱ्या श्रोत्रादि इंद्रियांचा निग्रह न केल्यास नक्षत्रांना ताप देणाऱ्या आदित्यादि ग्रहांप्रमाणें तीं जीवाला संतप्त करितात. चित्ताचें आकर्षण करणाऱ्या या जीवाबरोबरच उत्पन्न झालेल्या श्रोत्रादि पंच ज्ञानेंद्रियांच्या अधीन झालेल्या पुरुषाच्या आपत्ति शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें वाढत असतात. तूं ऐश्वर्यमत्त व अजितेंद्रिय आहेस. यास्तव तुला क्लेश अवश्य भोगावे लागतील !

जो मूढमति मनोजयावांचून अमात्यांना जिंकण्याची इच्छा करितो आणि त्यांना वश केल्यावांचूनच शत्रूंचा निग्रह करण्याची हांव धरतो, तो शेवटीं परवश होऊन नाश पावतो. परंतु याच्या उलट जो बुद्धिमान् स्वतःलाच शत्रु समजून प्रथम मनोजय करतो, नंतर पुत्रादि अमात्यांना अधीन करून घेतो व शेवटीं शत्रूवर चाल करितो, त्याचा प्रयत्न कदापि निष्फल होत नाहीं. तो सर्वदा विजयीच होतो. यास्तव प्रथम मन, नंतर पुत्रादि व शेवटीं शत्रु, या क्रमानें विजयी व्हावें. श्री जितेंद्रिय, मनोनिग्रही, कामादि विकारांना जिंकणाऱ्या व विवेकपूर्वक कार्य आरंभिणाऱ्या अत्यंत धीर मनुष्याची सेवा करिते. पण तूं मनाला वश होऊन पुत्रादिकांच्या अधीन झाला आहेस. त्यामुळें तूं राजलक्ष्मीला पात्र नाहींस.

हे राजन्, पुरुषाचें शरीर हा रथ असून, मन सारथि आहे. निग्रह केलेलीं

---

१ अवृत्तिर्भयमन्त्यानां मध्यानां मरणाद्भयम् ।
उत्तमानां तु मर्त्यानामवमानात्परं भयम् ॥

२ काठकोपनिषदांतील 'आत्मानं रथिनं विद्धि०' हें श्रुतिवचन या विदुर वचनाचें मूळ आहे. या मंत्राचें सविस्तर व्याख्यान काठ. भा. पृ. ५६–५७ पहा.

पंचेंद्रियें त्या रथाचे अश्व आहेत. यास्तव त्या अश्वांचा दक्षतेनें निग्रह करून त्यांना दान्त केलें असतां रथांत बसून जाणाऱ्या माणसाप्रमाणें तो विद्वान् सुखानें संसारमार्गाचें आक्रमण करितो.

अदान्त म्ह० अशिक्षित अश्व जसे कुसारथ्याला मार्गामध्यें संकटांत टाकतात, तशीं अनिग्रहित इंद्रियें पुरुषाचा नाश करण्यासहि समर्थ आहेत.

अजितेंद्रिय मूढ दुःखाला सुख, अनर्थाला अर्थ व अर्थाला अनर्थ मानितो. धर्मार्थाचा त्याग करून इंद्रियांच्या वश होणारा अविवेकी सत्वरच वित्त, प्राण, ऐश्वर्य आणि स्त्री-पुरुषादिक यांस मुकतो. धनाचा ईश्वर असून इंद्रियें जर त्याच्या अधीन नसतील तर इंद्रियवश होऊन तो ऐश्वर्यापासून भ्रंश पावतो. संकल्पात्मक बुद्धीनें यत्नपूर्वक इंद्रियनिग्रह करून मनानें प्रत्यक् चैतन्यरूपाला जाणावें. यांत इतराच्या साह्याची अपेक्षा नाहीं. कारण निगृहीत बुद्धीच जीवाची हितकर्त्री आप्त होते व निग्रहरहित असलेली तीच शत्रुहि होते. यास्तव ज्या जितेंद्रिय पुरुषानें कार्य-करणसंघातरूप देहाख्य कार्याला स्वतःच्या अधीन ठेविलें आहे तोच स्वतःचा बंधु होय. शत्रूप्रमाणें अपकार करणाऱ्या इंद्रियांना जिंकल्यामुळें तो स्वतःच जीवाचा हितकर्ता मित्र होतो, किंवा इंद्रियवश होऊन स्वतःच स्वतःचा शत्रु होतो. बुद्धि हाच जीवाचा बंधु व रिपु आहे. जाळ्यांत अडकलेले दोन मोठे मासे जातिस्वभावामुळें परस्परांचे शत्रू जरी असले, तरी जाळें तोडण्यास प्रवृत्त झाल्यामुळें मित्रहि होतात. त्याप्रमाणें बुद्धि चिदात्म्याला संसारांत पाडीत असल्यामुळें त्याची जरी शत्रु असली तरी मोहाचा छेद करण्यासाठीं ती त्याची मित्रहि होते. जो भूपाल धर्मार्थाकडे लक्ष देऊन युद्धाचीं साधनें जमवितो तो युद्धसामुग्रीनें समृद्ध असलेला राजा निरंतर सुखी होतो. मनाच्या विकारभूत असलेल्या श्रोत्रादि पंच ज्ञानेंद्रियांना जिंकल्यावांचून जो अन्य शत्रूला जिंकण्याची इच्छा करितो, त्याला त्याचे शत्रूच जिंकतात. इंद्रियांच्या वश झाल्यामुळें रावणादिकांसारखे बलाढ्य राजेहि ऐश्वर्योपभोगांत आसक्त झाले व सीताहरणासारख्या पापकर्मांनीं दुर्बल होऊन नाश पावले, अशीं अनेक उदाहरणें दिसतात.

धृतराष्ट्रा, वाळलेल्या काष्ठांबरोबर ओलीं काष्ठेंहि जशीं जळतात, त्याचप्रमाणें पातकी मनुष्याच्या संसर्गानें निष्पापालाहि दंड भोगावा लागतो. यास्तव पातकी लोकांचा सहवास करूं नये. जो मूढमति मोहानें शब्दादि पंच विषयां-

कडे धांवणाऱ्या श्रोत्रादि पंचेंद्रियरूप शत्रूंचा निग्रह करीत नाहीं, त्याला परम आपत्ति ग्रासीत असते, तस्मात् हे राजा, तूंहि चित्ताच्या अस्थैर्यामुळें संकटग्रस्त झाला आहेस. अनसूया, आर्जव, शौच, संतोष, प्रिय भाषण, दम, सत्य व अचांचल्य हे गुण दुरात्म्याच्या ठिकाणीं नसतात. आत्मज्ञान अचांचल्य, तितिक्षा, धर्मनिष्ठा, वाक्संयम, म्ह० असंबद्ध प्रलाप न करणें, आणि गुप्तदान हे गुण हीन जनांच्या ठिकाणीं नसतात. हे भारता, तुझ्या पुत्रांच्या ठिकाणीं आर्जवादि गुण नसल्यामुळें तेहि याच कोटींतील आहेत.

कठोर भाषण व निंदा यांच्या योगानें मूर्ख लोक बुद्धिमानांची हिंसा करीत असतात. परंतु त्या पापानें वक्ताच लिप्त होतो, आणि क्षमा करणारे सज्जन पापमुक्त होतात. याच न्यायानें तुझा पुत्र पांडवांची निंदा करून स्वतःच पापलिप्त होत आहे. त्याला जय मिळणें शक्य नाहीं.

राजा, हिंसा असज्जनांचें, दंडाचा नियम राजाचें, पतिशुश्रूषा स्त्रियांचें आणि क्षमा गुणवानांचें बल आहे. हे नृपते, वाणीचें संयमन अतिशय दुष्कर आहे. कारण अर्थयुक्त व चमत्कारयुक्त वचन पुष्कळ बोलतां येत नाहीं. तें मर्यादित असतें. सुभाषण अनेक प्रकारें कल्याण करितें. परंतु याच्या उलट दुर्भाषण अनर्थ उत्पन्न करितें. बाणानें झालेलें क्षत भरून येतें. कुऱ्हाडीनें तोडलेलें वन पुनः वाढतें. परंतु निंदायुक्त कठोर वाक्शरानें पडलेला व्रण कदापि भरून येत नाहीं. कर्णी, नालीक, नाराच, इत्यादि विविध प्रकारचे तीक्ष्ण बाणहि शरीरांतून काढून टाकतां येतात, परंतु हृदयांत रुतलेलें वाक्शल्य काढतांच येणें शक्य नाहीं. वाग्बाण मुखांतून सुटतांच सरळ जाऊन दुसऱ्याच्या मर्मावर आघात करितात आणि ज्याला विद्ध केलें असेल तो मनुष्य रात्रंदिवस तळमळूं लागतो. यास्तव पंडितानें कठोर वचनांनीं दुसऱ्याला कदापि पीडा देऊं नये. पण हे राजा, सभेमध्यें द्रौपदीला दुर्वचनें बोलणाऱ्या तुझ्या पुत्रांचा अपराध अक्षम्य आहे.

हे भरतश्रेष्ठा, देवांना ज्याचा पराभव विहित असतो, त्याच्या सद्बुद्धीचें[1] ते प्रथम हरण करितात. त्यामुळें तो मूढमति सर्व विपरीत पाहूं लागतो व

१ यस्मै देवः प्रयच्छन्ति पुरुषाय पराभवम् । बुद्धिं तस्यापकर्षन्ति सोवाचीनानि पश्यति । बुद्धौ कलुषभूतायां विनाशे प्रत्युपस्थिते । अनयो नयसंकाशो हृदयान्नापसर्पति ॥

नीच कर्में आचरितो. पुरुषाचा विनाशकाल समीप आला म्हणजे त्याच्या कलुषित झालेल्या बुद्धीला अन्यायच न्याय आहे, असें भासूं लागतें व हा भ्रम त्याच्या मनांतून दूर होत नाहीं. याच न्यायानें सांप्रत तुझ्या पुत्राची बुद्धि विपरीत झाली आहे आणि तूंहि मिथ्या विरोधामुळें पांडवांची योग्यता जाणत नाहींस.

हे धृतराष्ट्रा, तुझ्या आज्ञेंत वागणारा युधिष्ठिर या पृथ्वीचें राज्य करो. तो राजलक्षणांनीं संपन्न असलेला अजातशत्रु त्रैलोक्याचेंहि राज्य करण्यास पात्र आहे. तो पृथापुत्र तुझ्या सर्व पुत्रांहून श्रेष्ठ आहे. त्याला त्याचा राज्यभाग देणेंच उचित आहे. हे राजेंद्रा, बुद्धि व तेज यांनीं युक्त असलेल्या धर्मराजाला धर्मार्थांचें यथार्थ ज्ञान आहे. म्हणूनच श्रेष्ठ धर्मवेत्ता असलेला तो आपलें स्वाभाविक दयालुत्व, अक्रौर्य व तुझ्याविषयीं पूज्यभाव, या तीन कारणांनीं अनेक प्रकारचे क्लेश सहन करीत आहे. ५. ३. ३४.

---

## अध्याय ३५ वा.

[ १ विदुरानें सांगितलेलें केशिनीचें आख्यान. २ नीतीचा उपदेश. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे महाबुद्धिमान् विदुरा, तूं अतिशय विचित्र भाषण करीत आहेस. तें ऐकत असतांना माझी तृप्ति होत नाहीं. यास्तव तुझें धर्मार्थयुक्त वचन आणखी सांग.

**विदुर**—हे विभो, सर्व तीर्थांत स्नान आणि सर्व प्राण्यांशीं समत्व हीं दोन्ही तुल्य फल देणारीं आहेत. किंबहुना यांतील समताच विशिष्ट आहे. तस्मात् हे राजन्, तूं या कुमारांमध्यें ( कौरवपांडवांत ) समदृष्टि ठेव. म्हणजे तुझी या लोकीं परम कीर्ति होऊन मरणोत्तर तुला स्वर्ग प्राप्त होईल. हे नरश्रेष्ठा, जोंवर मनुष्याची पुण्यकीर्ति या लोकीं प्रसिद्ध असते, तोंवरच तो स्वर्गलोकीं मान्य होतो.

[१]यांविषयीं पूर्वी एकदा केशिनीसाठीं विरोचनाचा सुधन्व्याशीं संवाद झाला. तो हा पुरातन इतिहास प्रसिद्ध आहे. हे राजन्, ‘ केशिनी ’-नांवाची एक अप्रतिम रूपवती राजकन्या होती. ती उत्तम पतीला वरण्यासाठीं स्वयंवरांत

---

१ हेंच आख्यान पूर्वी विदुरानें सभापर्वांत संक्षेपतः सांगितलें आहे. (खंड २ पृ. ३६८.)

स्थित असतां 'विरोचन'-नामक दैत्य तिच्या प्राप्तीच्या इच्छेनें तेथें आला. तेव्हां केशिनी त्या दैत्येंद्राला असें वचन बोलली.

**केशिनी**—हे विरोचना, ब्राह्मण श्रेष्ठ कीं दानव श्रेष्ठ? मला वाटतें कीं ब्राह्मणच श्रेष्ठ आहेत. तसें जर नसतें तर सुधन्वा ब्राह्मण तुझ्यासह एका आसनावर कसा बसला नसता! (ब्राह्मणाच्या अपेक्षेनें तूं दैत्य नीच आहेस. असें असतां तूं त्याचा निषेध कां करतोस!)

**विरोचन**—हे केशिनि, आम्ही कश्यप प्रजापतीची प्रजा असल्यामुळें श्रेष्ठ आहों. हे सर्व लोक आमचे आहेत. आमच्यापुढें देव किंवा ब्राह्मण यांची काय कथा!

**केशिनी**—हे विरोचना, थांब, तूं या स्वयंवर मंडपांतच बैस. उद्यां प्रातःकालीं सुधन्वा ब्राह्मण येणार आहे, त्यावेळीं तुम्ही दोघे एका ठिकाणीं जमलेत म्हणजे मी तुमच्या श्रेष्ठत्वाचा निर्णय करीन.

**विरोचन**—हे भद्रे, ठीक आहे. मी तुझ्या सांगण्याप्रमाणेंच करीन. उद्यां सुधन्वा व मी असे दोघे बरोबरच तुझ्या दृष्टीं पडूं.

**विदुर**—हे राजसत्तमा, ती रात्र उलटून सूर्यमंडल उदय पावलें असतां सुधन्वा ब्राह्मण त्या प्रदेशीं आला व जेथें केशिनीसह विरोचन बसला होता तेथें प्राप्त झाला. तेव्हां तो ब्राह्मण समीप आलेला पहातांच केशिनी उठून उभी राहिली व तिनें त्याला आसन व अर्घ्य-पाद्यादिक अर्पण करून त्याचा सत्कार केला. त्यावेळीं विरोचनानें 'या सुवर्णसिंहासनावर माझ्या शेजारीं बैस, ये.' अशी त्या ब्राह्मणाची प्रार्थना केली.

ती ऐकून **सुधन्वा** म्हणाला—हे प्रल्हादपुत्रा, तुझ्या या सुवर्णासनाला हातानें स्पर्श करून मी तुझा आदर करितों, तथापि तुझ्यासह एका आसनावर मी बसणार नाहीं.

त्यावर विरोचनानें त्याचा उपहास करीत म्हटलें—हे सुधन्वन्, माझ्यासह या सुवर्णासनावर बसण्यास तूं पात्रच नाहींस. माझ्या आसनाहून कनिष्ठ प्रतीचें काष्ठासन किंवा वेत्रासनच तुला योग्य आहे.

**सुधन्वा**—हे दानवा, पिता-पुत्र, दोन विप्र, दोघे क्षत्रिय, दोघे वृद्ध वैश्य किंवा दोघे शूद्र यांनींच एका आसनावर बसावें, यांच्यावांचून इतरांनीं परस्परांच्या अर्ध्या आसनावर कदापि बसूं नये. मी उच्चासनावर बसलों

असतां पूर्वी तुझा पिता प्रऱ्हाद माझी सेवा करीत खालीं बसत असे. त्यावेळीं तूं बाल होतास. आपल्या घरांत सुखानें वाढलेल्या तुला हा सभेंतील शिष्टाचार काय ठाऊक असणार! तूं कांहीं जाणत नाहींस.

**विरोचन**—'आपणां दोघांत श्रेष्ठ कोण?' या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं मी माझें सर्व सुवर्ण, धेनु, अश्व व असुरांचें सर्व वित्त पणाला लावतों. हे ब्राह्मणा, आपण तज्ज्ञांना हा प्रश्न विचारूं व त्याचा निर्णय करून घेऊं या.

**सुधन्वा**—हे विरोचना, सुवर्ण, गायी, अश्वादि तुझ्या तुलाच असोत. आपण प्राणांचा पण लावून ज्ञात्यांना हा प्रश्न विचारूं.

**विरोचन**—ठीक आहे. पण प्राणांचा पण लावूनहि आपण कोणांकडे जावें? कारण देव किंवा मानव यांच्यापुढें मी कदापि येणार नाहीं.

**सुधन्वा**—आपण प्राणांचे पण लावून तुझ्या पित्याकडेच जाऊं या. मग तर झालेंना? तुझा पिता प्रऱ्हाद पुत्राच्या हितासाठींहि कदापि असत्य भाषण करणार नाहीं.

**विदुर**—धृतराष्ट्रा, याप्रमाणें पण लावून ते दोघे क्रुद्ध झालेले—विरोचन व सुधन्वा जेथें प्रऱ्हाद होता तेथें येऊन पोंचले.

त्यांना पाहून प्रऱ्हाद म्हणाला—या दोघांचें हाडवैर असल्यामुळें ते केव्हांहि एकत्र फिरतांनाहि सावयाचे नाहींत. असें असतांना आज ते दोघे एकाच मार्गानें येथें कां बरें येत आहेत? ते दोघेहि सर्पासारखे क्रुद्ध झालेले दिसत आहेत. यास्तव मी आतां याविषयीं प्रथम विरोचनालाच प्रश्न करितों— "वत्सा विरोचना, यापूर्वी तुम्हांला एकत्र संचार करीत असतांना मीं कधीं पाहिलें नाहीं, असें असतांना तुमचा आजच सहसंचार कसा झाला? पुत्रा, तुझें या सुधन्व्या ब्राह्मणाशीं सख्य झालें कीं काय?"

**विरोचन**—हे तात, या सुधन्व्याशीं मीं सख्य केलेलें नाहीं. पण आम्हीं दोघांनीं प्राणाचा पण लाविला आहे आणि त्या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं आम्ही दोघेहि तुझ्याकडे आलों आहों. मी तुला सत्य विचारीत आहें. यास्तव तूं असत्य सांगूं नको.

**प्रऱ्हाद**—हे ब्रह्मन्, तूं आम्हांला पूज्य आहेस. प्रथम माझ्या या मधुपर्काचा स्वीकार कर.

असें बोलून त्यानें आपल्या सेवकांना 'या सुधन्व्या ब्राह्मणासाठीं उदक, मधुपर्क व शुभ्रवर्ण पुष्ट गाय, सत्वर घेऊन या' अशी आज्ञा केली.

तें ऐकून सुधन्वा म्हणाला—"हे प्रऱ्हादा, तूं मला मार्गांत असतांनाच मधुपर्कादि अर्पण केलें आहेस. आतां अगोदर या प्रश्नाचा निर्णय कर म्हणजे मला सर्व पोंचलें. मी विचारीत असलेल्या या प्रश्नाचें मला सत्य व निश्चित उत्तर दे. 'ब्राह्मण श्रेष्ठ कीं हा विरोचन श्रेष्ठ ?' हा आमच्या वादाचा प्रश्न आहे."

**प्रऱ्हाद्**—हे विप्रर्षे, विरोचन माझा एकुलता एकच पुत्र असून तूं तर साक्षात् ब्राह्मण माझ्या पुढें स्थित आहेस. अशा तुम्हां दोघांच्या वादाचा निर्णय आमच्यासारख्यांनीं कसा करावा ? हे भगवन्, तूं पूज्य असल्यामुळें तुझ्याविरुद्ध बोलल्यास माझ्याकडे ब्रह्मद्वेषाचा दोष येईल व विरोचन माझा पुत्र असल्यामुळें त्याच्याविरुद्ध निर्णय केल्यास पुत्रघाताचा दोष लागेल.

**सुधन्वा**—औरस पुत्राला गाय किंवा दुसरेंहि प्रिय धन द्यावें, पण हे बुद्धिमन्, आम्हां दोघांच्या वादांत तूं तथ्य वचनच बोलावेंस, हें उचित होय.

**प्रऱ्हाद्**—हे ब्रह्मन्, वादाचा सत्य किंवा असत्य कांहींच निर्णय न करणाराला अथवा अन्यायानें निर्णय देणाराला कोणतें दुःख प्राप्त होतें, तें मला सांग.

**सुधन्वा**—पति आपलें सांनिध्य सोडून सपत्नीकडे गेला असतां स्त्रीला त्या रात्रीं जसें दुःख होतें, किंवा द्यूतांत पराजित झालेला पुरुष जसा खेदानें रात्र घालवितो, किंवा दिवसभर भार वाहून थकलेला मनुष्य अंग ठणकत असल्यामुळें रात्रभर जसे क्लेश सहन करितो, तशाच प्रकारची दुःखमय रात्र अन्यायाचा निर्णय करणाऱ्या पुरुषाला काढावी लागते. ज्याला नगरांत आश्रय मिळत नाहीं, जो क्षुधार्त होऊन द्वाराबाहेर तिष्ठत रहातो व जो असंख्य शत्रूंकडून वेढला जातो, अशा आपन्न पुरुषांना जीं दुःखें सहन करावीं लागतात, तींच दुःखें असत्य साक्ष देणारास भोगावीं लागतात. अजादि सामान्य पशूंच्या लाभासाठीं असत्य भाषण करणाराचे पांच पूर्वज अधोगतीला जातात. गायीसारख्या श्रेष्ठ पशूंच्या प्राप्तीसाठीं अनृत सांगणाराचे दहा पूर्वज, अश्वादिकांसाठीं शंभर व मानवाच्या हितासाठीं एक सहस्र पूर्वज स्वर्गांतून च्युत होतात. सुवर्णप्राप्तीसाठीं असत्य भाषण करणाराचे पूर्वज व वंशज अधोगतीला प्राप्त होतात, आणि भूमीसाठीं अनृत बोलणाराच्या सर्वस्वाचाच नाश होतो. तस्मात् हे प्रऱ्हादा, भूमितुल्य असलेल्या केशिनीसाठीं तूं असत्य भाषण करूं नको.

प्रऱ्हाद्—हे विरोचना, या ब्राह्मणाचा पिता अंगिरा मजहून श्रेष्ठ आहे, हा सुधन्वा तुझ्याहून वरिष्ठ आहे आणि याची माता तुझ्या मातेहून प्रशस्यतर आहे. तस्मात्, या विप्रानें तुला जिंकलें आहे. तेव्हां तो तुझ्या प्राणांचा स्वामी झाला. हाच माझा निर्णय आहे.

पुत्राला असें सांगून प्रऱ्हाद सुधन्व्याकडे वळून म्हणाला—" हे ब्रह्मन्, न्यायानें तुला अर्पण केलेला माझा पुत्र विरोचन तूं मला पुनः परत द्यावास, अशी माझी प्रार्थना आहे."

सुधन्वा—हे प्रऱ्हादा, ज्या अर्थी तूं धर्मालाच वरिलेंस, आणि मोहानें अनृत भाषण केलें नाहींस, त्याअर्थी तुजवर प्रसन्न होऊन तुझ्या पुत्राचे दुर्लभ प्राण मी तुला परत देतों. हा तुझा विरोचन पुत्र मीं तुला दिला आहे. त्याचा स्वीकार कर आणि केशिनी राजकुमारीचें हळदीनें पादप्रक्षालन करून माझ्या समक्ष विरोचनाशीं तिचा विवाह लावून दे. ती राजकन्या याचीच भार्या होवो.

( २ ) विदुर—राजा धृतराष्ट्रा, ही आख्यायिका सांगण्याचें तात्पर्य इत-केंच कीं, तूं भूमीसाठीं असत्य भाषण करूं नको. बाबारे, पुत्रांसाठीं अनृत वचन बोलून पुत्र व अमात्य यांसह विनाश पावूं नको. पशूंचें पालन करणाऱ्या गोपालांप्रमाणें हातांत काठी घेऊन देव मानवांचें रक्षण करीत नसतात. तर त्यांना ज्यांचें रक्षण करावयाचें असतें, त्या मनुष्याला ते तशा प्रकारची सुबुद्धि देत असतात.

पुरुष जसें जसें आपलें मन सत्कृत्यांत नियुक्त करितो, तसे तसे त्याचे सर्व इष्टार्थ सिद्ध होतात, यांत संशय नाहीं. हे राजन्, वेदशास्त्र कपटाचरण करणाऱ्या मायावी माणसाचें पातकापासून रक्षण करीत नाहींत. पंख फुट-लेले पक्षी जसे आपलें घरटें सोडून उडून जातात, तसे वेद अशा धार्मिकांचा अंतकालीं त्याग करितात. या तीन दृष्टान्तांवरून हे राजा, तुझें दैवच प्रतिकूल दिसतें व तुझें अध्ययन निष्फल होय, असेंच म्हणावें लागतें.

हे भरतश्रेष्ठा, मद्यपान, कलह, मोठ्या समूहाशीं वैर, दाम्पत्यवियोग, ज्ञाति-भेद, राजाचें अप्रिय, पतिपत्नीवाद आणि निंद्य मार्ग हीं सर्वदा वर्ज करावींत, तसेंच, हस्तरेखा पाहून भवितव्य सांगणारे सामुद्रिक, २ पूर्वी चौर्य कर्मावर द्रव्य-संचय करून नंतर खोट्या मापानें व्यापार करणारे, ३ खोट्या फांशांनीं कपटद्यूत

खेळणारे किंवा शकुनादि सांगून अज्ञ जनांना फसविणारे धूर्त, ४ चिकित्सक, ५ विपरीत साक्ष देणारे शत्रु, ६ मित्र, ७ नर्तकीदास विट, उन्मत्तादि किंवा नट या सात प्रकारच्या लोकांची साक्ष कदापि सत्य मानूं नये, अशी नीति आहे. पण कपटद्यूतांत प्रवीण असलेल्या शकुनीला तूं प्रमाण मानीत आहेस. अग्निहोत्र, मौन, अध्ययन व यज्ञ हीं चार कर्मे जरी कल्याणकारक आहेत, तरी लोकांत आपला उत्कर्ष व्हावा या हेतूनें तीं आचरिलीं असतां भयंकर फल देतात. १ दुसऱ्याच्या घराला आग लावणारा, २ विष घालणारा, ३ कुंडगोलकाचें अन्न भक्षण करणारा, ४ सोमविक्रय करणारा, ५ केवल बाणांचीं पर्वें करणारा, ६ नक्षत्रादिकांतील दोष दाखविणारा ज्योतिषि, किंवा चहाडी करणारा, मित्रद्रोही, परस्त्रीगमन करणारा, भ्रूणहत्या करणारा, किंवा स्वशाखाध्यायी ब्राह्मणाचा घात करणारा, गुरुपत्नीशीं व्यभिचार करणारा, मद्यपान करणारा द्विज, क्षतावर टोंचणाऱ्या कावळ्याप्रमाणें कठोर वचनांनीं दुःखितांचा मर्मभेद करणारा, नास्तिक, वेदनिंदक, स्रुवप्रग्रहण म्ह० अधिकारबलावर सर्व व्यापाऱ्यांकडून पसा पसा धान्य घेणारा, किंवा ग्रामपुरोहित, व्रात्य म्ह० संस्कारहीन, कीनाश म्ह० पापाचरणी लोकांशीं सहभोजन करणारा, किंवा इतरांना अन्न न देतां स्वतःच भोजन करणारा, स्वतः समर्थ असूनहि शरणांगताचें रक्षण न करणारा, हे सर्व ब्रह्महत्या करणाराच्या तुल्यच आहेत, असें समजावें. राजा, यांतील घराला आग लावणें व विषप्रयोग हीं दोन आरंभींच सांगितलेलीं पातकें तुझ्या पुत्रांनीं आचरिलीं आहेत.

हे कौरवश्रेष्ठा, तृणज्वालेनें जशी अंधकारांतील वस्तु दिसते, त्याचप्रमाणें मनुष्याच्या आचरणावरून त्याच्या ठिकाणीं धर्म आहे किंवा नाहीं, हें जाणतां येतें. सुहृदांवर उपकार करणें, शत्रूला अपकार न करणें इत्यादि अहिंसाप्रधान व्यवहारानें सज्जन मनुष्य ओळखतां येतो. भयाच्या प्रसंगीं शूराचा अनुभव येतो, दुर्भिक्षादि संकटांत धैर्याचा प्रत्यय येतो आणि आपत्काळीं उपकार करणें व अपकार करणें या कार्यांवरून मित्र कोण व शत्रु कोण, यांची परीक्षा होते. हे राजन्, तुझ्या पुत्रांच्या वर्तनावरून त्यांच्या ठिकाणीं धर्म व साधुत्व दिसत नाहीं.

जरा रूपाचा विनाश करिते, आशा धैर्य नष्ट करिते, मृत्यु प्राणांचें हरण करितो, असूया धर्माचरणाची हानि करिते, क्रोध ऐश्वर्य घालवितो, नीचसेवा

शीलाचा विघात करिते, काम लज्जेचा त्याग करवितो, आणि अभिमान सर्वस्वाचा नाश करितो. हे राजा, तुझ्या पुत्राच्या ठिकाणीं अभिमान हा फार मोठा दोष आहे.

हे भारता, शुभ वस्तूंच्या दर्शनानें संपत्तीची प्राप्ति होते. प्रगल्भपणानें ती वाढते, दक्षतेनें दृढमूल होते आणि नियमित व्यय करण्यानें स्थिर रहाते. परंतु तूं अनियमित व्यय करीत असल्यामुळें ती तुझ्यापाशीं स्थिर रहाणार नाहीं.

पुरुषाला १ बुद्धि, २ कुलीनता, ३ इंद्रियनिग्रह, ४ अध्ययन, ५ पराक्रम, ६ मितभाषण, ७ यथाशक्ति दान व ८ कृतज्ञता हे आठ गुण या लोकीं प्रकाशित करितात. हे आठ गुण जरी अतिशय महत्त्वाचे व दुर्लभ असले तरी राजा जेव्हां एखाद्या मनुष्याचा सत्कार करितो, तेव्हां ‘ राजसत्कार ’ या एकाच गुणानें तो वरील सर्व गुणांनीं युक्त असल्याप्रमाणें प्रकाशूं लागतो. याच न्यायानें तूंहि कर्णादिकांचा सत्कार करीत असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं या गुणांचा भास होत आहे. पण त्यांच्या अंगीं हे गुण स्वाभाविक नाहींत.

राजा, स्वर्गाच्या निदर्शक आठ गोष्टी आहेत, त्यांतील चार सज्जनांच्या ठिकाणीं स्वाभाविक असतात व चार यत्नानें संपादन करतां येतात. १ यज्ञ, २ दान, ३ तप व ४ अध्ययन या चार कर्मांकडे सज्जनांची स्वभावतःच प्रवृत्ति असून १ दम, २ सत्य, ३ आर्जव व ४ दयालुत्व हे चार गुण प्रयत्नानें साध्य होतात. त्याचप्रमाणें १ यजन, २ अध्ययन, ३ दान, ४ तप, ५ सत्य, ६ क्षमा, ७ दया व ८ निर्लोभ, असे धर्माचे अष्टविधमार्ग श्रुत आहेत. यांतील आरंभींचे चार धर्म कोणी दंभार्थहि आचरितात. परंतु इतर चार मात्र सज्जनांवांचून अन्यत्र दिसून येत नाहींत. कारण असत्यादि दोषांनीं युक्त असलेल्या मनुष्याचे ठिकाणीं दंभार्थ यज्ञादि धर्म संभवतात.

हे धृतराष्ट्रा, जेथें वृद्ध[1] नाहींत, ती सभाच नव्हे, जे धर्म्य भाषण करीत नाहींत ते वृद्धच नव्हेत, ज्यांत सत्य नाहीं तो धर्मच नव्हे आणि मनांत कपट ठेवून उच्चारलेलें जें वचन तें सत्यच नव्हे. १ सत्य, २ विनययुक्त सौम्यमुद्रा, ३ अध्ययन, ४ देवतांचें उपासन, ५ सत्कुल, ६ शील, ७ बल, ८ धन, ९ शौर्य आणि १० युक्तियुक्त वचन हीं दहा स्वर्गप्रद आहेत, तस्मात् ज्यांना

---

१ न सा सभा यत्र न सन्ति वृद्धा न ते वृद्धा ये न वदन्ति धर्मम् ।
नासौ धर्मो यत्र न सत्यमति न तत्सत्यं यच्छलेनाभ्युपेतम् ॥

या दहा गुणांनीं युक्त होण्याची इच्छा असेल त्यांनीं सत्संग करावा. पाप करणाराची पापकीर्ति होते व त्याला पापाचें फल भोगावें लागतें. पुण्याचरण करणाराची पुण्यकीर्ति होते आणि त्याला अत्यंत पुण्यफल प्राप्त होतें. तस्मात् तीव्र व्रत धारण करणारानें पापाचरण कधींहि करूं नये. वारंवार पाप करणाराची बुद्धि प्रथम भ्रंश पावते, ज्याच्या बुद्धीचा भ्रंश झाला आहे, तो मूढ पुरुष नित्य नवें पाप आचरूं लागतो. निरंतर पुण्याचरण करणाराची बुद्धि वाढत जाते आणि तो परिपक्क बुद्धीचा विचारवान् पुरुष नित्य नवें पुण्यकर्म आरंभितो. याप्रमाणें पुण्यकीर्ति करणारा पुण्याचरणानें पुण्यलोकालाच प्राप्त होतो. यास्तव समाहितचित्त पुरुषानें पुण्याचरणच करावें.

असूया करणारा, कठोर वचनांनीं प्रहार करणारा, निष्ठुर, वैर करणारा, व कपटी अशा प्रकारचा पापाचरणी मनुष्य लवकरच महत्संकटांत सांपडतो. परंतु याच्या उलट अनसूयु, बुद्धिमान् व सर्वदा शुभाचरण करणारा पुरुष समग्र सुखांना प्राप्त होऊन सर्वत्र प्रिय होतो. जो मनुष्य प्राज्ञलोकांकडून ज्ञान संपादन करितो, तोच पंडित होय. ज्ञानवानच धर्म व अर्थ यांची प्राप्ति करून घेऊन सुखानें रहाण्यास समर्थ होतो.

हे भरतश्रेष्ठा, ज्यांच्या योगानें रात्रीं सुखानें झोंप येईल अशींच सत्कर्में दिवसा आचरावींत. पावसाळा सुखानें घालवितां येईल इतका अर्थसंचय आठ महिन्यांच्या परिश्रमानें करून ठेवावा. वृद्धपणाचा काल सुखानें जावा म्हणून पूर्व वयांत द्रव्य संपादन करावें आणि ज्यायोगें मरणोत्तर उत्कर्ष होईल असेंच कर्म यावज्जीव करीत असावें. पचन झाल्यावर मग अन्नाची प्रशंसा करावी. तारुण्य गेल्यावर भार्येची, युद्धांत विजयी झाल्यावर शूराची व तत्त्वाला प्राप्त झाल्यावर तपस्व्याची प्रशंसा करावी.

राजा, अधर्मानें संपादन केलेल्या धनानें स्वतःच्या दुष्कर्माचें छिद्र लपविण्याचा प्रयत्न केल्यास, तें झांकलें न जातां उलट दुसरें दुष्कर्म मात्र उघ-

---

१ दिवसेनैव तत्कुर्याद्येन रात्रौ सुखं वसेत्। अष्टमासेन तत्कुर्याद्येन वर्षाः सुखं वसेत्॥ पूर्वे वयसि तत्कुर्याद्येन वृद्धः सुखं वसेत्। यावज्जीवेन तत्कुर्याद्येन प्रेत्य सुखं वसेत्॥

२ जीर्णमन्नं प्रशंसन्ति भार्यां च गतयौवनाम्।शूरं विजितसंग्रामं गतपारं तपस्विनम्॥

इकीस येतें. तुझे पुत्र परिणामीं सुख होणारें कर्म न करितां, अन्यायानें द्रव्य मिळवून सुख भोगीत आहेत, परंतु तें त्यांचें कृत्य विपरीत आहे. नियतचित्त लोकांचा गुरु शास्ता असतो. दुरात्म्यांना राजा शासन करितो आणि गुप्तपणें पातक करणारांना यम शिक्षा करितो. तुझा पुत्र दुर्योधन प्रच्छन्नपाप आचरीत आहे. ऋषींचें[1] कुल, नद्यांचें मूळ, महात्म्यांची उत्पत्ति व स्त्रियांचें दुराचरण यांना अंत नसल्यामुळें त्यांचा उगम जाणण्याचा यत्न करूं नये.

ब्राह्मणांचा सत्कार करण्यांत तत्पर, दाता, स्वज्ञातीशीं सरळ वर्तन ठेवणारा आणि शीलसंपन्न क्षत्रिय दीर्घकाल पृथ्वीचें पालन करितो. राजा, शूर, कृतविद्य व सेवापरायण असे तीन प्रकारचे पुरुष या पृथ्वीवरील सुवर्णपुष्पें वेंचीत असतात. पांडव शूर असल्यामुळें ते सुवर्णभाक् आहेत. हे भारता, सर्व कर्मांमध्यें बुद्धिबलावर होणारीं कर्में श्रेष्ठ होत. बाहुबलानें साध्य होणारीं मध्यम, कपट साधनांनीं गुप्तपणें केलीं जाणारीं कर्में निकृष्ट आणि ज्या कर्मांच्या सिद्धीसाठीं आपल्या शिरावर संकटाचा भार येऊन पडतो तीं निंद्य होत. हे कुरुश्रेष्ठा, दुर्योधन, शकुनि, दुःशासन व कर्ण या मूढांना ऐश्वर्य अर्पण करून तूं उत्कर्षाची इच्छा कशी करतोस ? बा धृतराष्ट्रा, सर्व गुणांनीं युक्त असलेले पांडव तुला पितृतुल्य मानून आदरानें वागत आहेत; यास्तव तूंहि त्यांच्याशीं पुत्रवत् वर्तन ठेवावेंस हेंच योग्य होय. ५. ३. ३५.

---

## अध्याय ३६ वा.

[ १ हंस व साध्य यांच्या धर्म्यसंवादाचा अनुवाद. २ महाकुलांविषयीं धृतराष्ट्राचा प्रश्न व विदुराचें उत्तर. ३ पांडवांशीं कपटाचरण केल्याबद्दल धृतराष्ट्राचा पश्चात्ताप व अभयपदाचा प्रश्न. ४ विदुराचा हितोपदेश.]

( १ ) **विदुर**—हे धृतराष्ट्रा, आत्रेय व साध्य यांचा हा संवादरूप पुरातन इतिहास आम्हीं ऐकला आहे, व तो इतिहास व्यवहारांत नेहमीं सांगितला जातो. तो मी तुला सांगतों, ऐक. पूर्वी एकदा साध्य देवांनीं परिव्राजकरूपानें

---

१ ऋषीणां च नदीनां च कुलानां च महात्मनाम् । प्रभवो नाधिगन्तव्यः स्त्रीणां दुश्चरितस्य च ॥

संचार करणाऱ्या महाप्राज्ञ व तीव्र व्रत धारण करणाऱ्या महर्षीला असा प्रश्न केला—

**साध्य**—हे महर्षे, आम्ही साध्यदेव आहोंत. तुला नुसतें पाहूनच तुझ्या बाह्य वेषावरून तूं कोण आहेस, याचें आम्हांला अनुमान करतां येत नाहीं. तूं अध्ययनयुक्त, धीर व बुद्धिमान् आहेस, असें आम्हांला वाटतें. यास्तव तुझें विद्वत्तापूर्ण उदार वचन ऐकण्याची आमची इच्छा आहे.

**हंस**—हे देवहो, मीं माझ्या गुरूच्या मुखानें असें ऐकलें आहे कीं, धृति, शम, व सत्यधर्म यांच्या परिपालनानें चित् व जड यांची ग्रंथि शिथिल करावी. आत्मानात्मविवेकानें अंतःकरणांतील सर्व सुखदुःख आत्मरूप पहावें. ज्याप्रमाणें रज्जूवरील सर्पाचा आरोप दूर झाला, म्हणजे त्यापासून उत्पन्न झालेलें भयहि तेथेंच लीन होतें, त्याचप्रमाणें अंतःकरणांतील सुख-दुःखहि आत्म्याशीं सम होतें. आपला क्रोध सहन करून दुसऱ्याला शाप न देणाराचा क्रोधच अपराध करणाराला दग्ध करितो आणि त्याचें सुकृत क्षमावानाला प्राप्त होतें. कोणाला अपशब्द बोलूं नये. दुसऱ्याचा अवमान करूं नये. मित्रद्रोह करूं नये. नीचांचा सहवास करूं नये. अभिमान धरूं नये. हीनवृत्ति धारण करूं नये आणि क्रोधयुक्त रूक्ष वाणी वर्ज करावी.

कठोर वचन पुरुषाचीं मर्में, अस्थि, हृदय व प्राण यांचा दाह करीत असतें. तस्मात् धर्मनिष्ठानें रोषयुक्त दाहक वाणीचा सर्वदा त्याग करावा. मर्मछेद करणाऱ्या, रूक्ष भाषण करणाऱ्या आणि शब्दरूपी कंटकांनीं मनुष्यांना टोंचणाऱ्या पुरुषाला अत्यंत अभागी समजावें. कारण तो आपल्या मुखामध्यें नित्य संबद्ध असलेल्या मृत्यूलाच वहात असतो. एखादा मनुष्य अति तीक्ष्ण सूर्य व अग्नि यांप्रमाणें दग्ध करणाऱ्या वाग्बाणांनीं जरी विद्ध करीत असला तरी त्या विद्ध व दग्ध होणाऱ्या पुरुषानें ‘ हा मला सुखच देत आहे,’ असें समजावें.

राजा, ज्याप्रमाणें शुभ्र वस्त्र ज्या रंगांत घालावें त्या रंगाचें होतें, त्याप्रमाणें मनुष्यहि सज्जन किंवा दुर्जन, तपस्वी किंवा चोर यांतील ज्याच्या संगतींत असेल, त्याच्या वश होत असतो. तूंहि रूक्षभाषणादि करणाऱ्या तुझ्या पुत्रांच्या संगतीनें त्यांच्यासारखाच झाला आहेस. जो मनुष्य अतिवाद करणाराशीं स्वतः वाद करीत नाहीं किंवा इतरांकडून वाद करवीत नाहीं, दुसऱ्यानें प्रहार केल्यावांचून कोणाला मारीत नाहीं किंवा मारवीत नाहीं. एखाद्यानें प्रहार केला तरीहि त्या पातक्याच्या वधाची इच्छा करीत नाहीं, तो देवाहूनहि श्रेष्ठ होय.

कांहींच भाषण न करतां मौन धरणें चांगलें. परंतु त्याहून सत्यभाषण करणें श्रेयस्कर आहे. सत्य व प्रिय भाषण अधिक श्रेष्ठ व सर्वांहून धर्म्य-वचन श्रेष्ठतम होय. तस्मात् हे धृतराष्ट्रा, तूं सत्संग करावास हेंच योग्य होय. पुरुष जशा प्रकारचा होऊन रहातो, जशा प्रकारच्या लोकांचा सहवास करितो, आणि जसा होण्याची इच्छा करितो, तसा तो होतो. मनुष्य जसा जसा एखाद्या विषयापासून निवृत्त होतो, तसा तसा तो त्यापासून विमुक्त होतो आणि सर्वथा निवृत्त झाला म्हणजे त्याला लेशमात्रहि दुःख होत नाहीं. स्वप्नांत जसा बाह्यविषयांपासून होणाऱ्या दुःखाचा लेश नसतो, स्वप्नांत अनुभविलेलें दुःख जागृतींत निवृत्त होतें आणि सुषुप्ति व समाधि या दोन अवस्थांत दुःखाचा स्पर्शहि होत नाहीं, तसा तूं सर्वांपासून निवृत्त हो म्हणजे दुःखमुक्त होशील. जो मनुष्य स्वतः जिंकला जात नाहीं, दुसऱ्याला जिंकण्याची इच्छा करीत नाहीं, कोणाशीं वैर करीत नाहीं किंवा प्रत्याघात करीत नाहीं, निंदा व प्रशंसा या दोन्हींविषयीं समभाव ठेवितो, शोक किंवा हर्ष मानीत नाहीं, अशा पुरुषाला यत्किंचित्‌हि दुःख होत नाहीं.

हे राजन्, जो सर्वांचें कल्याण इच्छितो, कोणाचें अकल्याण मनांतहि आणीत नाहीं, तो सत्यवादी, मृदु व दांत पुरुष उत्तम म्हटला जातो. जो मिथ्या सांत्वन करीत नाहीं, प्रतिज्ञेप्रमाणें देतो, आणि परक्याचें छिद्र जाणतो तो मध्यम पुरुष होय. जो दुरात्मा उपकार करणारांशीं क्रोधवशात् कृतघ्न होतो तो अधम पुरुष होय. राजा, तुझ्या पुत्रांना घोषयात्राप्रसंगीं गंधर्वांनीं गदाप्रहारांनीं ताडन केलें, शस्त्रांनीं विदीर्ण केलें. तेव्हां पांडवांनीं वस्तुतः असें शासन भोगण्यास योग्य असलेल्याहि कौरवांना सोडविलें. परंतु ते मूढ उपकार करणाऱ्या त्यांना विसरले आहेत, त्यांच्याशीं सरळ वागत नाहींत; उलट कृतघ्न झाले आहेत, ही अधम मनोवृत्ति होय.

जो कल्याणोपायांवर श्रद्धा ठेवीत नाहीं, 'मी परोपकार करीत नाहीं, तेव्हां इतरहि मजवर उपकार करणार नाहींत' असा साशंक असतो व मित्रांचें

---

१ अव्याहृतं व्याहृताच्छ्रेय आहुः सत्यं वदेद्व्याहृतं तद्द्वितीयम् ।
प्रियं वदेद्व्याहृतं तत्तृतीयं धर्म्यं वदेद्व्याहृतं तच्चतुर्थम् ॥

यादृशैः सन्निविशते यादृशांश्चोपसेवते । यादृगिच्छेच्च भवतुं तादृग्भवति पूरुषः ॥
यतो यतो निवर्तते ततस्ततो विमुच्यते । निवर्तनाद्धि सर्वतो न वेत्ति दुःखमण्वपि ॥

निराकरण करितो तो अधम पुरुष जाणावा. स्वतःचें कल्याण इच्छिणाऱ्या पुरुषानें सर्वदा उत्तम पुरुषाचाच सहवास करावा. संकटप्रसंगीं मध्यमाचीहि संगति धरावी, परंतु अधमाच्या वाऱ्यासहि उभें राहूं नये.

जो पुरुष सत्कुलोत्पन्न लोकांच्या आचाराला अनुसरत नाहीं, तो द्यूतादि असद्वलानें, प्रज्ञेनें किंवा पराक्रमानें वित्त संपादन करूं शकत नाहीं, किंवा सज्जनांच्या प्रशंसेलाहि प्राप्त होत नाहीं.

(२) धृतराष्ट्र—हे विदुरा, जे धर्मार्थांत नित्य तृप्त व बहुश्रुत असतात, ज्या सत्कुलीनांची देव स्पृहा करितात, ते महाकुलीन कसे असतात, हें मला सांग. मी तुला हा प्रश्न विचारीत आहें.

विदुर—हे राजन्, जे कृच्छ्रचान्द्रायणादि तप, २ इंद्रियजयादि दम, ३ वेदाध्ययन-वेदाध्यापनादि ब्रह्मवित्त, ४ यज्ञकम, ५ विधियुक्त दारपरिग्रह, ६ पवित्र व ७ सतत अन्नदान या सात गुणांनीं जे संपन्न असतात, ते सत्कुलोत्पन्न आहेत, असें जाणावें. जे आपल्या सद्वृत्तापासून कदापि चलित होत नाहींत, ज्यांच्या दोषामुळें त्यांचे पितरादि व्यथित होत नाहींत, तर उलट त्यांच्या गुणांच्या योगें संतुष्ट होतात (ते दोषाचरण करीतच नाहींत), जे प्रसन्न चित्तानें धर्म आचरितात, ज्यांनीं अनृताचा त्याग केलेला असतो, ते पुत्र-पौत्रादिरूपानें कुलाची वृद्धि करून कीर्तीची इच्छा करणारे पुरुषहि स्वतःच महाकुलें होत.

आतां कुलांचें कुलीनत्व कशामुळें नष्ट होतें तें सांगतों ऐक—यज्ञ न केल्यानें, विधिरहित दारपरिग्रह केल्यानें, स्वधर्मत्यागानें आणि धर्माचें अतिक्रमण केल्यानें सत्कुलें हीन होतात. तसेंच देवद्रव्याचा विनाश, ब्राह्मणांचें वित्तहरण, ब्राह्मणधर्माचें अतिक्रमण, ब्राह्मणांना ताडनादि केल्यानें, त्यांची निंदा केल्यानें व त्यांच्या ठेवीचा अपहार केल्यानेंहि कुलांचा विनाश होतो. विद्या, सत्पुरुष व धन यांनीं युक्त असलेलीं कुलेंच सत्कुलांत गणलीं जातात. परंतु ज्यांचें वर्तन हीन आहे, तीं कुलेंच नव्हेत. याच्या उलट धर्मयुक्त असलेलीं कुलें द्रव्यहीन जरी असलीं तरी तीं सत्कुलांत गणलीं जाऊन महद्यशाला प्राप्त होतात. यास्तव हे राजा, सदाचाराचें मोठ्या यत्नानें संरक्षण करावें. वित्त येतें

१ उत्तमानेव सेवेत प्राप्तकाले तु मध्यमान्। अधमांस्तु न सेवेत य इच्छेद्भूतिमात्मनः॥

व जातें, त्यामुळें वित्तक्षयानें पुरुषाचा विनाश होत नाहीं. परंतु आचारहीन पुरुष नाश पावतो. हीन वृत्तीचीं कुलें गायी, पशु, अश्व व समृद्ध कृषि यांनीं जरी संपन्न असलीं तरी त्यांचा उत्कर्ष होत नाहीं.

हे प्रभो, आमच्या कुलांत दुसऱ्याशीं वर करणारा कृतघ्न, परधनापहारी, मित्रद्रोही, कपटी, अनृत वक्ता व देव, पितर, आणि अतिथि यांना अन्न अर्पण केल्यावांचून आहार करणारा राजा व अमात्य न होवो. जो ब्राह्मणांचा वध व द्वेष करितो आणि कृषि करीत नाहीं, तो आमच्या सभेंत न येवो. सज्जनांच्या गृहांत तृण, भूमि, उदक व सत्य आणि प्रिय भाषण यांचा केव्हांहि अभाव होत नाहीं. अतिथींना यांचा सदैव लाभ होत असतो. हे महाप्राज्ञ राजा, पुण्यकर्में करणाऱ्या धार्मिकांची प्रवृत्ति परम श्रद्धेनें अतिथींचा सत्कार करण्याकडे असते.

हे नृपते, लहानसा रथहि जसा फार मोठा भार वाहून नेण्यास समर्थ असतो, तसा प्रचंड वृक्षहि भार वाहूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें महाकुलांतील पुरुषच रथाप्रमाणें अविकलतेनें भार वहाण्यास उद्युक्त होतात. सामान्य माणसांना तें कार्य शक्य नसतें. जो मनुष्य आपल्या मित्राच्या क्रोधाला भितो, किंवा त्याच्याशीं साशंकपणें वागतो, तो त्याचा खरा मित्रच नव्हे. तर जो आपल्या मित्रावर पितराप्रमाणें विश्वास ठेवितो, तोच त्याचा मित्र होय. अशा मित्राशींच संबंध ठेवावा. इतरांशीं ठेवूं नये. हे राजा, तूंहि मजविषयीं साशंक असल्यामुळें तुझ्या मनांत मित्रत्वभाव नाहीं. जो मनुष्य कांहीं संबंध नसतांहि मित्रत्वानें वागतो, तोच खरा बंधु, मित्र, गति व आश्रयस्थान होय. परंतु मूर्ख दुर्योधन कुल-शीलादिकांनीं संबद्ध नसलेल्या कर्णादिकांशीं मित्रभावानें वागत आहे. जो चंचल बुद्धीचा मनुष्य वृद्धांची सेवा करीत नाहीं, अशा अस्थिर वृत्तीच्या पुरुषाचा मित्रसंग्रह अस्थिर असतो. हंस जसे शुष्क सरोवराला सोडून जातात, तसे चंचलवृत्तीच्या अविवेकी व इंद्रियाधीन असलेल्या पुरुषाचे सर्व अर्थ त्याच्यापासून दूर जातात.

धृतराष्ट्रा, वायूच्या अधीन असलेल्या चंचल मेघाप्रमाणें असज्जनांची वृत्ति अस्थिर असते. ते अकस्मात् क्रुद्ध होतात व कारणावांचून प्रसन्न होतात. जे पुरुष सत्कार व कृतार्थ करणाऱ्या मित्राच्या हितार्थ झटत नाहींत, त्या कृतघ्नांच्या मृतदेहाला मांसभक्षक पशु-पक्षीहि स्पर्श करीत नाहींत. यास्तव

आपल्यापाशीं धन असो किंवा नसो, मित्रांचा सत्कार करावा. मित्रांची परीक्षा संकटप्रसंगीं याचना केल्यानेंच होते. जो आपत्प्रसंगीं साह्य करतो, तोच खरा मित्र होय. पण जो आपलें कार्य साधण्यासाठीं मित्र होतो, तो खरा मित्र नसून व्यापारीच होय. इष्टवियोगजन्य शोकानें रूप, बल व ज्ञान नष्ट होऊन व्याधि मात्र जडते.

केवल शोकानें शरिराला त्रास होतो, त्यामुळें शत्रूला आनंद होतो. यास्तव हे राजा, तूं व्यर्थ शोक करूं नको. मनुष्य पुनः पुनः उत्पन्न होतो व मरतो. त्याची वृद्धि होते व पुनः क्षय होतो. मनुष्याला कधीं याचना करावी लागते तर कधीं तो इतरांकडून याचनाहि केला जातो. तो कधीं स्वतः शोक करितो व कधीं त्याच्यासाठीं इतर शोक करितात. त्याला सुख-दुःख, उत्कर्ष-अपकर्ष, लाभ-हानि, जन्म-मरण, हीं सर्व क्रमानें स्पर्श करीत असतात. तस्मात् धीर पुरुष कदापि हृष्ट होत नाहीं, किंवा शोक करीत नाहीं. मनासह श्रोत्रादि सहा इंद्रियें चंचल आहेत, त्यांतील जें ज्या विषयांमध्यें आसक्त होतें, त्याविषयीं छिद्रयुक्त कुंभांतून गळणाऱ्या जलाप्रमाणें त्याची बुद्धि स्वार्थापासून भ्रंश पावते.

(३) **धृतराष्ट्र**—हे महामते, शरीररूपी काष्ठांत अग्नीप्रमाणें अव्यक्त असलेल्या युधिष्ठिराशीं मीं मिथ्याचरण केलें आहे. तो माझ्या मंदमति पुत्रांचा युद्धांत नाश करील. हे विदुरा, हें सर्व बाह्य जगत् भययुक्त व अस्थिर आहे, आणि मन चंचल आहे, यास्तव भीतिरहित व स्थिर असें जें परम पद तें मला सांग.

(४) **विदुर**—हे निष्पाप राजा, तुला विद्या, तप, इंद्रियनिग्रह व लोभाचा त्याग यांवांचून शांति मिळेल असें दिसत नाहीं. आत्मज्ञानानें मनुष्याच्या संसाररूपी भयाचा नाश होतो. तपाच्या योगानें सद्गुरु-शास्त्रादिकांचा लाभ होतो, गुरुशुश्रूषेनें ग्रंथापासून होणारें ज्ञान मिळतें आणि सर्व चित्तवृत्तिनिरोधानें परमशांति प्राप्त होते. दान व वेदाध्ययन यांपासून मिळणाऱ्या स्वर्गादि फलाविषयीं निरिच्छ व राग-द्वेषशून्य होऊन इहलोकीं संचार करणाऱ्या पुरुषास मोक्षाची प्राप्ति होते. यथाविधि वेदाध्ययन, धर्मयुद्ध, सुकृत व उग्र तपश्चर्या यांच्या

१ अर्चयेदेव मित्राणि सति वासति वा धने ।
नानार्थयन्प्रजानाति मित्राणां सारफल्गुताम् ॥

फलासक्तीचा नाश झाला असतां परमानंदरूपी सुख प्राप्त होतें. ( जगत्कारण जें ब्रह्म त्याच्या दर्शनानें सकलकर्मांचा नाश झाला असतां शुद्ध आनंदाचा लाभ होतो. त्यावांचून इतर सर्व दुःखरूप आहे, अशा आशयानें विदुर पुढें म्हणतो— )

ज्ञातीशीं वैर करणारांस उत्तम मऊ शय्येवरहि निद्रासुख मिळत नसतें. हे राजन्, स्त्रियांच्या विलासांतहि त्यांचें चित्त रमत नाहीं. मागधांच्या स्तुतीनेंहि त्यांचें समाधान होत नाहीं. ज्ञातिद्रोह करणारे लोक धर्माचरण करीत नाहींत, त्यामुळें त्यांना सुख प्राप्त होत नाहीं. त्यांचा गौरव होत नाहीं. त्या ज्ञातिभेद करणारांस शम रुचत नाहीं. त्यांना सांगितलेलें पथ्यकर हितवचन पटत नाहीं. त्यामुळें अलब्ध वस्तूंचें संपादन व प्राप्त वस्तूंचें परिपालन हीं दोन्ही त्याच्या ठिकाणीं संभवत नाहींत.

हे मनुजेंद्रा, ज्ञातीशीं वैर करणारापाशीं दुसऱ्याचा विनाश करण्यावांचून अन्य कांहीं साधन नसतें. ते सर्वदा तत्परायण असतात. गायींच्या ठिकाणीं दुग्धादि, ब्राह्मणाच्या ठिकाणीं तप, स्त्रियांच्या ठिकाणीं चंचलत्व व ज्ञातीपासून भय संभवतें.

राजा धृतराष्ट्रा, कुरुकुलाचे तंतु असलेल्या या पांडवांचें तूंच बालपणापासून अनेक वर्षें संवर्धन केलेंस. त्यांनीं वनवासांतील विपुल क्लेश सहन केल्यामुळें ऋषींच्या समुदायांनीं त्यांस सज्जनांची उपमा दिली आहे. अशा साधुतुल्य पांडवांची तूं वंचना करूं नको. हे भरतश्रेष्ठा, तुझे अन्य ज्ञातिबांधव पांडवांसारखे नाहींत. ते एकेकटे असले म्हणजे शुष्क काष्ठांप्रमाणें धूमसत असतात व एकत्र जमले म्हणजे काष्ठांच्या जुडग्यांप्रमाणें प्रज्वलित होतात.

हे धृतराष्ट्रा, जे शूर पुरुष आपलें शौर्य ब्राह्मण, स्त्रिया, ज्ञाति व धेनु यांमध्यें प्रकट करितात, त्यांचा वृक्षावरून पडणाऱ्या पक्व फलाप्रमाणें अधःपात होतो. एखादा शाखायुक्त प्रचंड वृक्ष जरी असला तरी तो जर एकटाच असेल तर वायु एका क्षणांत वेगानें त्याचें उन्मूलन करितो. परंतु याच्या उलट जे वृक्ष समूहानें प्रतिष्ठित असतात, ते परस्परांच्या आश्रयानें राहून सोसाट्याचा वायु सहन करण्यासहि समर्थ होतात. याच न्यायानें एखादा मनुष्य अनेक गुणांनीं जरी युक्त असला तरी तो एकटा असल्यास वाताहत वृक्षाप्रमाणें शत्रु त्याला सुसाध्य मानितात. अन्योन्याच्या आश्रयानें व आधारानें सरोवरांतील कमलाप्रमाणें ज्ञातीची वृद्धि होत असते.

हे महाराज, ब्राह्मण, गायी, ज्ञातिबांधव, शिशु व स्त्रिया, ज्यांचें अन्न खाल्लें असेल ते आश्रयदाते व शरणागत हे सर्व अवध्य आहेत. मनुष्यांमध्यें सधनता व नीरोगित्व यांवांचून दुसरा गुण नाहीं. हे राजन्, तुझें कल्याण असो. दरिद्री व रोगी हे दोघेहि मृतवत्च आहेत. परंतु हे राजा, तूं धनवान् व रोगरहित आहेस, यास्तव गुणवानांप्रमाणें शमाला प्राप्त हो. धृतराष्ट्रा, क्रोध मस्तकशूल देणारा आहे. जे असज्जन असतात, ते व्याधीवांचूनच कटु, रुक्ष, तीक्ष्ण व स्पर्श करण्यास दुःसह असें जें क्रोधरूपी पेय तें प्राशन करीत नाहींत. सज्जनच त्याचें प्राशन करितात. तस्मात् हे प्रभो, तूं हा क्रोध गिळून शांत हो.

रोगपीडित मनुष्यांना पुत्र-पश्वादि फल, विषयांचा इष्टानिष्टविवेक, भोग व धनादिजन्य सुख यांचें भानहि रहात नाहीं. कारण पुत्रादिकांपासून होत असलेलें सुख त्यांच्या अनुभवास येत नाहीं. त्यामुळें रोगी नित्य दुःखच भोगीत असतात. यास्तव हे राजा, जागरादिकांच्या द्वारा रोगाला उत्पन्न करणाऱ्या या संतापाचा तूं त्याग कर.

हे राजन्, पूर्वीं द्यूतप्रसंगीं द्रौपदीला जिंकलेलें पाहून मीं तुला ' द्यूत खेळणाऱ्या या दुर्योधनाचें निवारण कर. पंडित द्यूताची प्रशंसा करीत नाहींत.' असें जें हितवचन सांगितलें होतें, तें तूं ऐकलें नाहींस.

हे धृतराष्ट्रा, सहनशीलांशीं जें विरोध करितें, तें वस्तुतः बलच नव्हे. यास्तव तूं दायविभागरूपी सूक्ष्म धर्माचें सत्वर अवलंबन कर. तुझ्या क्रूर पुत्रांपाशीं स्थित असलेली राजलक्ष्मी नष्ट होईल व ती वृद्धि पावून सहिष्णु युधिष्ठिर व त्याचे पुत्र-पौत्र यांचा आश्रय करील. यास्तव हे धार्तराष्ट्र पांडवांचें पालन करोत आणि पांडुपुत्र तुझ्या पुत्रांचें रक्षण करोत. त्या कुरूंचे मित्र व शत्रु एकच असोत, व त्यांचें कार्यहि एकच असो. हे राजन्, अशा प्रकारें ते सुखी व समृद्ध होऊन जिवंत राहोत.

हे कुरुकुलश्रेष्ठा, तूं आज कौरवांचा आधारस्तंभ आहेस. तूं स्वतः जरी कांहीं व्यापार करीत नसलास तरी यथेष्ट वागणाऱ्या पुत्रांचा निरोध करण्यास समर्थ

---

१ न मनुष्ये गुणः कश्चिद्राजन्सधनतामृते ।
अनातुरत्वाद्भद्रं ते मृतकल्पाहि रोगिणः ॥

१ न तद्बलं यन्मृदुना विरुध्यते सूक्ष्मो धर्मस्तरसा सेवितव्यः ।
प्रध्वंसिनी क्रूरसमाहिता श्रीर्मृदुप्रौढा गच्छति पुत्रपौत्रान् ॥

आहेस. यास्तव बाबारे, वनवासानें संतप्त झालेल्या व तुला पुत्रतुल्य असलेल्या पांडुपुत्रांचें पालन करून स्वतःच्या यशाचें रक्षण कर. हे नरेंद्रा, तूं कौरव आणि पांडव यांचा संधि कर. शत्रूंना आपलें छिद्र कळूं देऊं नको. ते सर्व पांडुपुत्र सत्यामध्येंच प्रतिष्ठित आहेत. त्यांच्याप्रमाणें तूं दुर्योधनालाहि सत्यामध्येंच स्थित कर. ५. ३. ३६.

---

## अध्याय ३७ वा.

[ १ विदुरानें केलेलें सतरा प्रकारच्या मूर्खांचें वर्णन व धृतराष्ट्राला उपदेश. २ पुरुष शतायु न होण्याचीं कारणें. ३ पुनः नीतिचा उपदेश. ]

( १ ) **विदुर**—हे राजेंद्रा, आकाशावर मुष्टीचा प्रहार करणारे, कधींहि चांकवितां न येणाऱ्या इंद्रधनुष्याला वांकविणारे व चंद्र-सूर्यांच्या किरणांचें ग्रहण करणारे असे हे सतरा मूर्ख पुरुष स्वायंभुव मनूनें सांगितले आहेत. मीहि ते तुला सांगतों ऐक—१ जो शिष्य नसणाऱ्या दुर्योधनादिकांसारख्या मूर्खांस उपदेश करतो, २ जो अल्प लाभानें संतुष्ट होतो, ३ जो स्वार्थासाठीं शत्रूचें अतिशय सेवन करितो, ४ जो स्त्रियांचें रक्षण करितो, ( शत्रुसेवा व स्त्रीरक्षा यांच्या योगानें स्वतःचें कल्याण इच्छिणारे हे सर्व मूर्ख होत. ) त्याचप्रमाणें ५ अयाच्य वस्तूची याचना करणारा, ६ स्वतः केलेल्या अल्पकृतीचीहि श्लाघा करणारा ( हा सहावा मूर्ख होय. ) ७ कुलीन असून स्वार्थासाठीं अकार्य करणारा, ८ स्वतः दुर्बल असून बलाढ्याशीं वैर करणारा, ९ अश्रद्धावानास धर्मोपदेश करणारा, १० परस्त्रीप्रमाणें अकाम्य वस्तूची कामना करणारा, ११ पुत्राच्या भार्येशीं थट्टा-विनोदादि करणारा, १२ सुनेच्या पितरादिकांनीं संकटांतून सोडविलें असतांहि त्यांच्यापासून सत्काराची अपेक्षा करणारा, १३ परक्यांच्या शेतांत बीजारोपण करणारा किंवा परस्त्रीच्या ठिकाणीं संतति निर्माण करणारा, १४ स्वस्त्रीला वारंवार अपशब्द बोलणारा, १५ एखादी वस्तु घेऊन ‘ मला स्मरत नाहीं ’ असें बोलून नाकबूल होणारा, १६ तीर्थादिकांच्या ठिकाणीं दानाचें शाब्दिक अभिवचन देऊन घरीं याचना करावयास आलेल्या याचकांस ‘ मीं पूर्वीच दान दिलें आहे, ’ अशी दान न देतांच श्लाघा करणारा, १७ सत्याला असत्य व असत्याला सत्य ठरविणारा, असे हे सतरा मूर्ख आहेत. यांना हातीं पाश घेतलेले यमदूत अधोलोकीं नेतात.

राजा, जो मनुष्य ज्या पुरुषाशीं जसा वागत असेल, तसेच त्याच्याशीं वर्तन ठेवावें. हाच धर्म होय. कपटाचरण करणाराशीं कपटानें व सरळ वागणाराशीं निष्कपट वर्तन ठेवावें. यास्तव तुझ्याशीं साधुत्वानें वागणाऱ्या सज्जन पांडवांशीं सरळ वागणेंच तुला उचित आहे. हे राजन्, जरा रूपाचा लोप करिते, आशा धैर्याची हानि करिते, मृत्यु प्राणांचें हरण करतो, असूया धर्मबुद्धि घालविते, काम लज्जेचा त्याग करवितो. हीनसेवेनें सद्वृत्त नाहींसें होतें, क्रोधानें ऐश्वर्य नष्ट होतें आणि अभिमानानें सर्वस्वाचा विनाश होतो, तस्मात् तूं अभिमानाचा त्याग कर.

( २ ) अभिमान सर्वस्वाचें हरण करणारा आहे, असें विदुरमुखानें ऐकून 'माझ्या अभिमानी पुत्रांना जर अल्प आयुष्य असेल, तर अभिमान टाकल्यानें ते कांहीं जिवंत रहाणार नाहींत. बरें, त्यांचें आयुष्य जर दीर्घ असेल, तर ते अभिमानानें जरी युक्त असले तरी मरणार नाहींत, अशा आशयानें धृतराष्ट्र म्हणाला—"हे विदुरा, सर्व वेदांमध्यें 'पुरुष शतायु असतो' असें वर्णिलेलें आहे, परंतु या पूर्ण दीर्घायुष्याचा लोकांना लाभ कां होत नाहीं, याचें काय कारण ?"

विदुर—हे नरश्रेष्ठा, तुझें कल्याण असो. लोक अल्पायु होण्याचीं कारणें सांगतों ऐक—१ अतिमान, २ अतिवाद, ३ योग्यकालींहि दान न करणें, ४ क्रोध, ५ आत्मपोषणपरायणता व ६ मित्रद्रोह हीं सहा कारणें पोलादाच्या तीक्ष्ण शस्त्रासारखीं आहेत. तीं देहवानांच्या आयुष्याचा छेद करितात आणि तींच मानवांचा नाश करितात. मृत्यु त्यांच्या प्राणांचें हरण करीत नाहीं. तस्मात् हे राजा, या सहा दोषांचा त्याग केला असतां तुझे पुत्र शतायु होतील.

हे भारता, एखाद्यानें 'माझ्या या भार्येचें रक्षण कर,' असें सांगून विश्वासानें तिला स्वाधीन केलें असतां, त्या परस्त्रीशीं व गुरुपत्नीशीं निंद्य आचरण करणारा, शूद्रेशीं विवाह करणारा त्रैवर्णिक द्विज, मद्यपि, ग्रामनायक, ब्राह्मणांच्या वृत्तीचें हरण करणारा, त्यांना दास्यांत नियुक्त करणारा आणि शरणांगताचा वध करणारा, हे सर्व ब्रह्मघातक्यांसारखे महापातकी आहेत. अशा लोकांचा सहवास घडला असतां प्रायश्चित्त करावें, अशी श्रुति आहे. यास्तव

१ यस्मिन् यथा वर्तते यो मनुष्यस्तस्मिंस्तथा वर्तितव्यं स धर्मः ।
मायाचारो मायया वर्तितव्यः साध्वाचारः साधुना प्रत्युपेयः ॥

तुझे पुत्र जर अतिमानादि दोष टाकणार नाहींत, तर पांडवांच्या वृत्तीचा अपहार करणाऱ्या त्यांची तूं संगति ठेवूं नको.

हे कुरुश्रेष्ठा, विद्यावान्, नीतिज्ञ, दाता, पितृ-देवादिकांस अर्पण करून मग शेषान्न भक्षण करणारा, हिंसा न करणारा, अनर्थावह कृत्य न करणारा, कृतज्ञ, सत्यवक्ता व मृदु असा विद्वान् स्वर्गाला प्राप्त होतो. हे राजन्, प्रियवादी पुरुष सर्वदा सुलभ असतात, परंतु अप्रिय पण हितकर वचन सांगणारा वक्ता व तें ऐकणारा श्रोता असे दोघेहि दुर्लभ आहेत. जो पुरुष धर्माचा आश्रय करून आपल्या प्रभूला रुचेल किंवा नाहीं, याचा विचार न करितां त्याला अप्रिय पण पथ्यकर उपदेश करितो, तोच त्या राजाचा खरा साहाय्यकर्ता होय. कुलाच्या हितासाठीं पुरुषाचा त्याग करावा, ग्रामासाठीं कुलाचा त्याग करावा, नगरासाठीं ग्राम सोडावा आणि आत्महितासाठीं पृथ्वीचाहि त्याग करावा. यास्तव तूं दुर्योधनाचा त्याग कर. संकटप्रसंगीं उपयोगी पडावा म्हणून धनसंचय करावा. धनाचा व्यय करूनहि स्त्रियांचें रक्षण करावें आणि द्रव्य व दारा यांचाहि प्रसंगीं त्याग करून आत्मरक्षण करावें.

धृतराष्ट्रा, द्यूत पुरुषांच्या वैराला कारण होतें, असा पूर्वकल्पांतील अनुभव आहे. यास्तव बुद्धिमान् मनुष्यानें चित्तरंजनार्थहि द्यूत खेळूं नये. हे प्रतीपकुलोत्पन्न राजा, द्यूताच्या प्रसंगीं 'हें द्यूत योग्य नाहीं,' असें मी तुला वारंवार सांगत होतों, परंतु व्याधिग्रस्ताला औषध व पथ्य जसें रुचत नाहीं, तसें माझें तें हितवचन तुला रुचलें नाहीं. हे वैचित्रवीर्या, चित्रविचित्र पिसाऱ्यांनीं युक्त असलेल्या मनोरम मयूराप्रमाणें हे पांडव आहेत, त्यांचा काकतुल्य असलेल्या धार्तराष्ट्रांकडून तूं पराभव करविलास; परंतु नरेंद्रा, सिंहांचा त्याग करून कोल्ह्यांचें रक्षण करणाराप्रमाणें प्रसंग आला असतां तुला आपल्या कृतीचा पश्चात्ताप होईल !

( ३ ) बा धृतराष्ट्रा, जो स्वामी आपली सेवा करणाऱ्या व हितामध्यें तत्पर असलेल्या भृत्यावर सर्वकाल क्रुद्ध होत नाहीं, त्या प्रभूवर त्याचे भृत्य सर्वदा विश्वास ठेवितात व संकटप्रसंगीं त्याचा त्याग करीत नाहींत. यास्तव हे राजा, सेवकांची वेतनादि वृत्ति संकुचित करावी. परकीयांचें राज्य व धन संपादन करण्याची इच्छा करूं नये. पूर्वीं स्नेहयुक्त असलेले अमात्यादि भोग्य पदार्थांच्या अपहारामुळें स्वामीशीं विरोध करूं लागतात आणि वंचित झालेले ते त्याचा

त्यागहि करितात. यास्तव आपल्या कार्याविषयीं पूर्वींच साध्यासाध्य विचार करून आपलें उत्पन्न व व्यय यांस अनुसरून भृत्यांचें वेतनादि निश्चित करावें आणि योग्य साह्यकर्त्यांचा संग्रह करावा. ज्याला समर्थ सेवकांचें साह्य असतें, तोच परराष्ट्रग्रहणादिकांसारखें दुष्कर कर्म करूं शकतो. जो भृत्य आपल्या स्वामीचा अभिप्राय जाणून त्याचीं सर्व कार्यें निरलसपणानें करितो, प्रसंगीं आपल्या प्रभूला हिताचा उपदेश करितो, स्वामीवर अनुरक्त असतो व जो कुलीन भृत्य आपल्या स्वामीची शक्ति जाणतो, तो आपल्या आत्म्याप्रमाणेंच अनुग्राह्य असतो. हे राजा, मी तुझ्याशीं आजवर असाच वागलों आहें. यास्तव माझ्या हितोपदेशाचा स्वीकार करून मजवर अनुग्रह कर. जो भृत्य स्वामीनें उपदेश केला असतां त्याचा निषेध करितो, स्वतःला प्रज्ञावान् मानतो व स्वामीची आज्ञा न ऐकतां त्याच्या विरुद्ध भाषण करतो, त्याचा तत्काल त्याग करावा.

राजा, आतां मी तुला दूताचीं लक्षणें सांगतों तीं ऐक. १ दर्पशून्य, २ सामर्थ्यवान्, ३ दीर्घसूत्री नसलेला—चपल, ४ सदय, ५ मंजुल भाषण करणारा, ६ शत्रूला अभेद्य, ७ निरोगी, ८ उदार म्हणजे युक्तियुक्त अर्थपूर्ण भाषण करणारा, या आठ गुणांनीं युक्त असलेल्या दूताचीच दूतकार्यांत नेहमीं योजना करावी. हे भारता, अविश्वसनीय परकीयांच्या घरीं सायंकाळीं विश्वासानें कदापि जाऊं नये. चवाठ्यावर रात्रीं लपून राहूं नये. राजा जिची कामना करीत आहे, अशा स्त्रीचा अभिलाष धरूं नये.

कुटील व कुत्सित लोकांचा संकेत चालला असतां त्यांस 'माझा तुमच्यावर विश्वास नाहीं' असें कदापि सांगूं नये, तर 'मला दुसरें कांहीं काम आहे' अशा मिषानें तेथून निघून जावें. 'लोक आपल्याला क्रूर बोलतील' या भयानें ऋणकोला दंड करण्यास समर्थ नसलेला लज्जावान् राजा, व्यभिचारिणी स्त्री, राजसेवक, पुत्र, भ्राता, विधवा, जिचीं अपत्यें बाल आहेत अशी स्त्री, सेनेवर उपजीविका करणारा, व अधिकारावरून दूर केलेला पुरुष, यांना व्यवहारांत न्यायनिर्णयाच्या कामीं केव्हांहि नियुक्त करूं नये.

धृतराष्ट्रा, १ प्रज्ञा, २ सत्कुलांतील जन्म, ३ विद्वत्ता, ४ दम, ५ पराक्रम, ६ मितभाषण, ७ यथाशक्ति दान, व ८ कृतज्ञता, हे आठ गुण पुरुषाला प्रकाशित करितात. राजा जेव्हां एखाद्या मनुष्याचा सत्कार करितो, तेव्हां 'राजाश्रय' हाच त्याचा गुण या सर्व गुणांना धारण करितो. (मनुष्यानें मोठ्या

प्रयत्नानें राजाश्रय मिळविला म्हणजे त्याच्या ठिकाणीं पूर्वोक्त आठ गुण नसले तरी ते आहेत असें मानलें जातें.)

स्नानशील पुरुषाला १ बल, २ रूप, ३ मंजुळ आवाज, ४ स्पष्ट उच्चार ५ मृदु स्पर्श, ६ लावण्य, ७ सुगंध, ८ पावित्र्य, ९ ऐश्वर्य व १० श्रेष्ठ स्त्रिया या दहा गुणांची प्राप्ति होते. मिताहारी पुरुषाला १ आरोग्य, २ आयुष्य, ३ बल, ४ सुख, व ५ सदृढ अपत्यें यांचा लाभ होऊन त्याची 'बहुभोजन करणारा, खादाड' अशी कोणी निंदा करीत नाहीं. असे हे मिताहाराचे सहा गुण आहेत.

आळशी, खादाड, लोकांना द्वेष्य असलेला, मायावी, क्रूर, देश व काल न जाणणारा आणि क्षपणकादिकांचा अनिष्ट वेश धारण करणारा, यांस आपल्या घरांत निवास करूं देऊं नये. कृपण, गालिप्रदान करणारा, मूर्ख, कैवर्तक, निष्ठुर, वैर करणारा व कृतघ्न अशा लोकांपाशीं अत्यंत आर्त स्थितींतहि याचना करूं नये.

या लोकीं सहा प्रकारचे नराधम आहेत. १ आततायी, बहुभाषी किंवा सदा व्यग्र, नित्य अनृत भाषण करणारा, ज्याची भक्ति दृढ नाहीं असा, स्नेहरहित व स्वतःला कुशल मानणारा, अशा अधमांचें कदापि सेवन करूं नये. तस्मात् गुणरहित स्वपुत्रांच्या पक्षपातानें तूं गुणवान् पांडुपुत्रांचा त्याग करूं नको. तर सांप्रत सर्वांच्या ऐकमत्यानें अभ्युदय साधून घे व सर्वांचें हित कर. अर्थ सहायवानांशीं संबद्ध आहे व साह्यकर्ते अर्थावर अवलंबून आहेत. याप्रमाणें हे दोन्ही अन्योन्याश्रयी आहेत. ते अन्योन्यावांचून सिद्ध होत नाहींत.

राजा, पुत्रांना जन्म देऊन त्यांना अनृणी करावें, त्यांच्या निर्वाहाची सोय करावी, सर्व कन्या योग्य वरांना अर्पण कराव्या, नंतर अरण्याचा आश्रय करून

१ अकर्मशीलं च महाशनं च लोकद्विष्टं बहुमायं नृशंसम् ।
अदेशकालज्ञमनिष्टवेषमेतान् गृहे न प्रतिवासयेत ॥
कदर्यमाक्रोशकमश्रुतं च वनौकसं धूर्तममान्यमानिम् ।
निष्ठूरिणं कृतवैरं कृतघ्नं एतान्भृशार्तोऽपि न जातु याचेत् ॥
संक्लिष्टकर्माणमतिप्रमादं नित्यानृतं चादृढभक्तिकं च ।
विसृष्टरागं पटुमानिनं चाप्येतान्न सेवेत नराधमान् षट् ॥

मुनि व्हावें. सर्व भूतांना हितावह व स्वतःला सुखावह असेंच कर्म सर्वार्थ-सिद्धीसाठीं करीत असावें. कारण स्व-परहिताचरण सर्वांचें मूलभूत आहे. त्या कर्मावांचून साक्षात् ईश्वरहि फल देण्यास समर्थ नाहीं. ( यावर तूं कदाचित् म्हणशील कीं, परहित केल्यानें स्वहित कसें होईल! तर तेंहि सांगतों ऐक— ) सहायसंपन्न मनुष्य धनादिकांचा संग्रह, शत्रूंचा पराजय, शौर्य, धर्मज्ञानैश्वर्य-रूप बल, उद्योग व दृढनिश्चय या सहा गुणांनीं युक्त असल्यामुळें त्याच्या उप-जीविकेला भय कोठचें !

आतां हे स्वामिन्, पांडवांशीं वैर करण्यांत किती दोष आहेत तें पहा. पांडवांचे हे क्लेश पाहून इंद्रासह सर्व देव व्यथित होत आहेत. पुत्रांचें हें वैर पाहून तूं नित्य उद्विग्न होत आहेस. तुझ्या यशाचा नाश होऊन शत्रूंना हर्ष होत आहे. हे देवेंद्रतुल्य राजा, ज्याप्रमाणें आकाशांत तिर्यक्—तिरकस पसरलेला धूमकेतु या लोकांचा विनाश करितो, त्याप्रमाणें भीष्म, द्रोण, राजा युधिष्ठिर व स्वतः तूं यांचा प्रवृद्ध झालेला क्रोध या सर्व लोकांचा विध्वंस करील.

हे राजन्, तुझे शंभर पुत्र, कर्ण आणि पांच पांडव या सागरान्त अखिल पृथ्वीचें शासन करोत. हे सर्व धार्तराष्ट्र जणुकाय वन असून पांडुपुत्र त्यांतील व्याघ्र आहेत. तस्मात् या सव्याघ्र वनाचा उच्छेद करूं नको. म्हणजे वनामुळें व्याघ्र नाश पावणार नाहींत. व्याघ्रावांचून वन व वनावांचून व्याघ्र कधींहि संभवत नाहींत. कारण व्याघ्र वनाचें संरक्षण करितात व वन व्याघ्रांना आश्रय देऊन त्यांचें रक्षण करितें.

धृतराष्ट्रा, तुझे पापबुद्धि दुर्योधनादि पुत्र पांडवांचे दोष जाणण्यामध्यें जसे दक्ष असतात, तसे ते पांडुपुत्रांचे कल्याणप्रद गुण जाणण्याची इच्छा करीत नाहींत. स्वर्गलोकापासून अमृत जसें दूर रहात नाहीं, तसे धर्मापासून अर्थ दूर होत नाहींत, यास्तव श्रेष्ठ अर्थसिद्धीची इच्छा करणारानें प्रथम धर्मच आचरावा. परब्रह्मामध्यें चित्त रमल्यामुळें ज्याची बुद्धि 'हें माझें आहे' या संकल्पापासून निवृत्त झाली आहे, तो ही त्रिगुणात्मिका माया व महदादि, हें सर्व पूर्णपणें जाणतो. कारण आत्मज्ञानानें सर्वज्ञत्वाची प्रसिद्धिच आहे.

राजन्, मोक्षाला अधिकारी नसलेल्या पुरुषांविषयीं मी काय सांगतों तें ऐक—जो मनुष्य धर्म, अर्थ व काम यांचें यथाकालीं सेवन करितो, त्याला इहलोकीं

व परलोकींहि त्याचें फल प्राप्त होतें. हर्ष-क्रोधांपासून उत्पन्न होणाऱ्या वेगाचें जो नियमन करितो व आपत्तीमध्यें मोहित होत नाहीं तो ऐश्वर्याला पात्र होतो. पुरुषांचें नित्य बल पांच प्रकारचें आहे, त्यांतील बाहुबल सर्वांत कनिष्ठ म्हटलें जातें. हे राजा, तुझें कल्याण असो, अमात्यलाभ हें दुसरें बल व धनलाभ हें तिसरें बल आहे, असें विद्वान् लोक म्हणतात. पितृपैतामहांपासून सहज प्राप्त झालेलें जें कुलाचें बल ( सत्कुलीनत्व ) तें चवथें बल स्मृत आहे आणि हे भारता, ज्या बलाच्या योगानें सर्व बलांचा संग्रह करतां येतो त्या सव बलांतील श्रेष्ठ बलाला ' प्रज्ञाबल ' म्हणतात.

अतिशय अपकार करण्यास समर्थ असलेल्या पुरुषाशीं वैर करून ' मी त्याच्यापासून दूर आहें, मला कांहीं भय नाहीं ' असा विश्वास कदापि धरूं नये. स्त्रिया, राजे, सर्प, वेदाध्ययन करणारा द्विज, स्वामी, शत्रु, विषयोपभोग व आयुष्य यांवर कोणता सुज्ञ मनुष्य विश्वास ठेवील ! धृतराष्ट्रा, प्रज्ञारूपी शरानें विद्ध झालेल्या प्राण्याला वैद्य, औषधें, होममंत्र, मंगलकृत्यें, वेदमंत्र, व सुसिद्ध असलेलीं रसायनें, यांचा कांहींच उपयोग नाहीं. सर्प, अग्नि, सिंह व ज्ञाति यांची मनुष्यानें कदापि अवज्ञा करूं नये. कारण हे सर्व अतितेजस्वी आहेत. या लोकीं अग्नीचें तेज फार मोठें आहे. तें काष्ठांत गूढ रहातें. तें तेज जोंपर्यंत दुसऱ्यानें उद्दीपित केलें नाहीं, तोंपर्यंत तें काष्ठाला दग्ध करीत नाहीं. परंतु जेव्हां काष्ठांचें मंथन करून तें तेज प्रज्वलित केलें जातें, तेव्हां त्या तेजानें केवल तें काष्ठच नव्हे तर त्याबरोबर सर्व वनहि दग्ध होतें.

हे धृतराष्ट्रा, याच न्यायानें हे सत्कुलोत्पन्न पांडुपुत्र अग्नितुल्य तेजस्वी आहेत. ते क्षमावान् असून काष्ठांतील अग्नीप्रमाणें आपलें हृद्गत गुप्त राखून स्वस्थ राहिले आहेत. राजा, तूं पुत्रांसह लताधर्माप्रमाणें आहेस व पांडुपुत्र महावृक्षासारखे आहेत. महावृक्षाचा आश्रय केल्यावांचून लता कदापि वृद्धि पावत नाहीं. तस्मात् पांडवांचा आश्रय करून तूं पुत्रांसह आपला उत्कर्ष करून घे. हे आंबिकेया, मी तुला पुनः तोच सिद्धांत सांगतों ऐक. बाबारे, पांडव वनांतील सिंह आहेत हें तूं निश्चित समज. सिंहांवांचून वनाचा उच्छेद होत असतो व वनावांचून सिंह नाश पावत असतात. तस्मात् तुझ्या पुत्रांचा वध करून पांडवहि स्नेहानें व्याकुल होऊन नाश पावतील. ५. ३. ३७.

## अध्याय ३८ वा.

[ १ विदुरानें पुनः केलेला नीतीचा उपदेश. ]

( १ ) विदुर—हे धृतराष्ट्रा, समोरून वृद्ध मनुष्य येत असलेला पहातांच तरुणाचे प्राण जणुंकाय उत्क्रमण पावूं लागतात. (तो गडबडून जातो.) पण उत्थान आणि अभिवादन यांच्या योगानें तो त्यांस स्थिर करितो. आलेल्या साधु-अतिथीला आसन देऊन जल आणावें, त्याचें पादप्रक्षालन करावें आणि कुशल विचारून आपलेंहि क्षेम त्याला निवेदन करावें. नंतर त्या विद्वानानें अन्न सिद्ध झालें आहे असें पाहून तें अतिथीला अर्पण करावें. जो कृपण मनुष्य आपल्या कृपण स्वभावामुळें, लोभामुळें किंवा आपण खर्च केला असतां 'हा धनिक आहे,' अशी राजादिकांत आपली प्रसिद्धि होईल, या भयानें अतिथीला उदक, मधुपर्क आणि गाय अर्पण करीत नाहीं व त्यामुळें ज्याच्या गृहांत त्यानें केलेल्या आतिथ्याचें मंत्रयुक्त ग्रहण कोणीहि करीत नाहीं, अशा माणसाचें जीवित व्यर्थ होय, असें आर्यांचें मत आहे. चिकित्सक, बाण करणारा, ब्रह्मचर्यापासून भ्रंश पावलेला, चोर, क्रूर, मद्यपि, भ्रूणहत्या, सेनेवर उपजीविका व वेदविक्रय करणारा आणि निषिद्ध वस्तु विकणारा, हे लोक उदक देण्यासहि अपात्र आहेत. परंतु ते जर अतिथिरूपानें आपल्या घरीं आले, तर त्यांचा जामात्याप्रमाणें आदर करावा. कारण अतिथि दोषपूर्ण जरी असला, तरी तो पूज्य आहे. मग इतर गुणवानांविषयीं काय सांगावें ! आतां अविक्रेय वस्तु कोणत्या, त्या सांगतों. ऐक—

हे राजा, लवण, शिजविलेलें अन्न, दहीं, दूध, मध, तेल, तूप, तिल, कच्चें मांस, फलमूलें, शाखा, रक्त, वस्त्रें, सुगंधी द्रव्यें आणि गूळ या पदार्थांचा विक्रय द्विजांनीं कधींहि करूं नये. जो पुरुष क्रोधशून्य असतो, मातीचें ढेकुळ, दगड व सोनें हे तिन्ही पदार्थ सम मानतो, शोकरहित व स्नेह-वैरशून्य होऊन निंदा व प्रशंसा यांपासून दूर रहातो, राग-द्वेषादिकांच्या राहित्यामुळें प्रिय व अप्रिय यांचा त्याग करून उदासीनवत् रहातो, तो खरा संन्यासी होय. जो नीवार धान्य, मूळें, इंगुद व शाका यांवर निर्वाह करितो, आत्मसंयमन करून अग्निकार्यांत तत्पर असतो, वनांत रहातो, स्वतः दरिद्री असला तरीहि अतिथींचा सत्कार करतो, मग धनादिकांनीं संपन्न असल्यावर काय सांगावें ! असा धुरंधर तापस खरा पुण्यवान् होय.

धृतराष्ट्रा, बुद्धिमानाला अपकार करून 'मी त्याच्यापासून दूर आहें, तो माझी कसली हानि करणार आहे?' असा विश्वास कदापि ठेवूं नये. कारण बुद्धिमानाची बुद्धि दीर्घ बाहूसारखी असते. तिच्या साह्यानें तो दूरस्थ अपकर्त्याचाहि नाश करण्यास समर्थ होतो. यास्तव अतिथिभक्त पांडव दूरस्थ जरी असले तरी तूं त्यांना तुच्छ मानूं नको. अविश्वासु माणसावर कदापि विश्वास ठेवूं नये. विश्वासु माणसावरहि अति विश्वास ठेवूं नये, अशी नीति आहे. यास्तव अविश्वसनीय असलेल्या भीमावर विश्वास ठेवणें योग्य नव्हे. विश्वासापासून भय उत्पन्न होतें, व समूळ नाश होतो. कोणाशीं ईर्ष्या न करणारा, आपल्या स्त्रीचें संरक्षण करणारा, अन्नादिकांचा अतिथ्यादिकांना विभाग देणारा, प्रिय भाषण करणारा व स्त्रियांशीं मधुर भाषण करणारा, अशा पुरुषानें स्त्रियांच्या वश होऊं नये.

हे राजन् स्त्रिया पूज्य आहेत, त्या पवित्र असून गृहाला प्रकाशित करणाऱ्या आहेत, स्त्रिया गृहाची शोभा आहे. तस्मात् त्यांचें विशेषतः रक्षण करावें. पित्याकडे अंतःपुर व मातेकडे स्वयंपाकगृहाची व्यवस्था सोंपवावी. पुत्र-भ्रात्यादिकांकडे गायींचें पालन सोंपवून स्वतःप्रमाणेंच त्यांचें अन्नादिकांनीं पोषण करावें आणि कृषीचें स्वतः निरीक्षण करावें. तिचें रक्षण दुसऱ्यावर कदापि सोपवूं नये. भृत्यांकडे व्यापार सोंपवावा व पुत्रांकडून ब्राह्मणांची सेवा करवावी. हे राजा, पांडव आपल्या स्त्रीचें रक्षण करीत असतात. त्यांची पत्नी द्रौपदी लक्ष्मीतुल्य आहे. यास्तव पितृस्थानीं असलेल्या तूं त्यांचें अवश्य रक्षण कर. तिचें अतिक्रमण केल्यास फार मोठें भय उपस्थित होईल.

राजा, जलापासून अग्नि, ब्राह्मणापासून क्षत्रिय व दगडापासून लोखंड उत्पन्न होतें. त्यांतील सर्वगत तेज आपापल्या कारणांत लीन होतें. सर्वदा सज्जन व कुलीन पांडव अग्नीसारखे तेजस्वी आहेत. ते क्षमाशील असल्यामुळें काष्ठांत गुप्त रहाणाऱ्या अग्नीप्रमाणें बाह्यतः शांत दिसत आहेत.

ज्या राजाचा संकेत बाह्य व आंतर जनांतील कोणालाहि माहीत नसतो व जो सर्वतश्चक्षु असल्याप्रमाणें हेरांच्या द्वारा परक्यांचा संकेत जाणतो तो राजा ऐश्वर्याला प्राप्त होतो. गंभीर नृपाल 'मी अमुक करणार आहें,' असें कधीं

---

१ अपकृत्य बुद्धिमतो दूरस्थोऽस्मीति नाश्वसेत्।
दीर्घौ बुद्धिमतो बाहू याभ्यां हिंसति हिंसितः॥

बोलत नाहीं, तर धर्मकामार्थकार्ये करून दाखवितो. त्याचा गुप्त संकेत कदापि बाहेर फुटत नाहीं. यास्तव धृतराष्ट्रा, पर्वतशिखरावर चढून प्रासादावर एकांतांत किंवा तृणरहित अरण्यांत जाऊन तेथें गुप्त संकेत करावा. हे भारता, सुहृद् नसलेल्या माणसाला आपला गुप्त संकेत सांगणें योग्य नव्हे. एखादा पुरुष सुहृद् असूनहि मूढ असेल, अथवा पंडित असला तरीहि चपलवाक् म्ह० बडबड्या असेल, तर त्यासहि गुप्तसंकेत कळूं देऊं नये. महीपालानें परीक्षा केल्यावांचून आपल्या अमात्याची योजना करूं नये. कारण अमात्याच्या ठिकाणीं अर्थलीप्सा म्ह० द्रव्यसंपादनेच्छा व गुप्तसंकेताचें रक्षण, हे दोन गुण अवश्य असावे. ज्या राजाचीं धर्म, अर्थ व काम यांतील सर्व कार्यें झाल्यावर मग तीं त्याच्या सभासदांस कळतात, तो राजा श्रेष्ठ होय. ज्या भूपालाचे सर्व संकेत गुप्त असतात त्याला निःसंशय सिद्धि प्राप्त होते.

जो राजा मोहानें निंद्य कार्यें आरंभितो, त्या कार्यांच्या विपरीतत्वानें तो जीवितालाहि मुकतो. प्रशस्त कार्यांचें अनुष्ठान सर्वदा सुखावह असतें. अशा कार्यांचें अनुष्ठान न करणेंच उलट पश्चात्तापाला कारण होतें. ज्याप्रमाणें वेदाध्ययन न करणारा विप्र श्राद्धाला पात्र नसतो, त्याप्रमाणें १ संधि, २ विग्रह, ३ यान, ४ आसन, ५ द्वैधीभाव व ६ समाश्रय यांच्या समूहाला षाड्गुण्य असें म्हणतात. या षाड्गुण्यांत निष्णात नसलेला मनुष्य संकेत ऐकण्यास अपात्र होय. पूर्वोक्त षड्गुणांनीं संपन्न असलेला राजा शत्रूचें स्थान, वृद्धि व क्षय जाणण्यास समर्थ असतो. तो आपल्या सच्छीलानें सर्वत्र पूज्य होतो व सर्व पृथ्वी त्याच्या स्वाधीन होते. ज्याचा हर्ष व क्रोध कधींहि निष्फल नसतो, ज्यानें आपल्या कोशाचें निरीक्षण स्वतः केलें आहे व जो एखादें कार्य करून पुनः त्याच्या गुण-दोषांचें चिंतन करितो, त्याला पृथ्वी सर्व प्रकारचें ऐश्वर्य देते.

पृथ्वीपालानें केवल राजा हें नांव आणि छत्र-चामरादि राजचिह्नें यांवरच संतुष्ट व्हावें. ऐश्वर्यादि सर्व सुखोपभोग आपल्या सर्व भृत्यांस विभागून त्यांच्यासह त्यांचा उपभोग घ्यावा. स्वतः एकट्यानेंच त्यांचा अपहार करूं नये. ब्राह्मण त्यांच्या क्रियाभिज्ञत्वामुळें ब्राह्मणाला जाणतो. पति पत्नीला चांगलें ओळखतो. तसेंच नृपति अमात्याला व राजाच राजाला जाणतो. वध्य असलेला शत्रु हातीं सांपडल्यास त्याला कदापि सोडूं नये. आपल्या दुर्बलावस्थेंत वध्य शत्रूपुढेंहि नम्र व्हावें आणि आपण सबल होतांच शत्रूला जिवंत सोडूं नये. कारण असा शत्रु जिवंत सुटला असतां त्याच्यापासून लवकरच भय प्राप्त होतें.

धृतराष्ट्रा, दैवतें, राजे, ब्राह्मण, वृद्ध, बाल व रोगी यांच्याविषयीं आलेल्या क्रोधाचें मोठ्या प्रयत्नानें नियमन करावें. कारण देवतापासून अनिष्ट फलाचें, राजापासून वधाचें व ब्राह्मणापासून शापाचें भय असतें.

मूढांना प्रिय असलेला निरर्थक कलह सुज्ञ मनुष्य वर्ज करितो. त्यामुळें त्याला कीर्तीचा लाभ होतो आणि तो लोकामध्यें कोणत्याहि अनर्थानें युक्त होत नाहीं. क्लीब पतीची इच्छा न करणाऱ्या स्त्रीप्रमाणें ज्याचा प्रसाद निष्फल व क्रोध निरर्थक असतो, अशा स्वामीचा त्याचे भृत्य अवमान करितात. बुद्धीनें धनप्राप्ति किंवा मूढत्वानें दारिद्र्य प्राप्त होत नसतें; तर तें कर्मफलाधीन आहे, हें प्राज्ञच केवल जाणतात, इतर जाणत नाहींत.

हे भारता, विद्या, शील व वय यांनीं वृद्ध असलेले ज्ञानवृद्ध, धनवान्, आणि बलवान्, यांचा मूढ मनुष्य नित्य अवमान करितो. दुराचारी, मूढ, असूया करणारा, अधार्मिक, क्रोधी व कठोर भाषण करणारा, अशा पुरुषांवर सत्वर अनर्थ ओढवतात. याच्या उलट वंचना न करणारा, दाता, प्रतिज्ञा पाळणारा व वाणीचें संयमन करून विचारपूर्वक भाषण करणारा, अशा मनुष्याला सर्व प्राणी अनुकूल होतात. वंचनाशून्य, दक्ष, कृतज्ञ, मतिमान् व ऋजु अशा पुरुषाचा द्रव्यसंचय क्षीण जरी झाला, तरीहि त्याला परिवाराचा लाभ होतो. १ धृति, २ शम, ३ दम, ४ शौच, ५ कारुण्य, ६ मृदुभाषण व ७ मित्रांशीं अद्रोह, हे सात गुण ऐश्वर्याला उद्दीपित करीत असतात.

हे नृपश्रेष्ठा, आपल्या आश्रित वर्गाला त्यांचा अंश न देतां स्वतःच सर्व सुखोपभोग घेणारा, दुष्टात्मा, कृतघ्न व निर्लज्ज अशा राजाला या लोकीं वर्ज मानावें.

जो मनुष्य निर्दोष प्राण्याला दोष देऊन कोपवितो, त्या सदोष माणसाला सर्पयुक्त गृहांत निजणाऱ्या पुरुषाप्रमाणें रात्रीं सुखानें निद्रा येत नाहीं. हे भारता, कोपविलेल्या भृत्यादिकांच्या वेतनादिकांचें अतिक्रमण केल्यानें स्वतःच्या योग-

१ न च रात्रौ सुखं शेते ससर्प इव वेश्मनि ।
यः कोपयति निर्दोषं सदोषोऽभ्यन्तरं जनम् ॥
येषु दुष्टेषु दोषः स्याद्योगक्षेमस्य भारत ।
सदा प्रसादनं तेषां देवतानामिवाचरेत् ॥

क्षेमांतहि अडथळा येतो; यास्तव देवतांच्या प्रसादाप्रमाणें अशा लोकांची प्रसन्नता संपादन करावी. स्त्रीच्या स्वाधीन केलेलें धन आणि प्रथमच उत्कर्ष झाल्यामुळें गर्वानें दृप्त झालेले व अकुलीन अशा लोकांच्या हातीं दिलेलें सर्व द्रव्य हीं दोन्ही संशयितच आहेत, असें समजावें. हे राजन्, ज्या ठिकाणीं स्त्री, द्यूतकार, किंवा मूर्ख यांतील एखादा शासन करीत असेल, तेथील प्रजाजन दगडाच्या नावेंत बसलेल्या लोकांप्रमाणें अवश होऊन दुःखार्णवांत बुडतात.

हे भारता, जे भृत्य केवल राजकार्यांतच आसक्त असतात, आपल्या महत्त्वादिकांमध्यें आसक्त नसतात, तेच पंडित होत. कारण भृत्य मानापमानामध्यें आसक्त झाले म्हणजे त्यांच्यामध्यें परस्पर स्पर्धा सुरू होते. ते आपसांत कलह करितात, त्यामुळें राजकार्य नष्ट होतें. ज्याची द्यूतकार, चारण व व्यभिचारिणी स्त्रिया प्रशंसा करितात, तो मानव जीवंत रहात नाहीं. हे राजा, महाधनुर्धर व अतिशय बलाढ्य पांडवांना सोडून तूं हें महदैश्वर्य दुर्योधनाला अर्पण केलें आहेस; तस्मात् त्रैलोक्यापासून भ्रंश पावणाऱ्या बलीप्रमाणें तूं ऐश्वर्यमदानें मूढ झालेल्या तुझ्या पुत्राला राज्यभ्रष्ट झालेलें लवकरच पहाशील! ५. ३. ३८.

---

## अध्याय ३९ वा.

[ १ विदुराचा धृतराष्ट्राला परोपरीनें उपदेश. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे महाप्राज्ञ विदुरा, काष्ठाच्या कळसूत्री बाहुलीप्रमाणें ऐश्वर्य व अनैश्वर्य पुरुषाच्या स्वाधीन नाहीं. विधात्यानें तें दैवाधीन ठेविलें आहे. यास्तव तूं मला दोष देऊं नको; मला उपदेश कर. तुझें भाषण श्रवण करण्यास मी सिद्ध आहें, परंतु त्याप्रमाणें वागण्याचें मात्र मला धैर्य नाहीं!

विदुर—हे भारता, अप्रासंगिक वचन साक्षात् बृहस्पति जरी सांगत असला, तरी त्याला मूर्ख मानून त्याची अवज्ञा होत असते. तेव्हां माझ्यासारख्याची काय कथा! एखादा मनुष्य दानानें प्रिय होतो. तर कोणी प्रियभाषणानें प्रीति संपादन करितो. जो मनुष्य मूलादि वशीकरणऔषधीनें किंवा मंत्रादि साधनांनीं प्रिय होतो, तो त्या वस्तूंचा अभाव होतांच अप्रिय होतो, परंतु मी तशाप्रकारचा नाहीं. दानादिकांवांचूनच जो प्रिय होतो, तोच खरा प्रिय होय. यास्तव प्राप्तकालीं तुला सांगत असलेल्या माझ्या या योग्य उक्तीचा तूं अनादर करूं नको.

राजा, आपल्याला जो मनुष्य द्वेष्य वाटत असेल, तो कितीहि विद्वान् किंवा पंडित असला तरीहि सज्जन दिसत नाहीं आणि प्रिय मनुष्याचीं सर्व कार्यें शुभच दिसतात व द्वेष्याचीं सर्वच कार्यें सदोष भासतात.

हे राजन्, तुझा हा दुर्योधन पुत्र उत्पन्न होतांच, 'तूं या एका पुत्राचा त्याग कर, त्या एका पुत्राच्या त्यागानें तुझ्या शंभर पुत्रांची वृद्धि होईल, परंतु त्या एकाच्या अत्यागानें शंभर पुत्रांचा नाश होईल,' असें मी तुला सांगितलें होतें. ज्या वृद्धीपासून पुढें क्षय होतो ती वृद्धि महत्त्वाची मानूं नये, परंतु ज्या क्षयापासून परिणामीं उत्कर्ष होतो, तो क्षयहि हितकरच समजावा. कारण, हे महाराज, ज्यापासून परिणामीं उत्कर्ष होतो तो क्षयच नव्हे, तर या लोकीं जो प्राप्त झाला असतां अतिशय नाश होतो, तोच क्षय जाणावा. हे धृतराष्ट्रा, कोणी गुणानें समृद्ध असतात, तर कित्येक धनानें संपन्न असतात. तुझे पुत्र धनसंपन्न असले तरी गुणहीन आहेत. त्यांचा तूं त्याग कर.

धृतराष्ट्र—हे विदुरा तूं परिणामीं हितकर व प्राज्ञसंमत असेंच भाषण करीत आहेस. परंतु या माझ्या दुर्योधन-पुत्राचा त्याग करण्यास माझें मन धजत नाहीं. जेथें धर्म असेल तेथेंच जय होईल !

विदुर—राजा, तूं जर दुर्योधनाचा त्याग करण्यास असमर्थ असशील तर निदान शकुनिप्रभृति दुष्टांचा तरी त्याग कर. अतिशय गुणवान् व विनयसंपन्न मनुष्य भूतांचा अल्पनाशहि होऊं देत नाहीं. यास्तव हे राजन्, तूं आपल्या या कुलनाशाची उपेक्षा करूं नको.

परनिंदा व परोपद्रव यांत निरत असलेले लोक परस्परांचा कलह लावून देण्याचा नेहमीं यत्न करीत असतात, अशा लोकांचें दर्शनच अमंगल असतें. त्यांच्या सहवासापासून प्राण्यांना महद्भय असतें, त्यांना द्रव्यदान न दिल्यास महान् अनर्थ ओढवतो आणि द्रव्य दिल्यास अतिशय भीति उत्पन्न होते. भेद करणें हेंच ज्यांचें शील आहे असे लोक, सकाम, निर्लज्ज, शठ आणि पातकी म्हणून ज्यांची प्रसिद्धि आहे अशा लोकांचा सहवास निंद्य होय. शिवाय इतरहि महादोषांनीं युक्त असलेल्या पुरुषांना वर्ज करावें.

---

१ द्वेष्यो न साधुर्भवति न मेधावी न पण्डितः ।
प्रिये शुभानि कार्याणि द्वेष्ये पापानि चैव ह ॥

ज्या कर्मासाठीं मैत्री केली असेल तो हेतु निवृत्त झाला असतां नीच मनुष्याच्या मनांतील प्रीतीचा, फलनिष्पत्तीचा व मैत्रींतील सुखाचा नाश होतो. तो नीच मनुष्य उपकारकर्त्यांची निंदा करितो व त्याच्या नाशाचा यत्न आरंभितो. अल्प अपकारानें त्याच्या मनाची शांति होत नाहीं. यास्तव विद्वानानें अशा निर्दय व शास्त्रसंस्कारशून्य नीच मनुष्याच्या संबंधाचा चांगला विचार करून त्यांना दुरूनच वर्ज करावें.

जो मनुष्य आपल्या दरिद्री, दीन व आतुर ज्ञातीवर अनुग्रह करितो, तो पुत्र, पशु इत्यादिकांसह उत्कर्ष पावून परम श्रेयाला प्राप्त होतो. ज्यांस आपली कुलवृद्धि व कल्याण व्हावें, अशी इच्छा असते, त्यांनीं ज्ञातीचा उत्कर्ष करावा. तस्मात् हे राजेंद्रा, तूं पांडवांशीं सरळ वाग. ( कपटाचरण करूं नको. ) हे भरतर्षभा, ज्ञातीचा सत्कार करणारा मनुष्य श्रेयानें युक्त होतो. ज्ञातिजन गुणरहित जरी असले, तरीहि त्यांचें संरक्षण करावें, मग सर्वथा गुणवान् व तुझ्या प्रसादाची इच्छा करणाऱ्या पांडवांविषयीं काय सांगावें ! तस्मात्, हे विशांपते, वीर पांडवांवर प्रसन्न हो. त्यांच्या निर्वाहासाठीं त्यांना निदान कांहीं गांवें तरी दे. त्यामुळें या लोकीं तूं कीर्तिमान् होशील. बाबारे, पुत्रांना शासन करणें हें तुज वृद्धाचेंच कर्तव्य आहे. मींहि तुला हितवचन सांगतों आहें, मला तुझा हितेच्छु समज.

हे भरतश्रेष्ठा, स्वतःच्या कल्याणाची इच्छा करणारानें ज्ञातींशीं केव्हांहि कलह करूं नये. तर ज्ञातिबांधवांसह सुखोपभोग घ्यावा. आपल्या[1] ज्ञातिजनांसह प्रीतीनें भोजन व कथावार्ता करून परस्परांशीं प्रेमभावानें वागावें, कदापि विरोध करूं नये. ज्ञातिच तारते व मारते. सज्जन तारण करितात व दुर्जन बुडवितात, यास्तव हे मानद राजेंद्रा, तूं पांडवांशीं सद्वर्तन ठेव. पांडुपुत्रांकडून आवृत्त झालेला तूं शत्रूंना दुर्धर्ष होशील. विषलिप्त बाणानें विद्ध केलेला मृग निरुपयोगी होतो. कारण व्याधाला त्याचें मांस खातां येत नाहीं. हिंसेचें पातक मात्र लागतें. त्या व्याधाप्रमाणेंच ज्ञातीला प्राप्त होऊन ज्ञातीचा नाश करणाऱ्या श्रीमंताची स्थिति होते.

---

१ संभोजनं संकथनं संप्रीतिश्च परस्परम् ।
ज्ञातिभिः सह कार्याणि न विरोधः कदाचन ॥

हे नरेश्वरा, पांडवाचा किंवा तुझ्या पुत्रांचा वध झाल्याचें तूं जेव्हां ऐकशील, तेव्हां तुला अतिशय संताप होईल, याचा विचार कर. जीवित नश्वर आहे, हें जाणत असतां ज्या कर्मानें पुरुषाला लोकलज्जेनें घरांत खाटेवर बसून कृतकर्मांचा पश्चात्ताप करावा लागतो, तें कर्मच त्यानें प्रथम न करणें बरें. हे महाराज, नीतिशास्त्रकर्ता शुक्रच काय तो नीतिमान् आहे. त्या भार्गवावांचून इतर सर्व पुरुष कांहींना कांहीं अनीतीनें वागतातच. यास्तव पूर्वी जें होऊन गेलें तें जाऊं दे, पण आतां भविष्यत्कालीं कसें वागावें याचा विचार करणें प्राप्त आहे. दुर्योधनानें पूर्वी पांडवांशीं जें अन्यायाचें वर्तन केलें, याचा प्रतिकार आतां तूं करावास. कारण तूं कुलांतील वृद्ध आहेस. हे नरश्रेष्ठा, पांडवांना राज्यांशदानानें स्थिर केलें असतां तूं लोकांत निष्पाप व विद्वानांना पूज्य होशील.

जो नृपाल उपदेश करणाऱ्याच्या सम्यग्वचनांचा फलतः विचार करून कार्याला आरंभ करितो, त्याला चिरकाल यश प्राप्त होतें. कुशल उपदेष्ट्यांनीं उपदेशिलेलेंहि ज्ञान वस्तुतः असम्यक्‌च आहे. कारण त्या ज्ञानाच्या योगानें त्याला ज्ञातव्य वस्तु अवगत होत नाहीं आणि जरी अवगत झाली, तरी तो त्याप्रमाणें वागत नाहीं. याच न्यायानें मीं केलेला हा उपदेश तुझ्या ठिकाणीं निष्फलच होणार, यांत संशय नाहीं. ज्या कर्माचें फल दुःख आहे, तें कर्म विद्वानानें कदापि आरंभूंच नये आणि जो परिणामीं दुःखद होणारें कर्म आरंभीत नाहीं, त्याचीच अभिवृद्धि होते. जो पुरुष पूर्वी केलेल्या पापांचा विचार न करतां त्यालाच अनुसरतो, तो दुर्बुद्धि अगाध पंकांत पडतो. विद्वानानें मंत्रभेदाचीं हीं सहा द्वारें मानलीं आहेत. अर्थाची अविच्छेदानें वृद्धि व्हावी, अशी इच्छा करणाऱ्यानें त्या द्वारांचें नित्य रक्षण करावें. सुरापानादिकांचा मद, निद्रा, परकीयांच्या गुप्त हेरांविषयीं अज्ञान, स्वतःच्या चर्येवरील विकार, दुष्ट अमात्यांवर विश्वास व अकुशल दूत हीं मंत्रभेदाचीं द्वारें जाणून तीं सर्वदा झांकून टाकावीं. जो मनुष्य धर्म, अर्थ, व काम या तीन पुरुषार्थांनीं युक्त असतो, तो शत्रूंचाहि स्वामी होतो.

---

१ असम्यगुपयुक्तं हि ज्ञानं सुकुशलैरपि। उपलभ्यं चाविदितं विदितं चाननुष्ठितम्॥
पापोदयफलं विद्वान्यो नारभति वर्धते। यस्तु पूर्वकृतं पापमविमृश्यानुवर्तते॥
अगाधपङ्के दुर्मेधा विषमे विनिपात्यते। मंत्रभेदस्य षट् प्राज्ञो द्वाराणीमानि लक्षयेत्॥

राजा, शास्त्राध्ययन व वृद्धांची सेवा केल्यावांचून बृहस्पतितुल्य पुरुषांनाहि धर्म व अर्थ यांचें ज्ञान होणें शक्य नाहीं, समुद्रांत पडलेली वस्तु नष्ट होते, न ऐकणाराला केलेला उपदेश व्यर्थ होतो, नास्तिकानें केलेलें शास्त्राध्ययन विफल होतें व कुंडांतील अग्नि प्रज्वलित झालेला नसतांना दिलेली आहुति निरर्थक होते.

बुद्धिमानानें एखाद्याशीं मैत्री करण्यापूर्वीं प्रथम युक्तीनें त्याच्याविषयीं मनांत वारंवार विचार करावा, नंतर स्वतः अनुभवानें त्याच्या योग्यतेचा निश्चय करावा, परक्यांच्या मुखानें त्याची माहिती मिळवावी, नंतर त्याच्या मुखादि चिह्नांवरून निश्चय करावा आणि मग त्या विद्वानाशीं मैत्री करावी.

विनयानें अकीर्तीचा नाश होतो, पराक्रम अनर्थ घालवितो, नित्य क्षमा क्रोध नाहींसा करिते व धर्माचरणानें अशुभ चिह्नें नष्ट होतात. हे राजन्, भोग्य वस्तूची सामग्री, जन्मस्थान ( कुग्रामांत जन्म झाला असल्यास प्रायः त्याच्या ठिकाणीं विवेकाचा अभाव असतो, ) गृह, आचार, भोजन व आच्छादनादि वस्त्रें यांवरून कुलाची परीक्षा करावी.

राजा, इष्ट भोग्य वस्तु समीप आली असतां निष्काम जीवन्मुक्तालाहि तिचा प्रतिकार करणें शक्य नसतें, मग सकाम मनुष्याविषयीं काय सांगावें ! विद्वानांचा सहवास करणारा, सुविद्य, धार्मिक, प्रियदर्शन, मित्रांनीं युक्त असलेला व प्रियवाक् अशा माणसाशीं स्नेह ठेवावा. कुलीन असो किंवा दुष्कुलीन असो, मर्यादेचें उल्लंघन न करणारा, धर्मनिष्ठ, मृदु व लज्जावान् असा पुरुष शेकडों कुलीनांहून श्रेष्ठ होय. ज्यांचें मन, बुद्धि व गूढाचार हे तिन्ही

---

१ नष्टं समुद्रे पतितं नष्टं वाक्यमशृण्वति ।
अनात्मनि श्रुतं नष्टं नष्टं हुतमनग्निकम् ॥
२ मत्या परीक्ष्य मेधावी बुद्धया संपाद्य चासकृत् ।
श्रुत्वा दृष्ट्वाऽथ विज्ञाय प्राज्ञैर्मैत्रीं समाचरेत् ॥
३ उपस्थितस्य कामस्य प्रतिवादो न विद्यते ।
अपि निर्मुक्तदेहस्य कामरक्तस्य किं पुनः ॥
४ ययोश्चित्तेन वा चित्तं निभृतं निभृतेन वा ।
समेति प्रज्ञया प्रज्ञा तयोर्मैत्री न जीर्यति ॥

एकरूप असतात, त्यांची मैत्री कदापि क्षीण होत नाहीं. दुर्बुद्धि व अनिश्चयी पुरुषाची मैत्री तृणांनीं आच्छादिलेल्या कूपाप्रमाणें असते, यास्तव विचारी माणसानें त्याचा त्याग करावा. कारण त्याची मैत्री नाश पावते. सुज्ञ माणसानें गर्विष्ठ, मूर्ख, क्रोधी, साहसी व धर्महीन लोकांबरोबर मैत्री ठेवूं नये. कृतज्ञ, धार्मिक, सत्यवक्ता, अक्षुद्र, दृढभक्त, जितेंद्रिय, मर्यादेंत स्थित व केव्हांहि न सोडणारा, असाच मित्र इष्ट आहे.

विषयांपासून निवृत्ति अत्यंत दुष्कर असल्यामुळें ती मृत्यूहूनहि अधिक दुःखद आहे. विषयप्रवृत्ति देवतांचाहि नाश करणारी आहे. सर्व भूतांवर दया, अनसूया, क्षमा, धृति व मित्रांचा सत्कार, हीं आयुष्य वाढविणारीं आहेत, असें विद्वान् म्हणतात. कोणत्याहि कार्यांत अन्याय झाला असतां दृढनिश्चयानें पुनः तें न्यायमार्गांत पूर्ववत् प्रस्थापित करणें, हे श्रेष्ठ पुरुषाचें व्रत आहे. भावी संकटाचा प्रतिकार कसा करावा, हें जाणणारा, वर्तमानकाळाविषयीं दृढनिश्चय करणारा, आणि भोगांवांचून प्राप्त दुःखाचा नाश होत नाहीं, हें जाणून गत गोष्टीविषयीं शोक न करितां कार्यतत्पर होणारा मनुष्य अर्थहीन होत नाहीं. (त्याची संपत्ति नष्ट होत नाहीं.) मनुष्य कर्मानें, मनानें व वाणीनें सतत जें कर्म करितो, तेंच त्याला आकर्षण करीत असतें. तस्मात् सर्वदा शुभ कर्मच करावें. दहीं, दूर्वा, गायी इत्यादि पवित्र पदार्थांचा स्पर्श, सहायसंपत्ति, शास्त्राध्ययन, उद्यम, अंतःकरणाचा सरलपणा, आणि सज्जनांचें वारंवार दर्शन, हीं कल्याणकारक आहेत. उद्योग न सोडणें, हेंच ऐश्वर्य, लाभ व शुभ यांचें मूळ आहे. मनुष्य अविश्रांत उद्योगानें श्रेष्ठ पदाला प्राप्त होऊन अत्यंत सुखी होतो.

बा धृतराष्ट्रा, ज्याअर्थीं क्षमेवांचून अन्य कांहींहि अधिक ऐश्वर्यप्रद व हितावह नाहीं, त्याअर्थीं आपल्या उत्कर्षाची इच्छा करणारानें सर्वदा व सर्वत्र क्षमेचेंच अवलंबन करावें. दुर्बलानें सर्वांशीं क्षमाशील असावें आणि समर्थानें धर्मबुद्धीनें क्षमा करावी. जो अर्थ व अनर्थ नित्य सम मानितो, त्यानें निरंतर क्षमाशील असणेंच हितकर आहे.

---

१ अवलिप्तेषु मूर्खेषु रौद्रसाहसिकेषु च ।
तथैवापेतधर्मेषु न मैत्रीमाचरेद्बुधः ॥

२ कर्मणा मनसा वाचा यदभीक्ष्णं निषेवते ।
तदेवापहरत्येनं तस्मात्कल्याणमाचरेत् ॥

ज्या सुखाचा उपभोग घेतला असतां मनुष्य धर्म व अर्थ यांपासून च्युत होत नाहीं, त्याच सुखोपभोगाचें यथेष्ट सेवन करावें. अमर्याद आहारादि करणें हें मूढाचें व्रत आहे, तें आचरूं नये.

दुःखार्त, प्रमत्त, नास्तिक, आळशी, अदांत, आणि उत्साहशून्य अशा मानवापाशीं श्री रहात नाहीं. सरळ अंतःकरणाच्या मनुष्याला मनाच्या ऋजुतेमुळें दुर्वर्तनाची लज्जा वाटते. परंतु दुर्जन लोक त्याला दुर्बल समजतात व पीडा देतात. अति-पंडित, अति-उदार दाता, अति-शूर, अति-व्रती, व प्रज्ञाभिमानी इतक्या लोकांपासून संपत्ति भयानें दूर पळते. ( कारण पंडित विचारानें मला निःसार समजेल, दाता दान देऊन तुच्छ लेखील, शूर युद्धांत पडला असतां मी निराश्रित होईन, तीव्र व्रत धारण करणारा सुखोपभोग निरुपयोगी समजेल आणि प्रज्ञाभिमानी दुष्ट आज्ञेनें माझा नाश करील, अशी लक्ष्मीला भीति वाटत असते. ) श्री अति गुणवानांपाशीं रहात नाहीं किंवा अत्यंत गुणहीनाचाहि आश्रय करीत नाहीं. ती गुणांची इच्छा करीत नाहीं, किंवा दुर्गुणावर आसक्त होत नाहीं. तर उन्मत्त व अंध गायीप्रमाणें कोठें तरी— मनास येईल तेथें रहाते.

अग्निहोत्र वेदाध्ययनाचें फल आहे, सच्छील व सदाचार हें शास्त्राध्ययनाचें फल आहे, विषयोपभोग व पुत्रप्राप्ति हें दारपरिग्रहाचें फल आहे. दान व सुखोपभोग हें धनाचें फल आहे.

राजा, जो मनुष्य अधर्मानें संपादन केलेल्या द्रव्यानें पितरांचें और्ध्वदेहिक कर्म व परलोकाचें यज्ञदानादि साधन करतो, त्याला परलोकीं अमार्गानें संपादन केलेल्या द्रव्याच्या दानाचें फल मिळत नाहीं. सत्यनिष्ठ मनुष्याला गहन अरण्य, दाट झाडी, दुर्गम प्रदेश, रोगादि आपत्ति, दुर्भिक्ष इत्यादि बिकटप्रसंगीं किंवा एखाद्यानें त्यावर शस्त्रें जरी उगारिलीं, तरी यत्किंचित्‌हि भय वाटत नाहीं. ( तो धैर्यानें सर्व संकटांतून पार पडतो. )

उद्योग, इंद्रियनिग्रह, दक्षता, अप्रमाद, धैर्य, स्मृति आणि विचारपूर्वक कार्यारंभ, हीं पुरुषाच्या उत्कर्षाचीं कारणें आहेत.

तापसांचें बल तप, ब्रह्मवेत्त्यांचें बल ब्रह्म, दुर्जनांचें बल हिंसा आणि गुण-

१ तपो बलं तापसानां ब्रह्म ब्रह्मविदां बलम् ।
हिंसा बलमसाधूनां क्षमा गुणवतां बलम् ॥

वानांचें बल क्षमा आहे. जल, कंदमूळें, फळें, दूध, तूप, ब्राह्मणाची इच्छा, गुरूचें वचन व औषध हीं आठ द्रव्यें व्रतभंग करीत नाहींत. स्वतःला प्रतिकूल वाटणारें वर्तन दुसऱ्याशीं कदापि करूं नये. हा संक्षिप्त धर्म आहे. त्याचेंच आचरण करावें. याहून इतर धर्म कामानें प्रवृत्त होतो. अक्रोधानें क्रोधाला, सदाचरणानें दुर्जनाला, दानानें कृपणाला व सत्यानें अनृताला जिंकावें.

स्त्री, धूर्त, आळशी, भीरु, क्रोधी, गर्विष्ठ, चोर व नास्तिक, यांवर कदापि विश्वास ठेवूं नये. नित्य वंदनादिकांनीं विनयशील व वृद्धांची सेवा करणारा, अशा मनुष्याची कीर्ति, आयुष्य, यश आणि बल, यांची वृद्धि होते. हे राजन्, अतिशय क्लेशानें, धर्माच्या अतिक्रमानें किंवा शत्रूला प्रणिपात करून जे अर्थ प्राप्त होतात, ते संपादन करण्याची इच्छा करूं नको. विद्याहीन पुरुष, प्रजाशून्य स्त्रीसंग, अन्नावांचून प्रजा व अराजक राष्ट्र, हीं सर्व शोचनीय आहेत. मनुष्य प्रवासानें कृश होतो, पर्वत सतत वहाणाऱ्या निर्झरानें झिजतो, स्त्रिया विषयोपभोगावांचून अकालीं वृद्ध दिसूं लागतात आणि वाक्शल्य मनाचा दाह करीत असतें.

२अनभ्यासानें वेद व अव्रतानें ब्राह्मण मलिन होतात. जेथें सिंधु नदाला पंचनद मिळतात, त्या प्रदेशाला 'बाह्लिक' देश म्हणतात. तेथील लोकांची वंचनेविषयीं प्रसिद्धि आहे. यास्तव त्या बाह्लिक देशानें या पृथ्वीला व अनृतानें पुरुषाला लांछन लागतें. साध्वी स्त्रियांना कौतूहलानें व विवाहित स्त्रियांना पति दीर्घकाल प्रवासास गेला असतां, गौणत्व प्राप्त होतें. रौप्याच्या मिश्रणानें सुवर्ण, कथिलानें रौप्य, शिशानें कथील व मातीनें शिसें हीन होतें. दीर्घ शयनानें निद्रेला, कामानें स्त्रियांना, इंधनानें अग्नीला व विपुल प्राशनानें मद्यतृष्णेला तृप्त करण्याचा कदापि यत्न करूं नये.

३ज्यानें दानानें मित्रांना वश करून घेतलें आहे, युद्धानें शत्रूला जिंकलें आहे व अन्नादि भोग्यवस्तूंनीं स्त्रियांना अधीन ठेविलें आहे, त्याचें जीवित सफल होय.

हे धृतराष्ट्रा, सहस्रावधि सुवर्ण धारण करणारे श्रीमान्‌हि जिवंत रहातात. मध्यम धनाढ्यहि जिवंत रहातात व धनहीनहि जगतात. त्यासाठीं विपुल

१ न तत्परस्य संदध्यात् प्रतिकूलं यदात्मनः ।

२ अनाम्नायमला वेदा ब्राह्मणस्याव्रतं मलम् ।

३ यस्य दानजितं मित्रं शत्रवो युधि निर्जिताः ।
अन्नपानजिता दाराः सफलं तस्य जीवितम् ॥

ऐश्वर्याचीच आवश्यकता नाहीं. यास्तव हे राजा, तूं ही धनतृष्णा सोडून दे. धनावांचून जिवंत रहातांच येत नाहीं, असें नाहीं. या पृथ्वीतलावर जेवढें व्रीहि-यवादि धान्य, सुवर्ण, पशु व स्त्रिया आहेत, तेवढें सर्व ऐश्वर्य जरी एकट्या मनुष्याला मिळालें तरीहि त्याची तृप्ति होत नाहीं, हें जाणणारा विचारी मनुष्य त्यांविषयीं मोह पावत नाहीं. हे राजन्, मी तुला पुनः सांगतों कीं, तुझ्या मनांत स्वपुत्र व पांडुपुत्र यांच्याविषयीं जर समता वास करीत असेल, तर पांडवांना यथाभाग राज्य दे व त्यांच्याशीं सम आचरण ठेव. ५. ३. ३९.

---

## अध्याय ४० वा.

[ १ विदुराचें उपदेशपर भाषण. २ त्यानें सांगितलेल्या संग्राह्य वस्तु व धर्म यांचें अत्याज्यत्व. ३ नदीचें रूपक, ४ चातुर्वर्ण्यपालन. ]

( १ ) विदुर—धृतराष्ट्रा, जो मनुष्य सज्जनांनीं सत्कार केला असतांहि अभिमानशून्य राहून यथाशक्ति कार्य करीत असतो, त्याला सत्वर यश प्राप्त होतें. कारण सज्जन प्रसन्न झाले असतां ते पूर्णपणें सुख देण्यास समर्थ असतात. जो सुज्ञ पुरुष अधर्मयुक्त महान् लाभ जरी होत असला व त्यापासून त्याला कोणीं निवृत्तहि केलें नाहीं, तरी त्या अर्थाचा त्याग करितो, तो कात टाकलेल्या सर्पाप्रमाणें महादुःखांपासून मुक्त होऊन सुखानें शयन करतो.

असत्यानें उत्कर्ष पावणें, राजाजवळ चहाडी करणें व गुरूचें अप्रिय करणें किंवा पितरादि गुरुजनांचें मिथ्याचरित्र प्रकाशित करणें, हीं सर्व ब्रह्महत्येसमान आहेत. असूया हा सर्वप्रकारें मृत्युच आहे. बहुभाषण किंवा निंदा श्रीचा नाश करणारी आहे. १ गुरूंची अवज्ञा किंवा गुरुजनांच्या सेवेचा अभाव, २ अल्पकालांत विपुल ज्ञानप्राप्तीची इच्छा व ३ आत्मश्लाघा हे तीन विद्येचे शत्रू आहेत. १ आळस, २ मदमोह, ३ चापल्य, ४ वल्गना, ५ औद्धत्य, ६ दर्प व ७ अदातृत्व हे सात विद्यार्थ्याचे दोषच मानले आहेत. सुखाची इच्छा करणारास विद्या कोठची ! विद्यार्थ्याला सुख मिळत नसतें. सुखाची इच्छा असल्यास विद्या सोडावी आणि विद्येची इच्छा असल्यास सुखाचा त्याग करावा. अग्नीची

---

१ सुखार्थिनः कुतो विद्या नास्ति विद्यार्थिनः सुखम् ।
सुखार्थी वा त्यजेद्विद्यां विद्यार्थी वा त्यजेत्सुखम् ॥

काष्ठांनीं, समुद्राची नद्यांनीं, अंतकाची सर्व प्राण्यांनीं व पुरुषांची कामिनींनीं तृप्ति होत नाहीं. ( त्यांची तृष्णा अधिकच वाढत असते. ) आशा धैर्याचा लोप करिते, यम समृद्धीचा नाश करितो. ( ऐश्वर्यवानाला अकालीं मृत्यु आला असतां त्याची समृद्धि व्यर्थ होते. ) क्रोधानें ' श्री ' नाहींशी होते, कृपणतेनें यशाची हानि होते, पालन न केल्यानें पशूंचा घात होतो आणि एक ब्राह्मण कोपला असतां तो समग्र राष्ट्राचा नाश करितो.

( २ ) हे राजन् , तुझ्या गृहांत अजादि पशु, कांसें, रौप्य, विषाची परीक्षा करणारे चकोरादि पक्षी, वेदाध्ययन केलेले श्रोत्रिय, ज्ञानवृद्ध, ज्ञातींतील कुलीन व व्याधिग्रस्त लोक, हे सर्व सदैव असोत.

चंदन, वीणा, आदर्श, मध, तूप, ताम्रपात्रें व लोहपात्रें, शंख, आणि सुंदर शालग्राम, हे मंगलकारक पदार्थ देव, ब्राह्मण व अतिथि यांच्या पूजनार्थ गृहामध्यें नेहमीं ठेवावे, असें मनूचें वचन आहे.

हे भारता, मी तुला सर्व प्रकारें पुण्यप्रद, मंगलकारक व उत्कृष्ट वचन सांगतों तें ऐक. मनुष्यानें कामानें, भयानें, लोभानें किंवा आपल्या जीवितासाठींहि कदापि धर्माचा त्याग करूं नये. कारण धर्म नित्य आहे व सुखदुःखें अनित्य आहेत. तसाच जीव नित्य असून जीविताचा हेतु जी अविद्या ती अनित्य आहे. यास्तव अनित्य असलेलें सुखदुःख व अविद्या यांचा त्याग करून शाश्वत धर्म व शुद्ध आत्मा यांवर निष्ठा ठेव व सतत संतुष्ट हो. सर्व लाभामध्यें संतोष हाच परम लाभ आहे.

हे राजन्, आजवर अनेक महाबलाढ्य व भाग्यवान् नरेंद्र धनधान्यसंपन्न पृथ्वीचें राज्य करीत असतां राज्य व विपुल ऐश्वर्य सोडून अकस्मात् मृत्यूच्या वश झाले आहेत, याचा विचार कर.

हे राजेंद्रा, अनेक कष्ट सोसून ज्याचें पोषण केलें, असा प्रिय पुत्र मृत झाला असतां, त्याचा मृतदेह स्वगृहांतून उचलून दूर नेतात, केंस मोकळे सोडून त्याच्यासाठीं करुण विलाप करितात आणि शेवटीं काष्ठाप्रमाणें तें शव चितेमध्यें टाकून देतात.

---

१ न जातु कामान्न भयान्न लोभाद्धर्मं जह्याज्जीवितस्यापि हेतोः ।
नित्यो धर्मः सुखदुःखे त्वनित्ये जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः ॥
त्यक्त्वाऽनित्यं प्रतितिष्ठस्व नित्ये संतुष्य त्वं तोषपरो हि लाभः ॥

मृत मनुष्याच्या धनाचा इतर लोक उपभोग घेतात. पक्षी व अग्नि त्याच्या शरीरांतील सप्त धातूंना भक्षण करितात आणि पुण्य व पाप यांनीं आवृत्त झालेला तो जीव त्या दोहोंसह परलोकीं जातो. पक्षी ज्याप्रमाणें पत्र-पुष्पहीन वृक्षाचा त्याग करून अन्यत्र जातात, त्याप्रमाणें मृतांचे ज्ञातिजन, सुहृद् व पुत्रादि त्याच्या चितेंत दग्ध झालेल्या देहाला सोडून परत फिरतात. त्यावेळीं अग्नींत टाकलेल्या त्या पुरुषाचें स्वकृत कर्मच त्याला अनुसरतें, तस्मात् मनुष्यानें हळुहळू धर्माचाच यत्नानें संचय करावा.

हे राजन्, या मृत्युलोकावर स्वर्ग आहे. स्वर्गलोकाच्या अधोभागीं व पाताळांत अन्धतामिस्राख्य नरक आहे. तो इंद्रियांना महामोह पाडीत असतो. यास्तव तूं सावध रहा. तें प्रकाशशून्य स्थान तमोगुणप्रधान पुरुषांना प्राप्त होत असतें, त्या अंधतमाचा तुला स्पर्श न होवो. हे भारता, माझें हें वचन ऐकून त्याप्रमाणें जर यथावत् आचरण करशील, तर तुला या लोकीं परम यश प्राप्त होईल आणि परलोकाचें भय यत्किंचित्‌हि रहाणार नाहीं.

( ३ ) हे कुरुश्रेष्ठा, जीव ही एक नदी आहे, धर्म हा तिचा घाट आहे. सत्यब्रह्म हें त्या जीवनदीचें उगम स्थान आहे. धैर्य हें नदीतीर असून दया त्यांतील ऊर्मि आहेत. तिच्यांत स्नान केलें असतां पुण्यकर्मा जीव पावन होतो. ( आत्मवेत्ता प्रत्यग्रूपांत मग्न झाला असतां शुद्ध स्वरूपांत लीन होतो ) व अशाप्रकारें पावन झालेला पुण्यात्मा नित्य विरक्त होतो. वैराग्याहून श्रेष्ठ पुण्य दुसरें कोणतेंहि नाहीं. ही संसारनदी पंचेंद्रियरूपी जलानें युक्त आहे. काम व क्रोध हे त्या नदींतील नक्र आहेत. यास्तव तूं धृतिमय नौका करून जन्मरूपी दुर्गम मार्गाचें उल्लंघन कर. ( मोक्षार्थ यत्न कर. )

प्रज्ञावृद्ध, धर्मवृद्ध, विद्यावृद्ध व वयानेंहि वृद्ध असलेल्या स्वबंधूचें पूजन करून त्याला प्रसन्न करून घ्यावें व त्याला कर्तव्याकर्तव्याविषयीं प्रश्न करावा.

---

१ अन्यो धनं प्रेतगतस्य भुङ्क्ते वयांसि चाग्निश्च शरीरधातून्।
द्वाभ्यामयं सह गच्छत्यमुत्र पुण्येन पापेन च वेष्ट्यमानः ॥
उत्सृज्य विनिवर्तन्ते ज्ञातयः सुहृदः सुताः ।
अपुष्पानफलान् वृक्षान् यथा तात पतत्रिणः॥
अग्नौ प्रास्तं तु पुरुषं कर्मान्वेति स्वयंकृतम् ।
तस्मात्तु पुरुषो यत्नाद्धर्मं संचिनुयाच्छनैः ॥

असें जो करतो तो कर्तव्याकर्तव्याविषयीं केव्हांहि मोहित होत नाहीं. काम व क्षुधा यांना धैर्यानें जिंकून अगम्यागमन व अभक्ष्यभक्षण या दोषांपासून इंद्रियांचें रक्षण करावें. नेत्रांनीं पाहून अनिंद्य वस्तु हातीं घ्यावी. पवित्र जागेवर पाऊल ठेवावें व याप्रमाणें हस्त व पाद यांचें नेत्रांच्या द्वारा रक्षण करावें. परदारादिकांचें दर्शन व कुशब्दांचें श्रवण यांपासून मनानें चक्षु व श्रोत्र यांना निवृत्त करावें व मन आणि वाक् यांचें संयमनानें रक्षण करावें.

(४) हे महाराज, आतां चातुर्वर्ण्याचे धर्म सांगतों ते ऐक—नित्य यथाकालीं स्नान-आचमनादि करणारा, यज्ञोपवीत धारण करणारा, नित्य वेदाध्ययन करणारा, पतिताचें अन्न वर्ज करणारा, सत्यवक्ता व गुरुशुश्रूषु असा ब्राह्मण ब्रह्मलोकापासून च्युत होत नाहीं.

वेदाध्ययन करून परिस्तरणपूर्वक अग्निहोत्र-यज्ञादि करणारा, प्रजेचें पालन करणारा व गो-ब्राह्मणांच्या रक्षणार्थ हातीं शस्त्र घेऊन तत्पर असणारा क्षत्रिय युद्धांत मरण पावला असतां स्वर्गलोकीं जातो.

वेद-शास्त्राध्ययन करून ब्राह्मण, क्षत्रिय व आश्रित यांस पर्वकालीं धन विभागून देणारा आणि अग्नित्रयाच्या पवित्र धूमाचें अवघ्राण करणारा वैश्य मरणोत्तर स्वर्गलोकीं दिव्य सुखें भोगितो.

ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांची क्रमानें यथान्याय सेवा करून त्यांस संतुष्ट करणारा शूद्र व्यथाशून्य व निष्पाप होऊन देहपातानंतर स्वर्गसुखें भोगितो.

हे राजन्, याप्रमाणें हे चातुर्वर्ण्याचे धर्म मीं तुला संक्षेपतः सांगितले. हे धर्म सांगण्याचा माझा हेतु काय आहे, तोहि सांगतों ऐक. पृथ्वीपालनरूपी क्षात्रधर्मापासून युधिष्ठिर च्युत झाला आहे, त्याला तूं पुनः राज्यावर स्थापन कर.

धृतराष्ट्र—हे सौम्य, तूं मला नित्य जो उपदेश करितोस, तो योग्य आहे, तूं जें मला सांगतोस तें सर्व सत्य आहे, असें मलाहि वाटतें. मी पांडवांविषयीं सर्वदा असाच विचार मनांत आणितों. परंतु दुर्योधनाची भेट होतांच माझी ती बुद्धि पुनः विपरीत होते. तस्मात् हे विदुरा, कोणत्याहि प्राण्याला दैवाचें अतिक्रमण करतां येणें शक्य नाहीं, हेंच खरें. दैवच निश्चित असून पुरुषप्रयत्न व्यर्थ आहे, हेंच मी सत्य मानितों. ५. ३. ४०.

येथें तिसरें प्रजागरपर्व समाप्त झालें.

---

# सनत्सुजातपर्व ४.

## अध्याय ४१ वा.

[ १ धृतराष्ट्रानें ब्रह्मतत्त्वाविषयीं प्रश्न केला असतां विदुरानें स्वतःच्या शूद्रयोनीचा विचार करून सनत्सुजाताचें केलेलें स्मरण. २ सनत्सुजाताचें आगमन व त्याला सत्कारपूर्वक धृतराष्ट्राच्या संशयनिवृत्तीची प्रार्थना. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें ब्रह्मविद्याधिकारी पुरुषाच्या विशेषणाप्रमाणें असलेली जी साधनसंपत्ति तिचें सविस्तर उपपादन केलें. त्यांत विदुरानें क्वचित प्रसंगीं ‘ यतो यतो निवर्तते ’ इत्यादि वचनांनीं संक्षेपतः ब्रह्मविद्या सूचित केली आहे. तीच सविस्तर ऐकण्याच्या इच्छेनें धृतराष्ट्र म्हणाला—“ हे विदुरा, वाणीनें अनुक्त पण अवश्य वक्तव्य, असें जर कांहीं तुझ्याजवळ अवशिष्ट असेल, तर तूं श्रवणेच्छु असलेल्या मला तें सांग. कारण तूं विचित्र भाषण करितोस. ”

**विदुर**—हे धृतराष्ट्रमहाराज, जो पुराण सनातन कुमार सनत्सुजात त्यानें ‘ मृत्यु नाहीं ’ असें सांगितलें आहे. तो बुद्धिमानांतील श्रेष्ठ ऋषि तुला योगकलादि गुह्य व शमादि प्रकट असे सर्व हृदयाश्रित धर्म सांगेल.

**वैशंपायन**—राजा, वर्णाश्रमक्रमाचें उल्लंघन करून ब्रह्मविद्येचा उपदेश करूं नये, हें तत्त्व आख्यायिकेच्या द्वारा धृतराष्ट्र व विदुर यांच्या पुढील संवादांत प्रकट केलें आहे.

**धृतराष्ट्र**—हे विदुरा, तो सनातन कुमार मला जें तत्त्व सांगणार, तें तूंच कां सांगत नाहींस ? तुला तें यथावत् अवगत नाहीं कीं काय ! तुझ्या ज्ञानाचा जर कांहीं अवशेष राहिला असेल तर तूंच तें मला सांग.

**विदुर**—हे राजन्, माझा जन्म शूद्रयोनींत झाला आहे, त्यामुळें नीतिप्रभृति लौकिकज्ञानाहून विलक्षण असलेलें ब्रह्मज्ञान सांगण्याचा अधिकार मला नाहीं. ब्रह्मविद्येमध्यें सनातनसंज्ञक कुमाराची बुद्धि किती परिनिष्ठित आहे, हें मी चांगलें जाणतों. तो कुमार ब्राह्मयोनींत उत्पन्न झाला आहे, त्यामुळें तो अति गुह्य ब्रह्मज्ञानाचाहि उपदेश करण्यास समर्थ आहे. त्यानें तुला ज्ञानोपदेश केल्यास तो देवांच्या निंदेला पात्र होणार नाहीं. म्हणून मी तुला हें सांगत आहें.

धृतराष्ट्र—बा विदुरा, त्या सनातन, पुराण ब्रह्मर्षीशीं या देहानें माझा समागम कसा होईल तें सांग पाहूं ?

( २ ) वैशंपायन—राजा पारिक्षिता, धृतराष्ट्राची ही शंका ऐकून विदुरानें तीक्ष्ण व्रतें धारण करणाऱ्या त्या ऋषीचें चिंतन केलें. त्याबरोबर विदुर आपलें स्मरण करीत आहे, असें जाणून तो सनातन कुमार त्याच्यापुढें प्रकट झाला. विदुरानें शास्त्रोक्त मधुपर्कादि विधीनें त्याचें स्वागत केलें आणि सुखासनावर बसून किंचित् विश्रांति घेतलेल्या त्या महर्षीला तो म्हणाला—" भगवन्, या धृतराष्ट्र राजाच्या मनांत कांहीं संशय आहे, त्याचें निरसन करण्यास मी समर्थ नाहीं, यास्तव तूं या राजाच्या संशयाचें निरसन कर. ज्या ब्रह्मविद्येचें तुझ्या मुखानें श्रवण करून हा नरेंद्र सर्व दुःखांपासून मुक्त होईल, लाभ-अलाभ, प्रिय-द्वेष्य, जरा-मृत्यु, भय-असहिष्णुता, क्षुधा-तृषा, मद व ऐश्वर्य, अरति व तंद्री, काम-क्रोध आणि क्षय व उत्कर्ष आणि यांचें हेतुभूत पुण्य-पाप याला पीडा देणार नाहींत, असा त्याच्यावर अनुग्रह कर. ५. ४. ४१.

---

## अध्याय ४२ वा.

[ १ धृतराष्ट्र व सनत्सुजात यांचीं प्रश्नोत्तरें. ]

( १ ) वैशंपायन—राजा, त्यानंतर बुद्धिमान् धृतराष्ट्रानें विदुराच्या पूर्वोक्त वचनाचें अभिनंदन केलें, आणि त्या महात्म्यानें सनत्सुजाताला एकांतांत विस्मृत झालेल्या आत्म्याला ब्रह्मविद्येच्या योगानें जाणण्याच्या इच्छेनें ब्रह्मात्मविषयक श्रेष्ठ ज्ञान विचारिलें.

धृतराष्ट्र—हे भगवन् सनत्सुजात, मृत्यु नाहीं, असें तूं आपल्या शिष्यांना सांगितलें आहेस, असें हा प्राज्ञ विदुर म्हणतो. ह्यावरून ' मृत्यु ' हा पदार्थच नाहीं, असा शिष्यांना केलेला तुझा उपदेश प्रसिद्ध आहे, असें दिसतें. पण इंद्रादि देव व विरोचनादि असुर यांनींहि मृत्यूचा अभाव होऊन अमृतत्व-प्राप्ति व्हावी म्हणून प्रजापति-गुरूपाशीं वास करून ब्रह्मचर्य आचरिलें, असें छान्दोग्योपनिषदाच्या आठव्या अध्यायांत स्मृत आहे. (छां. भा. अ. ८. पृ. ६२५.) आपल्या म्हणण्याप्रमाणें मृत्यु जर खरोखरच नाहीं, तर या देवासुरांनीं मृत्यूच्या

---

१ सनत् म्ह० हिरण्यगर्भाख्य सनातनब्रह्म. त्या सनातन ब्रह्माच्या मनापासून ज्ञान-वैराग्यादिकांनीं युक्त असा जो उत्तम प्रकारें उत्पन्न झाला तो सनत्सुजात होय.

परिहारासाठीं ब्रह्मचर्य कां आचरिलें ? यावरून ‘ मृत्यु आहे ’ असें एक पक्ष म्हणतो व ‘ तो नाहीं ’ असा दुसरा पक्ष आहे. तर यांतील खरें काय आहे, तें मला सांग.

धृतराष्ट्रानें असा प्रश्न केला असतां भगवान् श्रीसनत्सुजात म्हणाले— हे राजा धृतराष्ट्रा, कित्येक अविद्वान् लोक वस्तुतः मृत्यु आहेच, असें समजून वेदोक्त कर्मानें अमृतत्वप्राप्ति होते, असें म्हणतात व वस्तुभूत असलेल्या मृत्यूची निवृत्ति होऊन अमृतत्वप्राप्ति व्हावी यासाठीं वेदोक्त कर्माचें आचरण करितात. विषयविषानें अंध झालेले दुसरे कित्येक विषयावांचून सुखच नाहीं व मोक्ष तर निर्विषय आहे, यास्तव त्याची आम्हांला अपेक्षाच नाहीं, असें समजून कर्मानेंच विषयप्रचुर देवादिभाव प्राप्त होतो, असें वर्णितात. याविषयीं एका विषयासक्त पुरुषाचें पुढील वचन प्रसिद्ध आहे. ‘ अपि वृंदावने शून्ये शृगालत्वं स इच्छतु । न तु निर्विषयं मोक्षं कदाचिदपि गौतम ॥’—हे गौतमा, पुरुषानें सर्व विषयशून्य वृंदावनांतील शृगालत्वाचीहि इच्छा करावी म्ह० त्यानें निर्जन वनांतील श्वानाच्या जन्माचीहि इच्छा करावी, पण निर्विषय—सर्व विषयशून्य मोक्षाची इच्छा केव्हांहि करूं नये.

त्याचप्रमाणें परमात्म्याहून अन्य वस्तु न पहाणारे कित्येक विद्वान् ज्ञानकर्मांच्या योगानें अमृतत्वाची प्राप्ति होते, असें वर्णन करितात. आणखीं कित्येक अद्वितीय आत्मदर्शी आत्म्याहून व्यतिरिक्त—दुसरी वस्तुच नाहीं, असें समजतात व आत्मव्यतिरिक्त दुसरी वस्तु नसल्यामुळें मृत्युहि नाहींच, असें वर्णितात. यास्तव हे राजन् , या दोन्ही पक्षांमध्यें विरोध कसा संभवत नाहीं, तें मी तुला सांगतों. माझें वचन सावधान चित्तानें ऐक. त्याविषयीं तूं साशंक होऊं नको.

हे क्षत्रिया, मृत्यूचें अस्तित्व व नास्तित्व हे दोन्ही पक्ष आदिसर्गापासून—जगाच्या आरंभापासून प्रवृत्त झाले आहेत. ( मूळ वचन—‘ उभे सत्ये क्षत्रियाद्यप्रवृत्ते ’ असें आहे. त्यांतील ‘हे क्षत्रिय’ व ‘आद्यप्रवृत्ते’ असा पदच्छेद करून वरील अर्थ केला. पण त्याच पदाचा ‘ क्षत्रियाद्य ’ व ‘ प्रवृत्ते ’ असा पदच्छेद केला असतां, हे क्षत्रियश्रेष्ठा, मृत्यूचें अस्तित्व व नास्तित्व हीं दोन्ही सत्य आहेत असा अर्थ संभवतो.

**धृतराष्ट्र**—पण परस्परविरुद्ध असलेलें अस्तित्व व नास्तित्व या दोहोंचें सत्यत्व कसें संभवतें !

सनत्कुमार—हे राजा, विद्वानांना 'प्रसिद्ध मोह' हाच मृत्यु म्हणून संमत आहे. सर्व लोकांच्या ठिकाणीं जो अनादि अविवेक दृढ होऊन राहिला आहे, तोच मृत्यु होय, असें विद्वानांचें मत आहे. यास्तव हे क्षत्रियश्रेष्ठा, तुझ्या म्हणण्याप्रमाणें अस्तित्व व नास्तित्व या दोहोंनाहि सत्यत्व आहे, या म्हणण्यांत विरोध उत्पन्न झाला असता, पण तो केव्हां ? मृत्यु परमार्थरूप असता तर तो दोष उद्भवला असता; पण मृत्यु सत्य नाहीं.

'तर मग मृत्यु कोण' म्हणून विचारशील तर मोह हाच मृत्यु आहे, हें मीं वर सांगितलेंच आहे. मोह म्हणजे मिथ्या ज्ञान. अनात्म्यामध्यें आत्माभिमान. त्यालाच 'अनादि अविवेक' असेंहि म्हणतात व कांहीं विद्वानांच्या मतानें तोच मृत्यु आहे. पण मी मोहाला मृत्यु म्हणत नाहीं, तर प्रमादाला मृत्यु म्हणतों. प्रमाद म्हणजे स्वाभाविक ब्रह्मभावापासून च्युत होणें. तो प्रमाद मिथ्याज्ञानाचेंहि कारण आहे. आत्म्याच्या स्वरूपाचा अनिश्चय—आत्म्याचें अज्ञान हाच मृत्यु म्ह० जननमरणादि सर्व अनर्थांचें बीज आहे, असें मी मानितों. त्याचप्रमाणें सदा अप्रमाद म्ह० स्वाभाविक स्वरूपानें अवस्थित होणें, यालाच मी अमृतत्व म्हणतों. छान्दोग्यांतील निरतिशय चैतन्यस्वरूप परम ज्योतीला प्राप्त होऊन आत्मा आपल्या स्वाभाविक स्वरूपानें अभिनिष्पन्न—संपन्न होतो, हें वाक्य स्वरूपावस्थान हेंच मोक्षप्रद आहे, असें दाखवितें. ( छा. भा. ८—३—४ पृ. ५९६ )

अनुगीतेमध्येंहि ' आत्मा एकच आहे. तो अद्वितीय आहे आणि तोच एक आत्मा सर्व प्राण्यांच्या हृदयांत अभिव्यक्त होतो, असें म्हटलें आहे; ' त्याचेंच स्वरूप मी तुला कथन करितों. मर्त्य या सर्व द्वैताचा स्वरूपामध्यें लय करून व आत्म्यामध्यें निश्चयानें स्थित होऊन स्वरूपसंस्थ म्ह० स्वरूपांत अवस्थित होतात, असें स्पष्ट म्हटलें आहे.

ज्याअर्थीं स्वरूपावस्थान हाच मोक्ष आहे, त्याअर्थीं तो चतुर्विध कर्मफलाहून विलक्षण आहे. उत्पत्ति, प्राप्ति, संस्कृति—संस्कार, विकृति—विकार हें कर्मांचें चतुर्विध फल आहे. मोक्ष या चारी प्रकारच्या फलाहून विलक्षण आहे. म्हणूनच अमृतत्व कर्मानें साध्य होत नाहीं. समुच्चित ज्ञानकर्मांनेंहि अमृतत्वाचा लाभ होणें शक्य नाहीं. त्यामुळें ' अमृत्युः कर्मणा केचित् ' हा जो वर एक पक्ष सांगितला आहे, तो सर्वथा अनुपपन्न आहे. ( या पक्षाचें निराकरण स्वतः सनत्सुजातच पुढें करणार आहेत. )

त्यावर धृतराष्ट्र म्हणतो—प्रमाद म्ह० आत्म्याविषयींचें अज्ञान हाच मृत्यु व सदा अप्रमाद–स्वाभाविक स्वरूपानें अवस्थित होणें, हेंच अमृतत्व आहे, हें कशावरून अवगत होतें?

सनत्सुजात—प्रमादापासून पराभव प्राप्त होतो. स्वाभाविक ब्रह्मभावापासून च्युत झाल्यामुळें देहादि अनात्म्याच्या ठिकाणीं आत्मभाव धारण केल्यानें पूर्वी विरोचनप्रभृति असुरांचा पराभव झाला, याविषयीं छान्दोग्योपनिषदामध्यें प्रमाणहि आहे. त्याचप्रमाणें अप्रमादामुळें म्ह० स्वाभाविक चित्सदानंद अद्वितीय ब्रह्मस्वरूपानें अवस्थित झाल्यामुळें इंद्रादि देव ब्रह्मभूत झाले. याविषयींहि स्मृतिप्रमाण आहे. किंवा इंद्रियांमध्यें रममाण होणारे जे विषयी अनात्मज्ञ प्राणी ते असुर होत. असले असुर स्वाभाविक ब्रह्मभावाचें अतिक्रमण करून अनात्मभूत देहादिकांमध्यें आत्माभिमान धारण करितात आणि याप्रमाणें अनात्म्यामध्यें आत्मभावास प्राप्त होऊन पशुपक्षि-प्रभृति तिर्यगादि योनीस प्राप्त होतात. हाच त्या असुरांचा पराभव होय. याविषयींहि बह्वृच ब्राह्मणोपनिषदांत आधार आहे. त्याचप्रमाणें जे स्वात्म्यामध्येंच रममाण होतात, ते ब्रह्मज्ञ सुर होत. ते अप्रमादामुळें म्ह० स्वरूपामध्यें स्थित झाल्यामुळें ब्रह्मभूत झाले. मिथ्या ज्ञान व त्याचें कार्य यांची निवृत्ति होऊन ते साक्षात् ब्रह्मच झाले.

धृतराष्ट्र—भगवन्, सर्व जंतूंच्या प्राणांचा उपसंहार करणारा मृत्यु सर्व लोकप्रसिद्ध आहे. असें असतांना 'प्रमाद हाच मृत्यु आहे, असें मी म्हणतों' असें कसें सांगतां!

सनत्सुजात—राजा, मृत्यु व्याघ्राप्रमाणें प्राण्यांना कांहीं खात नाहीं. कारण व्याघ्र जसा प्राण्यांना खातो, त्याप्रमाणें मृत्यूनें जर जीवाला खाल्लें असतें, तर त्याचें स्वरूपहि उपलब्ध झालें असतें, पण मृत्यूचें स्वरूप कोणालाच उपलब्ध होत नाहीं. म्हणून मृत्यु नाहीं, असें मी म्हणतों.

धृतराष्ट्र—'अहो पण सावित्रीच्या उपाख्यानांत सत्यवानाच्या शरीरांतून पाशबद्ध व त्यामुळेंच मृत्युवश झालेल्या अंगुष्ठमात्र पुरुषाला यमानें बलात्कारानें बाहेर ओढून काढलें व सावित्रीला तो प्रत्यक्ष दिसला, असें वर्णन केलें आहे. असें असतांना तुम्ही 'यमाचें स्वरूप उपलब्ध होत नाहीं' असें कसें म्हणतां?

**सनत्सुजात**—हे राजन्, सावित्रीच्या उपाख्यानांत त्या साध्वीला यमाचें दर्शन झाल्याचें उपलब्ध होतें, हें खरें, पण तो साक्षात् मृत्यु नव्हे. तर जें आत्म्याचें अज्ञान तोच प्रमादाख्य मृत्यु होय. कारण त्याला—अज्ञानाला साक्षात् विनाशहेतुत्व आहे. या मनुष्यशरीरांतच आत्म्याला न जाणल्यास फार मोठा विनाश होतो. ( के. भा. पृ. ४३. ) असें म्हणून अज्ञानाला विनाशहेतुत्व आहे, असें सांगितलें आहे. तसेंच बृहदारण्यकामध्यें 'मृत्युर्वै तमः ज्योतिरमृतम्' ( बृ. भा. १–३–२८ ) अज्ञान हाच मृत्यु आहे व ज्ञान अमृत आहे, या वाक्यानें प्रमादाख्य अज्ञानाला साक्षात् मृत्युत्व आहे, असें सांगितलें आहे. म्हणून प्रमादच साक्षात् सर्व अनर्थांचें बीज आहे, असें मी म्हणतों. म्हणून मुमुक्षूनें पूर्वोक्त प्रमाद करूं नये. तर चित्-सत्-आनंद अद्वितीय ब्रह्मभावानें अवस्थित व्हावें.

ज्याअर्थी प्रमादच मृत्यु आणि अप्रमाद अमृतत्व आहे, त्याअर्थी अमृतत्व कर्मसाध्य किंवा कर्मप्राप्य नाहीं. कारण तें नित्यसिद्ध व नित्यप्राप्त आहे. म्हणून प्रमाद हेंच सर्व अनर्थांचें बीज आहे व त्यामुळें तोच मृत्यु आहे, असें मी म्हणतों. मी यमाला मृत्यु समजत नाहीं. पण कित्येक विषयविषानें अंध झालेले अविद्यावान् लोक 'यम स्वात्म्याहून भिन्न आहे' व तो वैवस्वत यम मीं सांगितलेल्या प्रमादाख्य मृत्यूहून भिन्न आहे असेंहि म्हणतात, तो आत्मावास—सर्व प्राण्यांच्या बुद्धीमध्यें राहणारा, अमृत म्ह० अमरधर्मा व 'ब्रह्मचर्य' —स्वात्मभूत ब्रह्मामध्यें रममाण होणारा ब्रह्मनिष्ठ आहे. हा मृत्युसंज्ञक देव पितृलोकांत राहून आपल्या राज्याचें अनुशासन करितो. 'पण तो अनुशासन कसें करितो' म्हणून म्हणशील तर तेंहि सांगतों. तो वैवस्वत यमराज पुण्यकर्में करणारांना सुखप्रद व पापकर्में करणारांना असुखप्रद होतो.

याप्रमाणें आत्मविषयक अज्ञान हाच प्रमाद व तोच मृत्यु आहे, असें सांगून मीं मृत्यूचें स्वरूप निश्चित केलें. आतां त्याचेंच कार्यरूपानें म्हणजे व्यक्तरूपानें अवस्थान कसें होतें, तेंहि सांगतों ऐक.

राजा, हा जो प्रमादाख्य मृत्यु तो प्रथम अहंकाररूपानें परिणाम पावतो

---

१ या श्लोकांत 'आस्य' असा एक शब्द आहे व त्या शब्दाचा अर्थ अभिमानात्मक अहंकार असा केला आहे. पण पूर्वी मोहाला मृत्यु असें म्हटलें असल्यामुळें येथें 'आस्य' म्ह० काम, असेंहि म्हणतां येईल. जो सर्व प्राण्यांना संसारांत पाडतो, तो काम. किंवा प्रसिद्ध मुखाप्रमाणें हा काम सर्वभक्षक असल्यामुळें त्याला 'आस्य' असें म्हटलें आहे, असाहि याचा अर्थ संभवेल.

आणि सर्व प्राण्यांच्या हृदयांत अहंकाररूपानें स्थित होऊन त्या अहंकारापासूनहि कामरूपानें बाहेर पडतो. तो काम आपल्या विषयामध्यें प्रवृत्त होऊं लागला असतां कांहीं निमित्तानें प्रतिबद्ध झाल्यास क्रोध, प्रमाद व मोह या रूपानें परिणत होतो. त्यानंतर अहंकार, काम, क्रोध, प्रमाद व मोह या रूपानें परिणत झालेल्या अज्ञानाशीं तादात्म्य पावून मी ब्राह्मण, क्षत्रिय, स्थूल, कृश, अमक्याचा पुत्र, नातु, इत्यादि प्रकारें राग-द्वेषानें युक्त होऊन उन्मार्गानें वागूं लागतो. श्रौत-स्मार्त धर्माचें उल्लंघन करून त्याच्या उलट वर्तन करूं लागतो. त्यामुळे त्याला आत्म्याचा समाधियोग यत्किंचित्हि प्राप्त होत नाहीं.

त्या अहंकारादिरूपानें परिणत झालेल्या अज्ञानानें हे सर्व जीव मोहित होतात, देहादिकांमध्यें आत्मभावाला प्राप्त होतात व पूर्वोक्त प्रमादाख्य मृत्यूच्या अधीन होऊन राहतात. आयुष्य क्षीण झालें असतां ते अज्ञ जीव धूमादि दक्षिणायन मार्गानें परलोकीं गमन करितात. धूमादि मार्गानें गमन करणाऱ्या त्या जीवांना 'चंद्रमस्' या नांवाचा पितृलोक प्राप्त होतो. त्या लोकांतील भोगांना कारण होणारें कर्म क्षीण होईपर्यंत ते तेथें रहातात व कर्मक्षय होतांच त्या लोकांतून च्युत होऊन आकाश, वायु, वृष्टि, अन्न, शुक्र, शोणित, इत्यादि क्रमानें या लोकीं येऊन देहधारण करितात. देह धारण केलेल्या त्या जीवाला त्याचीं इंद्रियें अनुसरतात व त्याचीं सर्व कर्में प्रवृत्त होतात. त्यामुळें इंद्रियगुणांच्या अनुरोधानें तो मरण पावतो व दुसरा जन्म घेतो. त्या जन्मांतहि तो पुनः मृत्यु पावतो. याप्रमाणें जन्म-मरणचक्रावर आरूढ होऊन तो त्यांतून केव्हांहि सुटत नाहीं.

याप्रमाणें संसार आत्म्याच्या अज्ञानामुळें प्रवृत्त झाला आहे. त्यामुळें पुरुष जोंवर परमात्म्याला साक्षात् आत्मत्वानें जाणत नाहीं, तोंवर हा जीव रागादि क्लेशांनीं पीडित व मोहित होत्साता संसार करीत राहतो.

राजा, याप्रमाणें अविद्या व काम यांना बंधहेतुत्व कसें आहे, तें मीं तुला सांगितलें. आतां कर्माला बंधहेतुत्व कसें आहे, तेंहि सांगतों, ऐक.

कांहीं अविवेकी लोक कर्मानें अमृतत्व प्राप्त होतें, असें म्हणतात. पण तें बरोबर नाहीं. कर्मानें अमृतत्वप्राप्ति होत नाहीं, इतकेंच नव्हे, तर कर्माचा उदय झाला असतां त्याच्या फलामध्यें आसक्त झालेले जीव कर्मफलामध्येंच प्रवृत्त होतात. कर्मफलामध्येंच जन्म घेऊन पुनः असलेंच फल मिळावें, म्हणून

पुनः कर्मांचें आचरण करितात आणि स्वात्म्याला चिदानंदाद्वयब्रह्मत्व आहे, हें न कळल्यामुळें देहाभिमानी जीव विषयासक्तीनें भोगामध्यें प्रवृत्त होतो. एखादा अंध उंच, सखल, कंटकप्रचुर इत्यादि स्थानीं जसा परिभ्रमण करीत रहातो, त्याप्रमाणें हा विवेकहीन पुरुषहि सर्वत्र विषयसुखाच्या आकांक्षेनें संसारमार्गांत परिभ्रमण करीत रहातो. आसक्तीनें पराभूत झालेल्या पुरुषाच्या इंद्रियांची विषयांमध्यें प्रवृत्ति तेंच 'महामोहन' होय. ज्या पुरुषाला विषय मिथ्या आहेत असें वाटतें, त्याचीं इंद्रियें विषयांमध्यें प्रवृत्त होत नाहींत आणि त्यांची प्रवृत्ति विषयांमध्यें होत नसल्यामुळें ती प्रत्यगात्म्यामध्येंच होते. त्यामुळें त्यांच्या मोहाची निवृत्ति होते. पण ज्यांची बुद्धि विषय सत्य आहेत अशी असते, त्यांचीं इंद्रियें बाह्य विषयांमध्येंच प्रवृत्त होतात. असा बहिर्मुख पुरुष सत्, अद्वितीय, प्रत्यगात्मभूत परमात्म्याला आत्मत्वानें साक्षात् जाणत नाहीं. ( स्त्रीशरीराच्या संपर्कानें ज्याचें चित्त कलुषित झालेलें असतें, ते विषयविषांध पुरुष ब्रह्माला जाणत नाहींत, असें प्राचीन अभियुक्तांनीं–मुनींनीं म्हटलें आहे. ) त्यामुळें पुनः पुनः विषयांमध्यें प्रवृत्त होणें हेंच 'महामोहन' होय.

त्या महामोहनामुळें अविद्याकल्पित मिथ्या शब्दादि विषयांशीं संयोग होतो आणि मिथ्यार्थसंबंध झाला असतां या पुरुषाची संसारगति नियमानें सिद्ध होते. मिथ्याभूत विषयसंयोगानें ज्याचा स्वाभाविक ब्रह्मात्मभाव प्रतिबद्ध झाला आहे, असा पुरुष रूपादि विषयांचें स्मरण करीत सर्वकाल त्यांचीच उपासना करितो. सर्वत्र सिद्ध असलेल्या परमात्म्याची उपासना करीत नाहीं. त्यामुळें विषयांचें चिंतनच या पुरुषाचा प्रथम घात करितें म्ह० त्याला स्वरूपापासून च्युत करितें. त्यानंतर काम विषयध्यानानें प्रतिबद्ध झालेल्या या पुरुषाला विषयाच्या संनिध नेऊन पोंचवितो व त्याचा पूर्वींपेक्षां अधिक घात करितो.

नंतर क्रोध कामाभिहत झालेल्या याला स्ववश करून घेतो. याप्रमाणें विषयचिंतन, काम व क्रोध यांच्या अधीन झालेल्या या मूढ पुरुषांना ते

---

१ विषयतृष्णा विषयांच्या उपभोगानें शांत होत नाहीं. तर घृतादि हवीनें अग्नि जसा प्रदीप्त होतो, त्याप्रमाणें विषयांच्या उपभोगानें विषयतृष्णा अधिकाधिक वाढते, असें भगवान् मनूनेंहि म्हटलें आहे.

विषयचिंतनादि दोष मृत्यूपर्यंत नेऊन पोंचवितात. पण याच्या उलट जे विद्वान् धैर्यानें विषयांना जिंकून परमात्म्यालाच आपल्या प्रत्यगात्मत्वानें जाणतात, तेच मृत्यूचें उल्लंघन करूं शकतात.

धृतराष्ट्र—भगवन्, विद्वान् धैर्यानें विषयांना जिंकून मृत्यूचें उल्लंघन कसें करितात?

**सनत्सुजात**—राजा जो धीर पुरुष या विषयांचें अनित्यत्व, अशुचित्व, दुःखरूपत्व इत्यादि दोषांचें चिंतन करितो, तो पुनः पुनः उत्पन्न होऊन नाश पावणाऱ्या विषयांचा त्याग करितो आणि एखाद्या अशुद्ध पदार्थाप्रमाणें त्याविषयीं उदासीन होऊन रहातो. तो समीप असलेल्या विषयांचेंहि चिंतन करीत नाहीं. असा धीर पुरुषच मृत्यूचाहि मृत्यु होतो. प्रसिद्ध मृत्यु ज्याप्रमाणें सर्व भूतांचें भक्षण करितो, त्याप्रमाणें विषयांचा सर्वत्र त्याग करणारा धीर पुरुष मृत्यूचेंहि भक्षण करितो.

पण हे राजा, जो मनुष्य विषयांच्या अनित्यत्वादि दोषांचें चिंतन न करतां त्यांचा आदर करितो, त्याची काय अवस्था होते, तेंहि मी तुला सांगतों. जो पुरुष विषयांचें चिंतन करून त्यांना अनुसरतो, तो कामाच्या बरोबरच नाश पावतो. कामगुण अनित्य व प्रतिक्षणीं विनाश पावणारे आहेत. त्यामुळें कामी पुरुषहि त्यांच्याबरोबरच विनाश पावतो. पण याच्या उलट जो पुरुष विषयदोषदर्शनानें विषयांचा परित्याग करितो, तो या जन्मीं किंवा जन्मांतरीं संपादन केलेल्या पुण्यपापलक्षणकर्मांचा विवेकबुद्धीनें नाश करितो.

धृतराष्ट्र—अहो, पण आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व प्राण्यांना अत्यंत इष्ट असलेल्या या देहाचें त्याज्यत्व कसें संभवतें?

**सनत्सुजात**—राजा, प्राण्यांचा जो हा देह दिसतो, तो अप्रकाश, अच्छिद्रन व केवल नरक आहे. कारण तो कफ, रक्त, पू, कृमि, विष्टा, मूत्र, इत्यादि पदार्थांनीं परिपूर्ण आहे. पण हा असा अत्यंत बीभत्स असूनहि तो अतिशय रमणीय आहे, असें समजून कामी लोक त्याची इच्छा करितात व त्याच्या मागें धांवतात. पण जसे अंध पुढील कूपादि पदार्थांस पहाण्यास समर्थ नसल्यामुळें स्वतःच त्यांच्या समीप जाऊन त्यांत पडतात, त्याप्रमाणें स्त्रियादिकांची आकांक्षा करणारे विषयविषांध पुरुष त्यांच्या ठिकाणीं आसक्त होऊन नरकांतच पडतात.

हे राजेंद्रा, अशा पुरुषांचा जन्म व्यर्थ आहे. हे क्षत्रियश्रेष्ठा, जो विषय-विषांध पुरुष स्त्र्यादि अमंगल विषयांची आकांक्षा करून त्याच्या मागोमाग धांवतो व त्याहून अगदीं विलक्षण असलेल्या आत्मभूत परमात्म्याला जाणत नाहीं किंवा परमात्मविषय अध्यात्मशास्त्राचें अध्ययनहि करीत नाहीं, त्या विपयविषांध षडंगवेदवेत्या पुरुषाचाहि देह तृणनिर्मित व्याघ्राप्रमाणें व्यर्थ आहे. भगवान् वसिष्ठानेंहि ‘ जो ब्राह्मण चतुर्वेदवेत्ता असूनहि सूक्ष्म ब्रह्माला जाणत नाहीं, तो वेदरूप शब्दराशीच्या भारानें पीडिलेला ब्राह्मण गर्दभच होय ’ असें म्हटलें आहे. त्याचा केवल देहच निरर्थक असतो असें नाहीं, तर अशाप्रकारचा पुरुष हा स्वतःच स्वतःचा मृत्यु आहे. कारण क्रोध, लोभ, मोह व भय यांनीं युक्त असलेला जो हा तुझा आत्मा तुझ्या शरीरामध्यें दिसत आहे, तो सुद्धां मृत्यु आहे. म्ह० जो अजितेंद्रिय पुरुष क्रोध-लोभादिकांनीं युक्त होऊन विषयामध्यें प्रवृत्त होतो, तोच त्याचा मृत्यु होय.

धृतराष्ट्र—भगवन्, अशा मृत्यूचा विनाश कोणत्या उपायानें होतो ?

सनत्सुजात—हे क्षत्रिया, याप्रमाणें क्रोधादिरूपानें उत्पन्न होणारा प्रमादाख्य मृत्यु हेंच जन्म-मरणादि सर्व अनर्थांचें बीज आहे, असें जाणून त्या दोषांचा त्याग करून ज्ञानानें सच्चिदानंद अद्वितीय ब्रह्मरूपानें अवस्थित होणारा पुरुप मृत्यूला भीत नाहीं. कारण ज्ञानी पुरुषाला परमात्म्याचा साक्षात्कार झाला असतां हा ‘प्रमाद’-संज्ञक अज्ञानमृत्यु नाश पावतो. तो आत्मज्ञानी पुरुषाच्या समोर उभाहि रहात नाहीं. संसार हा मृत्यूचा विषय आहे. त्यास प्राप्त झालेला पुरुष जसा नष्ट होतो, त्याचप्रमाणें आत्मवेत्त्याच्या समीप आलेला अज्ञानमृत्यु नष्ट होतो.

[ याप्रमाणें कर्मांचें बंध-हेतुत्व सांगून ज्ञानालाच मोक्षसाधनत्व आहे, असें सनत्सुजातांनीं सांगितलें असतां त्यावर धृतराष्ट्र असा आक्षेप घेतो– ]

धृतराष्ट्र—भगवन्, कर्मांना बंधहेतुत्व आहे, असें कसें सांगतां ! कारण या संसारमंडलांत वेद ज्यांना ‘ धार्मिकांचे लोक ’ असें म्हणतात व ज्योतिष्टोमादि यज्ञांच्या योगानें धार्मिक ज्यांवर आरूढ होतात त्या ब्रह्मलोकान्त पवित्र व सनातन लोकांना परमपुरुषार्थत्व आहे, असेंहि ते ( वेद ) सांगतात, ते लोक बंधनकारक आहेत असें कसें म्हणतां येईल ? यज्ञाच्या योगानें प्राप्त होणाऱ्या ऊर्ध्व लोकांना परम पुरुषार्थत्व आहे, असें वेदरूप अपौरुषेय

प्रमाणावरून जाणणारा पुरुष त्याचें साधन जें कर्म त्याचें अनुष्ठान कसें बरें करणार नाहीं !

सनत्सुजात—राजा, तूं म्हणतोस तें खरें आहे; विषय-विषांध अज्ञ पुरुष ब्रह्मलोकादि साध्यसुख हाच परम पुरुषार्थ आहे, असें मानून त्या ब्रह्मलोकादिकांचें साधनभूत जें कर्म त्याच्या अनुष्ठानांतच निमग्न होतो, ही गोष्ट खरी आहे. पण विद्वान् ब्रह्मलोकांतील अविद्यादि दोषांना जाणतो व त्यामुळें तो त्यांत आसक्त होत नाहीं.

वेद सर्वफलजात अविद्वानालाच सांगतात. विद्वानाला सांगत नाहींत. त्यामुळें तो विद्वान् ब्रह्मलोकादि अनित्य सुख व त्याचें साधन कर्म, यांत प्रवृत्त होत नाहीं. तर परमात्म्यालाच आत्मत्वानें जाणून स्वतः परात्मा ब्रह्म होऊन परमात्म्यालाच प्राप्त होतो. तो ज्ञानमार्गानें अमार्गांचा नाश करितो. आत्म्याच्या विरुद्ध असलेले व संसारहेतुभूत धर्म, अधर्म आणि उपासनामार्ग हेच अमार्ग होत.

धृतराष्ट्र—भगवन्, तो सत्यादिलक्षण परमात्माच क्रमानें आकाशापासून पृथ्वीपर्यंत जगत् उत्पन्न करून व त्यांत प्रविष्ट होऊन अन्नमयादिरूपानें अवस्थित होत्साता संसार करीत असेल तर त्या सत्यज्ञानादिलक्षण, पुराण व अज परमात्म्याला दुःखबहुल संसारांत कोण नियुक्त करितो ! तो स्वतःच स्वतःला प्रेरणा करितो किंवा दुसरा कोणी त्याला प्रेरणा करितो ! किंवा नाना योनींमध्यें प्रवृत्त न होणाऱ्या, स्व-स्वरूपांत अवस्थित झालेल्या व अंतर्बहिरिंद्रियांनीं कोणतीहि क्रिया न करणारा असा तो परमात्मा संसारामध्यें जर प्रविष्ट न झाला, तर त्याला कोणतें असुख होतें ! तो स्वरूपांतच जर स्थित झाला तर त्यांत त्याची कोणती हानि होते ! हे विद्वन्, हें सर्व तूं मला यथावत् सांग.

सनत्सुजात—राजा, हा प्रश्न करण्यांत एक प्रेरक व दुसरा प्रेरित होणारा, एक नियोजक व दुसरा नियोज्य, असा भेद प्रतीतीला येत असल्यामुळें व एका कूटस्थ आत्म्याच्या ठिकाणीं त्याचा असंभव असल्यामुळें जगांत वस्तुभेद असलाच पाहिजे, असा जर तुझा आशय असेल तर तूं मला असें सांग कीं, तूं तो भेद कोणाचा मानतोस ! ब्रह्माच्याच ठिकाणीं नानात्व मानितोस कीं, जीव व परमात्मा यांचा भेद मानितोस ! तूं जर ब्रह्मच विविध आहे, त्याच्या ठिकाणीं भेद आहे, असें समजत असशील तर या पक्षीं फार

मोठा दोष येतो. १ अद्वैतवादी मिथ्या भाषण करणारे व अवैदिक आहेत असें होईल. २ परमार्थभूत अद्वैत हें वेदहृदय बाधित होण्याचा प्रसंग येईल. ३ ब्रह्म अनेक रूपानें परिणत झाल्यानें त्याच्या ठिकाणीं अनित्यत्वादि दोष येतील व अस्थूलादि वाक्यांशीं विरोध येईल. कारण उपनिषदांत ब्रह्माला अस्थूल, अनणु इत्यादि म्हटलें आहे, हें प्रसिद्ध आहे. बरें ' मी ब्रह्माचें नानात्व मानीत नाहीं, तर जीव आणि परमात्मा यांचा भेद मानितों ' असें म्हणून दुसरा पक्ष स्वीकारशील तर त्या पक्षींहि विनाश हा मोठा दोष प्राप्त होतो. श्रुति भेददर्शी पुरुषाला मोठें भय सांगते. स्मृति, इतिहास, पुराण इत्यादि सर्वहि प्रमाण ग्रंथांत भेददर्शी पुरुषाला मोठा प्रत्यवाय सांगितलेला आहे. त्यामुळें जीवेश्वरभेददर्शनांत अवैदिकत्व हा मोठा दोष प्राप्त होतो.

धृतराष्ट्र—तर मग तुमच्या पक्षीं जीवेश्वरादिव्यवहारभेद कसा संभवतो व त्याला नित्यत्व कसें ? अनादि अविद्याख्य मायेच्या संबंधानें जीवादि नित्य संभवतात. सजातीयादि भेदांनीं रहित असलेल्या परमात्म्याचें मायायोगानें बहुरूपत्व संभवतें. याविषयींहि पूर्वोक्त श्रुति-स्मृत्यादि प्रमाणग्रंथांत शेकडों प्रमाणें आहेत. ज्याअर्थीं एका परमात्म्यालाच मायायोगानें बहुरूपत्व प्राप्त होतें, त्याअर्थीं तोच कारणात्मा परमेश्वर कार्यात्म्या जीवाला त्याच्या पूर्व प्रयत्नाच्या अपेक्षेनें संसारांत नियुक्त करितो. जीवाचा हा संसार मायिक आहे. परमार्थतः नाहीं. त्यामुळें परमात्मा स्वतः संसार करीत नाहीं व करवीतहि नाहीं.

शिवाय माया या निमित्तानें परमात्म्यामध्यें नैमित्तिक भेद होतो, असें जरी मानलें, तरी कार्य-कारणरूपानें अवस्थित असलेल्याहि परमात्म्याचें स्वरूपाधिक्य नष्ट होत नाहीं. कारण संसाराला मायारूपत्व असल्यामुळें तो कार्यकारणभाव प्राप्त होण्याच्या पूर्वीं जसा निर्विकार होता, तसाच मायिक कार्यकारणभाव प्राप्त झाल्यावरहि तो रहातो. त्यामुळें पूर्ण परमात्म्याला जो जीव-भाव प्राप्त होतो, तो स्वाभाविक नसून आगंतुक आहे. त्यामुळें आमच्या मायिक व्यवहारामध्यें कोणताहि दोष संभवत नाहीं.

[ याप्रमाणें अद्वितीय परमात्म्याला अनादि मायायोगानें बहुरूपत्व प्राप्त होतें, असें सांगितलें. आतां ईश्वराचें जगत्कारणत्वहि मायोपाधिक आहे, असें सांगण्यासाठीं सनत्सुजात म्हणतात—] राजा, तो ऐश्वर्यादिगुणयुक्त परमात्मभूत परमेश्वर ईक्षणादिपूर्वक हें सर्व विश्व नित्य विकारयोगानें करितो, असें जें

म्हणतात, तें तो स्वतः करीत नसून त्याची मायाशक्तीच तें सर्व करिते. त्यामुळें सदानंदाद्वितीय परमात्म्याला स्वतः कारणत्व नाहीं. तर मायासंबंधामुळेंच त्याच्या ठिकाणीं जगत्कारणत्वाचा आरोप करितात.

पण 'असंग परमात्म्याच्या ठिकाणीं अशा अलौकिक मायेचा संबंध आहे, याविषयीं प्रमाण काय?' म्हणून म्हणशील तर ईश्वराच्या ठिकाणीं मायेचें अस्तित्व आहे, याविषयीं वेद हेंच प्रमाण आहे. 'इंद्र—परमात्मा आपल्या मायाशक्तींनीं बहुरूप होतो' 'मायावी महेश्वर हें सर्व जगत् उत्पन्न करितो' 'त्या परमात्म्याची स्वरूपभूत शक्ति स्वगुणांनीं गुप्त होऊन राहिलेली आहे' इत्यादि अर्थाच्या श्रुति; 'माझी माया दुरत्यय आहे' इत्यादि स्मृति व 'व्यापक परमात्म्याची ही दुस्तर माया अति दुर्ज्ञेय आहे' इत्यादि पुराणवचनें तिच्याविषयीं प्रमाण आहेत.

याप्रमाणें प्रमाद—आत्मस्वरूपाविषयीं अज्ञान, हेंच मृत्यूचें स्वरूप आहे व या अज्ञानस्वरूप मृत्यूच्या निमित्तानें अनेक अनर्थांची प्राप्ति होते, असें दाखवून आणि ज्ञानानेंच त्या अज्ञानरूप मृत्यूचा परिहार होतो, असें सनत्सुजातांचें मत ऐकून धृतराष्ट्र कर्मांचें स्वरूप जाणण्याच्या इच्छेनें म्हणतो— "भगवन्, या लोकीं कांहीं मानव धर्माचरण करितात व कांहीं लोक अधर्माचरण करितात; पण त्यांतील धर्म पापाचा विनाश करितो कीं, पाप धर्माला प्रतिबंध करितें! किंवा धर्म व अधर्म हीं दोन्ही तुल्यबल असल्यामुळें त्यांतील कोणीच कोणाचा विनाश करूं शकत नाहीं?"

अविद्वानाला त्या दोहोंचाहि अनुभव येतो. त्यामुळें धर्म व अधर्म यांतील कोणीच कोणाचा नाश करीत नाहीं, असें सिद्ध होतें. पण विद्वानाचा धर्म व अधर्म, या दोहोंचाहि ज्ञानाग्नीनें नाश होतो, अशा आशयानें सनत्सुजात म्हणतात—"हे राजन्, पुण्य-पापात्मक कर्मांत स्थित असलेलाहि पुरुष पुण्य व पाप या दोहोंचेंहि अनुष्ठान करितो. पण विद्वान् ज्ञानानें त्या उभयविध कर्मांचा नाश करितो व ही गोष्ट श्रुति, स्मृति, पुराण आणि इतिहास यांमध्यें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें ज्ञानहीन पुरुष पुण्यफलाला प्राप्त होतो व तो पापफलाचाहि उपभोग घेतो, हेंहि श्रुति-स्मृत्यादि प्रमाण ग्रंथांवरून सिद्ध आहे."

धृतराष्ट्र—भगवन्, अविद्वानाला पुण्य व पाप या दोहोंचाहि अनुभव घ्यावाच लागतो कीं, त्यांतील एकानें दुसऱ्याचा नाश होतो?

सनत्सुजात—हे वैचित्रवीर्या, पुरुष परलोकास प्राप्त होऊन पुण्य व पाप यांनीं प्राप्त होणारें इष्टानिष्ट फल पुण्य-पापलक्षण कर्मांमुळेंच भोगतो. तोच पुरुष विद्वान्–कर्माचा विनियोग जाणणारा असला, तर तो ईश्वरार्थ कर्मानुष्ठान करून त्या धर्माच्या योगानें पापाचा विनाश करितो. असा ईश्वरार्थ कर्मानुष्ठान करणारा जो विद्वान् त्याचा धर्म पापाहून बलवान् आहे, असें तूं समज. पण जो केवल कर्मानुष्ठान करितो, त्याचा धर्म पापाहून बलवान् नाहीं. अशा पुरुषाला पुण्य व पाप या दोहोंचाहि अनुभव घ्यावाच लागतो. त्याच्या पुण्यानें पापाचा किंवा पापानें पुण्याचा विनाश होत नाहीं.

धृतराष्ट्र—तर मग, कोणाचें कर्म स्वर्गादिकांचें साधन होतें व कोणाचें कर्मानुष्ठान चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानाचें साधन होतें ?

सनत्सुजात—राजन्, विषयासक्त पुरुष स्वर्गांतील उर्वश्यादि भोगांचें श्रवण करून स्वर्गसाधनभूत ज्योतिष्टोमादि कर्मांमध्यें स्पर्धेनें प्रवृत्त होतात. एखादा बलाढ्य राजा दुसऱ्या बलवान् राजाला पाहून त्याच्याशीं स्पर्धा करूं लागतो. मी स्वबलानें या बलाढ्य शत्रूला जिंकून त्याच्याहिपेक्षां अधिक सुखी होईन, अशा महत्त्वाकांक्षेनें तो विजयाच्या साधनांमध्यें जसा आसक्त होतो, त्याचप्रमाणें यज्ञाधिकारी ब्राह्मण स्वर्गफलाच्या आसक्तीनें यज्ञादि धर्म आचरितात. यज्ञाधिकारी प्रत्येक ब्राह्मण ‘ मी सर्वांपेक्षां अधिक धर्माचरण करून अधिक सुखी होईन ’ अशी इतरांशीं स्पर्धा करूं लागतो आणि अशा प्रकारें ‘ अहमहमिकेनें ’ स्वर्गसाधनभूत धर्मांचें अनुष्ठान करून मरणोत्तर धूमादिमार्गांनें स्वर्गलोकीं जाणारे कर्मठ तेथें नक्षत्ररूपानें प्रकाश पावतात.

पण याच्या उलट, ज्यांचें चित्त विषयांनीं आकृष्ट झालेलें नसतें, तें अनित्य फलाचें साधन असे जे ज्योतिष्टोमादि धर्म, त्यांविषयीं कोणाशीं स्पर्धा करीत नाहींत. उलट फलाची अपेक्षा न करितां ईश्वराराधनार्थ कर्मानुष्ठान करितात. अशा विरक्त पुरुषांचें यज्ञादि कर्म शुद्धीच्या द्वारा ज्ञानाचें साधन होतें. याविषयीं श्रुति-स्मृति-पुराणांमध्यें पुष्कळ प्रमाणें आहेत.

राजा, यज्ञादि साधनांच्या योगानें ज्यांचें चित्त शुद्ध झालेलें असून जे परमात्म्याला आत्मत्वानें जाणतात, ते ब्राह्मण या शरीरेंद्रियसंघातरूप लोकापासून मुक्त होत्साते सुखलक्षण पूर्णानंद ब्रह्माला प्राप्त होतात. हाच मुख्य स्वर्ग किंवा त्रिविष्टप आहे. कारण प्रसिद्ध स्वर्गांमध्यें अप्सरादि लक्षण विषयांपासून सुख

होतें व हा ब्रह्मलक्षण स्वर्ग आध्यात्मिकादि ताप, सत्त्वादि तीन गुण व जाग्रदादि तीन अवस्था यांनीं रहित आहे.

आतां ब्रह्मचर्यापासूनच सर्व कर्मांचा संन्यास व वेदान्तश्रवणादि करून स्वरूपामध्यें स्थित झालेल्या परमहंस परिव्राजकाचार्य विद्वानाचें आचरण कसें असतें ! तें भगवान् सनत्सुजात सांगतात—राजन्, अशा विद्वानाच्या आचरणाला वेदवेत्ते जन सम्यक् समाचार असें म्हणतात. अशा पुरुषाचें यथार्थ स्वरूप त्याचे बाह्य किंवा आंतर जन–भक्त व अभक्त यांतील कोणीहि जाणूं शकत नाहींत. तो कोठें राहतो म्हणून विचारशील तर तेंहि सांगतों. ऐक.

हे राजा, वर्षाकालीं जेथें तृण, उदक, इत्यादि विपुल असतें तेथेंच पशुपक्ष्यादि जसे रहातात, त्याप्रमाणें जेथें अन्नोदकाची समृद्धि असते, तेथेंच तो परमहंस परिव्राजक वास करितो. अशा ज्ञानी विरक्त पुरुषाला मृष्टान्नाची आवश्यकता नसते. भक्षण-योग्य फुलें, फळें, पानें, दूर्वादि जेथें सुलभ असतात, त्या प्रदेशीं तो सुखानें रहातो. किंबहुना अशा ब्राह्मणानें दूर्वादिकांच्या रसावरहि आपला निर्वाह करावा, पण पराधीन अन्न-पानादिकांची आशा करूं नये व त्याच्या आशेनें संतप्त होऊं नये. कारण या अन्न-पानादिकांनीं रहित असलेल्या प्रदेशांत माझी देहयात्रा कशी सिद्ध होईल ! अशी चिंता तो करूं लागल्यास त्याचा स्वरूपावस्थानरूप योग सिद्ध होणार नाहीं.

आतां त्यानें कशाप्रकारच्या लोकांचा सहवास करावा तेंहि सांगतों, ऐक—अशा परमहंस परिव्राजकानें जेथें आपला कोणी संमान करील, प्रणिपातादिपूर्वक ईश्वरबुद्धीनें पूजन करील, अशा प्रदेशीं राहूं नये. तर आपलें माहात्म्य प्रकट न करतां तें गुप्त ठेवणाऱ्या, प्रसंगीं प्राप्त होईल तें अन्न भक्षण करणाऱ्या, कोणत्याहि प्राप्त चैलादिकांनीं शरीराला आच्छादित करणाऱ्या, जड, मूक, पिशाच्च इत्यादिकांप्रमाणें संचार करणाऱ्या त्यानें जेथें लोक त्याचा अवमानादि करतील अशाच ठिकाणीं वास करावा.

त्याला मूढ मानून त्याच्या वाटेला न जाणारा प्राकृत जन हाच त्याला श्रेयस्कर होय. त्याला स्थितप्रज्ञ ब्रह्मविद् मानून त्याची पूजा करणारा जन त्याला श्रेयस्कर होत नाहीं. सर्व साधनांचा त्याग करून पूर्णानंदरूपानें स्थित झालेला जो विद्वान्, त्यानें मूकव्रत धारण करावें. आत्म्याला संतप्त करूं नये. ब्रह्मनिष्ठासाधनभूत चैल, अजिन, कुश, पुस्तक इत्यादि अवश्य वस्तूंचा त्याग

करूं नये. कारण आत्मज्ञानी पुरुषाचें कुशादि हेंच ब्रह्मत्व आहे. तेंच त्याचें अन्न होय. ब्रह्मवेत्त्यानें नियमानें गूढचर्या–अज्ञातवास हेंच माझें नियत कर्तव्य आहे असें मानावें. आपल्या ज्ञातींतील कोणाच्याहि सांनिध्याची इच्छा करूं नये. तर सुहृद्-बांधवादिकांचा परित्याग करून केवल स्वात्मनिष्ठ होऊन गुप्त वास करावा. तात्पर्य स्थूल व सूक्ष्म देह आणि त्यांचे धर्म, यांचा आत्मत्वानें स्वीकार करूं नये. कारण स्थूल-सूक्ष्मशरीरांनीं रहित, क्रिया-कर्त्रादि-शून्य, अविद्यादोषरहित अशनाया-पिपासादि षडूर्मींनीं रहित, शीतोष्ण सुख-दुःखादि धर्मवर्जित, सर्वप्रमाणागोचर, सर्वान्तर व सर्वसाक्षी अशा आत्म्याला ‘ मी स्थूल आहें, कृश आहें, मूक आहें, सुखी आहें ’ इत्यादि प्रकारें जाणणें कसें शक्य आहे !

मुख्य ब्राह्मणानें शुद्ध चैतन्यरूप आत्म्याच्या ठिकाणीं स्थूल-सूक्ष्मरूप देहद्वयाचा आरोप करणें सर्वथा अयुक्त आहे. कारण त्या विद्वानानें असा अनात्म्याच्या ठिकाणीं आत्म्याचा अध्यारोप केल्यास त्याचें ब्राह्मणत्वच नष्ट होईल ! पण याच्या उलट जो अविवेकी पुरुष पूर्वोक्त प्रकारें सर्व द्वंद्वशून्य व आनंदलक्षण असलेल्या आत्म्याला देहद्वय व त्याचे धर्म यांनीं युक्त, कर्ता-भोक्ता, सुखी-दुःखी, ब्राह्मण-क्षत्रिय इत्यादि प्रकारें जाणतो, त्या आत्म्याचाच अपहार करणाऱ्या मूर्ख चोरानें कोणतें पाप केलें नाहीं ! त्यानें महापातकादि सर्व पापें केलींच आहेत असें जाणावें. अशा पुरुषाच्या संसाराची निवृत्ति सर्वथा होत नाहीं. यास्तव हे राजा, विषयभूत देहेंद्रियादि अनात्मवस्तूंवरील आत्मभाव टाकून वागादिकांचा विषय न होणाऱ्या परमात्म्यामध्येंच निश्चयानें स्थित व्हावें.

देहेंद्रियें व त्यांचे धर्म यांना आत्मत्वानें न पहाणाऱ्या पुरुषाला कोणत्या फलाची प्राप्ति होते, तें सनत्सुजात सांगतात—जो पुरुष अनात्मभूत देह, इंद्रियें व त्यांचे धर्म, यांचें आत्मत्वानें ग्रहण करीत नाहीं, तो संसारश्रमानें युक्त होत नाहीं. अशनाया-पिपासा हे प्राणाचे, शोक-मोह हे मनाचे आणि जरा-मरण हे शरीराचे धर्म आहेत. स्थूल व सूक्ष्म या दोन देहांचा आत्म्याच्या ठिकाणीं अध्यास झाला म्हणजे त्यांच्या धर्मांचाहि आत्म्यावर अध्यास होतो. पण जो देहेंद्रियें व त्यांचे धर्म यांचें आत्मत्वानें ग्रहण करीत नाहीं, त्यांना अशनायादि षडूर्मींचे संसारश्रम होत नाहींत. त्यामुळेंच तो निरुपद्रव असतो. क्रोध, हर्ष, लोभ, मोह इत्यादि विघ्नें हेच उपद्रव होत. पूर्वोक्त प्रकारें जो अश्रान्त

असतो, तोच निरुपद्रव होतो. विद्वानांना तोच शिष्ट म्हणून मान्य होतो. पण ब्रह्मज्ञ विद्वान् ब्राह्मणानें शिष्टाप्रमाणें वागूं नये. तर जड किंवा मूढ यांप्रमाणें वागावें.

आतां याप्रमाणें जो गूढ आचरण करीत नाहीं, त्याची निंदा करीत सनत्सुजात पुढें म्हणतात—जसे बाल म्ह० श्वान किंवा मूढ आपलीच वांत ( ओकून टाकलेलें अन्न ) भक्षण करितात, तसे जे शिष्ट ब्रह्मवेत्ते आपलें माहात्म्य प्रकट करीत होत्साते गूढचारी रहात नाहींत, ते आपलेंच बल–वीर्य–सामर्थ्य क्षीण करीत असल्यामुळें जणुं काय वांतच भक्षण करितात आणि अशाप्रकारें वांताशन करणें हें त्यांच्या अनर्थालाच कारण होतें. यास्तव विद्वानानें गूढचर्या स्वीकारून अशिष्टाप्रमाणें वर्तन करावें.

( आतां सनत्सुजात योग्याची प्रशंसा करितात— ) धृतराष्ट्रा, जे विद्वान् स्त्री, पुत्र, वित्त इत्यादि मानुष वित्तामध्यें आसक्तचित्त होत नाहींत, तर वेदप्रतिपाद्य अहिंसा, सत्य, अस्तेय, अपरिग्रह, ब्रह्मचर्य इत्यादि समाधिसाधनामध्येंच आसक्त होऊन रहातात ते द्विज दुर्धर्ष व दुष्प्रकंप्य असतात. कोणतीहि परिस्थिति, दोष किंवा पुरुष त्यांना स्वरूपावस्थानापासून ढळवूं शकत नाहीं. ते ब्रह्माची तनुच–ब्रह्मस्वरूपभूतच आहेत, असें जाणावें.

या लोकीं जो कोणी अग्न्यादि देवतांतील प्रत्येक देवतेला उद्देशून याग करितो, तो या ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणाची बरोबरी करूं शकत नाहीं. कारण ब्रह्मवेत्ता सर्व देवतायाजी पुरुषाहूनहि श्रेष्ठ आहे व त्यांत कांहीं आश्चर्यहि नाहीं. कारण स्वतः यजमान ‘ इदमग्नये इदमिन्द्राय ’ असा देवतोद्देशानें हविस्त्याग करून ज्या देवतेपासून फल संपादन करण्याची इच्छा करितो, ती देवताहि या ब्रह्मवेत्त्याच्या बरोबरीची नाहीं आणि अग्न्यादि देवसुद्धां जर ब्रह्मवेत्त्याची बरोबरी करूं शकत नाहींत, तर देवांचें उपकरण असलेला हा यजमान ब्राह्मणाची बरोबरी कशी करणार ! ‘ या लोकीं ब्रह्मवेत्त्यांहून श्रेष्ठ भूत नाहीं, ’ याविषयीं अनेक श्रुति-स्मृतिप्रमाणें आहेत.

( भगवान् सनत्सुजात पुनः ब्रह्मवेत्त्याचाच आचार सांगतात—) स्थितप्रज्ञांचीं लक्षणें जाणणारे कांहीं विद्वान् ब्रह्मचर्याश्रमापासूनच संन्यास करून गूढचर्या करणाऱ्या या परमहंस परिव्राजकाचार्याला ब्रह्मवेत्ता जाणून जर त्याची पूजा करूं लागले, तर त्यांच्याकडून पूजा केली जाणाऱ्या या विद्वा-

नानें 'मी असा पूज्य आहें' असें मानून हृष्ट होऊं नये. त्याचप्रमाणें स्थितप्रज्ञांचीं लक्षणें न जाणणारे अविद्वान् त्या निष्क्रिय आत्मज्ञाला जड व मूढ मानून जर त्याचा अवमान करूं लागले तर त्यानें त्या अवमानानें संतप्तहि होऊं नये.

(तर मग, दुसऱ्याकडून पूजित व अवमानित झालेल्या त्या विद्वानानें आपल्या मनांत काय समजावें तें आतां सनत्सुजात सांगतात–) नेत्रांच्या निमेषोन्मेषा-प्रमाणें–उघड झांपीप्रमाणें 'पूज्यांची पूजा करणें' हा विद्वानांचा स्वभावच आहे. त्याला अनुसरून ते माझा आदर करतात, त्यांत काय आश्चर्य आहे, असें मानून ब्रह्मवेत्त्यानें हृष्ट होऊं नये. त्याचप्रमाणें लौकिक व शास्त्रीय मर्यादेचें उल्लंघन करणारे अधर्मज्ञ मूढ मान्यांचा मान ठेवीत नाहींत; कारण त्यांचाहि तो स्वभावच आहे, त्यांत तरी काय आश्चर्य आहे; असें समजून त्यानें संतप्त होऊं नये.

(आतां मान व मौन यांचे विषय पृथक् आहेत, असें दाखविण्यासाठीं सनत्सुजात म्हणतात–) हे राजा, मान आणि मौन हीं एकत्र कधीं रहात नाहींत. हा प्रत्यक्षादि प्रमाणांचा विषय होणारा प्रपंच मानाचा विषय आहे व ब्रह्म हा मौनाचा विषय आहे. मानानें संसारप्राप्ति व मौनानें ब्रह्मप्राप्ति होते. जो पुरुष प्रपंचामध्यें आसक्त असतो, त्याला ब्रह्मप्राप्ति होत नाहीं. कारण जो विषयासक्त पुरुष स्वर्गादि विषयप्राप्तीसाठीं कर्मानुष्ठान करितो, त्या विषयविषान्ध पुरुषालाच ऐश्वर्य प्राप्त होतें व तें ऐश्वर्यहि श्रेयोमार्गाला विरोध करितें आणि जो ऐश्वर्यमदानें विषयांमध्यें प्रवृत्त होतो, त्या विद्याविहीन पुरुषाला ब्रह्मानंदलक्षण ऐश्वर्य दुर्लभ होतें.

राजा, आतां मी तुला ब्रह्मानंदलक्षण ऐश्वर्याच्या प्राप्तीचीं साधनें सांगतों. ब्राह्मी लक्ष्मीमध्यें प्रवेश करण्याचीं द्वारें अनेक आहेत व साधु ब्राह्मण तीं दुश्चर आहेत, असें म्हणतात. यथार्थ संभाषण व भूतहित हें सत्य, अकुटिलता हें आर्जव, अकार्याविषयीं लज्जा ही ह्री, अंतर्बहिरिंद्रियांची उपरति हा दम, दोषप्रक्षालन हें शौच व ब्रह्मविद्या, हीं सहा दुश्चर साधनें मान-मोहादि दोषांना प्रतिबंध करणारीं असून तींच ब्रह्मश्रीमध्यें प्रवेश करण्याचीं साधनें आहेत. ५. ४. ४२.

---

## अध्याय ४३ वा.

[ १ धृतराष्ट्राचे प्रश्न व सनत्सुजातांचीं शास्त्रीय उत्तरें. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—भगवन्, कशाप्रकारच्या पुरुषाला हा वागादि-उपरति-लक्षण मौनभाव प्राप्त होतो ! अभाषण व आत्मस्वरूप यांतील तुम्हांला विवक्षित असलेलें मौन कोणतें ! मौन म्हणजे तूष्णींभाव—वाणीचा निरोध असें आम्हांला माहीत आहे. यास्तव या तूष्णींभावानें विद्वान् ब्रह्माला प्राप्त होतो कीं, दुसऱ्या एखाद्या मौनानें त्याला मोक्ष मिळतो ? हे मुने, मुमुक्षु ब्राह्मण या लोकीं मौनाचें आचरण कसें करितात ?

**नत्सुजात**—राजा, वेद मनासह या परमात्म्याला विषय करूं शकत नाहींत. कारण उपनिषदेंहि या परमात्म्याचा साक्षात् वाच्यवृत्तीनें—मुख्यवृत्तीनें बोध करूं शकत नाहींत आणि मनहि त्याचा निश्चय करूं शकत नाहीं. म्हणूनच त्या परमात्म्याला ‘ वाङ्मनसातीत ’ असें म्हणतात. यास्तव वाणीचा विषय न होणारा परमात्मा हेंच मौन आहे. जेथून वेदरूप शब्द उत्पन्न झाला व ज्याच्यामध्यें स्थित होऊन तो आपला निमित्तभूत अर्थ प्रकट करितो, तें शास्त्रादिकांचें कारणच ब्रह्म आहे. त्यामुळें हा ‘ वेद ’-शब्दप्रतिपाद्य परमात्मा ज्ञानरूप आहे. पण ‘तो जर वाणीचा अविषय आहे, तर तो ज्ञानरूप आहे, हें तरी कसें कळतें ! ’ म्हणून विचारशील तर हे क्षत्रियश्रेष्ठा, तो संविन्मय—ज्योतिर्मय—ज्ञानमय, असाच आमच्या अनुभवाला येतो. आम्हांला परमात्म्याचा अनुभव ज्योतिर्मयत्वानें येत असल्यामुळें तूं माझ्या कथनावर विश्वास ठेव. परमात्मा चिद्रूप आहे, याविषयीं अविश्वास करूं नको. कारण श्रुति, स्मृति, इतिहास, पुराण व योगशास्त्र यांमध्यें त्याचें चिद्रूपत्वानेंच प्रतिपादन केलेलें प्रतीत होतें.

**धृतराष्ट्र**—जो ब्राह्मण पापाचरण करीत असतांनाहि ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांचें अध्ययन करितो, तो त्या वेदाध्ययनानें पावन होतो कीं नाहीं तें मला सांगा.

**सनत्सुजात**—हे विवेकी राजा, पापाचरण करणारा पुरुष ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तिन्ही वेदांचें अध्ययन जरी करीत असला तरी ते ऋगादिवेद निषिद्धाचरण करणाराचें रक्षण करूं शकत नाहींत. राजा, हें माझें वचन भयानक किंवा औपचारिक आहे, असें मानूं नको. मी हें तुला सत्य सांगत

आहे, त्यावर अविश्वास ठेवूं नको. कारण वेद पुरुषाचें अधर्मापासून रक्षण करीत नाहींत. एखादा ढोंगी पुरुष लोकांची प्रतारणा करण्यासाठीं सर्व वेदांचें अध्ययन जरी करीत असला तरी तें व्यर्थ होय. पक्ष्यांच्या पिलांना पंख फुटले म्हणजे तीं आपल्या आश्रयभूत घरट्यांना सोडून जशीं निघून जातात, तसे वेद पापीपुरुषाला अंतकालीं सोडून जातात. ते त्याच्या पुरुषार्थोपयोगी होत नाहींत.

धृतराष्ट्र—भगवन्, नित्य व काम्य कर्में पितृलोकादि प्राप्तीचीं साधनें असल्यामुळें त्यांना संसाररूप अनर्थाचें हेतुत्व आहे व प्रतिषिद्ध कर्मांना नरकसाधनत्व असल्यामुळें तींहि अनर्थाचीं कारणें आहेत, असें तुम्हीं पूर्वीं सांगितलेंच आहे आणि आतां वेदहि वेदवेत्त्याचें रक्षण करीत नाहीं, असें सांगत आहां. पण असें जर आहे, तर ‘ वेदाध्ययन, तदर्थ विचार व अनुष्ठान करावें ’ हा ब्राह्मणांचा अनादि वृथालाप कां ऐकूं येतो ?

सनत्सुजात—राजा, वेदाचा जर विधि व निषेध इतकाच अर्थ असता तर वेद हा ब्राह्मणांचा ‘ वृथा प्रलाप ’ झाला असता, पण स्वर्गादिकांहून भिन्न असलेला जो मोक्षसंज्ञक परम पुरुषार्थ, तो मुख्य वेदार्थ आहे. त्याहून अन्य असलेला जो कर्मराशि व उपासना, त्यांना मोक्षप्राप्तीचें साधन जें ज्ञान व त्याचेंहि साधन जी अंतःकरणशुद्धि, त्यांचें साधनत्व असल्यामुळें परंपरेनें पुरुषार्थत्व आहे आणि कर्म व उपासना हीं परंपरेनें पुरुषार्थाचीं साधनें असल्यामुळें त्यांना वेदप्रतिपाद्यत्व आहे.

आतां परमात्म्यालाच पुरुषार्थत्व कसें म्हणून म्हणशील, तर बृहदारण्यकांत ‘अनात्मज्ञ लोक अंधतमानें व्याप्त असलेल्या स्वर्गादि लोकांस प्राप्त होतात’ (बृ. भा. ४. ४. १०) असें सांगून व ‘ जो पुरुष परमात्म्यालाच आत्मत्वानें जाणतो, त्याला शोक व संताप देत नाहींत,’ असें म्हणून आत्मज्ञाची कृतकृत्यता प्रदर्शित केली आहे. त्याचप्रमाणें आत्मवेत्त्याला अमृतत्वप्राप्ति व अनात्मवेत्त्याला आत्मविनाशरूप अनर्थप्राप्ति सांगितली आहे. त्याचप्रमाणें आत्मस्वरूप, याचा साक्षात्कार व त्याचें फल यांचा वारंवार उल्लेख करून भगवान् वेदानें ‘मकरादिकांप्रमाणें रागादिकांकडून पीडिल्या जाणाऱ्या या पापी, विषयासक्त पुरुषाला या

१ न छन्दांसि वृजिनात्तारयन्ति मायाविनं मायया वर्तमानम् ।
नीडं शकुन्ता इव जातपक्षाश्छन्दांस्येनं प्रजहत्यन्तकाले ॥

संसारसागरांतून सोडवून पूर्णानंद मोक्षाख्य परमार्थरूप स्वाराज्यावर मी कसा बरें स्थापन करूं शकेन ?' असा विचार करून मोक्षाच्या प्राप्तीचें साधन जें ज्ञान व ज्ञानाचेंहि साधन जी जिज्ञासा, त्या जिज्ञासेच्या साधनत्वानें यज्ञादिकांचा विनियोग केला आहे आणि ज्याअर्थी वेदांना मोक्ष व मोक्षाचीं साधनें यांचें प्रतिपादकत्व आहे, त्याअर्थी त्यांना संसाररूप अनर्थाचें निवृत्तिहेतुत्वहि आहेच. म्हणून वेद वेदवेत्त्या पुरुषाचें रक्षण करण्यास समर्थ आहेत. अशा आशयानें सनत्सुजात म्हणतात—हे महानुभाव राजा धृतराष्ट्रा, त्या परमात्म्याच्या मायापरिकल्पित नामादि विशेषरूपांनीं हें जगत् भासतें. हें कशावरून अवगत होतें ? म्हणून विचारशील तर सांगतों. 'परमात्मा आपल्या मायाशक्तींनीं बहुरूप होतो.' अशा बृहदारण्यक वाक्यावरून तें आम्हांला अवगत होतें. ( बृ. भा. २. ५. १९. ) श्रुतीनें ईश्वराच्या मायानिर्मित बहुरूपत्वाचा असा निर्देश करून पुनः लागलेंच त्याचें 'सर्वविशेषशून्य' चिद्रूपात्मा हें स्वरूपहि सांगितलें आहे.

त्याचप्रमाणें बृहदारण्यकाच्या मूर्तामूर्त ब्राह्मणामध्यें त्याचेंच मूर्तामूर्त सर्व जगत् हें कल्पित स्वरूप सांगून ' नेति नेति ' या वाक्यानें त्याचेंच सम्यग्रूप प्रतिपादिलें आहे. तसेंच तैत्तिरीयामध्यें आत्म्यापासून आकाशादि पृथ्वीपर्यंत सर्व कार्य उत्पन्न झालें, असें वर्णन करून त्याचेंच वाङ्मनसागोचर सम्यग्रूप सांगितलें आहे. छान्दोग्यांत नामापासून प्राणापर्यंत मायानिर्मित सर्व जगाचा निर्देश करून शेवटीं सर्व विशेषशून्य भूम-ब्रह्माचा सम्यग्रूपानें उपदेश केला आहे. यावरून सर्व वेद परमात्म्याच्या मायाकल्पित नाम-रूपादिकांनीं हें जगत् प्रतीत होतें व तो परमात्मा सर्वविशेषशून्य आहे, असेंच सर्व वेद सांगतात.

राजा, केवल वेदच असें वर्णन करितात असें नाहीं, तर पराशरादि इतर मुनीहि परमात्म्याचें असेंच वर्णन करितात. त्यावरून ईश्वरप्रीत्यर्थ अनुष्ठिलेल्या कर्मांना चित्तशुद्धिद्वारा ज्ञानसाधनत्व असल्यामुळें आणि ज्ञानानें अविद्येची निवृत्ति होऊन परंपरेनें तीं ( कर्में ) पुरुषार्थाचीं साधनें होत असल्यामुळें ईश्वरार्थ अनुष्ठिलेल्या यज्ञादि कर्मांना पुरुषार्थत्व आहे. पण जे विषयासक्त पुरुष ईश्वरार्थ कर्मानुष्ठान न करितां स्वर्गादि भोगप्राप्तीसाठीं त्यांचें अनुष्ठान करितात, त्यांच्या कर्मांना पुरुषार्थत्व नाहीं.

वेदानें विश्वरूपाहून विपरीत असलेलें जें ब्रह्म, त्याच्या प्राप्तीसाठीं कृच्छ्र-चांद्रायणादि तप व ज्योतिष्टोमादि यज्ञ हीं दोन्ही सांगितलीं आहेत. त्यांचा पूर्वोक्त विनियोग जाणणारा विद्वान् ईश्वरार्थ कर्मानुष्ठान करितो व कर्मजन्य अपूर्वानें–पुण्यानें युक्त होतो. त्या पुण्यानें पापाचा क्षय करून निष्पाप होतो. त्यानंतर ज्याचें सर्व पाप क्षीण झालें आहे, असा तो ज्ञानानें ज्याला प्रकाशित केलें आहे, अशा सच्चिदानंद अद्वितीय ब्रह्मस्वरूपाला प्राप्त होतो. म्ह० तो आत्मवेत्ता विद्वान् ज्ञानानें परमात्म्यास प्राप्त होतो. पण ज्यानें ईश्वरार्थ कर्मानुष्ठान करून सर्व पापाचा क्षय केलेला नसतो तो ज्ञानी होत नाहीं. तर तो स्वर्गादि फलांची आकांक्षा करून या लोकीं केलेलें यज्ञादि सर्व कर्म बरोबर घेऊन परलोकीं जातो व त्याच्या फलाचा उपभोग घेतो आणि अवशिष्ट राहिलेल्या कर्मानें पुनः संसारांत पडतो. अर्थात् या लोकीं केलेलें जें तप, त्याचें फल परलोकामध्यें भोगणें हें सर्वांना समान आहे, पण ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणांचें तप अतिशय समृद्ध होतें म्ह० फलाच्या वृद्धीला कारण होतें. पण जे विषयी अनात्मवेत्ते असतात, त्यांच्या तपाची समृद्धि होत नाहीं. तर ज्या कर्माचें जें फल श्रुत असतें, तेवढेंच फल त्यांना मिळतें. त्याची समृद्धि होत नाहीं.

धृतराष्ट्र—भगवन्, केवल तप अत्यंत समृद्ध कसें होतें, तें मला सांगा.

सनत्सुजात—राजा धृतराष्ट्रा, जें तप पापरहित असतें, त्यालाच 'केवल' असें म्हणतात. जें या सर्व प्रपंचाचें निमित्तभूत तप, त्यालाच केवल असें म्हटलें आहे. कारण उशनाकवीनें गुणसाम्यामध्यें स्थित असलेल्या तत्त्वाला 'केवल' असें म्हटलें जातें व त्या केवलापासूनच हें सर्व सदसदात्मक जगत् उत्पन्न झालें, असें म्हटलें आहे. तें हें केवल तपच अत्यंत समृद्धीला कारण होतें. गुणांच्या साम्यामध्यें स्थित नसलेलें तप निष्कल्मप होऊं शकत नाहीं. सत्त्वादि गुणांतील कोणत्याहि गुणानें युक्त असलेलें तप हें सकल्मप तप होय. तें अत्यंत समृद्धीला कधींहि प्राप्त होत नाहीं.

हे क्षत्रिया, तूं मला जें विचारीत आहेस, तें हें तप होय व त्या तपोमूलच हें सर्व आहे. आजपर्यंत अनेक वेदवेत्ते तपाच्याच योगानें श्रेष्ठ अमृतत्वाला प्राप्त झाले आहेत.

धृतराष्ट्र—भगवन्, निष्कल्मष तपाला केवल तप म्हणतात, असें आपण

सांगितलें. पण तपाचें कल्मष कोणतें, तें मला सांगा, म्हणजे मी निष्कल्मष तपानें गुह्य सनातन ब्रह्माला जाणीन.

सनत्सुजात—राजन्, या तपाचे क्रोधादि बारा दोष आहेत व सात नृशंसें आहेत. तसेंच, वेदशास्त्रांमध्यें सविस्तर वर्णिलेले ज्ञानादि बारा गुण आहेत. यास्तव मी हे तपाचे शास्त्रोक्त बारा गुण व एकोणीस दोष सांगतों. ते ऐक.

१ क्रोध हा तपाचा पहिला दोष आहे. तो कामाला प्रतिबंध झाला असतां उत्पन्न होतो. तो दुसऱ्याला ताडन करणें, शिव्या देणें इत्यादि क्रिया करवितो. शरीराला घाम व कंप सुटणें, दृष्टि क्रूर होणें इत्यादि त्याचीं बाह्य लिंगें आहेत. क्रोध हा अंतःकरणाचा विक्षेप आहे. २ स्त्र्यादि विषयांचा अभिलाष हा काम. ३ परद्रव्येच्छा किंवा संपादन केलेल्या द्रव्याचा योग्य स्थानीं विनियोग करण्याचें धैर्य नसणें हा लोभ. ४ कर्तव्याकर्तव्याचा विवेक न होणें हा मोह; ५ विषयरसांच्या सेवनाची इच्छा ही विवित्सा; ६ अकृपा—निष्ठुरता, ७ असूया—दुसऱ्याचे गुण दोषरूपानें प्रकट करणें किंवा परकीय गुणादि सहन न होणें; ८ आत्मबहुमानित्व—स्वतःला मोठा मानणें हा मान; ९ इष्ट वस्तूचा वियोग झाला असतां अंतःकरणाला होणारा जो विक्षेप—रोदन, चिंतन इत्यादि ज्यांचीं बाह्य चिह्नें आहेत, तो शोक. १० विषयभोगेच्छा ही स्पृहा, ११ दुसऱ्याच्या ऐश्वर्याविषयीं असहिष्णुता हीच ईर्ष्या, १२ दुसऱ्याच्या गुणाचा निषेध करण्याची इच्छा किंवा बीभत्सा हीच जुगुप्सा; असे हे क्रोधादि बारा दोष तपाचें कल्मष आहे. महागुणवान् ब्राह्मणानें त्याला सदा वर्ज करावें.

ब्राह्मणाच्या ठिकाणीं उत्कृष्ट गुणांचा योग स्वभावतःच सिद्ध असतो. किंवा ब्रह्मप्राप्ति हाच महागुण होय. त्या ब्रह्मप्राप्तिलक्षण महागुणानें युक्त असलेल्या पुरुषानें सर्वदा या क्रोधादि दोषांना वर्ज करावें. कारण जसा व्याध मृगांचें छिद्र शोधीत त्यांच्या मागोमाग धांवत असतो व त्यांचें छिद्र आढळतांच त्यांना मारतो, त्या प्रमाणें या बारा दोषांतील प्रत्येक दोष त्या मनुष्याचें रन्ध्रान्वेषण करीत प्रत्येक मनुष्याला अनुसरतो व छिद्र सांपडतांच त्यांचा घात करितो. यास्तव क्रोधादिकांतील प्रत्येक दोष विनाशाचें कारण आहे आणि ज्याअर्थीं असें आहे, त्याअर्थीं त्यांना सर्वदा वर्ज करावें.

आतां मीं पूर्वीं ज्यांचा उल्लेख केला आहे, तें नृशंससप्तक कोणतें तें सांगतों, ऐक. १ संभोगसंविद्—ज्याची बुद्धि विषयभोगांतच आसक्त

असते, तो संभोगसंविद्; २ 'विषमेधमानः'—विषाप्रमाणें इतरांना पीडा देऊन वृद्धि पावणारा (अथवा 'द्विषमेधमानः' हा पाठ घेतल्यास त्याचा अर्थ प्राण्यांना द्वेष्य—अप्रिय असलेलें कर्म करून त्यांच्या द्वारा वृद्धि पावणारा;) ३ पूर्वीं धर्मबुद्ध्या धनादिक देऊन मागून मीं हें कशाला दिलें, असें म्हणून संतप्त होणारा दत्तानुतापी. ४ जो अत्यंत क्षुद्र लाभासाठीं सर्वांनीं केलेला अवमान सहन करितो तो कृपण; ५ ज्ञानबलशून्य असलेला अबलीयान्; ५ इंद्रियवर्गाची प्रशंसा करणारा वर्गप्रशंसी; व ७ जो आपल्यावरच अवलंबून असलेल्या अनन्यशरण भार्येचा द्वेष करितो तो वनिताद्वेष्टा; असे हे सात पुरुष पूर्वोक्त क्रोधादिकांहून भिन्न व नृशंसरूप आहेत.

आतां ज्ञानादि बारा गुण सांगतों ते ऐक—१ तत्त्वार्थज्ञान; २ यथार्थ व भूतांना हितावह भाषण, हें सत्य; ३ मनाचें दमन, हा दम; ४ अध्यात्मशास्त्रश्रवण, हें श्रुत; ५ सर्व भूतांविषयीं सहनशीलता, हें अमात्सर्य; ६ अकार्याविषयीं लज्जा, हीच ह्री; ७ द्वंद्वसहिष्णुता, ही तितिक्षा; ८ परदोषांचें आविष्करण न करणें, ही अनसूया; ९ ज्योतिष्टोमादि यज्ञ व ब्रह्मयज्ञादि महायज्ञ, हाच यज्ञ; १० ब्राह्मणांना धनादि देणें, हेंच दान; ११ विषय संनिध असतांनाहि इंद्रियांचा निग्रह हीच धृति; व १२ अंतःकरणाची उपरति—शांति हाच शम; हीं ज्ञानादि बारा व्रतें ब्राह्मणांच्या पुरुषार्थाचीं साधनें होतात.

याप्रमाणें ज्ञानादि बारा गुण सांगून सनत्सुजात त्यांची स्तुति करितात—जो ब्राह्मण या गुणांनीं युक्त असतो व त्यांच्याशीं केव्हांहि वियुक्त होत नाहीं, तो या सर्व पृथ्वीला स्ववश करून घेतो. किंबहुना या बारा गुणांतील तीन, दोन किंवा एका गुणानेंहि युक्त असलेले पुरुष क्रमानें ज्ञानी व ब्रह्मभूत होतात.

राजा, आतां मी तुला दमाचे दोष सांगतों. ते लक्षपूर्वक ऐकून ठेव. दम हा एकच दोष दुसऱ्या अठरा दोषांनीं युक्त असतो. त्यांचें दोषत्व तें कोणतें, म्हणून विचारशील तर तेंहि सांगतों—मी आतां तुला जे अनृतादि अठरा दोष सांगणार आहें, त्यांतील एक दोष जरी आचरिला, तरी दमाच्या प्रतिकूल आचरण केल्यासारखें होतें. तें कोणतें म्हणून विचारशील तर सांगतों, ऐक.

१ अनृत—अयथार्थ वचन; २ पैशुन—परदूषणवचन; ३ तृष्णा—विषयप्राप्तीची इच्छा; ४ प्रातिकूल्य—सर्वांची प्रतिकूलता; ५ तम—अज्ञान; ६ अरति—प्राप्त झालेल्या लाभानें संतुष्ट न होणें, किंवा इत्यादि विषयभोगांनीं तृप्त न होणें; ७ लोकद्वेष—लोकांना उद्वेग होईल असें आचरण करणें; ८ अभिमान—कोणापुढेंहि नम्र न होणें; ९ विवाद—लोकांशीं कलह करणें; १० प्राणिपीडन—स्वदेहाच्या पूर्तीसाठीं प्राण्यांची हिंसा करणें; ११ परीवाद—दुसऱ्यांच्या समक्ष त्यांच्या दोषांचें कथन करणें; १२ अतिवाद—व्यर्थ प्रलाप; १३ परिताप—वृथा दुःखचिंतन करणें; १४ अक्षमा—द्वंद्वविषयक असहिष्णुता; १५ अधृति—इंद्रियसंबंधीं चपलता; १६ धर्म, ज्ञान व वैराग्य यांची असिद्धि; १७ पापकृत्य—निषिद्ध आचरण व १८ अविहित हिंसा; असे हे दमाचे अठरा दोष सांगितले आहेत. या अठरा दोषांनीं रहित असलेला जो गुण तोच दम होय, असें विद्वान् समजतात.

मदाचेहि अठरा दोष आहेत व त्याग षड्विध आहे. वर ' दमाचे दोष ' असें म्हणून अनृतादि-हिंसान्त ज्या दोषांचें संकीर्तन केलें, तेच त्यांच्या विपरीत झाल्यास मदाचे दोष होतात. अनृताच्या उलट १ सत्य, २ अपैशुन, ३ अतृष्णा, ४ अप्रातिकूल्य, ५ ज्ञान, इत्यादि हे पूर्वोक्त विपरीत पदार्थ मदाचे दोष म्हणजे मदाचा नाश करणारे म्हणून सांगितले आहेत.

राजा, मीं तुला त्याग सहा प्रकारचा आहे, असें म्हटलें. तो षड्विध त्याग अतिशय श्रेष्ठ आहे. पण त्यांतील तिसरा त्याग तर अत्यंत दुष्कर आहे. पुरुष त्या तिसऱ्या त्यागानें आध्यात्मिकादि त्रिविध तापाचें निश्चयानें उल्लंघन करून जातात. तो त्याग केला असतां सर्व जिंकल्यासारखें होतें. पण ते त्याग कोणते म्हणून विचारशील तर सांगतों—

१ याचना करणाऱ्या योग्य पुरुषाला पुत्र व वित्त यांचें दान करणें, हा पहिला त्याग होय; २ श्रौतकर्मांमध्यें व स्मार्तकर्मांमध्यें दिलेलें जें दान, त्याला क्रमानें इष्ट+पूर्त=इष्टापूर्त असें म्हणतात. कोणी देवांना उद्देशून दान देणें हें इष्ट व पितरांना उद्देशून देणें हें पूर्त असें म्हणतात. ज्याचें चित्त शुद्ध झालें असून जो पदार्थांतील अनित्यत्वादि दोष जाणतो, त्या पुरुषानें विरक्त होऊन धनादिकांचा व कामांचा त्याग करणें हा तिसरा त्याग होय. पण या त्यागाच्या योगानें काय होतें म्हणून विचारशील तर सांगतों.

या त्यागांनीं पुरुष अप्रमादी होतो व हा अप्रमाद आठ गुणांनीं युक्त आहे. १ सत्य, २ ध्यान म्ह० सूर्यमंडलस्थ नारायणादि कोणत्याहि शुभपदार्थामध्यें चित्ताची अविच्छिन्न प्रवृत्ति ठेवणें; ३ समाधान म्ह० प्रणवोच्चारानें विश्व, तैजस व प्राज्ञ या तीन अवस्थांच्या अभिमानी जीवाचा उपसंहार करून स्वाभाविक चित्सदानंद अद्वितीय ब्रह्मरूपानें अवस्थित होणें; ४ चोद्य—मी कोण, कोणाचा, कोठून आलों, इत्यादि प्रश्न; ५ वैराग्य—ऐहिक व पारलौकिक विषयांविषयीं अप्रीति; ६ अस्तेय—आत्म्याचा किंवा परकीय द्रव्याचा अपहार न करणें; आत्मा निर्विशेष चैतन्यरूप असतांना त्याला शरीरेंद्रियादिरूप समजणें, हेंच आत्मचौर्य होय; ७ ब्रह्मचर्य; ८ असंग्रह—पुत्र, स्त्री, क्षेत्र इत्यादिकांचा परिग्रह न करणें. या आठ गुणांचें नियमानें परिपालन करावें.

याप्रमाणें दमाचे दोष सांगितले. त्या दोषांचें परिमार्जन करावें. त्या अठरा दोषांचा त्याग केला असतां पुरुष प्रमाद करीत नाहीं. अनात्म्याला आत्मा समजणें हाच मुख्य प्रमाद होय. तो अप्रमादहि कोणत्या आठ गुणांनीं युक्त असतो तें वर सांगितलेंच आहे. हे राजेंद्रा, तूं सत्यात्मा हो. सत्यस्वरूप हो. सत्यामध्येंच सर्व लोक प्रतिष्ठित आहेत. कारण, सर्व विद्वान् सत्याधीन आहेत, सत्यामुळेंच त्यांचें अस्तित्व सिद्ध होतें, असें सांगतात. सत्यामध्येंच अमृताख्य मोक्षहि स्थित आहे.

धृतराष्ट्रा, मीं वर जे दोष सांगितले आहेत, त्यांच्यापासून निवृत्त होऊन म्ह० त्यांचा त्याग करून या लोकीं तप व व्रतें यांचें आचरण करावें. परमेश्वरानें ब्राह्मणासाठीं सत्य हेंच वित्त उत्पन्न केलें आहे. साधूंचें सत्यच श्रेष्ठ आहे. राजा, या पूर्वोक्त दोषांनीं रहित व गुणांनीं युक्त असें जें अत्यंत समृद्ध तप तेंच केवल तप होय. किंबहुना तूं जें मला विचारीत आहेस, तेंच मी तुला संक्षेपतः सांगतों. आतां मी तुला जें सांगणार आहें, तें अत्यंत शुद्ध, पापहर आणि जन्म, मृत्यु व जरा यांची निवृत्ति करणारें आहे.

हे भारता, विषयांसह पंचेंद्रियांपासून आणि अतीत व अनागत म्ह० भूत व भविष्यत् विषयांचें चिंतन करणाऱ्या मनापासून मुक्त झालेला जीव सुखी होतो. इंद्रियांना वर्तमानकालीन विषयांपासून व मनाला भूत-भविष्यत् विषयांपासून निवृत्त करणारा पुरुष मुक्तच आहे, असें समज.

धृतराष्ट्र—भगवन्, पुराणांसह वेदांचें अध्ययन करणाऱ्या पुरुषाची अतिशय ख्याति होते, व तो स्वतःहि मी सर्वांहून अधिक विद्वान् आहें, असें

समजतो. कांहीं चतुर्वेदी असतात, कोणी त्रिवेदी व कित्येक द्विवेदी असतात. कांहीं लोकांनीं एकाच वेदाचें अध्ययन केलेलें असतें व दुसऱ्या कित्येकांनीं तर ऋगादि वेदांचें अध्ययनच केलेलें नसतें. अशा या विविध मनुष्यांमध्यें श्रेष्ठ कोण आहे, तें मला सांग. म्ह० त्यालाच मी ब्राह्मण मानीन.

राजाचा हा प्रश्न ऐकून ' जो स्वाभाविक चित्सदानंद अद्वितीय ब्रह्मस्वरूपानें अधिष्ठित होतो, तोच ब्राह्मण होय ' असें सांगण्याच्या आशयानें सनत्सुजात म्हणतात—' राजा, एका वेदाच्या अज्ञानामुळें ऋगादि अनेक वेद झाले आहेत. तो एक वेद कोणता म्हणून विचारशील तर सांगतों. ज्या पदार्थाचा 'इदं–हा, ही, हें' अशा रूपानें निर्देश करतां येतो, तें वेद्य. त्यालाच 'इदं-रूप' असें म्हणतात. हें इदंरूप जड, अनात्म, विकार व विनाशी असतें व सर्व वेद्याला जें जाणतें तें वेदन. त्याला 'अनिदं रूप'–चित् , संविद् , ज्ञप्ति इत्यादि म्हणतात. हें वेदन म्हणजेच वेद होय. हा वेद एक, अद्वितीय व संविद्रूप आहे. अशा या एकवेदरूप ब्रह्माचा बोध न झाल्यामुळें ऋक् , यजुः, साम इत्यादि अनेक वेद झाले. हे ऋगादि वेद, एकवेदरूप ब्रह्माच्या ज्ञानासाठीं विचार करितात. म्हणून त्यांना ' वेद ' हें नांव प्राप्त झालें आहे. किंवा ते आत्म्याचा सद्भाव साधितात, म्हणून वेद. किंवा ते जाणतात, ते ज्ञानसाधनभूत आहेत, म्हणून वेद. किंवा ब्रह्मामुळें त्यांना आत्मभाव प्राप्त होतो, अथवा ते ब्रह्माचा आत्मत्वानें लाभ होण्यास कारण होतात, म्हणून वेद. कारण ' विद् ' हा धातु विचार, सत्ता, ज्ञान व लाभ या अर्थीं पठित आहे. या चार अर्थीं पठित असलेल्या चार प्रकारच्या ' विद् '-धातूपासून निष्पन्न झालेला ' वेद ' हा शब्द त्या त्या अर्थीं प्रवृत्त होतो. म्हणून ऋगादि हे वेद होत.

त्या एकवेदाचें स्वरूप काय म्हणून विचारशील, तर ' सत्य ' हें त्याचें स्वरूप आहे, यास्तव तो सत्य. एकवेदस्वरूप जें ब्रह्म, त्याच्या अज्ञानामुळें वेद अनेक झाले आहेत. हे राजेंद्रा, तूंहि हें जाणून सद्ब्रह्मामध्यें स्थित झाला आहेस का ? तूं सत्यब्रह्मनिष्ठ झाला आहेस का ? जो या एका वेदाला तें सत्य जाणतो, तो सर्वदा प्राज्ञ होतो. दान, अध्ययन व यज्ञ हीं साधनें लोभानेंच प्रवृत्त होतात. ' या एकवेदाला जर न जाणलें, तर काय होतें ' म्हणून विचारशील, तर सांगतों. या सत्य-ज्ञानादिलक्षण ब्रह्मापासून च्युत होणाऱ्या म्ह० स्वाभाविक ब्रह्मभावाचा त्याग करून देहादि अनात्म पदार्थांमध्यें आत्मभावाला प्राप्त झालेल्या अज्ञ जीवांचे संकल्प व्यर्थ होतात.

म्हणजे त्याचे सत्यसंकल्पादिक सिद्ध होत नाहींत. त्यामुळें यज्ञादि कर्मे विस्तार पावतें. हें सर्व सत्यादि लक्षण ब्रह्माच्या अनिश्चयामुळें होतें. संसार आत्म्याच्या अज्ञानामुळें प्रवृत्त झाला आहे. आत्म्याचें अज्ञान हें निमित्त असून संसार हें त्याचें नैमित्तिक कार्य आहे. त्यामुळें पुरुष जोंवर परमात्म्याला आत्मत्वानें साक्षात् जाणत नाहीं, तोंवर तो तापत्रयानें अभिभूत होतो. रागादि दोष जलाशयांतील मकरादिकांप्रमाणें पुरुषाचें इतस्ततः आकर्षण करितात. त्यामुळें तो मोहित व असत्यसंकल्प होतो. तो स्वर्ग, पशु, अन्न इत्यादि हेय साधनांमध्यें प्रवृत्त होतो.

राजा, पुराणासह चार वेदांचें अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणाला बहुवाक्–पुष्कळ बडबड करणारा ब्राह्मण असें समजावें. तो मुख्य ब्राह्मण आहे, असें समजूं नये. 'तर मग मुख्य ब्राह्मण कोण' म्हणून विचारशील तर त्याचें लक्षण सांगतों, ऐक.

जो सत्य-ज्ञानादिलक्षण ब्रह्मापासून दूर होत नाहीं, तर स्वाभाविक सच्चिदानंद अद्वितीय ब्रह्मरूपानेंच अवस्थित होतो, तोच मुख्य ब्राह्मण आहे, असें तूं जाण. सत्यापासून च्युत व अकृतार्थ होऊन जो कर्मांमध्यें प्रवृत्त होतो तो मुख्य ब्राह्मण नव्हे. बृहदारण्यकांत ब्रह्मवेत्ताच मुख्य ब्राह्मण आहे, असें स्पष्ट सांगितलें आहे. (बृ. भा. ३. ५. १.)

धृतराष्ट्र—अहो पण, तुम्ही म्हणतां तें ब्रह्म जर प्रमाणानें सिद्ध होईल, तर मी हें सर्व मानीन. पण वेद अन्यपर–कर्मादिकांचें प्रतिपादन करीत असल्यामुळें वेदावरून ब्रह्माची सिद्धि होत नाहीं.

सनत्सुजात–हे नरश्रेष्ठा, वेद स्वच्छंदानें–स्वरसतः परमात्म्याविषयींच प्रमाण आहेत. कारण 'सर्वे वेदा यत्पदमामनन्ति०'–सर्व वेद ज्या पदाचें प्रतिपादन करितात, तेंच व्यापक परमात्म्याचें स्वरूप मी तुला सांगतों, असें यमानें नचिकेताला सांगितलें आहे. (का. भा. १. २. १५.) वेदाचें पर्यवसान मोक्षाख्य पुरुषार्थामध्यें होतें. एका मोक्षाख्य पुरुषार्थावांचून इतर सर्व अनित्य, अशुचि व दुःखमिश्रित आहे. त्यामुळें त्याला पुरुषार्थत्व नाहीं. अर्थात् ब्रह्मस्वरूप, ब्रह्मज्ञान व ब्रह्मज्ञानाचीं साधनें यांच्या प्रतिपादकत्वानें वेदांना प्रामाण्य आहे व ज्याअर्थी वेद स्वच्छंदानें 'परमात्मा' या अर्थींच प्रमाण आहेत, त्याअर्थी त्यांचेंच अध्ययन–वेदांचेंच

श्रवणादि करून ब्रह्मवेत्ते पंडित संविद्रूप परमात्म्याच्या स्वरूपाला प्राप्त झाले आहेत. ते वेद्य–विषयरूप प्रपंचाला प्राप्त झाले नाहींत.

धृतराष्ट्र—भगवन्, असें जर आहे, तर 'तें ब्रह्म विदित व अविदित यांहून विलक्षण आहे.' ( के. भा. १.३. ) 'ज्याला विषय न करतां मनासह वाक् निवृत्त होते' ( तै. भा. २. ९. पृ १५३. ) इत्यादि श्रुतींशीं विरोध आल्यावांचून कसा राहील !

सनत्सुजात—ऋग्वेदादि वेदांतील एकहि वेद मन व वाक् यांचा विषय न होणाऱ्या संविद्रूप परमात्म्याला जाणत नाहीं. कारण कोणीहि पुरुष ऋगादिरूप जड वेदानें संविद्रूप परमात्माख्य परब्रह्माला जाणूं शकत नाहींत व ते वेद्य प्रपंचालाहि जाणूं शकत नाहींत. कारण चैतन्याच्या योगानें सर्वांची सिद्धि होते आणि ज्याअर्थीं सर्व अनात्म पदार्थांची सिद्धि चिद्रूप परमात्म्याच्या अधीन आहे, त्याअर्थीं जो वेदाला–संविद्रूप परमात्म्याला जाणतो, तो सर्व वेद्यविषय जाणतो. पण जो वेद्यविषयाला जाणतो, तो सत्यादि लक्षण परमात्म्याला जाणत नाहीं.

धृतराष्ट्र—अहो पण, तुम्ही 'ऋगादिरूप जडवेदानें संविद्रूप परमात्म्याला जाणत नाहीं व वेद्यालाहि जाणत नाहीं' असें म्हणत असल्यामुळें अनात्मवेत्त्यांच्या प्रपंचाची सिद्धिच होत नाहीं, हेंच शेवटीं सिद्ध होतें.

सनत्कुमार—राजा, जो ऋगादि वेदांना जाणतो, तोहि अनात्मवेत्ताच होय. कारण तो स्वतःहून भिन्न असलेल्या ज्ञानानें वेद्य प्रपंचाला जाणतो. यावर तूं कदाचित् म्हणशील कीं, वेदवेत्ता अनात्मज्ञ जरी असला, तरी तो वेद्य प्रपंचाप्रमाणें परमात्म्यालाहि जाणील. पण हे राजा, वाणी व मन यांचा विषय न होणाऱ्या परमात्म्याला वेदवेत्ते जाणूं शकत नाहींत व साक्षात् वेदहि त्याला विषय करीत नाहीं. 'तर मग ब्रह्माला औपनिषदत्व कसें संभवतें ?' असें विचारशील तर तेंहि सांगतों.

वेदवेत्ते व वेद परमात्म्याला जरी विषय करूं शकत नाहींत, तरी जे वेदवेत्ते ब्राह्मण वेदांच्या ब्रह्मप्रतिपादनाचा प्रकार जाणतात ते वेदांच्या द्वारा वागादिकांचा विषय न होणाऱ्याहि परमात्म्याला जाणतात. त्यांना संविद्रूप परमात्म्याचा बोध ऋग्वेदादिकांच्या साह्यानेंच होतो.

धृतराष्ट्र—पण वेद निर्विषय ब्रह्माचें प्रतिपादन कसें करूं शकतात ?

सनत्सुजात—राजा, शुक्लप्रतिपदेच्या दिवशीं दिसणाऱ्या चंद्राच्या कलादर्शनास वृक्षाचें शाखाग्र जसें निमित्त होतें, त्याचप्रमाणें ऋगादि वेद नित्य चैतन्यरूप परमात्म्याच्या ज्ञानाचें कारण होतात. म्ह० ते मुख्य वृत्तीनें परमात्म्याचें प्रतिपादन करूं शकत नाहींत. तर शाखाचंद्रन्यायानें लक्षणेनें बोध करितात. [जो याप्रमाणें वेदांचा वेदरूप आत्मप्रतिपादन प्रकार जाणून त्याचें व्याख्यान करितो, तोहि ब्राह्मणच होय, असें सांगण्याच्या अभिप्रायानें ते पुढें म्हणतात—] हे राजा, जो या वेदप्रतिपादन प्रकाराचें व्याख्यान करितो, त्यालाच मी विद्वान् ब्राह्मण समजतों.

धृतराष्ट्र—अहो पण, श्रवण-मननादिकांच्या द्वारा आत्मसाक्षात्कार संपादन करून जो ब्रह्मरूपानें अवस्थित होतो, त्याला श्रुति मुख्य ब्राह्मण म्हणते. असें असतांना आपण 'जो वेदांचें व्याख्यान करितो त्यालाच मी विद्वान् ब्राह्मण समजतों' असें कसें म्हणतां !

सनत्सुजात—हे क्षत्रियश्रेष्ठा, मीं सांगितलेला हा वेदांचा वेदरूप आत्मप्रतिपादन प्रकार जो जाणतो, तो परब्रह्माला अवश्य जाणतोच. जो यथार्थश्रवण संपादन करून आत्मस्वरूपाविषयीं निश्चित झालेला असतो, त्याचें मनन व निदिध्यासन सत्वर सिद्ध होतें व तो सत्वर मुख्य ब्राह्मण होतो. [आणि हे राजा, 'ज्याअर्थी सत्यनिष्ठ पुरुषाच्याच ब्राह्मण्याची सिद्धि होते, त्याअर्थी विषयपरायण होऊं नये' अशा आशयानें सनत्सुजात म्हणतात—] हे धृतराष्ट्रा, या आत्म्याच्या शत्रूप्रमाणें असलेले जे देह, इंद्रियें व शब्दादि विषय, त्यांचें अन्वेषण करण्यास तत्पर होऊं नये. त्यांच्याच पोषणादिकांत तन्मय होऊन राहूं नये. कारण जो या विषयांचा संचय करीत नाहीं, तोच उपनिषदांतील 'तत्त्वमस्यादि'-वाक्यांनीं प्रतिपादिलेल्या प्रभु परमात्म्याला जाणतो. हे वैचित्रवीर्या, ज्याअर्थी सर्व विषयांच्या परित्यागानेंच आत्मदर्शनसिद्धि होते, त्याअर्थी सर्व-कर्म-संन्यास करून म्हणजे स्वात्मव्यतिरिक्त सर्व पदार्थांचा त्याग करून सर्व उपाधिशून्य व्हावें व स्वात्मा याच लोकाची उपासना करावी. स्वप्नांतहि विषयांची इच्छा करूं नये. याप्रमाणें सर्व विषयांचा उपसंहार करून जो साधक स्वात्मलोकाचीच उपासना करितो, त्या त्यागी ब्राह्मणाला सर्व विशेषशून्य असलेलें ब्रह्मच स्वतः अभिमुख होतें. त्यामुळें तो स्वरूपानें सिद्ध होऊन अज्ञानतमाहून अत्यंत विलक्षण असलेल्या भूमाख्य ब्रह्माला प्राप्त होतो. हे राजा, मीं तुला पूर्वीं तूष्णींभावरूप जें मौन सांगितलें आहे, त्या मौनाच्या

योगानेंच पुरुष मुनि होतो. केवल अरण्यांत जाऊन राहिल्यानें तो मुनि होऊं शकत नाहीं.

मीं सांगितलेल्या या तूष्णींभावरूप मौनानें युक्त असलेल्या पुरुषांतील जो कोणी त्या अक्षरपरमात्म्याला 'हा मी आहें' असें साक्षात् जाणतो, तो मुनिश्रेष्ठ होय. हे भारता, हा मुनिश्रेष्ठ सर्व पदार्थांना व्याकृत–अभिव्यक्त करीत असतो. त्यामुळें हाच वैयाकरण होय.

शब्दरूप एकदेशाचें व्याख्यान केल्यानें वस्तुतः कोणी वैयाकरण होऊं शकत नाहीं. कारण पूर्वोक्त मूलभूत अक्षरापासूनच सर्व नाम-रूपात्मक प्रपंच अभिव्यक्त झालेला आहे. यास्तव साक्षात् ब्रह्मालाच वैयाकरणत्व आहे. कारण तें मूलभूत ब्रह्मच प्रपंचाला अभिव्यक्त करितें. हा विद्वानहि ब्रह्मच आहे. तोहि ब्रह्मरूपानें नामरूप व्याकरण करितो, म्हणून ब्रह्मज्ञच मुख्य वैयाकरण होय. जो 'भूः, भुवः' इत्यादि सर्व लोकांना पहातो, तो सर्वदर्शी होतो व तोच सर्वरूप परमात्म्याला पहातो. हा विद्वान् सत्यादिलक्षण ब्रह्मामध्यें स्थित होऊन आपल्या मनाला निश्चल करितो. यास्तव सत्यादिलक्षण ब्रह्माला आत्मत्वानें जाणणारा पुरुष सर्व जाणतो. म्हणून तोच साक्षात् सर्वज्ञ आहे. केवल अनात्मदर्शी सर्ववित् होऊं शकत नाहीं. हे क्षत्रिया, वर सांगितलेल्या ज्ञानादि गुणांमध्यें स्थित असलेलाहि पुरुष सत्यामध्यें स्थित होऊन जें ब्रह्म पाहतो, तें वेदान्तश्रवणपूर्वकच पहातो. त्यावांचून त्याला ब्रह्मदर्शन होत नाहीं. अर्थात् केवल ज्ञानादिकांमध्यें स्थित झाल्यानेंच ब्रह्मदर्शन होईल, अशी आशा करूं नये. तर ज्ञानादि साधनांसह ब्रह्मामध्यें व सत्यामध्यें स्थित होऊन वेदान्तश्रवणादि करावें. त्याच्या योगानेंच ब्रह्मज्ञान होतें. आतां हे विद्वन्, वेदान्ताचा विचार कसा करावा तें मी तुला सांगतों. ५. ४. ४३.

---

## अध्याय ४४ वा.

[ १ ब्रह्मविद्येचें साधन जें ब्रह्मचर्य त्याचें सविस्तर निरूपण. २ ब्रह्मस्वरूपाचें निरूपण. ]

( १ ) याप्रमाणें आत्मज्ञानाचा मार्ग ऐकून त्याचें अंतरंग साधन जो योग त्याचें श्रवण करण्याच्या इच्छेनें धृतराष्ट्र म्हणतो—हे भगवन्, तूं ब्रह्माला प्राप्त करून देणारी अशी जी ही सर्व प्रकाशिका वाक् जाणतोस व जिचें ज्ञान

झालें असतां दुसरें कांहीं ज्ञातव्य उरत नाहीं, अशी अतिशय उत्कृष्ट व अतिशय दुर्लभ कथा मला सांग. हे सनत्सुजात, माझें हें वचन आज्ञारूप नसून प्रार्थनारूप आहे, असें तूं समज.

सनत्सुजात—हे राजा, मी ब्रह्मविद्येचा अधिकारी आहें, असें समजून तूं अतिशय हृष्ट होत आहेस व त्यामुळें मला ब्रह्मविद्या सांगण्याविषयीं आग्रह करीत आहेस. पण बाबारे, ब्रह्म असें त्वरेनें मिळत नसतें. ब्रह्मविद्या फार दुर्लभ आहे. तिच्यासाठीं जन्मच्या जन्म, साधनानुष्ठानांत घालविले पाहिजेत. निश्चयात्मिका बुद्धीमध्यें संकल्प-विकल्पात्मक मन विषयांपासून परावृत्त होऊन लीन झालें असतां तिचें चिंतन करावें लागतें व ती चिंतनानें प्राप्त होणारी विद्या ब्रह्मचर्यानेंच लाभणारी आहे.

धृतराष्ट्र—भगवन्, ही सनातन ब्रह्मविद्या म्ह० त्रिविध परिच्छेदशून्य ब्रह्माचें ज्ञान ब्रह्मचर्यानें प्राप्त होतें असें तूं सांगत आहेस. ती विद्या नित्यसिद्ध आहे. कारण प्रत्यगात्मा नित्य अपरोक्ष आहे. तशीच ती उत्पन्न होत नसून केवल अभिव्यक्त होत असते. कारण कर्माप्रमाणें ती आरंभयोग्य नसते. ती नित्यसिद्ध असल्यामुळें कार्यकालीं या आत्म्यामध्येंच स्थित होते. पण असें असतांना ब्राह्मणांना योग्य असलेलें अमृतत्व कसें प्राप्त होईल ? कारण जी वस्तु अगोदरच प्राप्त झाली आहे, तिच्या लाभासाठीं यत्न करावा लागत नाहीं. मग ब्रह्मविद्येला ब्रह्मचर्यादि अनुष्ठानाची काय अपेक्षा !

सनत्सुजात—हे राजा, मी तुला पुरातन ब्रह्मविद्या सांगतों. बुद्धिरूप उपाधीच्या संबंधामुळें मलिन झालेली ती विद्या दुर्बोध झाली आहे. तथापि ब्रह्मचर्यानें सिद्ध झालेली तीच विद्या मी तुला आत्मानात्मविवेकपूर्वक सांगतों. ज्या विद्येला प्राप्त होऊन ब्रह्मज्ञ पुरुष या मर्त्यलोकाचा त्याग करितात ती विद्या प्राचीन विद्वानांमध्यें नित्यसिद्ध असते.

धृतराष्ट्र—भगवन्, जी विद्या ब्रह्मचर्य या साधनानेंच साक्षात् जाणणें शक्य आहे, त्या ब्रह्मचर्याचें स्वरूप काय आहे तें मला सांगा.

सनत्सुजात—राजा, आचार्य या स्थानामध्यें प्रवेश करून जे गर्भभूत होत्साते ब्रह्मचर्याचें पालन करितात, ते याच लोकीं शास्त्रकर्तृत्वाला प्राप्त होऊन गुरूच्या अनुग्रहानें येथेंच ब्रह्मभावाला प्राप्त होतात. ते ब्रह्मरूप होतात, त्यांना पुनः या संसारांत यावें लागत नाहीं. जे या लोकीं सर्व कामांना जिंकून

शास्त्रज्ञानबलानें ब्राह्मी स्थितीला प्राप्त होतात, ते मुंजातृणांतून त्याच्या मध्यवर्ती असलेल्या कोमल तृणाला—ईषिकेला जसें पृथक् करितात, त्याप्रमाणें आत्म्याला देहाहून पृथक् करितात, ते सत्त्वामध्यें स्थित होतात. म्ह० हे राजा, प्रथम सर्व कामांचा त्याग करावा. नंतर ब्राह्मी स्थिति प्राप्त होण्यासाठीं द्वंद्वसहिष्णु व्हावें. नित्य सत्त्वस्थ व्हावें. म्हणजे मुंजा-ईषीकान्यायानें याच शरीरांत देह व आत्मा यांच्या विवेकाचें सामर्थ्य प्राप्त होतें.

हे भारता, माता व पिता हीं दोघें मिळून हें शरीर उत्पन्न करितात. पण आचार्यानें दिलेला जो जन्म, तो अतिशय पुण्यावह, अजर व अमर असतो. जो आचार्य सत्य वेदाक्षरांनीं दोन्ही कान भरून टाकितो, असत्य झालेल्या आत्म्यालाहि सत्य करितो व अमृतत्व प्राप्त करून देतो, अशा आचार्यालाच माता व पिता मानावें. सत्यब्रह्माचें प्रतिपादन करणाऱ्या वेदाक्षरांनींच शिष्याचे दोन्ही कान भरून सोडणाऱ्या आचार्यांचे उपकार स्मरणाऱ्या शिष्यानें त्यांचा कधींहि द्रोह करूं नये. शिष्यानें गुरूला नित्य अभिवादन करावें. शुचि व सावधान चित्त होऊन अध्ययन करण्याची इच्छा करावी. 'मी विद्वान् शिष्य असतांना गुरुगृहांतील हें तुच्छ कार्य कसें करूं ?' असा मान धारण करूं नये. एखादें कार्य करीत असतांना जरी अतिशय श्रम झाले तरी क्रुद्ध होऊं नये. हा ब्रह्मचर्याचा प्रथम पाद आहे.

सायंकालीं व प्रातःकालीं भिक्षेवर जीवन करणें व गुरूच्या अन्नावर उपजीविका न करणें हा शिष्यवृत्तीचा क्रम आहे. जो शिष्य शुचिर्भूत होऊन या क्रमानेंच विद्या संपादन करितो, त्याच्या ब्रह्मचर्याचा हाहि प्रथम पाद म्हटला आहे.

प्राण व धन या दोहोंचाहि व्यय करून शरीर, वाणी व मन यांनीं आचार्यांचें प्रिय करावें. तसेंच गुरूप्रमाणें गुरुपत्नीशींहि अत्यंत आदरानें वागावें. गुरुपुत्राशींहि तसेंच वर्तन ठेवावें. हा ब्रह्मचर्याचा दुसरा पाद होय.

आचार्यानें आपल्याला विद्यादान करून त्याचें प्रयोजन—दुःखनिवृत्ति व आनंदप्राप्ति संपादन करून दिली आहे, हे त्याचे उपकार जाणून; या आचार्यानें माझी अतिशय वृद्धि केली आहे, हें स्मरून विद्यासुखानें अतिशय हृष्ट होणारा शिष्य त्याचा अतिशय आदर करितो. यास्तव आचार्योपदेशानें विद्येला प्राप्त होऊन व विद्यासुखाचा अनुभव घेऊन शिष्य त्याचा जो सत्कार करितो, तोच ब्रह्मचर्याचा तिसरा पाद होय.

विद्येच्या निष्क्रयार्थ गुरूला धन-दानादि देऊन व त्याचें ऋण फेडून मग गुरुगृहांतून निवृत्त व्हावें. गुरूचें हें ऋण फेडल्यावांचून अन्य आश्रमामध्यें स्थिति करूं नये. म्ह० ब्रह्मचर्याश्रमांतून निवृत्त होऊं नये. पण 'मी गुरूला हें धनप्रदान करीत आहें' असेंहि विद्वान् शिष्यानें मानूं नये व तसें कोणापाशीं बोलूंहि नये. म्ह० शिष्यानें 'मी धनदानानें गुरूवर उपकार करीत आहें' असें मनांत आणूं नये, इतकेंच नव्हे तर वाणीनें तसे शब्दहि उच्चारूं नयेत.

या चतुष्पाद ब्रह्मचर्यानें चतुष्पदी विद्या प्राप्त होते. ती कशी म्हणून विचारशील तर सांगतों. हे राजा, शिष्य बुद्धिपरिपाकानें विद्येचा एक पाद प्राप्त करून घेतो व त्याचा अर्थ जाणतो. त्यानंतर गुरूंच्या सहवासानें त्याला विद्येचा दुसरा पाद प्राप्त होतो. बुद्धिवैभवानें त्याला विद्येचा तिसरा पाद प्राप्त होतो व सहाध्यायी विद्यार्थ्यांबरोबर शास्त्राचा विचार केल्यानें त्याला चतुर्थ पाद प्राप्त होतो. ( सनत्सुजातांनीं चार उपायांनीं विद्येचे चार पाद प्राप्त होतात, एवढेंच येथें सांगितलें आहे. कारण अन्य प्रमाणग्रंथांत आचार्यमुखानें शिष्याला एक अंश प्राप्त होतो, त्याच्या धारणाशक्तीनें त्याला दुसरा अंश मिळतो, कालानें तिसरा अंश व सतीर्थ्यांबरोबर शास्त्राची चर्चा केल्यानें त्याला चवथा भाग प्राप्त होतो, असें म्हटलें आहे. )

धर्मादि बारा गुण हें ब्रह्मचर्याचें स्वरूप आहे. आसन, प्राणायाम इत्यादि हीं त्यांचीं अंगें आहेत. ब्रह्मचर्याचे धर्म परिपालन करण्याचें सर्व सामर्थ्य आचार्यांच्या सहवासानेंच प्राप्त होतें, असें विद्वान् सांगतात. कर्म व ब्रह्म ह्या दोन प्रकारचा वेदार्थ ज्ञात झाल्यानेंच ब्रह्मचर्य फलद्रूप होतें.

याप्रमाणें 'मी ह्या गुरूवर उपकार करीत आहें' असा अभिमान न धरतां व त्या अभिमानाचें प्रकाशक वचन न बोलतां गुरूचा अर्थ संपादन करण्यासाठीं जो प्रवृत्त होतो, तो आचार्यांचा प्रसाद संपादन करितो. यास्तव शिष्यानें गुर्वर्थ संपादन करून तो गुरूलाच समर्पण करावा. त्यामुळें तो आचार्य अनेक गुणांनीं युक्त अशा सद्वृत्तीला प्राप्त होतो व दुसऱ्या अनेक शिष्यांचें पोषण करूं शकतो. शिष्यानें गुरुपुत्राशीं असेंच वर्तन ठेवावें. याप्रमाणें ब्रह्मचर्यामध्यें वास करणाऱ्या शिष्याची सर्व प्रकारें वृद्धि होते. त्याला अनेक पुत्र व प्रतिष्ठा यांची प्राप्ति होते. सव दिशा व उपदिशा त्याच्यावर धनाची वृष्टि करितात व याला अनेक ब्रह्मचारी प्राप्त होतात. म्ह० त्याच्यापाशीं अनेक विद्यार्थी येऊन रहातात व ब्रह्मचर्याचें पालन करितात.

या ब्रह्मचर्यानें देव देवत्वाला प्राप्त झाले आहेत. ब्रह्मचर्याच्या बलावरच महाभाग ऋषि ऋषित्वाला पोंचले आहेत. ‘ ब्रह्मचर्य ’ या साधनानेंच गंधर्वांसह अप्सरांना रमणीय स्वरूप प्राप्त झालें आहे. फार काय पण हे राजा, या ब्रह्मचर्याख्य व्रतानेंच सूर्य जगताला प्रकाशित करितो. धृतराष्ट्रा, चिंतलेली वस्तु देणाऱ्या चिंतामणीची इच्छा करणाऱ्या पुरुषांना त्यांना आकांक्षित असलेल्या मण्याची प्राप्ति झाली असतां जसा चिंतामणिभाव प्राप्त होतो, त्याचप्रमाणें हे देवादि ब्रह्मचर्य पाळून सत्यसंकल्पत्वाच्या योगानें चिंतित वस्तुप्रदत्वाला प्राप्त झाले आहेत. ( पारदाच्या एका विशिष्ट गुटिकेला चिंतामणि ही संज्ञा आहे. ) तो चिंतामणि चिंतित वस्तु देणारा आहे. कांहीं लोक त्याची आकांक्षा करितात व त्याची प्राप्ति झाली म्हणजे ते लोक इतरांना जसे इष्टार्थ देऊं शकतात—स्वतः चिंतामणितुल्य होतात, त्याचप्रमाणें ते देवादिकहि ब्रह्मचर्याच्या बलावर सत्यसंकल्प होतात व आपल्या भक्तांना इष्टार्थ देऊं शकतात.

हे राजा, जो पुरुष सर्व चतुष्पाद ब्रह्मचर्याचा आश्रय करितो व उग्र तपश्चर्या करून शरीराला पावन करितो, तो राग-द्वेषादिराहित्य या बाल्याला प्राप्त होतो किंवा उपनिषदांच्या अर्थाचें युक्तिपूर्वक अनुचिंतन करून तत्त्वनिश्चयाला प्राप्त होतो आणि या क्रमानें विद्वान् झालेला तो अंतकालीं मृत्यूला जिंकितो. यास्तव वर्तमान शरीराचा पात होईपर्यंत राग-द्वेषादिराहित्य एतद्रूप बाल्य, किंवा श्रुत वेदार्थाचें युक्तिपूर्वक अनुचिंतन करून तत्त्वनिश्चय करणें, एतद्रूप बाल्य यांचें यावज्जीव आचरण करावें.

हे क्षत्रिया, अविद्वान् लोक पुण्यकर्मांनें विनाशी लोकांना संपादन करितात, पण ‘ ब्रह्मच सर्वांचा आत्मा असल्यामुळें सर्व आहे, ’ अशा त्या सर्व ब्रह्माला जाणून विद्वान् स्वतःच सर्व होतो. त्याला कर्मानें प्राप्त करून घेण्यास योग्य असें कोणतेंच फल अवशिष्ट रहात नाहीं. अशा या ज्ञानावांचून मोक्षाला दुसरा मार्ग नाहीं.

( २ ) ‘ ज्ञानावांचून मोक्षाला दुसरा मार्ग नाहीं, ’ असें ऐकून धृतराष्ट्र एक क्षणभर आत्म्याचेंच अनुसंधान करीत राहिला, पण तो आत्म्याला प्राप्त झाला नाहीं, उलट अंतर्हृदयामध्यें नानावर्णांचे नाडीमार्ग पाहून सनत्सुजातास म्हणाला—“ हे भगवन्, सद्ब्रह्माचें रूप पहाण्याच्या इच्छेनें जर एखादा

पुरुष हृदयामध्यें त्याला पाहूं लागला, तर तो तें शुक्ल, रक्त, कृष्ण, अंजनासारखें कृष्णवर्ण, किंवा धूम्रवर्ण, असें त्याचें अनवस्थित स्वरूप पहातो. पण तें अमृत व अक्षर पद वस्तुतः कोणत्या स्वरूपाचें आहे !"

सनत्सुजात—राजा, तूं म्हणतोस तें खरें आहे. ब्रह्ममार्गामध्यें अशीं शुक्ल-लोहितादि रूपें दिसतात व तीं श्रुतहि आहेत. तथापि ब्रह्माचें स्वरूप पृथिव्यादि कोणत्याहि भूत-भौतिक पदार्थांमध्यें नाहीं. कारण तें शब्दादि सर्व विशेषांनीं रहित आहे. तथापि हीं शुक्लादि रूपें ब्रह्मप्राप्तीचीं चिह्नें आहेत. त्याचें स्वरूप अंतरिक्षांतहि नाहीं.

या संसारसागरांतील पंचभूतात्मक देहहि त्या परमात्म्याला धारण करूं शकत नाहीं. कारण जीवाप्रमाणें ब्रह्माला उपाधिजन्य दुःख नाहीं. किंवा समुद्राच्या जलांतहि ब्रह्मरूप नाहीं. राजा, रात्रीं आकाशांत दिसणाऱ्या विविध तारका, अभ्रामध्यें चमकणारी विद्युत्, वायु, देवता, चंद्र, सूर्य, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, शुद्ध सामांतील रथंतर, बार्हद्रथ व महाव्रतें, यांमध्येंहि त्याचें रूप दिसत नाहीं. कारण तें ब्रह्म नित्य आहे. त्याचें अतिक्रमण करून कोणालाहि रहातां येत नाहीं. अज्ञानरूप उपाधीहून तें अगदीं विलक्षण आहे. प्रलयकालीं सर्वभक्षक कालहि त्याच्या स्वरूपांत लीन होतो. त्याचें स्वरूप अतिशय सूक्ष्म आहे. तें क्षुरधारेप्रमाणें अतिशय तीक्ष्ण आहे, त्यामुळें तें दुर्लक्ष्य असून अति सूक्ष्मबुद्धीनेंच त्याचें ग्रहण करतां येतें. जसें तें सूक्ष्माहूनहि अतिसूक्ष्म आहे, तसें पर्वतादि महत्पदार्थांहूनहि अति महत् आहे. तेंच सर्वांचें अधिष्ठान आहे. तें अमृत—निर्विकार आहे. कारण एक विकार आपलें स्वरूप सोडून दुसऱ्या स्वरूपास प्राप्त झाला, म्हणजे त्याला मृत असें म्हणतात. परंतु तें तसें नाहीं, म्हणून अमृत. तेंच सर्व दृश्य आहे. तेंच बृहत् आहे व रमणीयहि तेंच आहे. उपादानभूत सुवर्णापासून जसे कुंडलादि अलंकार उत्पन्न होतात, त्याप्रमाणें परमात्म्यापासून हीं भूतें उत्पन्न झालीं आहेत व मृत्तिकेमध्यें लीन होणाऱ्या घटाप्रमाणें तीं ब्रह्मामध्येंच लीन होतात. यावरून ब्रह्माला जगत्कारणत्व आहे, हें सिद्ध होतें. श्रुतीनेंहि हेंच सांगितलें आहे. तें ब्रह्म द्वैतशून्य आहे. तथापि जगदाकारानें तेंच उदय पावलें आहे. तेंच महद्यश—अतिशय व्यापक व आकाशादिकांहूनहि महत् आहे. ब्रह्मज्ञ लोक केवळ वाणीनेंच विकारांचा उच्चार करितात. स्वरूपानें उच्चार करीत नाहींत.

कारण विकार वाङ्मात्र आहे. रज्जूमध्यें जसा सर्प, त्याप्रमाणें ज्यामध्यें हें सर्व जगत् प्रतिष्ठित आहे व रज्जुसर्पन्यायानें ज्यांत हें लीन होतें, तें अमृत—ब्रह्म आहे. त्याला जे जाणतात, ते मुक्त होतात. ५. ४. ४४.

---

## अध्याय ४५ वा.

[१ सनत्सुजात योगप्रधान ब्रह्मविद्या उपदेशितात.]

(१) सनत्सुजात—राजा, शोक, क्रोध, लोभ, काम, मान, परासुता—निद्रापरत्व, ईर्ष्या, मोह, विधित्सा, कृपा—स्नेह, असूया व जिगुप्सुता, हे पूर्वोक्त बारा महादोष मनुष्यांच्या प्राणांचा नाश करणारे आहेत. हे राजेंद्रा, हे दोष मनुष्यांचें पृथक् पृथक् सेवन करितात आणि ज्या पुरुषामध्यें त्यांचा प्रवेश झाला आहे त्याची बुद्धि मूढ—विवेकशून्य होते. तो दुःखरूप पापफलाला कारण होणारें कर्म आचरितो. स्पृहावान् पुरुष निर्दय होतो व दाता रूक्षवाक् होतो. तो याचकांना उद्देशून वृथा कठोर भाषण करितो. मनानें क्रोध धारण करणारा पुरुष आत्मश्लाघा करूं लागतो. हे सहा जन नृशंसधर्मांनीं युक्त असतात. ते अर्थाला प्राप्त झाले असतांनाहि कोणाचा संमान करीत नाहींत. १ संभोगसंविद्, २ विषमदृष्टि ठेवणारा, ३ अतिमानी, ४ दान देऊन आत्मश्लाघा करणारा, ५ कृपण, ६ दुर्बल, व ७ सर्वदा स्त्रीद्वेष करणारा, हे सात पापशील पुरुष नृशंस म्हटले आहेत.

धर्म, सत्य, तप, दम, अमात्सर्य, ह्री, तितिक्षा, अनसूया, दान, श्रुत, धैर्य व क्षमा हीं ब्राह्मणांचीं बारा व्रतें आहेत. जो ब्राह्मण या बारा व्रतांपासून कधींहि च्युत होत नाहीं, तो या सर्व पृथ्वीचें अनुशासन करितो.

---

१ चित्तवृत्तिनिरोधानें अगोदर 'त्वं'-पदार्थाला जाणून मागून वेदान्त-श्रवणादि उपायांनीं त्या 'त्वं'-पदार्थालाच ब्रह्मत्व आहे, असा निश्चय केला जातो. ही पहिली ब्रह्मविद्या होय. पण पूर्वी श्रवणादि-उपायांनीं प्रत्यगात्म्याचें ब्रह्मत्व परोक्षवृत्तीनें निश्चित करून मागून निदिध्यासनानेंहि प्रत्यगात्म्याचा ब्रह्मभाव साक्षात् जाणला जातो. ती दुसरी ब्रह्मविद्या आहे. या दोन्ही क्रमांचें फल व साधनें एकरूपच आहेत, हें सांगण्यासाठीं भगवान् सनत्सुजात पूर्वोक्तच हेयदोष व उपादेय गुण दाखवितात.

यांतील तीन, दोन, किंवा एका महाव्रतामध्येंहि ज्याचा पक्षपात असतो तो त्यासाठीं सर्वस्वाचा त्याग करितो. त्यामुळें त्याचें ‘ स्व ’ म्हणून कांहीं आहे, असें मानूं नये.

हे राजा, दम, त्याग व अप्रमाद, यांमध्यें अमृत स्थित आहे आणि ब्रह्म हेंच ज्यांचें मुख्य प्राप्य आहे, त्या विद्वान् ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणांच्या ठिकाणीं हीं बारा व्रतें असतात. ब्राह्मणांच्या विद्यमान किंवा अविद्यमान—खऱ्या किंवा खोट्या दोषांचें संकीर्तन करणें केव्हांहि विहित नाहीं. यास्तव जे लोक त्यांच्या दोषांचें संकीर्तन करितात ते नरकांत पडतात.

पूर्वीं सांगितलेला जो मद, त्याचे अठरा दोष आहेत व त्यांचें वर्णन पूर्वीं केलेंच आहे. दमाचे विरोधी म्हणून प्रातिकूल्यादि जे दोष सांगितले तेच मदाचे दोष आहेत, असें पूर्वीं सूचविलें आहे; पण हेच ते, असें म्हणून सांगितलेले नाहींत. यास्तव त्यांचेंच आतां संकीर्तन करितों.

१ परस्त्रीगमनादि, हें लोकांच्या द्वेषास पात्र होणारें कर्म, २ धर्मादिकांमध्यें विघ्न आणणें हें प्रातिकूल्य, ३ गुणिजनामध्यें दोषांचा आरोप करणें ही अभ्यसूया, ४ असत्य भाषण, ५ स्त्रियांचा अभिलाष, एतद्रूप काम, ६ क्रोध, ७ पारतंत्र्य, ८ निंदा, ९ राजद्वारादिकांमध्यें परदोष कथन, एतद्रूप पैशुन, १० नट-नर्तक-वेश्यादिकांच्या निमित्तानें किंवा दंडानें वित्तनाश, एतद्रूप अर्थहानि, ११ वैर, १२ मात्सर्य, १३ प्राणिपीडा, १४ ईर्ष्या, १५ मोद—दर्पाला कारण होणारा हर्ष, १६ अमर्याद वचन, एतद्रूप अतिवाद, १७ कार्याकार्यविवेकराहित्य हा संज्ञानाश व १८ सतत परद्रोहशीलता ही अभ्यसूयिता, हे मदाचे अठरा दोष आहेत. यास्तव बुद्धिमानानें केव्हांहि मत्त होऊं नये. आपत्कालींहि त्यानें त्या दोषांचा आश्रय करूं नये. कारण सज्जनांनीं या मदवत्त्वाची निंदा केली आहे.

हे राजा, सौहृदांमध्यें सहा गुण आहेत, असें जाणावें. सुहृदाचें प्रिय झालें असतां हृष्ट होणें, त्यांचें अप्रिय झालें असतां व्यथित होणें, हे सुहृदांचे दोन मुख्य गुण आहेत. जो दात्यापाशीं अयाच्य असलेल्याहि पुत्रादिकांची याचना करितो, त्या दीर्घकाल याचना करणाराला या दात्यानें अदेय असलेलेहि इष्टार्थ द्यावे. शुद्धचित्त पुरुष इष्ट पुत्र, वैभव व धन याचकाला देतो. ज्याला आपण आपलें सर्वस्व दिलें असेल त्याच्या गृहांत राहूं नये. मीं याच्यावर उपकार

केले आहेत, अशा बुद्धीनें तर तेथें कधींहि वास करूं नये. कारण त्यानें कधीं अनादर केल्यास स्नेहाचा भंग होतो. हा स्नेहाचा चवथा गुण आहे.

आतां पांचवा गुण कोणता तें सांगतों. सुहृद् स्वकर्मानें संपादन केलेल्या धनाचाच उपभोग घेतो. मित्रादिकांनीं संपादन केलेल्या धनावर कधींहि उपजीविका करीत नाहीं. कारण परधनावर उपजीविका केल्यास कदाचित् अपमान होण्याचा संभव असतो व स्नेहाचा भंग होतो, तो होऊं नये म्हणून हा सुहृद् स्वकष्टार्जित धनावर उपजीविका करितो.

आतां सहावा सुहृद्गुण सांगतात—मित्राच्या हितासाठीं सुहृद् आपल्या हिताचाहि नाश करितो. जो द्रव्यवान् गृहस्थ अशा गुणांनीं युक्त, म्ह० त्यागी—दाता, सात्त्विक—सत्त्वप्रधान होतो, तो श्रोत्रादि इंद्रियांच्या आकारांनीं परिणत झालेल्या पंचभूतांना शब्दादि भूतविषयांपासून निवृत्त करितो. स्वविषयापासून इंद्रियांना निवृत्त करणें हें समृद्ध व उत्कृष्ट केवल तप होय. तेंच ऊर्ध्वगति प्राप्त करून देतें. तें ज्ञानाप्रमाणें याच लोकीं कृतकृत्यता प्राप्त करून देत नाहीं, हें खरें, तथापि तें केवल तप अतिशय समृद्ध झालें असलें तरी वैराग्याच्या अभावीं धैर्यापासून च्युत होणाऱ्या त्याला दिव्य भोग देतें. त्यामुळें मी आतां दिव्य भोग भोगीन, अशा संकल्पानें समृद्ध झालेलें तें त्यांना ऊर्ध्वगति देतें.

सत्याचा निश्चय केल्यानें कांहीं साधकांचे यज्ञ मनानेंच सिद्ध होतात. कारण सत्यसंकल्पाचा निश्चय केल्यानें त्यांना सत्यसंकल्पत्व प्राप्त झालेलें असतें. याविषयीं वेदामध्यें ' त्रित '-नांवाच्या मुनीची कथा आलेली आहे.

त्रिताला त्याच्या भ्रात्यानें एका मोठ्या कूपामध्यें ढकलून दिलें असतां त्यानें तेथेंच सावधान चित्तानें सर्व यज्ञ संपादन केला. त्याविषयीं ' त्रितः कूपे अवहितः देवान् हवते ऊतये ' असा मंत्र आहे व त्यांत—' त्रित ' या नांवाचा मुनि कूपामध्यें राहूनच मनानें ध्यान करीत यज्ञसंततीसाठीं—यज्ञाचा विच्छेद होऊं नये म्हणून देवांचें आह्वान करता झाला, असें सांगितलें आहे. हा उत्तम अधिकाऱ्यांचा पक्ष होय.

दुसऱ्या मध्यम अधिकाऱ्यांचा यज्ञ, ब्रह्मयज्ञ, जप, इत्यादिरूप वाणीनेंच सिद्ध होतो. अनेक प्राकृत लोकांचा यज्ञ कर्मानें म्ह० आज्य, पशु, पुरोडाश इत्यादि-प्रधान क्रियेनेंच सिद्ध होतो. सगुण ब्रह्मज्ञानानेंच ज्यांचा संकल्प सिद्ध झाला आहे, अशा पुरुषापाशीं संकल्पशून्य चिदात्मा उपस्थित होतो. ज्याप्रमाणें

प्रसंगीं भृत्यापाशीं राजा उपस्थित होतो किंवा राजा त्याचा प्रेरक होतो, त्याप्रमाणें हा चिदात्मा सत्यसंकल्प पुरुषाचा अधिष्ठाता म्ह० प्रेरक होतो. शिवाय आणखी दुसरीहि गोष्ट मी तुला सांगतों ती ऐक. निर्गुण ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणाच्या विशेष प्रकारच्या संकल्पानेंच असंकल्प चिदात्मा अधिष्ठित होतो; कारण सगुणोपासकाच्या अपेक्षेनें निर्गुण ब्रह्मवेत्त्यामध्यें सत्यसंकल्पत्वादि अतिशय आविर्भूत होतात. हे राजा, हें योगशास्त्र शिष्यांना शिकवावें. त्यांच्याकडून त्याचें ग्रहण करवावें. कारण हें शास्त्र ब्रह्मप्राप्तीला हितकर आहे. याहून अन्य शास्त्रें हा केवल वाणीचा विकार आहे, असें विद्वान् लोक सांगतात.

या योगी पुरुषामध्यें हें सर्व जगत् प्रतिष्ठित आहे. हें सर्व त्याच्या अधीन आहे व हें जे जाणतात ते अमृत–मुक्त होतात. हे राजा, केवल पुण्यकर्मानें सत्य ब्रह्माची प्राप्ति होत नाहीं. अविद्वान् पुरुष जो होम किंवा याग करितो, त्या होम-यागात्मक कर्मानें तो मोक्षाला प्राप्त होत नाहीं व त्याला मरणोत्तर सुखहि होत नाहीं. एकान्तामध्यें शरीराच्या सर्व चेष्टा सोडून मनाचाहि व्यापार थांबवून ब्रह्माची उपासना करावी. ब्रह्मचिंतन हीच ब्रह्मोपासना होय. कोणी स्तुति केली तर संतुष्ट होऊं नये व निंदा केली तर क्रुद्ध होऊं नये. हे क्षत्रिया, याप्रमाणें क्रमानें वेदामध्यें पूर्वोक्त दृष्टि ठेवून जो रहातो, त्याला या जीवदवस्थेंतच–येथल्या येथेंच ब्रह्मदर्शन होतें. घट फुटतांच घटाकाश महाकाशांत जसें तादात्म्य पावतें, त्याप्रमाणें उपाधीचा विलय झाला असतां तत्त्ववेत्ता ब्रह्माशीं तादात्म्य पावतो. ५. ४. ४५.

---

## अध्याय ४६ वा.

[ १ आत्म्याचें स्वरूप व योगीच त्याला पाहतात, असें प्रतिपादन. ]

( १ ) **सनत्सुजात**—हे राजा, ब्रह्मवेत्ता ज्ञानयोगानें ज्याला पहातो व ज्याला जाणूनच ब्रह्मज्ञ अमृत होतात, तें तत्त्व शुक्र[1] म्हणजे शुद्ध–अविद्यादि दोषरहित, सर्वावभासक असल्यामुळें महज्जोति व देदीप्यमान महत् यश आहे. इंद्रादि देव ज्याची उपासना करितात व ज्याच्या तेजानेंच सूर्य विराजमान होतो, त्या परमात्म्याख्य सनातन पूज्य ब्रह्माला योगीच पाहूं शकतात. ज्ञान-

१ या अध्यायांत ब्रह्माला शुक्र, महज्जोति, महद्यश इत्यादि जीं विशेषणें दिलीं आहेत, तीं सर्व उपनिषदांतील आहेत.

योगानें रहित असलेले पुरुष त्याला पाहूं शकत नाहींत. त्या पूर्वोक्त शुद्ध-ब्रह्मापासून हिरण्यगर्भसंज्ञक ब्रह्म उत्पन्न होतें. शुद्ध ब्रह्मापासून उत्पन्न झालेलें हिरण्यगर्भाख्य ब्रह्म शुक्रानें म्हणजे विराड्रूपानें वृद्धि पावतें. तें शुद्ध ब्रह्म आदित्यादिकांकडून प्रकाशित न होतां आदित्यादिकांमध्यें स्वतःच प्रकाश पावतें. त्या आदित्यादिकांनाहि प्रकाशित करतें, म्ह० परमात्मा दुसऱ्या कोणाकडूनहि प्रकाशित होत नसून स्वयंप्रकाश व सर्वावभासक आहे. अशा त्या सनातन भगवानाला योगीच पाहूं शकतात. ज्ञानयोगरहित पुरुष पाहूं शकत नाहींत.

देशतः, कालतः, वस्तुतः अपरिच्छिन्न म्ह० पूर्ण असलेल्या परमात्म्यापासून जीवरूपानें पूर्णाचाच उद्धार करितात. म्ह० पूर्ण परमात्म्यापासून पूर्ण जीवात्माच उत्पन्न होतो. पूर्णापासूनच जीवाचा उद्धार—उद्भव झालेला असल्यामुळें विद्वान् या जीवस्वरूपालाहि पूर्णच म्हणतात. त्याचप्रमाणें जीवरूपानें अवस्थित असलेल्या पूर्णापासून देहेंद्रियादिकांमध्यें अनुप्रविष्ट झालेल्या पूर्ण आत्मस्वरूपाला देहेंद्रियादिकांहून पृथक् करून त्यांच्या सर्वांतर साक्षीला देहद्वयापासून उद्धरितात. त्यामुळें तें उद्धृत मूलभूत स्वरूप पूर्णानंदानें अवशिष्ट रहातें. म्ह० त्या पूर्णानंद ब्रह्माशींच संयुक्त होऊन चित्-सदानंद-अद्वितीय ब्रह्मरूपानें अवस्थित होतें. अशा त्या सनातन भगवानाला योगीच पाहूं शकतात. ( या वाक्यांत भगवान् सनत्सुजातांनीं ' पूर्णमदः पूर्णमिदम्० ' या श्रुतीचा अनुवाद केला आहे. बृ. भा. पृ. ५. १. १. )

प्रजापतीनें प्रथम परमात्म्यापासून ' आप ' उत्पन्न केलें. येथील ' आप ' हा शब्द भूतपंचकाच्या उपलक्षणार्थ आहे. अर्थात् ' आप ' या शब्दावरून उपलक्षित होणारी सर्व सूक्ष्म सृष्टि उत्पन्न केली. त्यानंतर त्या पूर्वसृष्ट ' आपा'-पासून सलिल-भूतपंचकात्मक स्थूल देहादिकांना उत्पन्न केलें. त्या स्थूल देहरूपानें अवस्थित असलेल्या सलिलाच्या मध्यवर्ती अंतरिक्षांत—हृदयाकाशांत दोघे तेजःस्वभाव जीव-परमात्मा रहातात. ते केवल हृदयाकाशाचाच आश्रय करून रहातात असें नाहीं, तर आग्नेयादि सहा उपदिशांसह प्राच्यादि सर्व दिशांना आच्छादित करणारे ते दोघे देव पृथ्वी व द्युलोक यांना धारण करितात. त्यांतील एक म्ह० जीव आपलें स्वाभाविक चित्सदानंद-अद्वितीय-ब्रह्मात्मतत्त्व न जाणतां देहादि अनात्म्यामध्यें आत्मभावाला प्राप्त होऊन भूतभौतिक-लक्षण कर्मफलानुरूप सुख-दुःखात्मक

देहादि पृथ्वीला धारण करितो व दुसरा देव द्योतनात्मक स्वात्मस्वरूपाला धारण करितो. [ सनत्सुजातांनीं येथें 'द्वा सुपर्णा०' या श्रुतीचाच अर्थ सांगितला आहे. मुं. भा. ३. १. १. ] जो स्वात्ममायेनें स्वात्म्यालाच प्राणादि अनंत भेदांनीं उत्पन्न करून व त्यांत प्रवेश करून त्यांना पहात रहातो, त्या भगवानाला योगीच पहातात.

राजा, इंद्रियाश्व ज्याचें कर्म अव्यय आहे, अशा ईश्वररूपानें अवस्थित झालेल्या जीवाला त्रैलोक्यस्वरूपानें अवस्थित असलेल्या, आपल्या शरीरामध्यें संचार करणाऱ्या-देहांत रहाणाऱ्या, प्रज्ञावान् म्हणूनच दिव्य-अप्राकृत, जरा-मरणादिशून्य, कधींहि उदय व अस्त न पावणाऱ्या द्योतनात्मक व पूर्णानंद अशा ब्रह्मामध्यें नेऊन पोंचवितात. म्ह० इंद्रियें स्वभावतःच विषयांमध्यें जरी रहात असलीं, तथापि बुद्धि-सारथ्याकडून आकर्षण केलीं जाणारीं तीं आत्मरूप जीवाला द्यूलोकांतील प्रज्ञावान् पुरुषालाच नेऊन पोंचवितात. ( याविषयीं कठवल्लींतील 'आत्मानं रथिनं विद्धि' हें रूपक पहा. का. भा. १. ३. ३. ) याप्रमाणें इंद्रियें तपाच्या योगानें जीवाला ज्या परमात्म्याला नेऊन पोंचवितात, त्या परमात्म्याला योगीच पहातात.

या परमात्म्याचें रूप दुसऱ्या कोणत्याहि वस्तूसारखें नाहीं. कारण याच्या-सारखें दुसरें कांहीं नाहींच. याविषयीं श्रुतीनेंहि 'ज्याचें नांव महद्यश आहे, त्याला दुसरी उपमाच नाहीं' असें म्हटलें आहे. यास्तव परमात्म्याचें रूप उपमानादिकांचा विषय होणारें नाहीं. त्याचप्रमाणें या सर्वांतर परमात्म्याला चक्षूनें कोणी पहात नाहीं. ( तर मग त्याला कसें पहातात म्हणून विचार-शील तर सांगतों. )

निश्चयात्मक बुद्धि, संकल्प-विकल्पात्मक मन व हृदय या साधनानें पुरुष त्याला पहातात. परमात्म्याची उपलब्धि हृदयावांचून होत नाहीं, हें सांग-ण्यासाठींच मीं येथें 'हृदयानें' असें म्हटलें आहे. किंवा केवल मन व बुद्धिच नव्हे, तर हृदयस्थ परमेश्वराकडूनहि अनुगृहीत होत्साते जे साधक याला पहातात, ते अमृत होतात. याप्रमाणें ज्याला जाणून योगी अमृत होतात, त्याला योगीच पाहूं शकतात.

राजा, इंद्रियांची विषयांमध्यें होणारी प्रवृत्ति अनर्थालाच कारण होते. कारण पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें, अकरावें मन व बारावी बुद्धि, यांतील

एकेकाला अनेक पुरुषांच्या अपेक्षेनें पूग—समूह असें म्हटलें आहे. असे हे बारा पूग, ते चलनशील व परमात्म्याकडून सुरक्षित आहेत. ते पूग मधाप्रमाणें मधुर असलेल्या विषयांचें असांकर्यानें नियमन करितात. म्ह० प्रत्येक इंद्रिय आपापल्या विषयाचा अनुभव घेतें. पुरुष जेव्हां विषयासक्त होऊन त्याचीं इंद्रियें विषयपरायण होतात, तेव्हां तीं घोर संसारामध्यें प्रवेश करितात. यास्तव इंद्रियांचा विषयांपासून उपसंहार करून त्यांना स्वात्म्यामध्येंच स्थिर करावें. ज्या परमात्म्याकडून नियमित झालेलीं हीं इंद्रियें सुरक्षित असतात, त्या देवाला योगीच पाहूं शकतात.

ज्याप्रमाणें मधुकर पंधरा दिवसांत संपादन केलेला मध अर्धा महिना प्राशन करितो, त्याप्रमाणें हा भ्रमणशील संसारी आपला संचित विषयरूप मध अर्धमासभर पीत रहातो. तो पूर्वजन्मामध्यें संपादन केलेलें कर्म अन्य जन्मामध्यें भोगितो.

धृतराष्ट्र—भगवन्, इहलोकींच फल देणाऱ्या कर्मांची फलसिद्धि संभवते. कारण तें फल कर्मानंतर लागलेंच मिळूं शकतें. पण परलोकीं फल देणाऱ्या कर्मांची फलसिद्धि कशी होणार ! कारण कर्माला विनाशित्व आहे.

सनत्सुजात—राजा, केवल कर्मापासूनच फलसिद्धि झाली असती, तर हा दोष संभवला असता. पण, परमेश्वर पुरुषानें जो धर्माचरणरूप प्रयत्न केलेला असतो, त्याच्या अपेक्षेनें म्ह० प्राणाग्निहोत्र व इतर कर्म यांस अनुसरून सर्व प्राण्यांमध्यें हविर्भूत अन्नादि कल्पितो. याप्रमाणें जो ईश्वर सर्व भूतांमध्यें अन्नादिकांची योजना करितो, त्याला योगीच पाहूं शकतात.

राजा, यावर तूं कदाचित् म्हणशील कीं, हें विषयरूप मधाचें प्राशन करणारे जीव सर्वदा भ्रमण करीतच रहातात, किंवा ज्ञानाला प्राप्त होऊन मुक्त होतात ? तर त्याचें उत्तर सांगतों, ऐक.

जे जीवभ्रमर ज्ञानपक्षरहित होऊन मधुभक्षण करीत परिवर्तन करितात, ते ज्याचीं पानें आपातरमणीय आहेत, अशा हिरण्यपर्ण अश्वत्थावर आरूढ होऊन—वेदसंयोगी ब्राह्मणादि देहास प्राप्त होऊन, त्याच ब्राह्मणादि देहांमध्यें पक्षयुक्त—ज्ञानी होतात व इष्टस्थानीं उडून जातात. त्यामुळें ते सुखानें मुक्त होतात. ज्याला जाणून पुरुष असे पक्षवान् व मुक्त होतात, त्याला योगीच पाहूं शकतात.

प्राण अपानाचा उपसंहार करितो व चंद्रमा—मन प्राणाचा उपसंहार करितो. त्या चंद्राला—मनाला आदित्य—बुद्धि गिळून टाकते व परब्रह्म आदित्याला—बुद्धीलाहि आपल्यामध्यें उपसंहृत करिते. पुरुष समाधिसमयीं अपानाचा प्राणामध्यें, प्राणाचा मनामध्यें, मनाचा बुद्धीमध्यें व बुद्धीचा परमात्म्यामध्यें उपसंहार करून स्वाभाविक चित्सदानंद अद्वितीय ब्रह्मरूपानें अवस्थित होतो. त्या सनातन भगवंताला योगीच पाहूं शकतात.

आतां सनत्सुजात परमात्म्याचें जीवरूपानें अवस्थान सांगतात—अविद्या व तिचें कार्य, यांचा नाश करितो म्हणून हंस—परमात्मा. तो हंस या भूतभौतिकलक्षण संसारसलिलाच्या बाहेरच राहून आपला जीवाख्य पाद वर उचलून घेत नाहीं; तर तो संसारांतील प्रत्येक व्यक्तीच्या प्रतिरूपच—प्रत्येक व्यक्तीसारखा—होऊन रहातो. तो आपला जीवाख्य पाद कां बरें वर उचलीत नाहीं ? म्हणून विचारशील तर सांगतों. त्या सतत गमन करणाऱ्या जीवाख्यपादाला जर त्यानें वर काढलें म्ह० तो हंस आपल्या मायेच्या योगानें स्वात्म्याला प्राणादि अनंत भेदयुक्त करून व त्यामध्यें जीवरूपानें प्रवेश करून जर अवस्थित न झाला तर मृत्यु जनन-मरणादि लक्षण अनर्थ हाच संसार सिद्ध होणार नाहीं. कारण तो जर जीवनरूपानें सर्व कार्यांमध्यें प्रविष्ट होऊन न राहिला, तर संसारी जीवांचाच अभाव होईल आणि संसारी जीवांचाच जर अभाव झाला तर जन्ममरणादिरूप अनर्थ कोठचा ! त्याचप्रमाणें अमृतत्व म्ह० मोक्षहि होणार नाहीं. कारण जो प्रविष्टच झाला नाहीं त्याच्या दर्शनाचा असंभव आहे. याप्रमाणें जो पादरूपानें जीवात्मा होतो व त्रिपादरूपानें सच्चिदानंद अद्वितीय ब्रह्मरूपानें अवस्थित होतो, त्या परमात्म्याला योगीच पहातात.

'तर मग कोणत्या उपाधीनें परमात्मा पादरूपानें अवस्थित होतो !' अशी आशंका घेऊन सनत्सुजात परमात्म्याचेंच लिंगोपाधिक जीवस्वरूप दाखवितात. तोच सच्चिदानंदाद्वितीय सर्व भूतान्तरात्मा, पूर्ण, पुरुष, परमात्मा अंतःकरणप्रधान लिंगशरीराशीं संबद्ध होऊन अंगुष्ठमात्र परिमाणानें परिच्छिन्न होत्साता नित्य संसार करितो. पण तो लिंगशरीरयोगानें अंगुष्ठमात्र होऊन संसार कां करितो, असें विचारशील तर तेंहि सांगतों—

जो लिंगयोगानें अंगुष्ठमात्र होऊन संसार करितो, जो स्तुत्य व सर्वांचा ईशिता सर्वांमध्यें प्रवेश करून—सर्व शरीरांना आत्मयुक्त करून प्रत्येक शरीरा-

मध्यें आत्मरूपानें विराजमान होणारा ईश, त्याला देहद्वयावर आत्माभिमान ठेवणारे अविवेकी मूढ पहात नाहींत आणि आत्म्याचा ब्रह्मभाव ज्ञात न झाल्यामुळें ते संसार करितात. ज्या आत्म्याला न जाणल्यामुळें अविवेकी संसार करितात, त्याला योगीच पाहतात.

[ आतां सनत्सुजात इंद्रियें व विषय यांचें अनर्थहेतुत्व दाखवितात—] ज्याप्रमाणें सर्प आपल्या बिळांतून बाहेर पडून व आपल्या विषप्रदानरूप व्यापारानें मर्त्यांना क्षीण करून पुनः आपल्या बिळांत जाऊन लपतात, स्वरूपाला आच्छादित करितात, त्याप्रमाणें इंद्रियरूप सर्प श्रोत्रादि बिळांमध्यें रहातात आणि त्या श्रोत्रादि छिद्रांतून बाहेर पडून मर्त्यांना विषयरूप विषाचें प्रदान करितात व त्या विषयविषप्रदानानें त्यांचा नाश करितात. हे राजा, हे इंद्रियरूपी सर्प आपापल्या बिळांत शिरून स्वतःला आच्छादित करितात. त्याप्रमाणें विषयविषानें व्याकुल झालेले जीव विशेषतः अविवेकी बनतात. विषयांहून अन्य कांहीं जाणत नाहींत. त्या इंद्रियांनीं दिलेले विषयरूप भोग मर्त्यांना पुनः पुनः मोहित करितात.

हा विषयमोह जीवांच्या गर्भ-जन्म-मरणादि संसाराला कारण होतो. ज्या आद्य शुद्ध परमात्म्याला न पाहिल्यामुळें विषयविषांध जीव मोहित होतात, त्याला योगीच पाहूं शकतात. हे राजा, मानवांतील जे शम-दमादि साधनांनीं रहित असतात व जे शमादि साधनांनीं युक्त असतात, त्या दोन्ही प्रकारच्या लोकांमध्यें आत्मस्वरूप एकसारखेंच प्रतीत होतें. त्याप्रमाणें मोक्ष व संसार या दोन्ही अवस्थांमध्यें अमृत—मोक्षहि समान असतो. पण त्यांतील जे शमादिसाधनंयुक्त असतात, ते त्या विष्णूच्या परम पदांतील मधाच्या पोळ्याला—पूर्णानंद ब्रह्माला—प्राप्त होतात. याप्रमाणें शमादि-साधनयुक्त लोक ज्या मधुनिधीला प्राप्त होतात, त्याला योगीच पाहूं शकतात.

तें पूर्णानंद ब्रह्म इहलोक व परलोक या दोन्ही लोकांना ब्रह्मात्मत्वविद्येनें व्यापून त्यांच्याहि पलीकडे रहातें, ज्या अर्थीं तें या दोन्ही लोकांना व्यापून अवशिष्ट रहातें, त्या अर्थीं या आत्मज्ञानानें पुरुषाचें अहुत अग्निहोत्र मुख्यवृत्तीनें हुत केल्यासारखें होतें; म्ह० आत्मज्ञानाच्या योगानें अग्निहोत्रादि सर्व कर्मफल संपादित होतें. ज्याअर्थीं या विद्येच्या योगानें पुरुष दोन्ही लोकांना व्यापून जातो आणि ज्याअर्थीं अहुत अग्निहोत्र हुत होतें, त्याअर्थीं हे राजा,

तुझी ब्रह्मविषयक विद्या तुला अग्निहोत्रादि कर्मांप्रमाणें लघुत्व म्ह० मर्त्यभाव न देवो.

जेव्हां पुरुष अज्ञानाख्य तमाहून अगदीं विलक्षण असलेल्या परमात्मरूप प्रज्ञानाला आत्मत्वानें संपादन करितो, तेव्हां ब्रह्मविद्येमध्यें व्यापृत असलेल्या व परमात्म्याला आत्मत्वानें जाणणाऱ्या या पुरुषाला प्रज्ञान व ब्रह्म असें नांव प्राप्त होतें. हे राजा, ज्ञानी पुरुषाला जें प्रज्ञान ब्रह्म प्राप्त होतें त्याला योगीच जाणतात.

जो प्रज्ञानैकरस ब्रह्मस्वरूप होऊन रहातो, तो आत्मा महान् होतो. सर्वांचा उपसंहार करणें, हें ज्याचें रूप आहे, त्या कारणासह सर्व कार्यांचा आत्मस्वरूपामध्यें उपसंहार करणारा जो त्या ज्ञानैकरसपूर्ण पुरुषाला साक्षात् जाणतो, त्या प्रज्ञानरूप परमात्म्याला आत्मत्वानें जाणणाऱ्या पुरुषाचा आत्मा याच देहामध्यें विनाश पावत नाहीं. कारण विद्वानाच्या उत्क्रांतीचा—मरणाचा अभाव सांगितलेला आहे. उत्क्रांतीच्या निमित्तानेंच विनाश होत असतो. सारांश, ज्याला जाणून आत्मविनाश होत नाहीं, त्या सनातन परमात्म्याला योगीच पहातात. तस्मात् जो अहर्निश मोठ्या आदरानें सच्चिदानंद अद्वितीय ब्रह्माला आत्मत्वानें जाणतो, तो सदा सत्कृत होतो, लोकांकडून त्याचा सत्कार केला जातो. त्याला मृत्यु—जन्म-मरणलक्षण संसार नाहीं, मग अमृत तरी कोठचें ! कारण अमृतत्व मृत्युसापेक्ष आहे. मृत्यूच्या अभावीं अमृतत्वाची प्राप्तिच संभवत नाहीं.

सत्य आणि अनृत हीं दोन्ही परमार्थ सत्य व एका अधिष्ठानाच्या आश्रयानें रहातात. रज्जूच्या आश्रयानें जसा सर्प रहातो, त्याचप्रमाणें लौकिक सत्य आणि असत्य हीं दोन्ही एका सद्रूप ब्रह्माच्या आश्रयानें रहातात. म्हणूनच एक अद्वितीय ब्रह्म सर्वकारण आहे, असेंहि म्हणतां येतें. ज्या आत्मतत्त्वाचें ज्ञान झाल्यानें मृत्यूचा विनाश होतो व ज्याच्या आश्रयानें सत्य व अनृत रहातात त्या परमात्म्याला योगीच पहातात.

आकाशादि-देहान्त जगत् उत्पन्न करून हृदयामध्यें प्रविष्ट झालेला हा अज चर व अचर भूतांचा आत्मा होतो. तो मनुष्यशरीरांतील अंगुष्ठमात्र हृदयामध्यें अभिव्यक्त होतो, पण स्वतःच्या सच्चिदानंद अद्वितीय स्वरूपानें कोठेंच प्रतीत होत नाहीं. जो अहर्निश निरलस व सावधान होऊन

पंच कोशापासून सर्वान्तर आत्म्याला पृथक् करितो, तो कृतार्थ पुरुष कवि—ज्ञानी होतो. त्याच्यापासूनच वायु उत्पन्न होतो व त्यांतच लीन होतो. त्याच्यापासूनच अग्नि व सोम हे देव प्रकट होतात व हा प्राणहि त्याच्यापासूनच उत्पन्न झालेला आहे. ब्रह्मच सर्वांचा आधार आहे. तेंच अमृत, तेच हे सर्व लोक, तेंच ब्रह्म व तेंच यश आहे. त्याच्यापासूनच हीं सर्व भूतें उत्पन्न झालीं व त्याच्यामध्येंच तीं सर्व लीन होतात. चंद्र व सूर्य हे दोन देव, पृथ्वी, द्युलोक, दिशा व हीं सर्व भुवनें यांस तें शुक्र—शुद्ध ब्रह्मच धारण करितें. त्याच्यापासूनच दशदिशा उत्पन्न झाल्या आहेत. गंगा, यमुना, सिंधु, सरस्वती, गोदावरी, कावेरी इत्यादि या सर्व नद्या, त्याच्याच सत्तेनें स्रवतात. त्याच्यापासूनच हे महासागर उत्पन्न झाले आहेत.

एखाद्या पुरुषानें आपल्याला सहस्रावधि पंख लावून जरी उड्डाण केलें व या कारणाचा अंत लावण्यासाठीं तो अनेक कोटी कल्प जरी उड्डाण करीत राहिला, तरी या सर्वकारण परमात्म्याचा त्याला अंत लागणार नाहीं. तो जरी मनासारखा वेग धारण करून सर्व दिशांमध्यें संचार करीत राहिला, तरी त्याला ब्रह्माची सीमा कळत नाहीं. यावरून हा परमात्मा अनंत आहे, असें सिद्ध होतें. अशा या सनातन अनंत परमात्म्याला योगीच पाहूं शकतात. या परमात्म्याचें स्वरूप इंद्रिय-विषयांमध्यें स्थित होत नाहीं. म्ह० तें अतींद्रिय आहे. तथापि यज्ञ-दान-तपोरूप कर्मांनीं ज्यांचें अंतःकरण शुद्ध झालेलें असून तें अग्नीप्रमाणें अतिशय दीप्त झालेलें असतें, तेच आपल्या सूक्ष्म व एकाग्र अंतःकरणानें त्याला साक्षात् जाणतात. ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी राग-द्वेषादि मलांनीं रहित व विशुद्ध सत्त्व होऊन एकाग्र मनानें त्या परमात्म्याला जाणावें.

जे साधनसंपन्न अधिकारी परमात्म्याला ' मीच तो आहें, ' असें आत्मत्वानें जाणतात ते अमृत—अमरण धर्मवान् होतात. जो शरीरेंद्रियादि-अभिमानानें युक्त असलेल्या सर्व भूतांमध्यें या सर्वान्तर आत्म्याला पहातो, तो सर्व भूतांमध्यें स्वात्म्याला पहाणारा विद्वान् कोणाला उद्देशून शोक करणार ! सर्व भूतांमध्यें आत्म्याला पहाणारा तो कृतार्थ होत असल्यामुळें कोणालाच उद्देशून शोक करीत नाहीं. ज्याप्रमाणें, जलानें परिपूर्ण असलेल्या फार मोठ्या जलाशयाचा लाभ झाल्यामुळें कृतकृत्य झालेल्या पुरुषाचें अन्य अल्प जलाशयामध्यें कांहीं प्रयोजन उरत नाहीं, त्याप्रमाणें सर्व भूतांमध्यें आत्म्याला पहाणाऱ्या ब्राह्मणाचें विशेषतः कांहीं प्रयोजन उरत नाहीं.

[ आतां सनत्सुजात पूर्वोक्त अर्थच दृढ करण्यासाठीं वामदेवादिकांप्रमाणें स्वानुभव सांगतात—] हे राजा धृतराष्ट्रा, मी तुमची माता—जननी आहें. पिताहि मीच आहें. तुझा दुर्योधनादि पुत्रहि मीच, फार काय पण प्राणिजाताचा आत्मा मीच आहें. सत् आणि असत् असें जें जें कांहीं आहे, त्या सर्वांचा मीच आत्मा आहें.

[ याप्रमाणें आधिभौतिक पित्रादिक मीच आहें असें सांगून सनत्सुजात मलाच आधिदैविक पित्रादिभाव आहेत असें दाखवितात—] हे राजा, मी वृद्ध पितामह आहें. इंद्रादिकांचा पितामह जो अनादि सिद्ध परमात्मा तोहि मीच आहें. जो इंद्रादिकांचा पिता हिरण्यगर्भ, तोहि मीच, तुम्ही सर्व माझ्याच स्वरूपामध्यें स्थित आहां. पण वस्तुतः तुम्ही माझ्या स्वरूपांतहि स्थित नाहीं व मीहि तुमच्या स्वरूपांत स्थित नाहीं. ( गी. भा. ९-४ पृ. ६८५ ). राजा, यद्यपि माझ्या स्वरूपांत तुम्ही नाहीं व मी तुजमध्यें नाहीं, तथापि माझा आत्माच सर्वांचा आशय आहे. जन्महि आत्माच आहे. म्ह० या आत्म्यापासूनच सर्व उत्पन्न झालें आहे. मीच तुमचा जनक सर्व जगामध्यें ओतप्रोत भरून राहिलों आहें. मीच अजरप्रतिष्ठ—जरामरणशून्य स्वस्वरूपांत स्थित आहें. मी स्वतः अज असून चराचर भूतांचा आत्मा आहें. मी अहोरात्र—अहर्निश निरलस होऊन आपल्या नित्य चैतन्यरूपानें राहिलों आहें. मी सूक्ष्माहूनहि सूक्ष्म आहें. माझें मन शोभन—रागद्वेषादि धर्मरहित आहें. त्यामुळेंच मी सुमना—ज्याचें मन सच्चिदानंद अद्वितीय ब्रह्माकार झालें आहे, असा असून सर्व भूतांच्या हृदयकमलामध्यें स्थित आहें.

राजा, माझाच हा असा अनुभव आहे, असें नाहीं. तर सनक-सनंदन-वामदेवादि अन्य ब्रह्मवेत्तेहि या परमात्म्याला सर्व भूतांचा पिता व सर्व प्राण्यांच्या हृदयपुंडरीकामध्यें स्थित असलेला पहातात. तेहि मजप्रमाणेंच परमात्म्याला आत्मत्वानें जाणतात व याविषयीं बृहदारण्यक, ऐतरेय, तैत्तिरीयक, छान्दोग्य, तलवकार इत्यादि अनेक उपनिषदांमध्यें अनेक विद्वानांचाहि असाच अनुभव वर्णिला आहे. यास्तव तूंहि विद्वानांच्या मार्गाचें अनुवर्तन कर. ५. ४. ४६.

येथें चवथें सनत्सुजातपर्व समाप्त झालें.

---

## यानसंधिपर्व ५.



### अध्याय ४७ वा.

[ १ राजसभेंत पांडवांना भेटून आलेल्या सूताला पहाण्याच्या इच्छेनें राजांचें आगमन. २ सूताचें सभेंत आगमन. ]

(१)**वैशंपायन**—जनमेजया, याप्रमाणें प्रासंगिक अध्यात्मविषय सांगितला. आतां प्रस्तुत कथानकाला आरंभ करितों, ऐक—अशाप्रकारें सनत्सुजात व ज्ञानी विदुर यांच्याशीं संभाषण करण्यांत राजा धृतराष्ट्राची ती रात्र निघून गेली. दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं कौरवांकडील सर्व राजांनीं संजयाला भेटण्याच्या इच्छेनें सभागृहांत हृष्ट चित्तानें प्रवेश केला. ते सर्वहि नृपाल पांडवांचा धर्मार्थयुक्त संदेश ऐकण्याविषयीं उत्सुक झाले होते. योग्य वेळीं धृतराष्ट्रप्रमुख सर्व राजे त्या शुभ राजसभेंत आले.

ती सभा विस्तीर्ण व शुभ्रवर्ण असून सुवर्णमय अंगणानें युक्त होती. त्या सभेंतील प्रकाश चंद्राच्या प्रभेप्रमाणें आल्हादकारक होता. तेथें चंदनोदकाचें सिंचन केलें होतें. त्या सभेंत रत्नजडित सुवर्णाचीं, हस्तिदंताचीं व काष्ठाचीं सुंदर आसनें सर्वत्र सुव्यवस्थित मांडलीं होतीं आणि त्यांवरून मूल्यवान् वस्त्रांचीं आस्तरणें घातलीं होतीं.

अशा त्या प्रेक्षणीय श्रेष्ठ सभेंत भीष्म, द्रोण, कृप, शल्य, कृतवर्मा, जयद्रथ, अश्वत्थामा, विकर्ण, सोमदत्त, बाल्हिक, महाप्राज्ञ विदुर व महारथ युयुत्सु या सर्व शूर पार्थिवांनीं धृतराष्ट्राला पुढें करून प्रवेश केला. त्याचप्रमाणें दुःशासन, चित्रसेन, शकुनि, दुर्मुख, दुःसह, कर्ण, उलूक व विविंशति हे सर्व अमर्षी कुरुराज दुर्योधनाला पुढें करून इंद्रसभेंत प्रवेश करणाऱ्या देवांप्रमाणें त्या शुभ सभेंत गेले.

हे राजा जनमेजया, त्या सर्व वीरांचे परिघासारखे दीर्घ बाहु होते, त्या शूरांनीं प्रवेश केला असतां ती सभा सिंहांनीं व्यापलेल्या गिरिगुहेप्रमाणें शोभली. ते सर्व सभासद सूर्यासारखे तेजस्वी व महाबलाढ्य होते. त्या धनुर्धरांनीं सभेंत प्रवेश करून आपापलीं चित्रविचित्र आसनें सुशोभित केलीं.

याप्रमाणें ते सर्व राजे आसनांवर विराजमान झाले असतां द्वारपालानें तेथें येऊन संजयाचें आगमन निवेदन केलें.

(२) द्वारपाल—हे प्रभो, सिंधुदेशांतील शीघ्रगामी अश्वांनीं युक्त असलेला जो रथ पांडवांकडे गेला होता, तोच हा रथ मोठ्या त्वरेनें इकडे येत आहे. त्यावरून आपला दूत संजयच येत आहे, यांत संशय नाहीं.

इतक्यांत रथ तेथें येऊन पोंचला व कुंडलें धारण करणाऱ्या संजयानें तत्काल रथांतून खालीं उडी टाकून महात्म्या महीपालांनीं पूर्णपणें व्यापलेल्या सभेंत प्रवेश केला.

**संजय**—हे कौरवहो, मी पांडवांकडे जाऊन परत आलों आहें, असें समजा. पांडुपुत्रांनीं सर्व कौरवांचें यथावय व यथाक्रम अभिनंदन केलें आहे. वृद्धांना अभिवादन केलें आहे. सुहृदांना सुहृदांप्रमाणें विचारलें आहे. तरुणांना यथान्याय सत्कार करून आशीर्वाद सांगितले आहेत. आतां मी येथून जातेवेळीं धृतराष्ट्रानें मला जसा उपदेश केला होता, त्याप्रमाणेंच मी पांडवांकडे जाऊन बोललों. तें सर्व तुम्हांला सांगतों, ऐका. ५. ५. ४७.

---

## अध्याय ४८ वा.

[ १ संजयाला धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयाचें दुर्योधनाला संबोधून अर्जुनाच्या भाषणाचें निवेदन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, उदार अंतःकरणाचा धनंजय काय म्हणाला तें मी तुला या राजसभेमध्यें विचारीत आहें. तो महात्मा युद्धांचा प्रणेता व दुर्जनांचें जीवित हरण करणारा आहे.

**संजय**—हे राजन्, युद्धेच्छु महात्मा अर्जुन युधिष्ठिराच्या अनुमतीनें केशवाच्या समक्ष जें वचन बोलला तें मी सांगतों. दुर्योधनानें तें ऐकावें. आपलें बाहुबल जाणणारा, निर्भय व युद्धाची इच्छा करणारा किरीटी वासुदेवाच्या समक्ष मला म्हणाला कीं, हे सूता, कौरवांच्या सभेंत दुर्योधनाला तूं माझा असा निरोप सांग. त्याचप्रमाणें मंदबुद्धि अतिमूढ कर्ण सदैव माझ्याशीं युद्धाची इच्छा करीत असतो. कालानेंच त्याचें आयुष्य भरत आलें आहे. यास्तव तो दुर्भाषण करणारा दुरात्मा सूतपुत्र ऐकत असतांना तूं माझा हा संदेश दुर्योधनाला कथन कर. तसेंच पांडवांशीं युद्ध करण्याकरितां इतरहि जे राजे बोलावून आणिले आहेत, ते ऐकत असतांना अमात्यांसह त्या धार्तराष्ट्राला माझें हें वचन निवेदन कर.

हे राजन्, वज्रधर देवराज इंद्राचें वचन ऐकणाऱ्या समग्र देवांप्रमाणें पांडव आणि सृंजय यांनीं धनंजयाचें हें ओजस्वी भाषण श्रवण केलें. गांडीवधारी युद्धोत्सुक अर्जुन बोलत असतां त्याचे नेत्र तांबड्या कमलपत्राप्रमाणें आरक्त झाले होते.

पार्थ म्हणाला—आजमीढकुलोत्पन्न राजा युधिष्ठिराचें राज्य दुर्योधन जर परत न देईल, तर ज्या पूर्वकर्मांचें फल अद्यापि भोगलें नाहीं, असें या धार्तराष्ट्राचें पातक शिल्लक आहे, असेंच म्हणावें लागेल, यांत संशय नाहीं. कारण भीमार्जुन, नकुल-सहदेव, वासुदेव, सात्यकि, धृष्टद्युम्न, शिखंडी आणि जो केवल संकल्पानेंच स्वर्ग व पृथ्वी दग्ध करण्यास समर्थ आहे, असा इंद्रतुल्य युधिष्ठिर यांच्याशीं युद्ध करण्याची जर दुर्योधन इच्छा करीत असेल, तर पांडवांची सर्व अर्थसिद्धि झालीच, म्हणून समजावी. युद्धांत सर्व कौरवांचा संहार करून समग्र पृथ्वीचें राज्य पांडव संपादन करतील. त्यापेक्षां युद्ध न करतां त्यांचें न्याय्य अर्धें राज्य त्यांना देणेंच हितावह आहे. तरीहि तूं पांडवांच्या स्वार्थासाठीं युद्धाला प्रवृत्त होऊं नको. परंतु तुला जर अर्धें राज्य देणें रुचत नसेल, तर खुशाल युद्धाला उभा रहा.

धर्मशील युधिष्ठिर वनवासाला गेला असतां, त्यानें वनांत जसें दुःख भोगलें, तसेंच दुःख युद्धांत मरण आलें असतां गतप्राण झालेल्या दुर्योधनाला प्राप्त होवो. ह्री, ज्ञान, तप, दम, शौर्य, धर्मरक्षण व धन यांनीं युक्त असलेल्या धर्मराजावर हा अन्यायानें वागणारा दुरात्मा दुर्योधन प्रभुत्व गाजवीत आहे.

युधिष्ठिर प्रणिपात, आर्जव, तप, दम, धर्मरक्षण इत्यादि बलानें जरी संपन्न आहे, तरी तो कपटानें फसला जातो. सत्यनिष्ठ असलेला हा आमचा राजा दीर्घकाल क्लेश भोगीत असतांहि ते तितिक्षेनें सहन करीत आहे. परंतु हा जितेंद्रिय ज्येष्ठ पांडव आपला फार वर्षें नियमन केलेला क्रोध जेव्हां प्रकट करील व त्या घोर क्रोधाग्नीचा कौरवांवर वर्षाव करील, तेव्हां त्या मूढमति धार्तराष्ट्राला युद्धाचा पश्चात्ताप होईल. ज्याप्रमाणें ग्रीष्म-ऋतूमध्यें प्रदीप्त झालेला अग्नि तृणाला जाळतो, त्याप्रमाणें युधिष्ठिर आपल्या क्रोधानें दीप्त झालेल्या नुसत्या दृष्टिक्षेपानेंच दुर्योधनाचें सैन्य दग्ध करील.

हा भयंकर वेगवान् असलेला भीमसेन अतिशय अमर्षी आहे. हातांत गदा घेऊन जणुकाय क्रोधरूपी विषाचें वमनच करणारा तो रथस्थ वृकोदर जेव्हां

दुर्योधनाच्या दृष्टीं पडेल, तेव्हां त्या धार्तराष्ट्राला या युद्धाविषयीं पश्चात्ताप होईल. ज्यावेळीं आयुधांनीं सज्ज झालेला भीमसेन सैन्याच्या अग्रभागीं स्थित होऊन शत्रुसैन्याचा अंतकाप्रमाणें संहार करील, तेव्हां त्या दुर्योधनाला माझ्या या वचनाचें स्मरण होईल.

त्याचप्रमाणें भीमसेनानें पर्वतशिखराप्रमाणें प्रचंड गजांचा निःपात केला असतां कुंभांतून वहाणाऱ्या जलाप्रमाणें त्यांच्या भग्न झालेल्या गंडस्थलांतून रक्ताचा प्रवाह वहात आहे, असें जेव्हां दुर्योधनाच्या दृष्टीं पडेल व गायींच्या कळपांत शिरणाऱ्या महासिंहाप्रमाणें भीमस्वरूपी भीमसेन हातांत गदा घेऊन धार्तराष्ट्राच्या सैन्यांत प्रवेश करून त्याचा वध करील, तेव्हां त्या गर्विष्ठ दुर्योधनाचे नेत्र उघडतील.

ज्यावेळीं कृतास्त्र भीमसेन महाभय उत्पन्न झालें असतां निर्भयपणें युद्धांत शत्रुसैन्यांचें मर्दन करील, त्यावेळीं तो वीर एका रथानें अप्रतिम रथौघ व पदातीचे संघ यांचा गदाप्रहारानें नाश करून टाकील. हा महाबाहु कौंतेय हत्तींच्या गळ्यांत व पायांत पाश घालून त्यांना मृत्यूप्रमाणें ओढील आणि परशूनें जसें वन कापावें, तसा धार्तराष्ट्राच्या सैन्याचा छेद करील. तो पराक्रमी वायुनंदन अग्नीनें दग्ध केलेल्या तृणगृहमय ग्रामांप्रमाणें धृतराष्ट्रपुत्रांची आणि विद्युल्लतेनें दग्ध होणाऱ्या पिकलेल्या शेताप्रमाणें विपुल सैन्याची वाताहात उडवील; त्याचप्रमाणें आपल्या प्रमुख योद्धयांचा वध झाल्यामुळें प्रगल्भ योद्धयांच्या अभावीं सर्व सैनिक भयार्त होऊन युद्धपराङ्मुख होतील, तेव्हां भीमसेनाच्या शस्त्राग्नीनें दग्ध झालेलें आपलें सैन्य पाहून दुर्योधनाला या युद्धाचा पश्चात्ताप होईल.

हा नकुल विचित्र युद्ध करण्यांत कुशल आहे. तो दोन्ही हातांनीं शरसंधान करितो. तो माद्रेय जेव्हां दोन्ही बाजूला प्रमुख रथ्यांचा ढीग रचील, तेव्हां हा धार्तराष्ट्र सावध होईल. अरे, सर्वथा सुखार्ह असलेल्या या नकुलानें दीर्घकाल वनांतील क्लेशकर कठिण शय्येवर मोठ्या दुःखानें शयन केलें आहे. तो वीर क्रुद्ध सर्पाप्रमाणें जेव्हां विषाचें वमन करील तेव्हां धार्तराष्ट्राला या युद्धाचा दुष्परिणाम कळून येईल.

हे सूता, धर्मराजानें युद्धासाठीं बोलाविलेल्या ज्या पार्थिवांनीं आपले प्राण त्यास अर्पण केले आहेत, ते सर्व नृपाल शुभ्र रथांतून कौरवसैन्यावर चाल

करून येत आहेत, असें जेव्हां पाहील, तेव्हां दुर्योधन या युद्धाविषयीं पश्चात्ताप पावेल.

हे संजया, त्याचप्रमाणें हे प्रतिविंध्यादि द्रौपदीचे पांच पुत्र कृतास्त्र आहेत. ते कुमार जरी बाल असले, तरी त्यांचा पराक्रम प्रौढासारखा आहे. ते शूर आपले प्राण टाकून कौरवांवर जेव्हां धांवून जातील, तेव्हां दुर्योधनाला युद्धाचा अनुताप होईल.

ज्यावेळीं हा वध करण्यास उद्युक्त झालेला सहदेव सुवर्णाच्या दीर्घ तंतूंनीं बनविलेल्या आणि शिक्षित व वेगवान् अश्वांनीं युक्त अशा निःशब्द रथांत बसून आपल्या शरौघानें राजांच्या मस्तकांचा छेद करील, आणि समरांगणांत महाभय उत्पन्न झालें असतां कृतास्त्र असलेला तो माद्रीपुत्र रथांत बसून सर्व दिशांमध्यें धांवून जात असलेला दिसेल, तेव्हां त्याला या युद्धाचा पश्चात्ताप होईल. संजया, हा सहदेव अकार्याविषयीं लज्जा बाळगणारा, शस्त्रनिपुण सत्यवादी, महाबलाढ्य सर्व धर्मांनीं युक्त, चपल व शरवृष्टि करण्यांत निष्णात आहे. तो शूर माद्रीनंदन शकुनीवर चालून जात असतां, अनेकांचा संहार करील.

त्याचप्रमाणें हे द्रौपदेय महाधनुर्धर, शूर व रथयुद्धांत प्रवीण आहेत. ते जेव्हां विषारी घोर सर्पांप्रमाणें समरांत दुर्योधनाच्या दृष्टीं पडतील, तेव्हां त्याला या युद्धापासून होणारे अनर्थ दिसून येतील.

हा अभिमन्यु कृष्णतुल्य अस्त्रवेत्ता आहे. शत्रूंच्या वीरांचा संहार करणारा हा सौभद्रेय मेघाप्रमाणें शत्रूंवर शरवृष्टि करील. हा सुभद्रापुत्र बाल जरी असला तरी त्याचा पराक्रम एखाद्या प्रौढ वीरासारखा आहे. तो इंद्रतुल्य कुमार जेव्हां शत्रुसैन्यावर मृत्यूसारखी झडप घालील, तेव्हां दुर्योधन या युद्धाविषयीं पश्चात्ताप पावेल.

हे सूता, 'प्रभद्रक' नांवाचे यादवकुमार सिंहासारखे पराक्रमी आहेत. ते युद्धविशारद असून अतिशय शीघ्रगामी आहेत. ते दुर्योधनाच्या सैन्याला उधळून देतील. तसेच हे दोघे वृद्ध महारथ विराट व द्रुपद पृथक् पृथक् सैन्यांनीं कौरवांचा त्यांच्या सैन्यासह पराभव करतील. द्रुपदराजा अस्त्रनिपुण आहे. तो रथारूढ होऊन आपल्या बाणांनीं शत्रूंच्या तरुण योद्ध्यांचीं मस्तकें तोडून त्यांचा ढिग रचील आणि हा परवीरांचा संहार करणारा विराट

आपल्या सदाचरणी मत्स्यसेनेसह शत्रुसैन्यांत प्रवेश करून त्यांचें मर्दन करील, त्यावेळीं दुर्योधनाच्या डोळ्यांत प्रकाश पडेल.

मत्स्यराजाचा ज्येष्ठ पुत्र मोठा सज्जन आहे. तो विराटपुत्र पांडवांसाठीं सज्ज होऊन समरांगणांत जाईल व युद्धाच्या अग्रभागीं जेव्हां दुर्योधनाच्या दृष्टीं पडेल, तेव्हां दुर्योधनाची युद्धाची हौस पूर्ण होईल.

कौरवांचा श्रेष्ठ योद्धा जो शान्तनव भीष्म त्याचा युद्धामध्यें शिखंडीच्या हातून पराभव झाला असतां आमचे शत्रु निःसंशय जिवंत रहाणार नाहींत, हें मी तुला सत्य सांगतों. कवच चढवून सज्ज झालेला शिखंडी योद्धयांचीं शिरकमलें तोडून त्यांच्या राशी पाडील व आपल्या रथाच्या दिव्य अश्वाच्या पदाघातांनीं अनेक रथौघांना तुडवून टाकीत भीष्मावर जेव्हां चाल करून जाईल, तेव्हां दुर्योधनाचा दर्प उतरेल.

बुद्धिमान् द्रोणाचार्यानें ज्याला गुह्य अस्त्रविद्या दिली आहे, त्या धृष्टद्युम्नाला जेव्हां दुर्योधन सृंजयांच्या सैन्याच्या अग्रभागीं पाहील, आणि तो अप्रमेय सेनापति शरांनीं कौरवांना विद्ध करीत द्रोणावर चाल करून जाईल, तेव्हां त्या सुयोधनाला युद्धाविषयीं खेद होईल.

हे संजया, ह्रीमान्, बुद्धिमान्, बलवान्, मनस्वी, लक्ष्मीवान् आणि सोमकांमध्यें श्रेष्ठ, असा वृष्णिसिंह वासुदेव ज्याचा अग्रणी आहे, अशा अजातशत्रूला कोणताहि शत्रु सहन करण्यास समर्थ नाहीं. तस्मात् तूं दुर्योधनाला जाऊन सांग कीं, तूं राज्याची इच्छा करूं नको. कारण सात्यकीसारखा अद्वितीय युद्धमंत्री आमच्या पक्षाला लाभला आहे. त्याच्यासारखा निपुण मंत्री जर आमच्या बाजूला नसता, तर कदाचित् तुमचा जय संभवला असता. तो शिनीचा नप्ता महाबलाढ्य, निर्भय व परम अस्त्रवेत्ता आहे. अशाप्रकारचा तो शत्रुमर्दक सात्यकि मेघाप्रमाणें शरांची वृष्टि करून शत्रूंच्या प्रमुख वीरांना जेव्हां आच्छादून टाकील, तेव्हां धार्तराष्ट्राला या युद्धाचा पश्चात्ताप होईल.

तो दीर्घबाहु धनुर्धर युद्धाचा निश्चय करून जेव्हां रणांगणांत जाईल, तेव्हां सिंहाचा वास येतांच गायींचा कळप जसा इतस्ततः भ्रमण करूं लागतो, तसें सर्व शत्रु रणांतून पळ काढतील. तो महात्मा शिनींचा अधिप गिरींचा भेद व सर्व लोकांचा संहार करणारा आहे. तो क्षिप्रहस्त तेजस्वी वीर स्वर्गांत स्थित असलेल्या सूर्याप्रमाणें भासतो. श्रीकृष्णाजवळ विस्मयकारक, सूक्ष्म, रमणीय व

योग्यप्रकारें शिक्षित घेतलेली अशी अद्भुत अस्त्रविद्या आहे. परंतु या सर्व गुणांनीं युक्त असलेला हा कृष्णाचा अस्त्रलाभ सात्यकीनेंहि प्राप्त करून घेतलेला आहे. अशा प्रकारचा युद्धविशारद सात्यकि जेव्हां आपल्या चार शुभ्र अश्वांनीं युक्त असलेल्या सुवर्णमय रथांत बसून रणांगणांत जाईल, तेव्हां त्याचा तो रथ दृष्टीं पडला म्हणजे तो मंदमति दुर्योधन शोकसंतप्त होईल.

माझा हा रत्नजडित सुवर्णाचा रथ शुभ्र अश्वांनीं युक्त होऊन जेव्हां रणांत प्रवेश करील व उग्र कपिध्वजानें शोभणारा तो माझ्यासह केशवानें अधिष्ठित आहे, असें दृष्टीं पडेल आणि मी त्या महायुद्धांत गांडिवधनुष्यावर गुण चढविला असतां त्याचा वज्रतुल्य टणत्कार कानीं पडेल, तेव्हां तो दुर्मति व हीन सहायानें संपन्न असलेला मूढ दुर्योधन 'नको हें युद्ध' असें म्हणूं लागेल!

ज्याप्रमाणें मेघांपासून घोररूप विद्युत्स्फुलिंग इतस्ततः पसरावे, त्याप्रमाणें माझ्या गांडिव धनुष्यापासून तीक्ष्ण बाण अविच्छिन्न धारारूपानें समंततः पसरत आहेत व ते सहस्रशः शत्रूंच्या मर्मांचा छेद करीत आहेत, गांडिवाच्या प्रत्यंचेपासून वेगानें सुटणारे बाण अश्व, गज व कवचें चढविलेले पदाति यांचें जीवन हरण करीत आहेत असें पाहील, त्यावेळीं त्या दुर्बुद्धि दुर्योधनाला त्याचें जीवितहि नकोसें होईल. ज्यावेळीं तो मंदबुद्धि कौरव त्याच्या वीरांनीं सोडलेल्या तीक्ष्ण बाणांचा माझे उग्र शर छेद करीत आहेत व मीं आपल्या हस्तलाघवानें परतविलेले शत्रूंचे बाण उलट शत्रुसैन्यांत प्रवेश करून त्याचाच नाश करीत आहेत, असें पाहील आणि पक्षी वृक्षाग्रावरून जशीं फळें पाडवितात, त्याप्रमाणें माझ्या हातांतून सुटलेले 'विपाठ' बाण कौरवसैन्यांतील तरुण वीरांच्या मस्तकांच्या राशी पाडीत आहेत असें त्याच्या दृष्टीं पडेल तेव्हां त्या गांधारीपुत्राला स्वतःचें सर्व दुष्कृत्य आठवेल.

रथ, अश्व व महागज, यांवर आरूढ झालेल्या महायोद्ध्यांना मीं आपल्या तीक्ष्ण बाणांनीं रणांगणांत लोळविलें आहे, हें पाहूनच तो दुरात्मा देहभान विसरेल! मीं भात्यांतून बाहेर काढलेलें दिव्य अस्त्र पाहूनच पळ काढणाऱ्या धृतराष्ट्रपुत्रांना जेव्हां तो अवलोकन करील, तेव्हां त्या दुर्मतीला मोठा अनुताप होईल. ज्यानें आपलें मुख उघडलें आहे, अशा काळाप्रमाणें मी धनुष्य वांकवून व त्यांवर देदीप्यमान बाण दोन्ही हातांनीं जोडून चतुरंग सेनेवर त्यांचा वर्षाव करीन आणि त्यामुळें भयभीत झालेले योद्धे संमूढ होऊन दश-दिशांत पळत आहेत, असें जेव्हां तो दुरात्मा पाहील तेव्हां तो मूढ होईल.

सर्व दिशांतून संचार करणाऱ्या माझ्या रथवेगानें उडालेल्या धूळीनें व्याकुल झालेलें व गांडीवधनुष्यापासून सुटलेल्या शरांनीं विद्ध झालेलें कौरवसैन्य दिङ्मूढ होऊन इतस्ततः पळूं लागेल. अश्वादि वाहनांचा संहार झाल्यामुळें श्रांत, भयार्त व तृषाक्रांत झालेले वीर व वाहनें विह्वल होऊन आक्रोश करूं लागतील, मारले जाणारे व मेलेले योद्धे आणि ज्यांचे केंस, अस्थि व मस्तकांच्या कवट्या यांच्या राशि सर्वत्र पसरल्या आहेत, असे सैनिक, प्रजापतीच्या वाजपेय यज्ञांतील सतरा पशूंप्रमाणें अमंगल दिसूं लागतील.

त्या महायुद्धांत वासुदेव, गांडीवधनुष्य, दिव्य पांचजन्य शंख, चार दिव्य शुभ्र अश्व, दोन अक्षय भाते, देवदत्त शंख आणि मी असे जेव्हां शत्रूंच्या दृष्टीं पडूं तेव्हां तो कौरव हळहळूं लागेल.

संजया, न्यायतः आम्हांला द्यावयाचें राज्य न दिल्यामुळें हे धार्तराष्ट्र वस्तुतः दस्यु[1] म्ह० चोरच आहेत. या दस्युसंघाचा विध्वंस करण्यासाठीं, आणि युगांतसमयीं शत्रूंचा संहार झाला असतां नवीन धर्मप्रधान काल प्रवृत्त करण्यासाठीं मी या सर्व कौरवांना अग्नीप्रमाणें दग्ध करीन. त्यावेळीं ऐश्वर्यभ्रष्ट झाल्यामुळें क्रुद्ध व नाश झाल्यामुळें कांपणारा मंदमति दुर्योधन भ्राते, सैन्य व भृत्य यांसह कृतकर्माचें फल भोगील.

हे सूता, एकदा मी पूर्वाह्णकालीं जलांत उभा राहून संध्या-वंदनादि करीत असतां एक मनोज्ञ विप्र मजकडे आला व म्हणाला—“ हे पार्था, तुला शत्रूंशीं युद्ध करून दुष्कर कर्म करावयाचें आहे. हरित अश्वांनीं युक्त असलेला वज्रधर इंद्र युद्धांत अग्रभागीं अदृश्य राहून शत्रूंचा वध करील किंवा सुग्रीव अश्वांनीं युक्त असलेल्या रथांतून वासुदेव मागल्या बाजूनें तुझें रक्षण करील. या दोहोंतून इष्ट असलेला एक वर मागून घे.”

संजया, तेव्हां मीं ‘ या युद्धांत वज्रधर इंद्रापेक्षां वासुदेवच माझा साह्यकर्ता असावा ’ असा वर मागून घेतला. त्यामुळें मला श्रीकृष्णाचें साह्य लाभलें आहे. दस्यूंचा वध करण्यासाठीं केशवाचें साह्य मला मिळावें, असेंच दैवाला विहित असावें असें मला वाटतें. स्वतः युद्ध न करणाऱ्या श्रीकृष्णानें मनानेंहि ज्या

१ ‘ परप्रतिग्रहमभिमन्यते स्तेनो भवति ’ म्ह० दुसऱ्याच्या वस्तूचा अपहार करणारा चोर होय, असें स्मृतिवचन आहे.

पुरुषाच्या जयाची आकांक्षा केली असेल तो इंद्रासह सर्व देवांचाहि पराभव करील, मग मानवांविषयीं काय सांगावें !

हे गावल्गणे, जो कोणी युद्धांत तेजस्वी व अत्यंत शूर वासुदेवाला जिंकण्याची इच्छा करील, तो मूर्ख आपल्या हातांनीं अनंत महासागर तरून जाण्याचाच अविचार करील. ज्याप्रमाणें एखाद्या मूढानें कैलासपर्वताच्या अतिशय कठिण शिलेवर जोरानें हाताची चापट मारली असतां त्याचा तो हातच नखांसह विदीर्ण होतो, परंतु त्यामुळें त्या पर्वताची यत्किंचित्हि हानि होत नाहीं, त्याचप्रमाणें वासुदेवाशीं युद्ध करणाराची स्थिति होईल. किंवा दोन हातांनीं प्रदीप्त अग्नीची शांति, चंद्र-सूर्यांचें हातानें निवारण आणि अमृताचें हरण या गोष्टी जशा असाध्य तसेंच केशवाला रणांत जिंकणें अशक्य आहे.

या मधुसूदनानें युद्धांत भोजांचा एका रथानें पराभव करून आपल्या यशानें देदीप्यमान होणाऱ्या रुक्मिणीचें हरण करून तिला वरिलें आणि त्याच साध्वीनें महात्म्या रौक्मिणेयाला जन्म दिला.

देवतांनाहि ललामभूत असलेल्या 'सुदर्शन'-नामक राजाला नग्नजिताच्या पुत्रांनीं बद्ध केलें होतें, पण या कृष्णानें त्या गांधारराजांचें मर्दन करून सुदर्शनाला मुक्त केलें. याच मुकुंदानें आपल्या वक्षःस्थलाच्या आघातानें पांड्यराजाला गतप्राण केलें. तसाच संग्रामांत कलिंगाचा निःपात केला. या वासुदेवानें दग्ध केलेली वाराणसी नगरी अनेक वर्षें अनाथ होऊन राहिली. इतरांना अजिंक्य असलेल्या 'एकलव्य'-नामक निषादराजाशीं युद्ध करण्याची हा नेहमीं इच्छा करीत होता, पुढें एकदा तो निषादराज याच्या समोर आला, तेव्हां जंभदैत्य स्वतःच केलेल्या शैलाघातानें जसा भूमीवर मरून पडला, त्याप्रमाणें कृष्णानें प्रहार केलेला तो निषादराज मृत होऊन भूमीवर पडला. त्यानंतर वृष्णि व अंधक यांच्या समूहांत सभेमध्यें स्थित असलेल्या उग्रसेनाच्या अति दुष्ट पुत्राला त्यानें मारिलें. त्यावेळीं याला एकट्या बलदेवाचेंच साह्य होतें. तथापि या महात्म्यानें सिंहासनस्थ कंसाचा वध करून उग्रसेनाला राज्य दिलें.

या देवकीनंदनानें आकाशामध्यें स्थित असलेल्या सौभाशीं युद्ध केलें. मायेनें युद्ध करणाऱ्या शाल्वराजाशीं यानेंहि मायायुद्ध केलें. त्या शाल्वानें याच्यावर शतघ्नी शक्ति सोडली, पण या वीरानें तिला चेंडूप्रमाणें आपल्या दोन्ही हातांनीं झेलून धरिलें. अशा वीराला कोणता मर्त्य युद्धांत सहन करील !

असुरांचें 'प्राग्जोतिष' या नांवाचें एक दुर्गम, असह्य व घोर नगर होतें. त्यांत रहाणाऱ्या महाबलाढ्य भूमिपुत्र नरकासुरानें एकदा अदितीचीं दोन शुभ रत्नजडित कुंडलें हरण केलीं. मृत्यूला न भिणारे इंद्रादि सर्व देव युद्धामध्यें त्याला सहन करूं शकले नाहींत. तेव्हां या केशवाचा प्रसिद्ध पराक्रम, बल व अनिवार्य अस्त्र यांचा विचार करून व दस्यूंचा नाश करण्याचा याचा स्वभाव ओळखून देवांनीं नरकासुराचा नाश करण्यासाठीं याची योजना केली. तेव्हां सर्व उपस्थित कार्यांचा निर्वाह करण्यास समर्थ असलेल्या या वासुदेवानें नरकासुराच्या वधाचें दुष्कर कार्य करावयाचेंहि स्वीकारलें.

त्यानें निर्मोचन नगरामध्यें असुरांचे लोहमय तीक्ष्ण पाश तोडून साठ सहस्र असुरांचा संहार केला. 'ओघ'-संज्ञक राक्षसाला मारून, 'मुर'-दैत्याचा नाश करून हा त्यांच्या निर्मोचन नगरींत शिरला. महाबलाढ्य भौमासुराचें या अतिबल कृष्णाशीं त्या नगरींतच युद्ध झालें. त्या संग्रामांत वायूनें उन्मूलन केलेल्या कर्णिकार वृक्षाप्रमाणें कृष्णानें ज्यावर असह्य प्रहार केला आहे, असा तो भौम नरकासुर भूमीवर गतप्राण होऊन पडला. याप्रमाणें भौम, नरक व मुरदैत्य यांचा नाश करून कृष्णानें अदितीचीं रत्नकुंडलें परत मिळविलीं आणि विजयश्री व यश यांनीं युक्त असलेला हा विद्वान् देवांकडे परत आला.

या मधुसूदनानें रणांत केलेलें तें घोर कर्म पाहून देवांनीं अनेक वर दिले. ते म्हणाले—" हे विष्णो, युद्ध करीत असलेल्या तुला केव्हांहि श्रम होणार नाहींत. आकाश व जल यांमध्येंहि तुझा संचार होईल. तुझ्या शरीरावर शत्रूंचीं शस्त्रें क्षत करूं शकणार नाहींत."

हे सूता, देवांच्या या वरांनीं हा जनार्दन कृतार्थ झाला आहे. अशाप्रकारच्या महाबलाढ्य व अप्रमेय वासुदेवाच्या ठिकाणीं गुणसंपत्ति सदैव वास करिते. पण तो मूढ धार्तराष्ट्र अशा या असह्य व अनंत वीर्यवान् विष्णूला जिंकण्याची इच्छा करीत आहे. तो दुरात्मा या महात्म्याला बद्ध करून ठेवण्याचे संकल्प सर्वदा करीत असतो. पण हा उदारात्मा कृष्ण आम्हां पांडवांकडे दृष्टि देऊन सर्व सहन करीत आहे. हा दुर्योधन मी व कृष्ण यांच्यामध्यें भेद उत्पन्न करून आम्हांमध्यें कलह लावण्याचा प्रयत्न करीत आहे. या उपायानें कृष्णाचें पांडवांवरील ममत्व कमी करतां येणें शक्य आहे, असें तो मूढ समजतो. पण

तो दुरात्मा कुरुक्षेत्रांतील युद्धभूमींत प्राप्त झाल्यावर त्याला वस्तुस्थिति कळून येईल.

हे संजया, युधिष्ठिराचें राज्य परत मिळण्याची इच्छा करणारा मी वस्तुतः माझे शत्रु नसलेलेहि राजा शांतनुपुत्र भीष्म, पुत्रासह द्रोण व शारद्वत् कृप यांना नमस्कार करून त्यांच्याशीं युद्ध करीन. कारण जो पापबुद्धि दुर्योधनाचा पक्ष घेऊन पांडवांशीं युद्ध करील, त्याला मृत्यूनेंच ग्राशिलें आहे व त्याचें निधन समीप आलें आहे, असें मी समजतों. दुर्योधन, शकुनि, कर्ण इत्यादि दुरात्म्यांनीं आम्हां राजपुत्रांना कपटद्यूतांत जिंकलें व दीर्घ कालपर्यंत कष्टकर वनवास भोगावयास लाविला. आम्हीं एक वर्ष अज्ञातवासाचे क्लेश भोगले. असें असतांना आतां पांडूचे पांच पुत्र जिवंत असेपर्यंत राज्यपदावर आरूढ झालेले धृतराष्ट्राचे पुत्र निर्भयपणें सुखोपभोग कसे घेऊं शकतील !

महेंद्रप्रभृति देवांचें साह्य घेऊन त्या दुरात्म्यांनीं युद्ध करणाऱ्या आम्हांला जर जिंकिलें, तर धर्म व्यर्थ आहे, त्यापेक्षां अधर्माचरणच श्रेष्ठ आहे, सत्कर्मांचा कांहीं उपयोग नाहीं, असेंच म्हणावें लागेल ! हा पुरुष जर कर्मबद्ध नसेल किंवा आम्ही जर धर्मतः कौरवांहून श्रेष्ठ नसूं, तरच त्यांचा जय होईल !

मी वासुदेवाच्या साह्यानें सर्व परिवारांसह दुर्योधनाचा नाश करण्याची प्रतिज्ञा करीत आहें. आम्हीं प्रतिज्ञेचें पालन केल्यावरहि आमचें राज्य परत न देणें व पूर्वी कपट द्यूतानें आमचें राज्य हरण करणें, यांत जर कांहीं पाप नसेल व मनुष्यानें आचरलेलें पुण्यकर्म जर निष्फल असेल, तर माझी प्रतिज्ञा मिथ्या होईल. पण त्या दुरात्म्याच्या प्राचीन व आधुनिक पापाचा विचार केला असतां कौरवांचा पराभव होणेंच सर्वथा न्याय्य आहे. यास्तव हे संजया, धृतराष्ट्राच्या सभेंतील सर्व कौरवांना संबोधून तूं माझा हा संदेश त्यांस सांग. धृतराष्ट्राचे पुत्र जर युद्ध करतील तर जिवंत रहाणार नाहींत. युद्ध न करतील, तरच कांहीं दिवस सुख भोगतील. युद्धामध्यें त्यांचा एकहि वीर जिवंत रहाणार नाहीं. मी कुंतीपुत्र अर्जुन कर्णासह सर्व धृतराष्ट्रपुत्रांना मारून कौरवांचें सर्व राज्य जिंकून घेईन. यास्तव तुमच्यांतील ज्यांचें जें कर्तव्य अवशिष्ट असेल, तें तुम्ही करून घ्या. हे कौरवहो, युद्धाला आरंभ होईपर्यंत तुम्ही स्त्रीप्रभृति इष्टभोग भोगून घ्या.

आमच्या आश्रयाला वृद्ध, शीलवान्, कुलीन व बहुश्रुत असे अनेक ब्राह्मण आहेत. त्यांना संवत्सराचें उत्तम ज्ञान असून ते ज्योतिषशास्त्रांत पंडित व

नक्षत्रयोगाचा निश्चय करणारे आहेत. ते उच्च-नीच दैवयुक्त रहस्य जाणतात भविष्यार्थाचें ज्ञान करून देणारीं शैवागमप्रसिद्ध सर्वतोभद्रादि चक्रें काढून कोणतें नक्षत्र कोणत्या ग्रहानें विद्ध झालें आहे व त्याचें फल काय आहे, याचा ते सतत विचार करीत असतात. त्यांनीं कुरु-सृंजयांचा फार मोठा क्षय होऊन पांडवांचा जय होणार, असें भविष्य वर्तविलें आहे.

ज्याप्रमाणें आमचा ज्येष्ठ भ्राता अजातशत्रु शत्रूच्या निग्रहाविषयीं निःशंक असून आमचा राज्यरूपी अर्थ सिद्धच आहे, असें मानितो, त्याचप्रमाणें भूत-भविष्यत् जाणणारा हा वृष्णिसिंह जनार्दनहि युद्धांतील जय-पराजयाविषयीं कधींच साशंक होत नाहीं. मीं स्वतःहि सावधान चित्तानें विचार करून या युद्धाचा परिणाम काय होईल, याचा सतत विचार करितों. पण माझी योगप्रभावानें युक्त असलेली दृष्टि कुंठित होत नाहीं. धृतराष्ट्रपुत्रांनीं युद्ध आरंभिल्यास त्यांचा नाश होणार असेंच ती पहाते.

मीं गांडीवधनुष्याला स्पर्श न करतांच तें सज्ज होतें. त्याच्या गुणाला स्पर्श केल्यावांचूनच त्याचा टणत्कार होऊं लागतो. माझे दिव्य बाण भात्यांतून आपोआप बाहेर पडूं लागतात. जीर्ण त्वचा सोडून बाहेर पडणाऱ्या महासर्पाप्रमाणें माझा तीक्ष्ण खड्ग कोशांतून वर उसळतो. ‘हे किरीटिन्, तुझा रथ केव्हां जोडला जाणार’ असे ध्वजाग्रावर होणारे भयंकर शब्द माझ्या कानीं पडतात. कोल्हे व भालू यांचे संघ रात्रीं कर्कश आक्रोश करितात. अंतरिक्षांतून राक्षस खालीं गळून पडतात. मृग, शृगाल, मयूर, काक, गृध्र बक, आस्वलें इत्यादि पशु व पक्षी माझा श्वेत अश्वांनीं युक्त असलेला रथ पाहून त्याच्या मागोमाग पळत सुटतात.

हे संजया, या सर्व चिह्नांवरून मी तुला प्रतिज्ञेनें सांगतों कीं, मी एकटाच पृथ्वीवरील सर्व योद्धयांवर शरवृष्टि करून त्यांना यमलोकीं पोंचवीन. ग्रीष्मऋतूंत प्रदीप्त झालेला अग्नि अरण्याला जसा जाळतो, त्याप्रमाणें मी भिन्न भिन्न अस्त्रमार्गांचा स्वीकार करून दुर्योधनाची सेना दग्ध करीन. इंद्रानें मला स्थूणाकर्ण, पाशुपत महास्त्र व ब्राह्म अस्त्र दिलें आहे. यास्तव कौरवांनीं माझ्याशीं युद्धाचा प्रसंग आणूं नये, हाच उत्तम पक्ष होय. मी कौरवांचा वध करण्याच्या इच्छेनें एकदा सज्ज झालों म्हणजे कौरवांच्या प्रजेंतील एका व्यक्तीलाहि मी जिवंत ठेवणार नाहीं.

बा गावल्गणे, असें जरी आहे, तरी कौरव व पांडव यांच्या वैराची शांति व्हावी, हाच माझा श्रेष्ठ व निश्चित आशय आहे, असें तूं त्यांना सांग. समरांत विजय मिळविणें हेंच ज्यांचें कर्म आहे, ते पांडव देवांशीं संग्राम करूनहि विजयीच होणार, यांत मुळींच संशय नाहीं. पण हा धृतराष्ट्राचा दुर्बुद्धि पुत्र हट्टानें अशा पांडवांशींच कलह करण्याची इच्छा करीत आहे. तेव्हां त्याला कसा मोह पडला आहे, तो आतां पहा.

संजया, मी तुला अखेरची एकच गोष्ट सांगतों ती ऐक. वृद्ध शान्तनव भीष्म, कृप, पुत्रासह द्रोण व बुद्धिमान् विदुर हे सर्व जें सांगतील, तेंच होवो. आणि सर्व कौरव या लोकीं दीर्घकाल जिवंत राहोत. ५. ५. ४८.

---

## अध्याय ४९ वा.

[ १ वासुदेव आणि अर्जुन हे नर-नारायणाचे अवतार आहेत असें भीष्माचें सभेंत कथन. २ कर्णाची निंदा. ३ द्रोणाचा भीष्ममतानुसार पांडवांशीं सख्य करण्याविषयीं उपदेश. ]

( १ ) वैशंपायन—हे भारता, त्या सभेंत जमलेल्या सर्व नृपालांसमक्ष शांतनव भीष्म दुर्योधनाला असें वचन बोलला—पूर्वी एकदा बृहस्पति व उशना-शुक्र हे दोघे ब्रह्मदेवाकडे गेले. त्यांच्याबरोबर इंद्रासह मरुत् अग्नीसह वसु, आदित्य, साध्य, स्वर्गांतील सप्तर्षि, विश्वावसु गंधर्व, शुभ अप्सरागण इत्यादि सर्व होते. ते लोकवृद्ध पितामहाला नमस्कार करून त्याच्या सभोंवार जाऊन बसले. त्यावेळीं स्वतेजानें जणुकाय सर्वांचें मन व तेज आकर्षण करणारे पूर्वदेव नर-नारायण ऋषि त्यांच्यापासून दूर बसले होते. त्यांना पाहून बृहस्पतीनें ब्रह्मदेवाला प्रश्न केला कीं, हे भगवन्, हे दोघे कोण आहेत! हे आपली परिचर्या कां करीत नाहींत! तें मला सांगा.

ब्रह्मदेव—हे ब्रह्मन्, हे दोघे महा बलाढ्य तपस्वी नर-नारायण आहेत. हे पुराण ऋषि आपल्या देदीप्यमान तेजानें द्यावा-पृथ्वीला प्रकाशित करून सर्वांना व्यापून येथें अलिप्त होऊन बसले आहेत.

हे दोघे मृत्युलोकांतून ब्रह्मलोकीं आले आहेत. हे महात्मे अतिशय बलाढ्य व पराक्रमी आहेत. स्वतःच्या तपःप्रभावानें उत्कर्ष पावलेल्या या उभयतां पुराण-ऋषींनीं आपल्या कर्मानें सर्व लोकांना संतोषविलें आहे. हे दोघेहि

तपस्वी देव-गंधर्वांना पूज्य असून ते महाप्राज्ञ आहेत. वस्तुतः ते दोघे एकच आहेत, परंतु असुरांचा नाश करण्यासाठीं त्या परंतपांनीं द्विधारूप धारण केलें आहे.

**वैशंपायन**—जनमेजया, ब्रह्मदेवाचें हें भाषण ऐकून जेथें ते दोघे नर-नारायण तप करीत होते, तेथें बृहस्पतिप्रभृति देवगणांसह शक्र गेला. त्यावेळीं देवासुरांच्या युद्धांत देवांना भय उत्पन्न झालें होतें, म्हणून इंद्रानें त्या महात्म्याच्या समीप जाऊन वराची याचना केली. तेव्हां ते तपस्वी त्याला 'इष्ट वर मागून घे' असें म्हणाले. त्यावर इंद्रानें 'आम्हांला या युद्धांत साह्य करा' असा वर मागितला.

तो ऐकून ते दोघे सनातन ऋषि म्हणाले—"ठीक आहे, आम्ही तुझी इच्छा पूर्ण करूं."

नंतर इंद्रानें त्या दोघांच्या साह्यानें दैत्य-दानवांना जिंकलें. परंतप नरानें युद्धांत इंद्राच्या शत्रूंचा वध करून पौलोम, कालखंज इत्यादि सहस्रावधि दैत्यांचा संहार केला. जंभराक्षस देवांना ग्रासूं लागला असतां या अर्जुनरूपी नरानें भ्रमण करणाऱ्या अस्थिर रथांत बसून भल्ल बाणानें त्या जंभाचें मस्तक छेदून टाकिलें. हें केवढें आश्चर्य आहे बरें! याच वीरानें समुद्राच्या परतीरावर साठ हजार निवातकवचांना रणांत जिंकून त्यांचें हिरण्यपुर छिन्नविच्छिन्न करून टाकिलें. याच महाबाहु अर्जुनानें इंद्रासह देवांना जिंकून अग्नीला खांडव वन अर्पण केलें. नारायणानेंहि इतर अनेक दैत्यांचा नाश केला आहे.

**भीष्म**—हे दुर्योधना, सांप्रत या लोकीं एकत्र असलेले हे महारथ कृष्णार्जुनच 'नर-नारायण'-नांवांनीं प्रसिद्ध असलेले पूर्वदेव आहेत. हे दोघे वीर मनुष्यलोकाला प्राप्त झाले आहेत. तरी इंद्रासह सुरासुरांनाहि अजिंक्य आहेत. हा कृष्ण नारायण असून फाल्गुन नर आहे. या नर-नारायणांचें बुद्धि-सत्त्व एकच आहे. परंतु हा एकच देव योगप्रभावानें दोन रूपें धारण करून अवतीर्ण झाला आहे. हे दोघे आपल्या पुण्यकर्मानें अक्षय लोकांना निरंतर प्राप्त होतात, परंतु जेव्हां युद्धाचा काल येतो, तेव्हां ते तेथें पुनः पुनः जन्म घेतात. तस्मात् युद्ध हेंच त्या उभयतांचें कर्तव्य आहे, असें वेदवेत्त्या नारदानें या चक्रधर वृष्णिवीराविषयीं मला सांगितलें आहे.

यास्तव बा दुर्योधना, तूं जेव्हां समरांगणांत हातीं शंख-चक्र-गदा घेतलेला केशव आणि भयंकर धनुष्य धारण केलेला अस्त्रवेत्ता अर्जुन, या दोघां सना-

तन महात्म्यांना एकाच रथावर आरूढ झालेलें पहाशील, तेव्हां तुला माझ्या या वचनाचें स्मरण होईल.

(२) तूं जर माझ्या भाषणाकडे दुर्लक्ष करशील, तर कौरवांचा क्षय होण्याचा काल समीपच आला आहे, असें समज. बाबारे, तुझी बुद्धि धर्म व अर्थ यांपासून भ्रंश पावली आहे, असेंच दिसतें. तूं जर माझा हा उपदेश मनावर घेणार नाहींस, तर लवकरच तुझ्या पक्षांतील अनेक वीरांचा वध झाल्याचें तुझ्या कानीं येईल. कारण सर्व कौरव तुझ्या मतानेंच चालणारे आहेत आणि तूं तर हीनकुलोत्पन्न कर्ण, पातकी शकुनि व तुझा भ्राता दुर्मति दुःशासन या तिघांच्या मतांनीं वागत आहेत. त्या सूतपुत्र कर्णाला परशुरामानें शाप दिलेला आहे. या दुरात्म्याच्या बुद्धीनें चालणें योग्य नव्हे.

कर्ण—हे पितामह, तुमच्यासारख्या वयोवृद्धानें मला असें बोलणें उचित नव्हे. मी क्षत्रधर्मांत स्थित असून स्वधर्मापासून च्युत झालेला नाहीं; असें असतांना माझें असें कोणतें दुर्वर्तन पाहून तुम्ही माझी अशी निंदा करीत आहां ! मीं एखादें पातक केलें आहे असें या धार्तराष्ट्रांना तर ठाऊक नाहीं. मी कधींहि पापाचरण करीत नसतों. मीं या धार्तराष्ट्राचें कदापि अप्रिय केलेलें नाहीं.

मी युद्धाला आलेल्या सर्व पांडवांचा संहार करीन. कारण पूर्वींपासून विरुद्ध असलेल्या पांडवांशीं मी आतां शम कसा करावा ! मला राजा धृतराष्ट्राचें सर्व प्रिय कर्तव्य आहे. तसेंच दुर्योधनाचेंहि मला प्रिय केलें पाहिजे. कारण आज तोच राज्यपदावर स्थित आहे. मला या भीष्माचें प्रिय करावयाचें नाहीं.

वैशंपायन—राजा, कर्णाचें हें भाषण ऐकून शांतनव भीष्मानें धृतराष्ट्राला 'हे महाराज,' असें संबोधून पुनः म्हटलें—हा कर्ण नित्य 'मी पांडवांचा वध करीन' अशी आत्मश्लाघा करीत असतो, परंतु महात्म्या पांडवांचा एक षोडशांशहि या सूतपुत्राच्या अंगीं नाहीं. तुझ्या या दुरात्म्या पुत्रांवर आतां जो अनर्थ ओढवणार आहे, तें सर्व या दुर्बुद्धि सूतपुत्राच्या कर्माचें फल आहे, असें समज. तुझ्या या मंदमति सुयोधन पुत्रानें या मूर्खाला आश्रय देऊन त्या देवपुत्रतुल्य असलेल्या पांडववीरांचा अवमान केला.

त्या सर्व पराक्रमी पांडवांनीं अनेक दुष्कर कर्में केलीं आहेत. त्यांतील एकेका वीरानें पूर्वीं जीं अलौकिक कर्में केलीं, तशा प्रकारचें एक तरी कर्म या कर्णानें आजपर्यंत केलें आहे का ? विराट-नगरीमध्यें कर्णाच्या प्रिय भ्रात्याचा वध

करून धनंजयानें केवढा पराक्रम गाजविला ! पण त्यावेळीं यानें काय केलें ! अर्जुनानें सर्व कौरवांचा पराभव करून त्यांचीं वस्त्रेंहि हरण केलीं. त्यावेळीं हा राधेय काय करीत होता ! देशांतराला तर गेला नव्हता ना ! घोषयात्रेच्या प्रसंगीं गंधर्वांनीं जेव्हां तुझ्या पुत्राला बांधून नेलें, तेव्हां हा सूतपुत्र कोठें गेला होता ! मग आतां पोळासारखा व्यर्थ गर्जना कशाला करतो आहे ! त्यावेळीं भीम, महात्मा पार्थ आणि दोघे माद्रीनंदन यांनीं मिळून गंधर्वांना जिंकलें व तुझ्या पुत्राला त्यांच्या हातून सोडविलें. राजा, तुझें कल्याण असो, सर्वदा धर्मार्थांचा लोप करणाऱ्या या मृषावादी कर्णानें आजवर अशा वृथा वल्गना पुष्कळ केल्या आहेत !

( ३ ) याप्रमाणें भीष्माचें भाषण ऐकून उदारमनाचा भारद्वाज द्रोण त्या राजसभेंत धृतराष्ट्राचा सत्कार करीत असें म्हणाला—"हे भरतश्रेष्ठा, या पितामह भीष्मानें तुला जें सांगितलें, तेंच तूं करावेंस, हेंच उचित होय. इष्टार्थलोलुप कर्णादिकांच्या वचनाप्रमाणें वागणें योग्य नव्हे. युद्धाला आरंभ होण्याच्या पूर्वींच पांडवांशीं सख्य करणें हितावह आहे, असें मला वाटतें. अर्जुनाचें जें भाषण आतां संजयानें आपल्याला निवेदन केलें, त्याप्रमाणें तो पांडव करील, यांत संशय नाहीं. या त्रिभुवनांत अर्जुनाच्या तुल्य दुसरा धनुर्धर नाहीं."

वैशंपायन—राजा, भीष्म-द्रोणांनीं असा कळकळीचा उपदेश केला. पण राजा धृतराष्ट्र त्यांच्या यथार्थ भाषणाकडे दुर्लक्ष करून संजयाला पांडवांचा वृत्तांतच विचारूं लागला. तेव्हां भीष्म-द्रोणांचा अनादर करून राजा त्यांच्याशीं नीट बोलतहि नाहीं, हें पाहून सर्व कौरव स्वतःच्या जीविताविषयीं निराश झाले. ५. ५. ४९.

---

## अध्याय ५० वा.

[ १ 'पांडवांचे साह्यकर्ते कोण आहेत' हा धृतराष्ट्राचा प्रश्न ऐकून संजयाची मूर्च्छा. २ सावध झालेल्या संजयानें पांडवपक्षांतील प्रमुख योद्ध्यांचें सभेंत केलेलें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे सूता, आमच्या साह्यार्थ येथें विपुल सेना जमली आहे, हें ऐकून धर्मपुत्र राजा युधिष्ठिर काय म्हणाला ! युद्धाची इच्छा करणाऱ्या युधिष्ठिरानें काय काय योजना केली आहे ! त्याच्या अनुज्ञेची अपेक्षा

करणारे कोणते भ्राते व पुत्र त्याच्या मुखाकडे पहात आहेत! माझ्या या मंदमति पुत्रांनीं कोपविलेल्या धर्माचरणी युधिष्ठिराचें 'तूं शमच कर' असें सांगून युद्धापासून कोणीच निवारण करीत नाहीं काय!

संजय—हे महाराज, तुझें कल्याण असो. पांडवांसह सर्व पांचाल युधिष्ठिराच्या आज्ञेंत तत्पर असतात. त्याचा शब्द झेलून धरण्यासाठीं ते सर्व त्याच्या मुखाकडे पहात असतात आणि तो धर्मराज सर्वांचें अनुशासन करतो. तो कुंतीपुत्र युधिष्ठिर येत आहेसें पहातांच पांडव व पांचाल यांचे रथसमुदाय पृथक् उभे राहून त्याचें अभिनंदन करितात. पांचाल उदय पावणाऱ्या तेजोराशि सूर्याप्रमाणें युधिष्ठिराला पूज्य मानितात. गोपालादि अज्ञजनहि युधिष्ठिराचा सत्कार करितात. पांचाल, केकय, मत्स्य, हेहि त्या पांडुपुत्राचा अभ्युदय चिंतितात. इतकेंच केवल नव्हे तर ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांच्या खेळणाऱ्या कन्याहि सज्ज झालेल्या त्या कौंतेयाला पहाण्यासाठीं येत असतात.

धृतराष्ट्र—हे संजया, पांडव कोणत्या बलाढ्य वीराच्या बलावर आमच्याशीं युद्धाला तयार झाले आहेत! धृष्टद्युम्नाच्या साह्यानें ते संपन्न आहेत किंवा सोमकांचें सैन्य त्यांच्या पक्षाला मिळालें आहे!

वैशंपायन—राजा, धृतराष्ट्रानें पुनः पुनः असा प्रश्न विचारला असतां त्या कौरवसभेंत संजय वारंवार दीर्घ निश्वास सोडूं लागला, तो अतिशय चिंतामग्न दिसूं लागला व कांहीं निमित्तावांचून तो सूत अकस्मात् दैवयोगानें मूर्च्छित होऊन पडला, तेव्हां त्याची ती अवस्था पाहून विदुर त्या राजसभेंत धृतराष्ट्राला म्हणाला—" हे महाराज, हा संजय मूर्च्छा येऊन भूमीवर पडला आहे. तो चेतनाशून्य व प्रज्ञाहीन झाला आहे. त्याच्या मुखांतून शब्दहि उमटत नाहीं."

धृतराष्ट्र—हे विदुरा, खरोखर, या संजयानें युद्धाला सज्ज झालेले ते महारथ कुंतीपुत्र पाहिले असावेत. माझ्या या प्रश्नानें त्या पुरुषव्याघ्रांचें स्मरण होऊन याचें मन भयभीत झालें असावें!

वैशंपायन—राजा, इतक्यांत संजय देहभानावर आला व त्या कौरवसभेंत धृतराष्ट्र महाराजाला आश्वासन देत असें वचन बोलला—

(२) संजय—हे राजेंद्रा, मी महारथ कुंतीपुत्रांना पाहून आलों. अज्ञातवासाचा क्लेशकर काल मत्स्यराजाच्या गृहांत बंदिवासाप्रमाणें घालविल्यामुळें ते वीर अतिशय कृश झाले आहेत. हे महाराज, पांडवांना युद्धांत कोणा-कोणाचें साह्य आहे, तें सांगतों, ऐक.

या युद्धांत वीर धृष्टद्युम्नाचें पांडवांना मुख्य साह्य आहे. जो धर्मात्मा रोषानें, भयानें, लोभानें, द्रव्यार्थ किंवा वादांत प्रतिपक्षाचा पराभव करण्यासाठींहि कदापि सत्याचा त्याग करीत नाहीं, जो धर्मधारण करणारांतील श्रेष्ठ व धर्मामध्यें प्रमाण मानला जातो, तो अजातशत्रु युधिष्ठिर पांडवांचा साह्यकर्ता आहे.

समग्र पृथ्वीतलावर बाहुबलांत ज्याच्या तुल्य दुसरा योद्धा नाहीं, ज्या धनुर्धरानें सर्व महीपालांना जिंकून वश करून घेतलें, ज्या वीरानें युद्धांत काशी, अंग, मगध व कलिंग या देशांतील भूपालांना जिंकून आणिलें, ज्यानें जतुगृहांतून पार पडल्यावर मनुष्यभक्षक हिर्डिब-राक्षसाच्या हातून आपल्या चारी भ्रात्यांना वांचविलें, जयद्रथानें द्रौपदीचें बलात्कारानें हरण केलें असतां ज्याच्या आश्रयानें ती साध्वी क्लेशमुक्त झाली, ज्यानें वारणावतांत दग्ध होणाऱ्या सर्व पांडवांना सोडविलें, ज्यानें पांचालीचें प्रिय करण्यासाठीं घोर व दुर्गम अशा गंधमादन पर्वतावर जाऊन क्रोधवश-राक्षसांचा संहार केला; ज्याचे बाहु दशसहस्र हत्तींच्या बलानें युक्त आहेत, अशा बलाढ्य भीमसेनाचा पांडवांच्या पक्षाला आधार आहे.

ज्या अप्रतिम धनुर्धरानें एकट्या कृष्णाच्या साह्यानें अग्नीला संतुष्ट करण्यासाठीं पूर्वी युद्ध करणाऱ्या पुरंदराला स्वपराक्रमानें जिंकिलें, ज्या वीरानें साक्षात् शूलपाणि महादेवाला युद्धानें संतुष्ट केलें आणि ज्या महात्म्यानें सर्व लोकपालांना वश करून घेतलें, त्या धनंजयाच्या बलावर पांडव युद्धाला सज्ज झाले आहेत.

ज्या माद्रीपुत्रानें म्लेच्छगणांनीं युक्त असलेली पश्चिम दिशा वश करून घेतली; जो विचित्र युद्ध करण्यांत निष्णात व धनुर्युद्धांत प्रवीण आहे, त्या सुस्वरूप वीर नकुलाचें पांडवांना साह्य आहे. त्याचप्रमाणें हे धृतराष्ट्रा, ज्या शूरानें युद्धामध्यें काशिराज, अंग, मगध व कलिंग यांचा पराभव केला; पराक्रमामध्यें अश्वत्थामा, धृष्टकेतु, रुक्मी व प्रद्युम्न हे चौघेच मानव या भूलोकीं ज्याच्या सदृश आहेत, त्या कनिष्ठ माद्रीपुत्र सहदेवाच्या बलावर पांडवांनीं हें युद्ध उभारिलें आहे.

हे भरतश्रेष्ठा, पूर्वी ज्या काशिराजकन्येनें ‘पुढील जन्मांत तरी आपल्या हातून भीष्माचा वध व्हावा’ या इच्छेनें घोर तप आचरिलें होतें, ती सती

मरणोत्तर जन्म घेऊन पांचालराजाची कन्या झाली आणि दैवयोगानें ती पुढें पुरुषत्व पावली. त्यामुळें तो वीर स्त्री व पुरुष यांचे गुणावगुण जाणण्यास समर्थ झाला आहे. त्या युद्धदुर्दम द्रुपदपुत्रानें कलिंग देश जिंकून घेतला आहे. त्या वीराला भीष्माच्या वधार्थच यक्षानें पुरुषत्व दिलें, तो अस्त्रनिपुण शिखंडि तुम्हां कौरवांशीं युद्ध करण्यासाठीं आपलें भयंकर धनुष्य सज्ज करून पांडवांच्या सैन्यांत स्थित आहे.

केकय देशांतील पांच राजपुत्र महा धनुर्धर आहेत. ते पांची भ्राते शूर असून पांडवांच्या बाजूनें युद्ध करण्यास कवचें चढवून सज्ज झाले आहेत. दीर्घबाहु युयुधान सत्यपराक्रमी व धृतिमान् आहे. तो शीघ्र अस्त्रें सोडणारा वृष्णिवीर संगरांत पांडवांना साह्य करणार आहे.

महात्म्या पांडवांना अज्ञातवासाच्या संकटांत आश्रयभूत झालेला राजा विराट पांडवांना मिळाला आहे. वाराणशींतील महारथ राजा काशिपति पांडवांच्या बाजूनें तुमच्याशीं युद्ध करण्यास तयार आहे. हे कुरुश्रेष्ठा, द्रौपदीचे पांच पुत्र जरी अल्पवयस्क कुमार आहेत, तरी ते युद्धांत दुर्जय आहेत. त्या सर्पतुल्य दुःस्पर्श महात्म्यांच्या बलावर पांडव युद्धाला उद्युक्त झाले आहेत.

धृतराष्ट्रा, कृष्णतुल्य पराक्रमी व युधिष्ठिरासारखा दमनशील असलेल्या कुमार अभिमन्यूच्या सामर्थ्यावर पांडव युद्धाला उभे राहिले आहेत. शिशुपालाचा पुत्र महारथ चेदिराज क्रुद्ध झाला असतां युद्धांत शत्रूला दुःसह होतो. तो अक्षौहिणी सैन्यासह पांडवांच्या साह्यार्थ आला आहे.

देवांना जसा इंद्र, तसा पांडवांना वासुदेव मुख्य आधार आहे. त्या केशवाच्या आश्रयानें पांडव युद्धाचा उत्साह धरीत आहेत. चेदिपतीचा भ्राता शरभ आपल्या करकर्ष भ्रात्यासह पांडवांच्या साह्यार्थ आला आहे. जरासंधाचे पुत्र सहदेव व जयत्सेन हे दोघे युद्धांत अप्रतिम वीर आहेत. ते पांडवांच्या पक्षांत स्थित आहेत. शिवाय महातेजस्वी द्रुपदराजा विपुल सैन्यासह आला असून तो पांडवांसाठीं स्वतःचे प्राण देण्यासहि तयार झाला आहे. राजा, हे व आणखींहि अनेक राजे पूर्व व उत्तर दिशेंतून आले आहेत. त्या सहस्रावधि भूपालांच्या बलावर युधिष्ठिर कौरवांशीं युद्ध करण्यास उद्युक्त झाला आहे. ५. ५. ५०.

---

## अध्याय ५१ वा.

[ १ भीमाच्या बलाचा विचार करून धृतराष्ट्राचा शोक. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, पांडवांकडे जमलेल्या ज्या सर्व उत्साही योद्ध्यांचें तूं वर्णन केलेंस, त्या सर्वांची एकटा भीमसेनच बरोबरी करणारा आहे. बा सूता, मला भीमसेनाचें फार भय वाटतें. तो धिप्पाड वृकोदर दीर्घद्वेषी आहे, व्याघ्राला भिणाऱ्या महामृगाप्रमाणें क्रुद्ध झालेल्या भीमाला पाहून माझा थरकांप होतो. बाबारे, सिंहाला जसे इतर पशु भितात, तसा मी वृकोदराच्या भीतीनें रात्रीच्या रात्री दीर्घ व उष्ण निःश्वास टाकीत जागत असतों.

तो मध्यम कौंतेय इंद्रतुल्य पराक्रमी आहे. युद्धामध्यें त्या महाबाहूला सहन करील असा एकहि योद्धा मला या सैन्यांत दिसत नाहीं. तो कौंतेय अमर्षी व मनांत दृढ वैर ठेवणारा आहे. तो मोठ्यानें गर्जना करीत नेहमीं वक्रदृष्टीनें पहात असतो, तो वृथा हंसत नाहीं, तर कार्य करून दाखवून मग शत्रूला हंसत असतो.

तो महाबलाढ्य पृथापुत्र अतिशय वेगवान् व उत्साही आहे. तो महाबाहु युद्धामध्यें खरोखर माझ्या मंदमति पुत्रांचा वध करील. दुराग्रहानें ग्रस्त झालेल्या या कौरवांच्या युद्धामध्यें गदा धारण करणारा कुरुश्रेष्ठ वृकोदर दंडपाणि अंतकाप्रमाणें संचार करील. संजया, मला जरी बाह्यदृष्टि नाहीं, तरी त्याची अष्टकोनी, लोखंडाची, सुवर्णानें भूषविलेली घोर गदा उगारलेल्या ब्रह्मदंडाप्रमाणें माझ्या मनःचक्षूंपुढें दिसत आहे. मृगांच्या कळपामध्यें जसा बलाढ्य सिंह प्रवेश करितो, तसा माझ्या पुत्रांच्या सैन्यांत भीम संचार करील.

हा भयंकर पराक्रमी पांडुपुत्र बालपणापासूनच बहुभोजन करणारा व अतिशय वेगवान् असून माझ्या सर्व पुत्रांशीं विरोध करीत असे. बालवयांतच तो माझ्या दुर्योधनादि पुत्रांचें गजाप्रमाणें मर्दन करीत असे. त्या गोष्टींचें स्मरण झालें म्हणजे अद्यापि माझ्या हृदयाला कंप सुटतो. त्याच्या बलामुळें माझ्या पुत्रांना नित्य क्लेश होत असत. आतांहि तो भयंकर पराक्रमी भीमच या वैराचा हेतु आहे.

क्रुद्ध झालेला भीम सैन्याच्या अग्रभागीं मनुष्यें, गज, अश्व इत्यादिकांचीं सैन्यें युद्धांत जणुकाय ग्राशीतच आहे, असें मला दिसत आहे. तो पराक्रमी

कुंतीपुत्र द्रोणार्जुनांसारखा अस्त्रवेत्ता, वायूसारखा वेगवान् आणि महेश्वरासारखा क्रोधी आहे. अशा भीमाचा युद्धांत वध करण्यास कोण समर्थ आहे सांग बरें !

हे संजया, या शत्रुमर्दक अमर्षी भीमानें याच्या पूर्वींच माझ्या सर्व पुत्रांना गतप्राण केलें नाहीं, हाच मी मोठा लाभ समजतों. ज्या शूरानें पूर्वी भयंकर बलवान् असलेले यक्ष व राक्षस यांचा वध केला, त्याचा वेग रणामध्यें कोणता मनुष्य सहन करूं शकेल ! अरे, हा वृकोदर बाल्यावस्थेंतहि माझ्या अधीन रहात नसे, मग आतां तर माझ्या दुष्ट पुत्रांनीं इतके क्लेश दिले असतां त्रस्त झालेला तो पांडव माझें कितपत ऐकेल, तें काय सांगावें ! ( तो मुळींच ऐकणार नाहीं, हें उघडच आहे. )

तो वृकोदर अतिशय क्रूर व क्रोधी आहे, तो प्रसंगीं मोडेल पण कदापि नम्र होणार नाहीं. तो सर्वदा भ्रुकुटी वक्र करून तीर्यक् दृष्टीनें पहात असतो. तो संतप्त झालेला पांडव कसला शांत होणार !

तो पृथापुत्र शूर व अति बलाढ्य आहे. त्याचा गौर वर्ण असून तो ताडासारखा उंच आहे. किंबहुना अर्जुनापेक्षांहि टिचभर उंचच आहे. तो भीमसेन वेगामध्यें अश्वांचें व बलामध्यें गजांचें अतिक्रमण करितो. त्याचें भाषण नेहमीं अस्पष्ट व नेत्र आरक्त असतात. ‘ हा वृकोदर रूप व पराक्रम यांत पुढें असा निपजणार आहे ’ असें भविष्य त्याच्या बालपणींच मीं व्यासांच्या मुखानें ऐकलें होतें, तें आज तत्त्वतः प्रत्ययाला येत आहे.

तो क्रुद्ध झालेला भीमसेन हातांत लोहदंड घेऊन रथ, अश्व, गज व सैनिक या सर्वांना भग्न करील. बा संजया, पूर्वी अनेकदा या भीमाच्या विरुद्ध आचरण करून मीं त्याचा अवमान केला आहे.

संजया, या पांडुपुत्राची लोखंडी गदा यत्किंचित्हि वक्र नसून महाशब्द करणारी आहे. ती अतिशय प्रचंड व सुवर्णमय आहे. ती स्थूल असून तिच्या सर्व बाजू प्रमाणशीर आहेत. अशा त्या प्रचंड गदेचे प्रहार माझे पुत्र कसे सहन करतील !

संजया, हा भीमसेनरूपी समुद्र अपार, अगाध व दुस्तर आहे. तो शररूपी नक्रांनीं व्याप्त आहे. अशा या भयंकर सागराला माझे मंदबुद्धि पुत्र तरून जाण्याची इच्छा करीत आहेत. ते माझे मूर्ख पुत्र स्वतःला पंडित सम-

जून कंठशोष करून सांगणाऱ्या माझें वचन ऐकत नाहींत. ते अहंमन्य दुर्यो-धनादि मध पहातात, पण तुटलेला दुर्गम कडा लक्षांत घेत नाहींत. सिंहाच्या मुखांत पडणाऱ्या महामृगाप्रमाणें दैवानेंच ज्यांना प्रेरणा केली आहे, असे हे माझे दुर्दैवी पुत्र नररूपी मृत्यूशीं संग्राम करण्यास जाणार आहेत. बा सूता, भीमाची ती प्रचंड गदा इतकी जड आहे कीं, ती खालीं पडली असतां भूमीचें विदारण होण्याचा संभव आहे, म्हणून ती नेहमीं लोखंडाच्या शिंक्यांत ठेवलेली असते. ती अतिशय वेगवान् पट्कोनी गदा दुःसह आहे, तिचा वेग माझे पुत्र कसे सहन करतील !

हे गावल्गणे, तो पृथापुत्र जेव्हां आपली गदा गरगर फिरवीत हत्तींचीं मस्तकें भग्न करील, क्रोधसंतप्त होऊन वारंवार जिभ चाटीत नेत्रांतून उष्ण अश्रु ढाळूं लागेल, सिंहनाद करीत गजावर चाल करून जाईल, चीत्कार कर-णाऱ्या मत्त गजावर भयंकर गर्जना करीत प्रहार करूं लागेल, रथमार्गांतील प्रमुख वीरांना विद्ध करील, तेव्हां प्रदीप्त अग्नीप्रमाणें संतप्त झालेल्या भीमाच्या हातून माझे पुत्र जिवंत कसे सुटतील !

ज्यावेळीं हातीं गदा घेतलेला तो महाबाहु माझ्या सेनेला पलायन करा-वयास लावून जणुकाय नृत्यच करीत रथमार्गांतून संचार करील, तेव्हां आम्हांला युगान्ताचाच प्रत्यय आणून देईल. संजया, मत्त गज जसा पुष्पित वृक्षांना भग्न करीत वनांत प्रवेश करितो, तसा हा प्रमत्त वृकोदर युद्धामध्यें रथस्थ वीर, सारथि, अश्व, अश्वस्थ योद्धे व ध्वज यांचा चुराडा करीत माझ्या पुत्रांच्या सैन्यांत संचार करील. गंगेचा प्रवाह तीरावरील सजल प्रदेशांतील विविध वृक्षांचें ज्याप्रमाणें उन्मूलन करितो, त्याप्रमाणें हा पुरुषव्याघ्र कौरवसेनेचीं पाळें-मूळें खणून काढील. भीमसेनाला पाहून भयार्त झालेले माझे पुत्र, भृत्य व राजे दशदिशांत पळून जातील.

संजया, हा वृकोदर अतुल पराक्रमी आहे. पूर्वी एकदा, बलाढ्य जरासंधानें ही समग्र पृथ्वी आपल्या स्वाधीन करून घेतली होती. त्या मागधाधिपानें ही वसुंधरा जिंकून तिला फार ताप दिला. तेव्हां पराक्रमी भीष्माच्या प्रतापा-मुळें कुरु व स्वतःच्या नैतिक बलावर अंधक व वृष्णि अशीं हीं तीनच कुलें केवल दैवानेंच त्याच्या वश झालीं नाहींत. अशा त्या महाबलाढ्य जरासंधाच्या अंतःपुरांत या भीमानें वासुदेवाच्या साह्यानें निःशंकपणें प्रवेश केला आणि

या वीर पांडुपुत्रानें आयुधावांचून त्या दुष्टाचा आपल्या बाहुबलानें वध केला. याहून अधिक आश्चर्य तें काय असणार !

हे संजया, दीर्घकाल सांचलेल्या विषाचें वमन करणाऱ्या सर्पाप्रमाणें हा वृकोदर रणांमध्यें आपला फार दिवसांचा क्रोध माझ्या पुत्रांवर काढील. ज्याप्रमाणें देवसत्तम देवेंद्र वज्रानें दानवांचा निःपात करितो, त्याप्रमाणें हा गदाधर भीमसेन माझ्या पुत्रांचा संहार करील. बा सूता, तो असह्य, अनिवार्य व तीव्र पराक्रम करणारा वृकोदर आरक्त नेत्र करून जणु काय धांवून येत आहे, असा मला वेळोवेळीं भास होत असतो. तो बलाढ्य पांडव गदा, धनुष्य आणि कवच यांनीं रहित व विरथ जरी असला, तरी नुस्त्या बाहुयुद्धांतहि त्याच्यापुढें कोण उभा राहूं शकेल !

माझ्याप्रमाणेंच धीमान् भीष्म, द्रोणाचार्य व शारद्वत् कृप हेहि भीमाचें सामर्थ्य जाणतात. परंतु त्यांना आर्यांचें व्रत माहीत आहे. रणक्षेत्रांत देहपात व्हावा या हेतूनें ते नरश्रेष्ठ युद्धामध्यें कौरवसैन्याच्या अग्रभागीं उभे रहातील. संजया, शेवटीं पांडवांचाच जय होणार, हें मला स्पष्ट दिसत असूनहि मी आपल्या पुत्रांचें युद्धापासून निवारण करूं शकत नाहीं, यावरून सर्वांत पुरुषाचें दैवच बलवत्तर आहे हेंच खरें. महा धनुर्धर भीष्मादिक सनातन स्वर्गमार्गाचा आश्रय करून कौरव-पांडवांच्या युद्धांत उभे रहातील आणि भूलोकांतील आपल्या यशाचें रक्षण करणारे ते महात्मे तुमुल युद्धांत प्राणत्याग करतील. बाबारे, या भीष्मादिकांना जसे माझे पुत्र तसेच पांडवहि आहेत. ते पांडव भीष्माचे पौत्र व द्रोण आणि कृप यांचे शिष्य आहेत. परंतु या तिघांहि वृद्धांना आम्हीं दानादिकांच्या रूपानें आश्रय दिला आहे, तेव्हां ते कृतज्ञ श्रेष्ठ पुरुष या उपकाराची निष्कृति करण्यासाठीं आमच्या बाजूनें युद्ध करतील. शिवाय क्षात्रधर्माचें पालन करणाऱ्या पुरुपास हातीं शस्त्र घेऊन युद्ध करीत असतां मृत्यु येणें श्रेयस्कर आहे, असें शास्त्रवेत्ते म्हणतात.

संजया, पांडवांशीं युद्ध करण्यास जे वीर जाणार आहेत, त्या सर्वांविषयीं मला दुःख होत आहे. आरंभापासून विदुर जें वारंवार उच्च रवानें सांगत होता, तेंच भय उपस्थित झालें आहे. बा सूता, ज्ञान दुःखाचा नाश करणारें आहे, असें मला वाटत नाहीं. कारण हें भावि दुःख अतिशय प्रबल असल्यामुळें ज्ञानानें अनिवार्य आहे. जीवन्मुक्त ऋषीहि एकदा लोकव्यवहार

करूं लागले व लोकांत स्थित झाले, म्हणजे सुख प्राप्त झालें असतां सुखी व दुःख प्राप्त झालें असतां दुःखी होत असतात. मग स्त्री, पुत्र, पौत्र, बांधव आणि राज्य इत्यादि सहस्रावधि मोहांत आसक्त झालेल्या पुरुषांविषयीं काय सांगावें !

या अनर्थाचा प्रतिकार करणें कसें शक्य होईल, याचा मला मोठा विचार पडला आहे, विचार करून पाहतां मला कुरूंचा विनाशच स्पष्ट दिसत आहे. द्यूतामुळें कौरवांवर हें महत् संकट ओढवलें आहे. माझ्या मंदमति पुत्रानें ऐश्वर्याच्या इच्छेनें व लोभानें हें पाप आचरिलें. सदा गमनशील कालाचा हा स्वभावच आहे, असें मी समजतों. खालीं व वर गमन करणाऱ्या रथचक्राच्या धांवेप्रमाणें तो सुख व दुःख देत सतत संचार करीत असतो. त्याच्या कक्षेंतून निसटून जातां येणें शक्य नाहीं.

हे संजया, मी आतां काय करूं ! कसें करूं ! कोठें जाऊं ! हे सर्व कालवश झालेले मूढ कौरव नाश पावतील, आणि माझे शंभर पुत्र मरून पडले असतां मला अवश होऊन त्यांच्या विलाप करणाऱ्या स्त्रियांचा आक्रोश ऐकावा लागेल ! अरे अरे, त्यापेक्षां मरण पत्करलें ! बा संजया, मला मरणाचा कांहीं उपाय तरी सांग. ग्रीष्म ऋतूंत वायूनें प्रेरणा केलेला प्रज्वलित अग्नि ज्याप्रमाणें तृणाला दग्ध करितो, त्याप्रमाणें ज्याचा साह्यकर्ता अर्जुन आहे, असा गदाधर भीम माझ्या पुत्रांचा संहार करील. ५. ५. ५१.

---

## अध्याय ५२ वा.

[ १ अर्जुनाचा पराक्रम मनांत आणून धृतराष्ट्राचा शोक. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, ज्याच्या मुखांतून आम्हीं कधींहि अनृत भाषण ऐकलेलें नाहीं, ज्याचा योद्धा धनंजय आहे, तो धर्मराज त्रैलोक्यहि जिंकण्यास समर्थ आहे. त्या गांडीवधारी अर्जुनाचा युद्धांत कोण बरें पराभव करील ! याचा मी रात्रंदिवस विचार करीत आहें. परंतु रथांतून त्याच्यावर चाल करून जाईल असा एकहि योद्धा मला दिसत नाहीं. तो धनुर्धर हृदयाचा छेद करणारे कर्णि-नालीकादि बाण सोडूं लागला असतां, त्याला प्रतिकार करणारा तत्तुल्य अन्य योद्धा नाहीं.

सूता, कर्ण आणि द्रोण हे दोघे वीर अस्त्रवेत्ते व समरांत अजिंक्य आहेत, ते दोघे जर अर्जुनावर चालून गेले, तर कोणाचा जय होईल, याविषयीं लोकांना फार मोठा संशय वाटेल, परंतु माझा पक्ष विजयी होईल, असें मला वाटत नाहीं. कर्ण जरी दयावान् आहे, तरी त्यानें भीमादि पांडवांचे अपराध केले आहेत; शिवाय त्याला युद्धांत शेवटीं अस्त्रविद्येचें विस्मरण होईल. द्रोणाचार्य वृद्ध असून ते पांडवांचे गुरु आहेत. अर्जुन त्यांचा शिष्य असल्यामुळें ते निःपक्षपातानें युद्ध करणार नाहींत. उलटपक्षीं पार्थ समर्थ, बलवान्, धनुर्धर व उत्साहपूर्ण आहे. त्यांचें अतिशय तुमुल युद्ध होईल आणि शेवटीं पांडवांचाच जय होईल, असें मला स्पष्ट दिसत आहे.

संजया, ते सर्वच अस्त्रनिपुण, शूर व महा यशस्वी आहेत, ते इंद्राच्या सर्व ऐश्वर्याचाहि त्याग करतील, पण स्वतःचा विजय सोडणार नाहींत. तस्मात् कर्ण व द्रोण या दोघांचा वध झाला असतां आमची शांति होईल आणि अर्जुन गतप्राण झाला असतां पांडवांची शांति होईल. परंतु अर्जुनाचा हन्ता किंवा जेता यालोकीं एकहि नाहीं. माझ्या मंदमति पुत्रांवरील पार्थाचा उद्दीपित झालेला क्रोध कसा शांत होईल !

संजया, पुष्कळ वीर अस्त्रविद्या जाणतात. ते कधीं जिंकतात तर कधीं जिंकिले जातात, परंतु फाल्गुनाचा मात्र निश्चयानें सर्वदा विजयच ऐकूं येतो. त्या पराक्रमी धनंजयानें सर्व देवांना जिंकून अग्नीला खांडव वन अर्पण केलें, त्याला तेहतीस वर्षें होऊन गेलीं. त्या कौंतेयाचा पराजय आम्हांला कधीं ठाऊक नाहीं. बाबारे, शील व आचरण यांत पार्थतुल्य असलेला हृषीकेश युद्धांत ज्याचें सारथ्य करितो, त्या अर्जुनाचा जय इंद्राच्या विजयाप्रमाणें निश्चित आहे.

सूता, अर्जुनाच्या रथावर दोघे कृष्ण व तिसरें गांडिव धनुष्य हीं तीन तेजेंच एकत्र जमलीं आहेत, असें आम्हीं ऐकलें आहे आणि आमच्या पक्षांत अर्जुनासारखा योद्धा, कृष्णासारखा सारथि किंवा गांडिवासारखें धनुष्य यांतील एकहि नाहीं, परंतु दुर्योधनाच्या वश झालेले मंदमति कर्णादि हें जाणत नाहींत. संजया, मनुष्याच्या मस्तकावर विद्युत्प्रहार झाला असतांहि, कदाचित् कांहीं शिल्लक राहूं शकेल, परंतु अर्जुनानें सोडलेले शर मात्र कांहींहि अवशेष ठेवणार नाहींत.

अर्जुनाच्या हस्तलाघवाचें काय वर्णन करावें ! त्याचा बाणवर्षाव व शत्रूंचा नाश या दोन्ही क्रिया एकाच क्षणीं होत असल्याप्रमाणें दिसतात. तो महात्मा शरवृष्टींनीं शत्रुशरीरापासून त्यांचीं मस्तकें जणु काय उपटूनच टाकीत आहे, असें दिसतें.

संजया, गांडीवापासून सुटलेलें व सर्व दिशांना प्रदीप्त करणारें बाणरूपी तेज युद्धामध्यें माझ्या पुत्रांच्या सेनेला दग्ध करील ! सव्यसाची अर्जुनाच्या रथघोषानें आमची प्रचंड भारती सेना भयार्त व त्रस्त झालेली मला भासत आहे. वायूनें प्रज्वलित केलेला प्रचंड दावानल जसें तृण जाळतो, तसा हा धनंजय माझ्या पुत्रांना दग्ध करील. तो किरिटी रणामध्यें तीक्ष्ण बाणांचा वर्षाव करूं लागला, म्हणजे विधात्यानें निर्मिलेल्या सर्वसंहारक अंतकाप्रमाणें त्याचें कोणालाहि निवारण करतां येणार नाहीं. कौरवांचे छेद, भेद, पलायन इत्यादि प्रकार मला घरांत बसून ऐकावे लागतील. त्याचप्रमाणें पांडवांचा वृत्तान्तहि माझ्या कानीं येईल. एकंदरींत भारतांचा क्षय समीप आला आहे, हेंच खरें. ५. ५. ५२.

---

## अध्याय ५३ वा.

[ १ युधिष्ठिर व त्याचे साह्यकर्ते यांच्या सामर्थ्याचा विचार करून धृतराष्ट्राचा शोक. २ पुत्रांना शमाचा उपदेश.]

(१) धृतराष्ट्र—संजया, ज्याप्रमाणें सर्व पराक्रमी पांडव कौरवांना जिंकण्याची इच्छा करीत आहेत, त्याचप्रमाणें त्याच्या सर्व अग्रेसर वीरांनीं स्वतःच्या जीवावर उदार होऊन जय मिळविण्याचा निश्चय केला आहे. संजया, तूंच मला सांगत आहेस कीं, पांडवांच्या पक्षाला पांचाल, केकय, मत्स्य, मागध आणि वत्स इत्यादि पराक्रमी भूपाल मिळाले आहेत. त्याचप्रमाणें जो जगत्स्रष्टा केवल संकल्पानेंच इंद्रासह हे सर्व लोक वश करून घेण्यास समर्थ आहे, तो सर्व शक्तिमान् कृष्ण पांडवांच्या जयासाठीं झटत आहे. ज्या शैनेयानें अर्जुनापासून समस्त अस्त्रविद्या मोठ्या त्वरेनें प्राप्त करून घेतली, तो सात्यकि शेतांतील बीजांप्रमाणें शरांची पेरणी करीत रणक्षेत्रांत स्थित होईल.

पांचाल धृष्टद्युम्न परम अस्त्रवेत्ता व क्रूर कर्म करणारा आहे. तो महारथ माझ्या सैन्याशीं युद्ध करील.

बा सूता, युधिष्ठिराचा क्रोध, अर्जुनाचा पराक्रम आणि दोघे माद्रेय व भीम, यांचें शौर्य यांचें मला अतिशय भय वाटत आहे. त्या मनुष्येंद्र पांडवांनीं सैन्यामध्यें अमानुष अस्त्रजाल पसरलें असतां माझे सैनिक त्याचें उल्लंघन करून जाऊं शकणार नाहींत, म्हणून मी सारखा आक्रोश करीत आहें.

संजया, धर्मात्मा पांडुनंदन दर्शनीय, विवेकी, श्रीनें युक्त, मेधावी व विचारी आहे. तो वेदाध्ययनाच्या तेजानें युक्त आहे. मित्र, अमात्य, युद्धनिपुण भ्राते, श्वशुर व वीर महारथ योद्धे या सर्वांनीं तो महारथ पांडव संपन्न आहे.

तो युधिष्ठिर धैर्यवान् असून आपल्या संकेताचें रक्षण करणारा आहे. तो कदापि निष्ठुर भाषण करीत नाहीं. तो ऱ्हीमान् सत्यपराक्रमी ज्येष्ठ पांडव निश्चयी, बहुश्रुत, वृद्धांची सेवा करणारा व जितेंद्रिय आहे. तो सर्वगुणसंपन्न कुंतीपुत्र प्रज्वलित अग्नीप्रमाणें संतप्त झाला असतां त्याच्या क्रोधाग्नींत पतंगाप्रमाणें कोणता मूर्ख उडी टाकील ! ( त्या क्रोधसंतप्त झालेल्या युधिष्ठिराच्या समीप कोण जाऊं शकेल ! )

संजया, मीं युधिष्ठिराशीं कपटद्यूतानें मिथ्याचरण केलें आहे. त्यानें आजपर्यंत भस्माच्छादित अग्नीप्रमाणें आपल्या क्रोधाचें नियमन केलें होतें. तो युद्धामध्यें माझ्या मूढमति पुत्रांचा अंत करील.

( २ ) यास्तव हे कौरवहो, त्या पांडुपुत्रांशीं युद्ध न करणेंच श्रेयस्कर आहे, हें माझें सांगणें ऐका. या युद्धानें आपल्या समग्र कुलाचा निश्चित क्षय होईल, हेंच माझें परम मत आहे. शमानेंच माझें मन शांत होईल. तुम्हांला जर युद्ध न करण्याचा हा विचार संमत असेल, तर हे कौरवांनो, आम्ही शमाचा यत्न करितों. युधिष्ठिर क्लेश भोगणाऱ्या आमची कदापि उपेक्षा करणार नाहीं. कारण या युद्धाचें निमित्त अधर्मानें उपस्थित झालें आहे, म्हणून तो धर्मराज माझीच निंदा करीत आहे. त्याची शमार्थ प्रार्थना केली असतां तो युद्धाला कसा बरें प्रवृत्त होईल ! ५. ५. ५३.

---

## अध्याय ५४ वा.

[ १ 'युद्धांत कौरवांचा क्षय निश्चित आहे व पुत्रांवर प्रभुत्व नसलेल्या तुझा विलाप व्यर्थ आहे,' असें संजयाचें उत्तर. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, तूं जें म्हणतोस तें खरें आहे. या युद्धांत डिवानें क्षत्रियांचा विनाश होणार, हेंच स्पष्ट दिसत आहे. परंतु सव्यसाचीचें मर्थ्य जाणत असूनहि तूं नित्य पुत्रांच्या वश कसा होतोस याचेंच मला श्चर्य वाटतें. हे भरतश्रेष्ठा, या वेळीं तूं शमाची इच्छा दर्शवीत आहेस खरा, तु ही तुझी बुद्धि कायम रहाणार नाहीं. कारण आरंभापासून तूंच पांडवांचे पराध करीत आला आहेस.

वस्तुतः तूं पांडवांना पितृतुल्य आहेस. जो सहृदय, संयमी व सावधान त्त असतो, तोच श्रेष्ठ पिता होऊं शकतो. त्यानें नेहमीं पुत्रांच्या हितामध्यें थत असावें, हेंच योग्य होय. पण पांडवांचा सतत द्रोह करणारा तूं त्यांचा रु होण्यास पात्र नाहींस. हे महाराज, द्यूतप्रसंगीं पांडवांचा सारखा पराजय त असतां 'हें जिंकलें, अमुक मिळविलें,' इत्यादि कौरवांचे उद्गार ऐकून खाद्या बालकाप्रमाणें तूं हंसत होतास ! त्यावेळीं तुझे पुत्र पार्थांना कठोर चनें बोलत असतां तूं त्यांची उपेक्षा केलीस. परंतु त्यावेळीं हे पांडुपुत्र समग्र ाज्य जिंकून घेतील, हा स्वतःचा विनाश तुझ्या लक्षांत आला नाहीं.

हे राजेंद्रा, तुझ्या पितरांचें जांगलांसह कुरुप्रदेश एवढेंच राज्य होतें. परंतु ा वीर पांडवांनीं आपल्या बाहुबलानें जिंकलेली समग्र पृथ्वी तूं अन्यायानें ाप्त करून घेतली आहेस. ज्यावेळीं त्या पृथापुत्रांनीं स्वपराक्रमानें जिंकलेली ूमि तुला निवेदन केली, तेव्हां तूं हें सर्व स्वतःचेंच कर्तृत्व मानिलेंस !

हे धृतराष्ट्र महाराज, द्यूतांत पराजित झालेले पांडव वनवासाला निघाले असतां तुला वारंवार हर्ष होत होता, परंतु गंधर्वानें बद्ध केलेले तुझे पुत्र जेव्हां संकटार्णवांत बुडूं लागले, तेव्हां महात्म्या पांडवांनींच त्यांना वांचविलें. पार्थानें तुझ्या दुर्मति पुत्रांना सोडवून परत आणिलें. हे राजा, अर्जुन एकदा तीक्ष्ण बाणांचा वर्षाव करूं लागला कीं, समुद्रहि शुष्क होतील, मग रक्त-मांसांनीं युक्त असलेल्या प्राण्यांविषयीं काय सांगावें !

शरसंधान करणाऱ्या धनुर्धरांत अर्जुन श्रेष्ठ, धनुष्यांमध्यें गांडिव श्रेष्ठ, सर्व प्राणिमात्रांत केशव श्रेष्ठ, आयुधांमध्यें सुदर्शन चक्र श्रेष्ठ आणि सर्व ध्वजां-

मध्यें सुशोभित झालेला कपिध्वज वरिष्ठ आहे. अशाप्रकारच्या उत्कृष्ट सामग्रीनें व श्वेत अश्वांनीं युक्त असलेला अर्जुनाचा रथ उगारलेल्या कालचक्राप्रमाणें रणांगणांत आमच्या असंख्य सेनेचा नाश करील. हे राजसत्तमा, ज्याच्यापाशीं भीमार्जुनासारखे योद्धे आहेत, त्यालाच आतां ही समग्र पृथ्वी निःसंशय प्राप्त होईल.

त्याचप्रमाणें भीमसेनानें मृतप्राय केलेली तुझी सेना पाहूनच दुर्योधनादि कौरव क्षीण होतील. हे राजन्, भीमार्जुनांना भ्यालेले तुझे पुत्र व त्यांचे अनुयायी नृपाल कदापि विजयी होणार नाहींत. हे विभो, मत्स्य, पांचाल व केकय आजच तुला तुच्छ मानीत आहेत आणि शाल्व व शूरसेनादि सर्व भूपति तुझी अवज्ञा करीत आहेत. धीमान् पार्थाचें सामर्थ्य जाणणारे ते सर्व नरश्रेष्ठ मोठ्या भक्तीनें पांडवांच्या बाजूला गेले आहेत. त्यांच्यावरील प्रेमामुळें तुझ्या पुत्रांशीं ते सदैव विरोध करीत असतात.

हे महाराजा, हे पांडुपुत्र धर्मनिष्ठ असल्यामुळें वधाला सर्वथा पात्र नाहींत. अशा धर्मात्म्यांना ज्यानें अन्यायानें क्लेश दिले व अर्जुनहि जो त्यांचा द्वेष करीत आहे, त्या पातकी पुत्राचें त्याच्या अनुयायांसह सर्व उपायांनीं नियमन केलें पाहिजे.

हे राजेंद्रा, द्यूताच्या वेळीं ज्ञानी विदुरानें व मीं तुला कंठशोष करून ‘ हें द्यूत नको ’ असें वारंवार सांगितलें; परंतु तेव्हां तूं आमचें म्हणणें ऐकिलें नाहींस, मग आतां शोक करून काय उपयोग ! तूं पांडवांना त्यांचें राज्य परत देण्यास समर्थ नाहींस, किंवा त्यांना जिंकण्यासहि असमर्थ आहेस, तेव्हां तूं जो हा पांडवांना उद्देशून विलाप करीत आहेस, तो सर्व निरर्थक आहे. ५. ५. ५४.

---

## अध्याय ५५ वा.

[ १ ‘ शत्रूंपेक्षां आपलें बल अधिक आहे ’ या कथनानें दुर्योधनानें केलेली धृतराष्ट्राची शोकनिवृत्ति. ]

( १ ) **दुर्योधन**—हे महाराज, तूं भिऊं नको व आमच्यासाठीं शोकहि करूं नको. आम्ही बलाढ्य असून शत्रूंना समरांत जिंकण्यास समर्थ आहों. पार्थ जेव्हां वनवासाला गेले व ते इंद्रप्रस्थाच्या समीपच होते, तेव्हां मधुसूदन

परराष्ट्राचें मर्दन करणाऱ्या प्रचंड सेनेसह त्यांच्याकडे गेला. तसेंच केकय, धृष्टकेतू, धृष्टद्युम्न व इतरहि अनेक अनुयायी राजे त्याला अनुसरले. त्या सर्वांनीं एकत्र जमून हे भारता, तुझी सर्व कौरवांसह निंदा केली आणि कृष्णाजिनें परिधान करून बसलेल्या युधिष्ठिराचा सन्मान केला. ते कृष्णप्रभृति सर्व नराधिप पुत्रांदिकासह तुझा वंशच्छेद करून आपलें राज्य परत मिळविण्याची इच्छा करीत आहेत. किंबहुना त्या सर्वांनीं तशी प्रतिज्ञाच केली आहे.

हे भरतर्षभा, मीं जेव्हां हा वृत्तान्त ऐकला, तेव्हां ज्ञातिक्षयाच्या भीतीनें भीष्म, द्रोण व कृप यांस म्हटलें—पांडव आपली प्रतिज्ञा सत्य करतील अशी माझी खात्री आहे. शिवाय वासुदेव आमचा समूल उच्छेद करण्याची इच्छा करीत आहे. यास्तव एका विदुरावांचून तुम्ही माझे सर्व आप्त-बांधव युद्धांत मृत्युमुखीं पडाल, असें मला निश्चित वाटत आहे.

कुरुश्रेष्ठ धृतराष्ट्र-महाराज धर्मज्ञ असल्यामुळें वध्य नाहीं. परंतु हा जनार्दन आमचें पूर्ण निर्मूलन करून निष्कंटक झालेल्या कौरवांच्या एकछत्री राज्यावर युधिष्ठिराची स्थापना करील. तेव्हां अशा बिकट परिस्थितींत आम्हांला काय करणें इष्ट आहे! आम्हीं संधीसाठीं पांडवांना शरण जावें, किंवा लज्जेनें पलायन करावें, किंवा प्राणांवर उदार होऊन शत्रूंपुढें युद्धाला उभें रहावें!

युद्धांत आमचा पराजय होईल, हें निश्चित आहे. कारण सर्व भूपाल युधिष्ठिराच्या अधीन आहेत आणि तीं सर्व राष्ट्रें आम्हांविषयीं स्नेहशून्य आहेत. शिवाय आमचे सर्व मित्र आमच्यावर कोपले आहेत. ज्या अर्थीं सर्व स्वजन व नृपाल सर्वशः आमचा धिक्कार करीत आहेत, त्या अर्थीं पांडवांना प्रणिपात करण्यांत दोष नाहीं. त्यामुळें वंशक्षय न होतां दीर्घ काल संधि होईल.

तथापि मला युद्ध करणेंच रुचतें. कां म्हणाल तर सांगतों ऐका—माझ्या अंध धृतराष्ट्र पित्यासाठीं माझ्या मनाला अतिशय दुःख वाटत आहे. कारण त्या जनाधिपानें माझ्यासाठीं अनेक दुःखें व विविध क्लेश सहन केले आहेत. शिवाय माझें प्रिय करण्यासाठीं धृतराष्ट्राच्या इतर सर्व पुत्रांनींहि पूर्वींच शत्रूंचा अवरोध केला आहे, हें सर्व आपल्याला ठाऊकच आहे. त्यामुळें ते महारथ पांडव राजा धृतराष्ट्राचा अमात्यांसह कुलच्छेद करून वैराचा सूड उगवतील.

माझें हें भाषण ऐकून द्रोण, भीष्म, कृप व अश्वत्थामा यांनीं मी अतिशय व्यथित होऊन चिंतामग्न झालों आहें हें जाणलें व मला म्हटलें—"हे परंतपा,

आम्हीं जरी शत्रूंशीं सर्वप्रकारें द्रोह केला आहे, तरी तूं भिऊं नको. युद्धाला उभ्या राहिलेल्या आम्हांला जिंकण्यास पांडव असमर्थ आहेत. शिवाय आमच्यापैकीं एकेकटा योद्धा सर्व पार्थिवांचा पराजय करण्यास समर्थ आहे. त्यांना खुशाल येऊं द्या. आम्ही तीक्ष्ण शरांनीं त्यांचा दर्प घालवूं.

हे सुयोधना, पूर्वीं शांतनुराजा मृत झाला असतां एकट्या भीष्मानें एका रथानें सर्व पार्थिवांना जिंकलें आहे आणि अति क्रुद्ध झालेल्या या कुरुसत्तमानें पुष्कळांना मारलेंहि आहे. तेव्हां ते सर्व भूपति भीतीनें या देवव्रताला शरण आले. तो पराक्रमी भीष्म आमच्यासह रणांत शत्रूंना जिंकण्यास समर्थ आहे. तस्मात् तुझें भय नाहींसें होवो."

हे प्रभो, याप्रमाणें त्यावेळीं या अमित तेजस्वी वीरांचा निश्चय होता. हे तात, पूर्वीं ही सर्व पृथ्वी शत्रूंच्या वश होती. पण आज ते पांडुपुत्र आम्हांला जिंकण्यास समर्थ नाहींत. पांडव आज वीर्यहीन झाले आहेत व त्यांना आतां भीष्मादि वीरांचें साह्य होणें मुळींच शक्य नाहीं. ते त्या वीरांच्या साह्याला मुकले आहेत. पण ज्याअर्थीं आम्ही साह्यसंपन्न आहों, त्याअर्थीं ही पृथ्वी आमच्याच अधीन राहील. शिवाय सुख-दुःखांत माझ्याशीं समरस असलेले अनेक राजे मीं जमविले आहेत. ते माझ्यासाठीं अग्नींत प्रवेश करतील किंवा समुद्रांतहि उडी टाकतील.

परंतु हे महाराज, पांडवांचें गुणवर्णन ऐकून तूं मात्र अतिशय दुःखाकुल झाला आहेस व एखाद्या भ्रांत झालेल्या मनुष्याप्रमाणें व्यर्थ विलाप करीत आहेस, हें पाहून हे सर्व भूपति तुला हंसत आहेत. हे राजन्, यांतील एकेकच नृपाल 'आपण पांडवांना पराभूत करण्यास समर्थ आहों,' असें समजत आहे. तस्मात् तूं ही भीति सोडून दे. हे कुरुश्रेष्ठा, माझ्या समग्र सेनेला जिंकण्यास साक्षात् देवेंद्रहि समर्थ नाहीं. या अक्षय्य सेनेचा स्वयंभू ब्रह्मदेवालाहि नाश करतां येणार नाहीं. मग इतरांची काय कथा !

हे विभो, युधिष्ठिर एखादी नगरी न मागतां फक्त पांच गांवांचीच याचना करीत आहे, त्याचें कारण तो माझें प्रचंड सैन्य व प्रभाव यांना भीत आहे. आतां तूं जो कुंतीपुत्र वृकोदराला समर्थ मानीत आहेस, तोहि तुझा भ्रमच आहे. हे भारता, तूं माझा प्रभाव अद्यापि पूर्णपणें जाणला नाहींस. गदायुद्धांत माझी बरोबरी करणारा एकहि योद्धा या समग्र पृथ्वीवर सांपड-

णार नाहीं, पूर्वी कोणी झाला नाहीं व पुढें होणार नाहीं. मी गुरुगृहीं मोठ्या क्लेशांत राहून या विद्येंत प्रावीण्य संपादन केलें आहे. तस्मात् मला भीमाचें किंवा अन्य कोणाचें यत्किंचित्हि भय वाटत नाहीं.

हे महाराज, तुझें कल्याण असो. ज्या हलधर संकर्षणाची मीं शिष्यत्वानें परिचर्या केली, त्या बलरामाचा ' दुर्योधनासारखा गदायुद्ध करणारा कोणी नाहीं ' असा निश्चय आहे. मी गदायुद्धांत संकर्षणतुल्य आहें. या पृथ्वीवर माझ्या पेक्षां अधिक बलवान् कोणी नाहीं. युद्धांत भीम माझा गदाप्रहार सहन करूं शकणार नाहीं. हे नृपश्रेष्ठा, क्रुद्ध झालेल्या माझा एकच घोर गदाप्रहार भीमाला तत्काल यमसदनीं पोंचवील. हातीं गदा घेतलेला वृकोदर एकदां माझ्या दृष्टीं पडावा अशी माझी फार दिवसांची इच्छा आहे. हा माझा नित्य मनोरथ आहे. हे राजा, युद्धांत मीं गदेचा एक प्रहार करतांच वृकोदराचीं गात्रें विशीर्ण होऊन तो धरणीवर गतप्राण होऊन पडेल. माझ्या एकाच गदाप्रहारानें हिमालय पर्वताचेहि सहस्रावधि तुकडे होतील. हा माझा प्रभाव तो भीम तर जाणून आहेच, पण ' दुर्योधनासारखा गदायुद्धांत दुसरा योद्धा नाहीं ' हें कृष्णार्जुनहि निश्चयानें जाणतात. तस्मात् या महायुद्धांत तुला वृकोदराचें जें भय वाटत आहे, तें दूर होवो. मी त्या पृथापुत्राचा नाश करीन, तूं खिन्न होऊं नको.

हे भरतर्षभा, मीं त्या भीमाचा एकदा वध केला कीं, अर्जुनाशीं युद्ध करण्यास त्याच्या समान—किंबहुना त्याच्यापेक्षां सरस—अनेक योद्धे आहेत. ते तत्काल त्या धनंजयाला जणुकाय उडवून देतील. भीष्म, द्रोण, कृप, अश्वत्थामा, कर्ण, भूरिश्रवा, प्राग्जोतिषाधिप, शल्य व सिंधुराज जयद्रथ यांतील एकेकटा वीर पांडवांचा संहार करण्यास समर्थ आहे. मग भीष्म-द्रोणांसारखे पराक्रमी योद्धे एकत्र जमल्यावर पांडवांना एका क्षणांत यमसदनीं पाठवितील, हें काय सांगावें !

अशाप्रकारें समग्र पृथ्वीला पादाक्रांत करणारी माझी सेना एका धनंजयाला जिंकण्यास असमर्थ होईल, असें हे राजन्, तुला कां वाटावें, हेंच मला कळत नाहीं.

भीष्म, द्रोण, कृप व अश्वत्थामा यांच्या शतशः बाणसमूहांनीं हा पार्थ जेव्हां व्यास होईल, तेव्हां तो अवश होऊन तत्काल यमलोकींच जाईल. हे भारता, हा शांतनुराजाचा पुत्र गांगेय ब्रह्मर्षितुल्य आहे. हा आमचा पिता-

मह देवांनाहि दुर्धर्ष आहे. मग इतरांची काय कथा! भीष्माचा वध करणारा या लोकीं कोणीहि नाहीं. या महात्म्याला त्याच्या पित्यानें प्रसन्न होऊन 'तूं इच्छेवांचून कदापि मरणार नाहींस' (तुला जेव्हां मरण यावें अशी इच्छा होईल तेव्हांच तूं मृत्यु पावशील) असा वर दिला आहे.

हे महाराज, ब्रह्मर्षि भरद्वाजापासून द्रोणपात्रामध्यें या द्रोणाचार्यांचा जन्म झाला आणि या आमच्या आचार्यांपासून परम अस्त्रवेत्ता अश्वत्थामा उत्पन्न झाला आहे. हा श्रीमान् कृपाचार्य महर्षि गौतमापासून शरस्तंबांत जन्म पावला. हाहि श्रेष्ठ आचार्य अवध्य आहे, अशी माझी समजूत आहे. याप्रमाणें हे नृप-श्रेष्ठा, ज्या वीराचे पिता, माता व मातुल हे तिघेहि अयोनिज आहेत तो शूर अश्वत्थामा माझ्या पक्षामध्यें स्थित आहे. हे भीष्मादि सर्व महारथ देवतुल्य आहेत. ते युद्धांमध्यें साक्षात् इंद्रालाहि व्यथित करतील. या पराक्रमी वीरांतील एकेकाकडे नुसतें वर मान करून पहाण्याचेंहि त्या पार्थाला धैर्य होणार नाहीं. मग ते सर्व नरव्याघ्र एकत्र जमले असतां धनंजयाचा वध करतील, यांत संशयच नाहीं.

हे कुरुसत्तमा, कर्णहि भीष्म-द्रोण-कृप यांच्या तुल्य आहे, असें माझें निश्चित मत आहे. ज्यावेळीं हा कर्ण गुरूची अनुज्ञा घेऊन स्वगृहीं परत आला तेव्हां परशुरामानें 'तूं मत्सम आहेस' असें त्याला म्हटलें आहे.

हा उदार कर्ण सहज कवच-कुंडलांनीं युक्त होता, त्या मनोरम शुभ कवच-कुंडलांचीं इंद्रानें शचीसाठीं याचना केली आणि तीं घेऊन त्याचें मूल्य म्हणून इंद्रानें आपली परम भयंकर अमोघ शक्ति त्याला दिली. त्या शक्तीनें सुसंरक्षित असलेल्या कर्णापुढें धनंजय कसा जिवंत राहील? हे राजन्, तस्मात् आमचा विजय हातांतील फलाप्रमाणें निश्चित आहे. त्याचप्रमाणें आमच्या शत्रूंचा या लोकीं पराजय होणार हें स्पष्टच दिसत आहे.

हे भारता, हा एकटा भीष्म प्रतिदिवशीं दहा लक्ष सैनिकांचा निःपात करण्यास समर्थ आहे, आणि हे धनुर्धर द्रोण, कृप व अश्वत्थामाहि तत्तुल्यच आहेत. त्याचप्रमाणें 'संशप्तक'-नामक क्षत्रियांचे प्रचंड समुदाय महापराक्रमी आहेत. आम्ही अर्जुनाचा वध करूं, किंवा तो कपिध्वज आमचा नाश करील, अशी यांची प्रतिज्ञा आहे. हे महाराज, हे भीष्मादि महारथ सव्यसाचीचा वध करण्यास पुरेसे आहेत, असें हे सर्व भूपाल मानितात, असें असतांना हे तात, तूंच पांडवांना इतका कां भितोस!

हे परंतपा, भीमसेनाचा वध झाला असतां, त्यांच्यांतील अन्य कोणता वीर युद्धाला पुढें येईल, हें जर तुला ठाऊक असेल तर सांग पाहूं. हे राजन्, हे पांच भ्राते, धृष्टद्युम्न व सात्यकि हे सातच योद्धे काय ते शत्रूंच्या बलाचें सार आहे, असें मी समजतों. परंतु उलटपक्षीं आमच्याकडे किती योद्धे आहेत ते पहा. भीष्म-द्रोण-कृपादि विशिष्ट महारथ आहेतच. शिवाय अश्वत्थामा, कर्ण, सोमदत्त, बाह्लिक, प्राग्जोतिषाधिप, शल्य, अवंतीचे दोघे अधिपति, जयद्रथ, दुःशासन, दुर्मुख, दुःसह, श्रुतायु, चित्रसेन, पुरुमित्र, विविंशति, शल, भूरिश्रवा, आणि तुझा प्रिय पुत्र विकर्ण, इतके सर्व माझ्या बाजूनें युद्धाला सज्ज आहेत.

आतां सैन्याची तुलना केली तरी आमचें अकरा अक्षौहिणी व शत्रूचें फक्त सात अक्षौहिणी सैन्य आहे. सैन्यांच्या संख्येंत एवढें मोठें अंतर असतांना आमचा पराजय कसा होईल ! हे महाराज, ' आपल्यापेक्षां शत्रूचें बल एक तृतीयांशानें कमी आहे, असं पाहून त्याच्याशीं युद्ध करावें, ' असं बृहस्पतीनें म्हटलें आहे. तेव्हां माझें सैन्य शत्रुसेनेपेक्षां तृतियांशानें अधिक आहे. या शिवाय शत्रूचें पुष्कळसें सैन्य मला गुणहीन दिसत आहे. माझें सैन्य संख्येनें अधिक व गुणांनीं वरिष्ठ आहे. हे विशांपते, याप्रमाणें माझ्या सैन्याचें श्रेष्ठत्व व पांडवांचें न्यूनत्व लक्षांत घेऊन तूं असा मोहानें खिन्न होऊं नको.

**वैशंपायन**—हे जनमेजया, धृतराष्ट्राला असें बोलून तो परपुरंजय दुर्योधन आतां योग्य काल आहे, असें पाहून संजयाला पांडवांकडील अधिक वृत्तांत विचारूं लागला. ५. ५. ५५.

---

## अध्याय ५६ वा.

[ १ संजयानें केलेलें पांडवांच्या रथ-अश्व-ध्वजांचें वर्णन. ]

**दुर्योधन**—संजया, युद्धाची इच्छा करणारा कुंतीपुत्र युधिष्ठिर राजांसह केवल सात अक्षौहिणी सैन्य जमवूनच आम्हांशीं युद्ध करण्याची इच्छा कशी करीत आहे !

**संजय**—हे राजन्, मला युद्धप्रेप्सु युधिष्ठिर अतिशय हृष्ट व भीमार्जुन आणि दोघे माद्रीनंदन अत्यंत निर्भय दिसले. कुंतीपुत्र धनंजयानें आपले अस्त्रमंत्र उपस्थित आहेत किंवा नाहींत, याचा स्वतःशींच निश्चय करण्यासाठीं

आपला सर्व दिशांना प्रकाशित करणारा दिव्य रथ जोडला आणि विद्युल्लतेनें युक्त असलेल्या मेघाप्रमाणें भासणाऱ्या त्या आपल्या रथाचें अवलोकन करून व रथाचे सभोंवार दृष्टि फेंकून संतुष्ट झालेला तो सव्यसाची मला असें बोलला "हे संजया, आमचाच विजय होईल याचें हें पूर्व चिह्न पहा." दुर्योधना, अर्जुनानें मला जसें सांगितलें तसाच मला प्रत्यय आला.

दुर्योधन—हे सूता, द्यूतांत पराभव पावलेल्या त्या पांडवांचें अभिनंदन करून तूं जर त्यांची एवढी प्रशंसा करीत आहेस, तर त्या पार्थाच्या रथाला अश्व व ध्वज कशाप्रकारचे आहेत तें सांग पाहूं.

संजय—हे विभो, विश्वकर्मा, प्रजापति व इंद्र यांनीं अनेक चित्रविचित्र रूपें कल्पिलीं व दैवी मायेच्या योगानें त्या रथावर तीं दिव्य, श्रीमान्, विशाल व सूक्ष्म अशीं विविध प्रकारचीं रूपें स्थापन केलीं आहेत. भीमसेनाचा अनुरोध करण्यासाठीं वायुसुत हनुमानानें स्वतःची प्रतिकृति त्या ध्वजावर स्थापिली आहे. त्या ध्वजानें आपल्या तेजानें सर्व दिशांमध्यें, वर, खालीं व तिरकस एक योजन प्रदेश व्यापिला आहे. तो ध्वज विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या मायेनें वृक्षांनीं व्यापिलेल्या प्रदेशांतहि अडकून रहात नाहीं.

हे राजन्, आकाशांत प्रकाशणारें इंद्रधनुष्य जसें एकाच वर्णाचें नसतें व त्यांतील विविध वर्ण ओळखतां येत नाहींत, त्याचप्रमाणें या अर्जुनाच्या ध्वजावर विश्वकर्म्यानें स्थापन केलेलीं रूपें अनेक आकाराचीं दिसतात. ज्याप्रमाणें अग्नीचा धूम चित्र-विचित्र तेजस्वी आकार धारण करीत अंतरिक्षांत जाऊन पोंचतो, त्याचप्रमाणें अर्जुनाचा दिव्य ध्वज विश्वकर्म्यानें निर्मिला आहे. तथापि त्या ध्वजाचा रथाला भार होत नाहीं. किंवा त्याला कोठें प्रतिबंधहि होत नाहीं.

हे नरेंद्रा, पार्थाच्या रथाला चित्ररथानें दिलेले वायुसारखे वेगवान् जातिवंत श्वेत अश्व जोडले असतां, त्यांची गति स्वर्ग, पृथ्वी व अंतरिक्ष यांत कोठेंच कुंठित होत नाहीं. हा दिव्य रथ शंभर अश्वांनीं युक्त असून त्यांतील कितीहि अश्व मारले गेले, तरी दिव्यप्रभावानें शंभर अश्वांची संख्या पूर्ण व्हावी, असा पूर्वी त्यास वर मिळालेला आहे.

त्याचप्रमाणें भीमसेनाचा रथ वायूसारख्या वेगवान् आणि हस्तिदंतासारख्या शुभ्र अश्वांनीं युक्त असून ते अश्व सप्त-ऋषींसारखे शोभतात. अर्जुनानें सहदे-

वालाहि असेच उत्तम अश्व दिले आहेत. त्यानें आपल्या भ्रात्याला प्रेमानें दिलेले ते अश्व भुरकट रंगाचे असून त्यांचा पृष्ठभाग तित्तिर-पक्ष्याप्रमाणें चित्र-विचित्र आहे. राजा, अशा विशिष्ट अश्वांनीं युक्त असलेला रथ सहदेवाला वहात असतो. वृत्रशत्रु इंद्राला वहाणाऱ्या अश्वांप्रमाणें दिसणारे अश्व अर्जुनाला इंद्रापासून मिळाले आहेत. तेच श्रेष्ठ अश्व माद्रीपुत्र नकुलाला वहातात. ते अश्व वायूसारखे वेगवान् आहेत. या पूर्वोक्त अश्वांसारखेंच ज्यांचे वय, चाल व गति आहे, असे चित्ररथानें दिलेले महावेगवान् विचित्र रूपाचे जातिवंत अश्व सौभद्रेय व द्रौपदीचे कुमार यांना वाहतात. ५. ५. ५६.

---

## अध्याय ५७ वा.

[ १ पांडवपक्षीयांनीं केलेल्या कौरवांतील भिन्न भिन्न योद्धयांना मारण्याच्या निश्चयाचें कथन. २ कौरवांचा पक्ष बलाढ्य असल्यामुळें त्यास पांडवांची भीति नाहीं, असें दुर्योधनाचें कथन. ३ धृष्टद्युम्नाचें पांडवांस प्रोत्साहन व कौरवास निरोप. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे संजया, पांडवांसाठीं माझ्या पुत्रांच्या सैन्याशीं युद्ध करण्यास जे प्रेमानें तेथें जमलेले आहेत, त्यांतील कोणकोणत्या नृपांना तूं पाहिलेंस, तें मला सांग.

**संजय**—हे महाराज, अन्धक व वृष्णि यांचा प्रमुख श्रीकृष्ण मीं तेथें आलेला पाहिला. त्याचप्रमाणें चेकितान व सात्यकि हे दोघेहि पृथक् पृथक् एकेक अक्षौहिणी सैन्यासह पांडवांच्या आश्रयाला आले आहेत. ते दोघेहि अतिशय मानी व महारथ आहेत. पांचालराज आपल्या दहा पुत्रांसह एक अक्षौहिणी सैन्य घेऊन आला आहे. सत्यजित् व धृष्टद्युम्न हे दोघे त्यांचे प्रमुख वीर आहेत.

शिखंडीनें ज्याचें परिपालन केलें आहे, असा द्रुपदराजा पांडवांचा मान वाढवीत आपलें सर्व सैन्य कवचादिकांनीं सज्ज करून त्यासह पांडवांच्या साह्यार्थ आलेला आहे. विराटराजा आपले शंख व उत्तर या पुत्रांसह पांडवांना येऊन मिळाला आहे. तो भूपाल आपले अनेक भ्राते, पुत्र व एक अक्षौहिणी सैन्य घेऊन आला असून त्यांत सूर्यदत्तादि वीर व मदिराक्षादि योद्धे प्रमुख आहेत. जरासंधाचा पुत्र मागध व चेदिराज धृष्टकेतु पृथक् पृथक् अक्षौहिणी सैन्य घेऊन युधिष्ठिराकडे आले आहेत.

ज्यांचे ध्वज रक्तवर्ण आहेत, असे पांची केकय भ्राते अक्षौहिणी सैन्य घेऊन पांडवांकडे आले आहेत. याप्रमाणें हे सर्व राजे एकंदर सात अक्षौहिणी सैन्यासह तेथें जमलेले मीं पाहिले. हे पराक्रमी वीर पांडवांसाठीं धृतराष्ट्राच्या सेनेशीं युद्ध करतील.

हे राजन्, महारथ धृष्टद्युम्न त्यांचा सनापति आहे. तो वीर मानुष, दैव, गान्धर्व व आसुर व्यूह जाणतो.

हे प्रभो, हा शान्तनव भीष्म शिखंडीचा भाग कल्पिलेला आहे. शस्त्रप्रहार करणाऱ्या मत्स्यांसह विराट-राजा या गांगेयावर चालून जाईल. बलाढ्य मद्राधिप ज्येष्ठ पांडुपुत्राचा भाग आहे. परंतु ही योजना विषम झाली आहे, हे दोघे वीर तुल्यबल नाहींत, असें कांहीं लोकांचें मत आहे.

शंभर भ्राते व पुत्र यांसह दुयाधन आणि प्राच्य व दाक्षिणात्य राजे हा भीमसेनाचा भाग आहे. वैकर्तन कर्ण अर्जुनाचा भाग आहे. त्याचप्रमाणें अश्वत्थामा, विकर्ण, सैन्धव, जयद्रथ, आणि दुसरेहि जे पृथ्वीमध्यें अजिंक्य व स्वतःला शूर मानणारे वीर असतील ते सर्व धनंजयाचा भाग कल्पिलेला आहे.

केकय राजपुत्रांतील पांच भ्राते महा धनुर्धर आहेत. त्यांचें दुसऱ्या केकयांशीं वर असल्यामुळें ते पांडवांच्या पक्षाला मिळाले आहेत. ते कौरवपक्षांतील केकय राजांबरोबर संग्रामांत युद्ध करतीलच, शिवाय मालव, शाल्व त्रिगर्तांचे दोघे मुख्य संशसक वीर, हा सर्व भाग केकय भ्रात्यांचाच कल्पिलेला आहे.

दुर्योधन व दुःशासन यांचे सर्व पुत्र आणि राजा बृहद्बल हे अभिमन्यूचे भाग आहेत. ज्यांच्या रथांचे ध्वज सुवर्णानें भूषविले आहेत व ज्यांचा प्रमुख धृष्टद्युम्न आहे, असे द्रौपदीचे पांच पुत्र द्रोणाचार्यांवर चालून जातील. चेकितान सोमदत्ताशीं द्वरथ युद्ध करील. युयुधान सात्यकि कृतवर्मा भोजाशीं युद्ध करण्याची इच्छा करीत आहे. माद्रीपुत्र शूर सहदेवानें सौबल शकुनीला युद्धांत आपला अंश कल्पिलेला आहे. शकुनीचा पुत्र कितव, उलूक आणि सरस्वतीच्या तीरावरील लोक या सर्वांस नकुल आपला भाग मानीत आहे. शिवाय पांडुपुत्रांनीं इतरहि जे पार्थिव रणांगणांत दिसतील, त्यांनाहि त्यांच्या नांवांनीं संबोधून आह्वान

करण्याचा निश्चय केला आहे. याप्रमाणें पांडुपुत्रांनीं तुझ्या सैन्याशीं युद्ध करणारांचे विभाग योजून ठेविले आहेत. तें मीं तुला निवेदन केलें. आतां पुत्रांसह तुला काय विचार करावयाचा असेल, तो कालक्षेप न करतां कर.

**धृतराष्ट्र**—हे संजया, ज्यांच्याशीं बलाढ्य भीमसेन समरांगणांत युद्ध करणार आहे, ते कपटद्यूत खेळणारे माझे सर्व मूढ पुत्र जगांत नाहींतच असें मला वाटूं लागलें आहे. मृत्युरूपी यजमानानें हे सर्व राजे जणुकाय यज्ञपशुवत् वधासाठीं संस्कृत केले आहेत. ते अग्नींत उडी टाकणाऱ्या पतंगाप्रमाणें गांडिवरूपी अग्नींत पडतील. ज्यांनीं वैर संपादन केल आहे, अशा पांडवांनीं माझ्या सैन्याला उधळूनच लाविलें आहे, असें मी समजतों. युद्धामध्यें पांडवांनीं ज्यांचा पराभव केला आहे, अशा या माझ्या सैन्याचें रक्षण करण्यास कोण समर्थ आहे !

हे सर्वहि पांडव अतिरथ, शूर, कीर्तिमान्, प्रतापवान्, विजयी आणि सूर्य व अग्नि यांच्या तुल्य तेजस्वी आहेत. ज्यांचा नेता युधिष्ठिर व रक्षक मधुसूदन आहे आणि अर्जुन, वृकोदर, नकुल, सहदेव, धृष्टद्युम्न, सात्यकि, द्रुपद, अनुजांसह धृष्टकेतु, उत्तमौजा, पांचाल, दुर्जय, युधामन्यु, शिखंडी, क्षत्रदेव, उत्तर, काशिराज, चेदिराजे, सर्व मत्स्य, सृंजय, विराटाचा पुत्र बभ्रु, पांचाल प्रभद्रक, इत्यादि श्रेष्ठ योद्धे आहेत, त्या वीरांच्या इच्छेविरुद्ध साक्षात् इंद्रहि या पृथ्वीचें हरण करण्यास समर्थ नाहीं. ते रणधीर पर्वतांचा छेद करण्यासहि समर्थ आहेत. अशा सर्वगुणसंपन्न, अतिमानुष व प्रतापवान् वीरांशीं माझा हा दुर्बुद्धि पुत्र मी आक्रोश करीत असतांहि युद्धाची इच्छा करीत आहे.

( २ ) **दुर्योधन**—हे तात, आम्ही दोघेहि एकाच ज्ञातींत उत्पन्न झालेले व भूमीवर रहाणारे आहों. असें असतांना तूं एकट्या पांडवांचाच जय होईल, असें कसें समजत आहेस ! पितामह भीष्म, द्रोण, कृप, कर्ण, दुर्जय जयद्रथ, सोमदत्त व अश्वत्थामा, यांना सर्व देवांसह तेजस्वी धनुष्य धारण करणारा इंद्रहि युद्धांत जिंकण्यास समर्थ नाहीं. मग पांडवांची काय कथा ! विधात्यानें ही सर्व पृथ्वी निर्माण करून पांडवांना जिंकण्यासाठीं हे राजे मत्प्रीत्यर्थ उत्पन्न केले आहेत. ते सर्व भूपाल शस्त्रधारी शूर व समर्थ आहेत. ते पांडव माझ्या सैन्याकडे नुस्तें पहाण्यासहि समर्थ नाहींत. मीच उलट पुत्रांसह या पांडवांचा युद्धांत पराभव करीन. जे पार्थिव माझें प्रिय करण्याची

इच्छा करीत आहेत, ते पाशानें बद्ध केलेल्या बालमृगांप्रमाणें या पांडवांचें निवारण करितील आणि हे महाराज, माझ्या सैन्याच्या शरजालानें व रथसमूहानें पीडित झालेले ते पांडव पांचालांसह रणांगणांतून पलायन करतील.

धृतराष्ट्र—हे संजया, माझा हा मूढ पुत्र उन्मत्तासारखा व्यर्थ वल्गना करीत आहे, परंतु तो युद्धांत धर्मराजाला जिंकण्यास समर्थ नाहीं. ते पांडव धर्मज्ञ व यशस्वी आहेत. माझ्या या मूढ पुत्रांचें व त्या महात्म्याचें बल हा भीष्म पूर्णपणें जाणतो, म्हणूनच त्याला त्या वीरांशीं युद्ध करणें रुचत नाहीं.

( ३ ) संजय—हे भारता, पांडवांना 'युद्ध करा, युद्धाला भिऊं नका' असें धृष्टद्युम्न सतत सांगत असतो. तो धृष्टद्युम्न एकदा माझ्या समक्ष म्हणाला—धार्तराष्ट्राच्या पक्षाला जे जे राजे मिळाले आहेत, ते आपापल्या सज्ज झालेल्या सैनिकांसह क्रुद्ध होऊन जेव्हां त्या तुमुल संग्रामांत एकत्र जमतील, तेव्हां जलाशयांतील मत्स्यांना गिळणाऱ्या 'तिमि'-नामक प्रचंड मत्स्याप्रमाणें मी एकटा त्या सर्वांचा संहार करीन. भीष्म, द्रोण, कृप, कर्ण, अश्वत्थामा, शल्य व सुयोधन या सर्वांचें मी समुद्राचा निरोध करणाऱ्या वेलेप्रमाणें निवारण करीन.

धृष्टद्युम्न असें बोलला असतां धर्मात्मा राजा युधिष्ठिर त्याला म्हणाला—"हे धृष्टद्युम्ना, पांडवांसह सर्व पांचाल तुझें धैर्य व वीर यांवरच अवलंबून आहेत. यास्तव तूंच आतां घनघोर संग्रामांतून आमचा उद्धार कर. हे महाबाहो, तूं क्षात्रधर्मांत स्थित आहेस, हें मी जाणतों. युद्ध करण्याच्या इच्छेनें पुढें आलेल्या कौरवांचा निग्रह करण्यास तूं एकटाच समर्थ व पुरेसा आहेस. तूं जें कांहीं करशील तें आम्हांला हितावहच होईल. संग्रामांत स्वपक्षांतील योद्धे पराभव पावून रक्षकाची इच्छा करूं लागले असतां जो शूर पुरुष पराक्रम गाजवीत अग्रभागीं स्थित असतो, त्या वीराला सहस्रावधि मूल्य देऊन विकत घ्यावें, असें नीतिशास्त्रज्ञ म्हणतात. हे नरश्रेष्ठा, तूं शूर, बलवान् व पराक्रमी आहेस. युद्धामध्यें भयार्त झालेल्या लोकांचा तूं त्राता आहेस."

धर्मात्म्या युधिष्ठिरानें असें म्हटलें असतां धृष्टद्युम्न मला असें निर्भय वचन बोलला—हे सूता, दुर्योधनाचे जे बाह्लिकादि कौरव योद्धे आहेत त्यांना, सर्व प्रजाजनांना, त्याचप्रमाणें, ज्यांचें आयुष्य आतां संपत आलें आहे, असे कृप, कर्ण, पुत्रासह द्रोण, जयद्रथ, दुःशासन, विकर्ण, भीष्म आणि राजा दुर्योधन

यांना तूं सत्वर जाऊन माझा हा निरोप सांग. जा, विलंब लावूं नको. त्या सर्वांना म्हणावें—तुम्ही युधिष्ठिराशीं सामोपचाराचें बोलणें कराल, तर श्रीकृष्ण ज्याचें संरक्षण करीत आहे, तो अर्जुन तुमचा वध करणार नाहीं. तुम्ही धर्मराजाचें अर्धें राज्य त्याला त्वरित देऊन टाका आणि लोकवीर पांडवांची क्षमा मागा.

सत्यविक्रम सव्यसाची पांडवांच्या तुल्य या पृथ्वीवर अन्य योद्धा नाहीं. त्या गांडिवधारी पार्थाचा रथ देवतांनीं अधिष्ठित आहे. तो मनुष्यांना अजिंक्य आहे. तस्मात् युद्ध करण्याचा विचार सोडून द्या. ५. ५. ५७.

---

## अध्याय ५८ वा.

[ १ धृतराष्ट्राचा दुर्योधनाला युद्ध न करण्याविषयीं पुनः उपदेश. २ दुर्योधनाची शम न करण्याची प्रतिज्ञा. ३ धृतराष्ट्राचा विलाप. ]

(१) धृतराष्ट्र—हा पांडुपुत्र युधिष्ठिर कुमार होता. तेव्हां पासूनच मी त्याचे गुण पहात आहें. तो ब्रह्मचारी व क्षात्रतेजानें युक्त आहे. अशा तेजस्वी वीराशीं हे माझे मूढमति पुत्र युद्धाची इच्छा करीत आहेत. मी सतत विलाप करीत असतां ते माझें ऐकत नाहींत. बा दुर्योधना, तूं युद्धापासून निवृत्त हो. कोणत्याहि प्रसंगीं सुज्ञ लोक युद्धाची प्रशंसा करीत नाहींत. अमात्यांसह निर्वाह करण्यास तुला पृथ्वीचें अर्धें राज्य पुरेसें आहे. यास्तव हे अरिंदमा, पांडुपुत्रांना त्यांचा उचित राज्यविभाग देऊन टाक. सर्व कौरव हेंच माझें सांगणें धर्मयुक्त आहे, असें मानीत आहेत. तस्मात् तूं महात्म्या पांडवांशीं शम करावास हेंच सर्वथा उचित होय.

तुझ्या सैन्यामध्यें व्याधि उत्पन्न झाले आहेत, सैनिक व अश्वादि वाहनें कण्डूरोगानें पीडित झालीं आहेत. हें पराजयाचें लक्षण आहे. हा तुझा विनाशच ओढवला आहे, परंतु मोहामुळें तूं तें जाणत नाहींस. बा सुयोधना, या युद्धाची मला इच्छा नाहीं. बाल्हिक, भीष्म, द्रोण, अश्वत्थामा, संजय, सोमदत्त, शल, कृप, सत्यव्रत, पुरुमित्र, जय व भूरिश्रवा, हेहि युद्धाची इच्छा करीत नाहींत. शत्रूंनीं पीडा दिली असतां कौरव ज्यांचा आश्रय करितात, ते हे सर्व योद्धे या युद्धाची प्रशंसा करीत नाहींत. म्हणून बाबारे, तुलाहि शम करणेंच मान्य होवो. तूं स्वतःच्या इच्छेनें हें युद्ध उपस्थित केलें नाहींस; तर कर्ण, पापी

दुःशासन व सौबल शकुनि, हे तिघे तुझ्याकडून हें कर्म करवीत आहेत, हें मी जाणतों.

( २ ) दुर्योधन—राजा, तूं सांगितलेल्या या भीष्मादि पूर्वोक्त वीरांवर भार टाकून मीं पांडवांना युद्धाचें आह्वान केलेलें नाहीं. हे तात, कर्ण व मीं अशा दोघांनीं मिळून या रणयज्ञाची दीक्षा घेतली आहे. आम्हीं युधिष्ठिराला यज्ञपशु कल्पिला आहे. रथ ही वेदी, खड्ग हीच स्रुवा, गदा स्रुक्, कवच हेंच सदोगृह, चार ऋत्विजांचें कर्म हेच अश्व, शर हेच दर्भ व यश हेंच हविर्द्रव्य, असा संकल्प करून आम्ही आत्मयज्ञानें रणांत यमाचें यजन करूं.

हे नृपते, याप्रमाणें जय मिळवून व आमच्या शत्रूंचा वध करून आम्ही ऐश्वर्यानें युक्त होऊं. हे तात, माझा भ्राता दुःशासन, कर्ण व मी असे तिघे मिळून या संग्रामांत पांडवांचा संहार करूं. एक तर मी पांडवांना मारून पृथ्वीचा अधिपति होईन, किंवा पांडव माझा वध करून या समग्र महीचा उपभोग घेतील. हे राजा, मी माझें जीवित, राज्य व धन या सर्वांचा त्याग करीन, पण पांडवांसह या जगांत राहणार नाहीं. सुईच्या अग्रानें व्यापिली जाईल इतकी भूमीहि मी पांडवांना देणार नाहीं.

( ३ ) धृतराष्ट्र—दुर्योधनाची तर मी आशा सोडलीच आहे. पण बाबारे, इतर सर्व कौरवांसाठीं मला दुःख आहे. 'रुरु' मृगांच्या कळपांत संचार करणाऱ्या बलाढ्य व्याघ्राप्रमाणें हे पांडव युद्धांत जमलेल्या श्रेष्ठ श्रेष्ठवीरांचा वध करतील. हा सात्यकि कुरुसेनेला एखाद्या स्त्रीप्रमाणें आपल्या दीर्घ बाहूंनीं चुरगळून टाकील, असें विपरीत लक्षण मला भासत आहे. युधिष्ठिराच्या सर्व सैन्यांतील न्यूनता भरून काढणारा हा मधुकुलोत्पन्न शैनेय सात्यकि रणांगणांत स्थित होऊन शेतांतील बीजाप्रमाणें शराची पेरणी करील. सर्व योद्ध्यांचा प्रमुख असलेला भीमसेन निर्भयपणें सैन्याच्या अग्रभागीं स्थित असतां सर्व वीर प्राकाराप्रमाणें त्याचा आश्रय करतील. भीमानें पर्वतप्राय उंच असलेल्या तुझ्या गजांचीं गंडस्थलें फोडून त्यांचें दंत भग्न करून रक्तानें माखलेल्या त्यांना भूमीवर लोळविलें आहे, असें तूं पहाशील. खरोखर त्या वेळीं पर्वतच जणुकाय विशीर्ण होऊन पडले आहेत, असा भास होईल आणि तशा घोर प्रसंगीं भीमाच्या स्पर्शाला भ्यालेल्या तुला माझ्या वचनाचें स्मरण होईल.

बा दुर्योधना, भीमसेनानें रथ, अश्व, गज, यांसह सर्व कौरवसैन्य दग्ध करून टाकिलें, म्हणजे त्या अग्नितुल्य वृकोदराला पाहून तूं माझे हे शब्द स्मरशील. बाबारे, पांडवांशीं जर शम केला नाहींस, तर महद्भय उपस्थित होईल. हा भीम गदाप्रहारानें तुमचा नाश करील. यास्तव शम करा. भीमसेनानें तोडलेल्या वनाप्रमाणें कौरवसैन्याचा निःपात केलेला जेव्हां तूं पहाशील, तेव्हां माझ्या या भाषणाची तुला आठवण होईल.

**वैशंपायन**—राजा, याप्रमाणें पुत्राला बोलून धृतराष्ट्रानें त्या सर्व नृपतींना तेंच सांगितलें आणि संजयाला पुनः प्रश्न केला. ५. ५. ५८.

---

## अध्याय ५९ वा.

[ १ संजयानें केलेलें कृष्णवचनाचें कथन. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे महाप्राज्ञा, महात्म्या कृष्णार्जुनानें काय भाषण केलें तें मला सांग. तुझें वचन ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**संजय**—हे राजन्, ऐक. मीं कृष्णार्जुनांना जसें पाहिलें व ते वीर मला जें कांहीं बोलले, तें सर्व मी तुला सांगतों. मीं अंतर्बाह्य शुद्ध होऊन, हात जोडून खालच्या मानेनें कृष्णार्जुनांच्या अंतःपुरांत प्रवेश केला. हे नृपाला, त्या प्रदेशीं अभिमन्यु किंवा नकुल-सहदेव यांनाहि जातां येत नाहीं ! तेथें दोघे कृष्ण, कृष्णा व सत्यभामा इतकींच मनुष्यें होतीं.

ते दोघेहि वासुदेव-धनंजय माध्वी नामक सुरा प्राशन करून मत्त झाले होते. त्यांनीं सर्वांगाला चंदनाचें अनुलेपन केलें होतें. पुष्पमाला धारण केल्या होत्या. ते उत्तम वस्त्रें परिधान करून दिव्य आभरणांनीं भूषित झाले होते. त्यांचें सुवर्णाचें विशाल आसन अनेक प्रकारच्या चित्र-विचित्र रत्नांनीं सुशोभित दिसत होतें. त्यावर विविध आस्तरणें घातलीं होतीं. अशा मूल्यवान् एकाच आसनावर ते दोघे अरिंदम बसले होते. त्यावेळीं कृष्णाचे दोन्ही चरण अर्जुनाच्या मांडीवर ठेवलेले मला दिसले व महात्म्या अर्जुनाचा एक पाय कृष्णेकडे व दुसरा भामेकडे दिसला.

हे राजन्, मी त्यांच्या समीप गेलों असतां पार्थानें मला सुवर्णाचें पादपीठ बसावयास दिलें. तेव्हां मीं त्या आसनाला हातानें स्पर्श करून खालीं भूमी-

वरच बसलों. त्यावेळीं हे प्रभो, पादपीठावरून वर उचललेले पार्थाचे शुभ-लक्षण युक्त दोन्ही चरण मीं पाहिले. त्याचे तळपाय ऊर्ध्व रेखांनीं चिह्नित होते.

हे महाराज, ते दोघेहि कृष्ण श्यामवर्ण व तरुण असून भव्य होते. शालवृक्षाच्या दोन स्कंधाप्रमाणें ते उन्नत दिसत होते. त्या दोघां महात्म्यांना अशा स्थितींत एकाच आसनावर बसलेलें पाहून मी अतिशय भयभीत झालों. ते दोघे कृष्णार्जुन इंद्र आणि विष्णु, यांच्या तुल्य आहेत. परंतु हा मंदमति दुर्योधन भीष्म-द्रोणांच्या आश्रयामुळें आणि कर्णाच्या आत्मश्लाघेमुळें त्यांची योग्यता जाणत नाहीं. हे दोघे अद्वितीय धनुर्धर ज्याच्या आज्ञेंत आहेत, त्या धर्मराजाच्या मनांतील संकल्प पूर्ण होतील, असा मीं त्याचवेळीं निश्चय केला.

राजा, त्यांनीं मला अन्न-पानादिकांच्या ग्रहणाविषयीं प्रश्न करून व कुशल विचारून माझा सत्कार केला. नंतर मी आसनावर बसलों व हात जोडून आणि मस्तक नम्र करून तुमचा संदेश त्यांस कळविला. तेव्हां पार्थानें धनु-र्गुणाच्या घर्षणानें चिह्नित झालेल्या आपल्या शुभ हस्तानें आपला पाय खालीं सोडला आणि ‘ हे केशवा, तूंच याला उत्तर दे ’ अशी कृष्णाला प्रेरणा केली. तेव्हां तें अर्जुनाचें वचन ऐकून सर्वाभरणांनीं भूषित झालेला इंद्रतुल्य वीर्यवान् कृष्ण इंद्रध्वजाप्रमाणें त्या आसनांवर उठून बसला व तो वक्त्यांतील श्रेष्ठ देवकीनंदन धृतराष्ट्रपुत्रांना भय व पांडुपुत्रांना आल्हाद देणारें असें श्रवणीय वचन बोलला. त्याचें तें भाषण आरंभीं मृदु असून उत्तरोत्तर दारुण होत गेलें. त्याचें सुसंस्कृत शब्दांनीं युक्त असलेलें तें सुश्राव्य भाषण मीं सावधान चित्तानें ऐकलें. त्या कुशल वक्त्यानें आपला सर्व अभिप्राय त्यांत व्यक्त केला.

वासुदेव—संजया, कुरुश्रेष्ठ भीष्म व द्रोण यांच्या समक्ष विवेकवान् धृतराष्ट्राला माझा असा संदेश कथन कर. हे सूता, प्रथम सर्व ज्येष्ठांस आमचें अभिवादन आणि कनिष्ठांना कुशल निवेदन करून नंतर मग त्यांना आमचा असा निरोप सांग—

तुम्ही विविध यज्ञ करा, विप्रांना दक्षिणा द्या आणि स्त्री-पुत्रांसह सुखो-पभोग घ्या. तुम्हांवर लवकरच महत्संकट ओढवणार आहे. यास्तव सत्पात्रीं दान द्या आणि सुपुत्रांना जन्म द्या. आपल्या प्रियजनांचें प्रिय करून घ्या. कारण युधिष्ठिर मोठ्या त्वरेनें जय मिळविण्यासाठीं येत आहे.

संजया, कौरवसभेंत वस्त्रहरणाच्या प्रसंगीं मी दूरदेशीं असतांहि या द्रौपदीनें 'हे गोविंदा' असा आक्रोश केला, तेव्हां तिनें माझ्या नामस्मरणानें मला जें ऋणी करून ठेविलें आहे, तें ऋण तिला केवल वस्त्रें पुरविण्यानें फिटलें नाहीं, कौरवांचा समूल उच्छेद केल्यावांचून मी त्या ऋणांतून मुक्त होणार नाहीं.

हे मूढबुद्धि कौरवहो, ज्या धनुर्धराच्या हातीं अतिशय तेजस्वी व दुराधर्ष गांडिव धनुष्य आहे आणि मी ज्याचा साह्यकर्ता आहें, अशा या सव्यसाचीबरोबर तुम्हीं वैर आरंभिलें आहे. पण माझ्या साह्यानें युक्त असलेल्या पार्थाशीं युद्ध करण्यास कोण समर्थ आहे ? साक्षात् इंद्रहि त्याला जिंकूं शकणार नाहीं. मग कालवश झालेल्या तुमची काय कथा !

पार्थाला जो कोणी युद्धांत जिंकील, तो सर्व पृथ्वी आपल्या दोन्ही हातांनीं उचलील, आपल्या क्रोधानें ही सर्व प्रजा दग्ध करील, किंवा देवांना स्वर्गांतून भूलोकीं पाडवील. युद्धांत धनंजयाला पराजित करील, असा देव, मनुष्य, असुर, यक्ष, गंधर्व व नाग यांमध्यें मला एकहि वीर दिसत नाहीं. या अर्जुनाचें विराटनगरींतील अद्भुत कर्म प्रसिद्धच आहे. या एकट्या वीरानें अनेक कौरवांचा पराभव केला; एवढीच एक गोष्ट त्याच्या पराक्रमाचें निदर्शन करण्यास पुरेशी आहे. या एका पांडुपुत्रानें विराटनगरींत तुमच्या सेनेला भग्न करून दशदिशेंत पलायन करावयास लाविलें, यावरूनच त्याचें सामर्थ्य प्रकट होत आहे. शारीरबल, मानसोत्साह, शौर्य, शीघ्र कार्यावबोध, शरक्षेपणाचें चापल्य, अविषाद व धैर्य हे गुण पार्थावांचून इतर कोठेंहि दिसून येत नाहींत."

हे राजन्, वर्षाकालीं वृष्टि करणारा इंद्र जसा अंतरिक्षांत गर्जना करितो, तसा हृषीकेश पार्थाला हर्ष देणाऱ्या घन गंभीर वाणीनें हें असें वचन बोलला. केशवाचें हें वचन ऐकून श्वेतवाहन अर्जुनानें अंगावर रोमांच आणणारें विस्तृत भाषण केलें. ५.५.५९.

---

## अध्याय ६० वा.

[ १ देव पुत्रांवरील प्रीतीमुळें व अग्नि प्रत्युपकाराच्या इच्छेनें युद्धांत पांडवांनाच साह्य करतील, असें धृतराष्ट्राचें दुर्योधनाला कथन. ]

**वैशंपायन**—राजा, जनमेजया, प्रज्ञाचक्षु जनेश्वर धृतराष्ट्रानें संजयाचें हें वचन ऐकून गुण-दोष-दृष्टीनें त्याचा विचार करण्यास आरंभ केला. त्या

वचनांतील गुण-दोषांचें सूक्ष्मदृष्टीनें यथामति विवेचन केल्यावर स्वपुत्रांचा जय इच्छिणाऱ्या धृतराष्ट्रानें आपल्या व शत्रूंच्या बलाबलांचाहि निश्चय केला. त्यांच्या शक्तीची आपल्या मनांत यथायोग्य तुलना केली असतां त्यास असें आढळून आलें कीं, पांडव देव आणि मानुष यांच्या शक्तीनें व तेजानें संपन्न असून कौरव केवल मानुष बलानेंच युक्त आहेत. त्यामुळें पांडवांपेक्षां कौरवांचें सामर्थ्य अत्यंत अल्प आहे.

याप्रमाणें बराच वेळ मनन करून तो मनुजाधिप दुर्योधनाला म्हणाला— " हे दुर्योधना, माझ्या मनाला जी सतत चिंता लागून राहिली आहे, ती कांहीं केल्या शांत होत नाहीं. कारण प्रत्यक्ष प्रमाणावरून मी हें सत्य मानीत आहें. हें केवल अनुमान नव्हे. हे पुत्रा, सर्व प्राण्यांचा आपल्या अपत्यांवर परम स्नेह असतो व ते यथाशक्ति त्यांचें प्रिय व हित करीत असतात. त्याचप्रमाणें सज्जन आपल्यावर उपकार करणाराचें अत्यंत प्रिय करण्याची संधि पहात असतात. तस्मात् अर्जुनानें खांडववनांत अग्नीवर जो उपकार केला, तो स्मरून या कौरव-पांडवांच्या घोर संग्रामांत तो हव्यवाहन पार्थाला अतिशय साह्य करील.

शिवाय ज्या भिन्न भिन्न अनेक देवतांपासून पांडवांची उत्पत्ति झाली आहे, ते सर्व यमधर्मादि देव पांडुपुत्रांनीं आवाहन करतांच भीष्म-द्रोण-कृपादिकांच्या भयापासून पांडवांचें रक्षण करण्यासाठीं धांवून येतील व अशनितुल्य वेग धारण करून ते आपल्या पुत्रांचें रक्षण करतील, हें माझें निश्चित मत आहे. शिवाय स्वतः वीर्यवान् व अस्त्रपारंगत असलेले ते नरश्रेष्ठ पांडव देवांच्या साह्यानें युक्त झाले असतां त्यांच्याकडे कोणाहि मानुषाला वर दृष्टि करून पहातांहि येणार नाहीं. ज्याचें गांडीव धनुष्य दुरासद, उत्तम व दिव्य आहे, ज्याचे दोन भाते दिव्य, अक्षय, शरपूर्ण व दारुण आहेत, ज्याच्या ध्वजावर अलौकिक, निःसंग व धूमाप्रमाणें अकुंठित गतिमान् वानर आहे, ज्याच्या रथासारखा दिव्य रथ या समुद्रवलयांकित पृथ्वीवर दुसऱ्या कोणापाशींहि नाहीं. ज्याच्या रथाचा शब्द महा अशनीसारखा शत्रूंना भयंकर वाटतो व ज्याच्या रथाचा निर्घोष लोक मेघांच्या गडगडाटाप्रमाणें ऐकतात; लोक ज्याला वीर्यामध्यें 'अतिमानुष वीर्यवान्' असें समजतात, जो रणांगणांत देवांनाहि जिंकणारा आहे, असें सर्व पार्थिव जाणतात, जो महाबलाढ्य पांडव एका निमिषांत पांचशें बाण घेऊन फार दूर अंतरावर सोडीत असलेला

सतो, भीष्म, द्रोण, कृप, अश्वत्थामा, मद्रराज, शल्य, इतर मध्यस्थ मानव
णि अतिमानुप राजे या सर्वांना ज्या रथशार्दुल पार्थाचा पराजय करतां येणें
शक्य आहे व जो अरिंदम एका वेगानें पांचशें बाणांचा वर्षाव करितो, तो
हाबाहु अर्जुन बाहुवीर्यांत सहस्रार्जुनाच्या तुल्य आहे. त्या कौंतेयाचा पराक्रम
हेंद्र व उपेंद्र यांच्यासारखा आहे. तो सव्यसाची या महायुद्धांत सर्व कौरवांचा
गुकाय संहारच करीत आहे, असें मला आजच दिसत आहे.

हे भारता, या विचारानें मला रात्रंदिवस झोंपहि येत नाहीं. कौरवांचा शम
सा होईल या चिंतेनें मला मनःस्वास्थ्य मिळत नाहीं. खरोखर हा कौरवांचा
हान् विनाशच उपस्थित झाला आहे. शमावांचून अन्य कशानेंहि या कल-
ाचा अंत होणार नाहीं. बा दुर्योधना, यास्तव मला नित्य शमच प्रशस्त वाटत
ाहे. युद्ध करणें मला रुचत नाहीं, कारण बाबारे, कौरवांपेक्षां पांडव अधिक
ाक्तिमान् आहेत, असेंच माझें निश्चित मत आहे." ५. ५. ६०.

---

## अध्याय ६१ वा.

[ १ देवत्वापासून भ्रंश पावण्याच्या भीतीनें देव पांडवांना साह्य करणार नाहींत. २ मीहि दैवबलानें युक्त आहें, असें दुर्योधनाचें वचन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, पित्याचें हें वचन ऐकून असहिष्णु धार्तराष्ट्र अतिशय क्रुद्ध होऊन पुनः असें वचन बोलला—" हे राजसत्तमा, या पृथा-पुत्रांना देवांचें साह्य मिळेल असें जें तूं समजत आहेस, तें अशक्य आहे. यास्तव त्याविषयीं तुझें भय दूर होवो. कारण हे भारता, इच्छा व द्वेष यांचें राहित्य, लोभ व द्रोह यांचा अभाव आणि प्राण्यांची उपेक्षा यांच्या योगानें देवांना देवत्व प्राप्त झालें, अशी कथा पूर्वीं द्वैपायन व्यास, महातपस्वी नारद व जामदग्न्य राम, यांनीं आम्हांला सांगितली आहे.

हे कुरुश्रेष्ठा, देव मनुष्यांप्रमाणें काम, क्रोध, लोभ व द्वेष यामुळें जगद्व्या-पारांत कदापि प्रवृत्त होत नाहींत. अग्नि, वायु, इंद्र, धर्म व दोघे अश्विनी-कुमार जर आसक्तीमुळें प्रवृत्त झाले असते, तर पांडवांना दुःख भोगावेंच लागलें नसतें. यास्तव हे राजा, तूं याविषयीं यत्किंचित्‌हि चिंता करूं नको.

हे देवादिक शम-दमादिकांची अपेक्षा करीत असतात. ते काम-क्रोधादि आसुरी भावांत कदापि प्रवृत्त होत नाहींत. तस्मात् ते पांडवांना साह्य करणार

नाहींत आणि त्यांनीं जर साह्य केलें तर वेदप्रामाण्यामुळें फलासक्तीनें केलेलें त्यांचें तें कार्य निष्फल होईल.

(२) हे राजन्, सर्व बाजूंनीं प्रदीप्त होऊन सर्व लोकांना दग्ध करणाऱ्या अग्नीला मी आपल्या मंत्रसामर्थ्यानें शांत करितों. देव ज्या परम तेजानें युक्त आहेत, तें अनुपम तेज माझ्यामध्यें देवांहूनहि अधिक आहे, असें तूं निश्चयानें समज. पर्वतशिखरांसह ही समग्र पृथ्वी जर विदीर्ण होत असली तर मी तिला मंत्रप्रभावानें सर्व लोकांसमक्ष स्थिर करीन. चेतन, अचेतन व स्थावर-जंगम यांच्या नाशासाठीं उत्पन्न झालेली, घोर गर्जना करणारी अश्मवृष्टि व सोसाट्याचा वायु यांसहि मी भूतांवरील अनुकंपेनें सर्वांसमक्ष शांत करितों. मीं मंत्रसामर्थ्यानें स्तंभित केलेल्या जलावरून रथ व पदाति चालून जातात.

मी एखाद्या कार्यासाठीं अक्षौहिणी सैन्यासह अन्यप्रदेशीं जावयास जेव्हां निघतों, तेव्हां मी जेथें जेथें जाण्याचें मनांत आणतों तेथें तेथें माझे अश्व मला घेऊन जातात. माझ्या राज्यांत सर्प-व्याघ्रादि भयंकर प्राणी नाहींत. मीं मंत्रानें रक्षण केल्यामुळें हिंस्र पशु इतर प्राण्यांची हिंसा करीत नाहींत. योग्य कालीं पर्जन्यवृष्टि होते, माझी सर्व प्रजा धर्मनिष्ठ असून माझ्या देशांत एकहि व्याधि नाहीं.

मी ज्यांचा द्वेष करितों, त्यांचें रक्षण करण्यास अश्विनीकुमारादि देवता व सर्व मरुद्गणांसह इंद्रहि समर्थ नाहींत. कारण ते धर्मादि देव जर माझ्या शत्रूंचें तत्काल संरक्षण करण्यास समर्थ असते, तर पार्थांना तेरा वर्षे दुःख भोगावेंच लागलें नसतें. हे तात, मला जे द्वेष्य आहेत, त्यांचें रक्षण करण्यास देव, गंधर्व, असुर किंवा राक्षस यांतील कोणीहि धजणार नाहींत, हें मी तुला सत्य सांगतों. माझे मित्र किंवा शत्रु यांचें शुभ होवो अथवा अशुभ होवो, असें मी चिंतन करतांच तत्काल तसें घडून येत असतें. मीं उच्चारलेले शब्द कधींहि अन्यथा होत नाहींत, म्हणून मला सर्व लोक सत्यवक्ता म्हणतात. माझें हें माहात्म्य सर्व दिशांत प्रसिद्ध आहे. हे राजा, तुला आश्वासन देण्या-साठीं मी तुला हें सर्व सांगत आहें, आत्मश्लाघेनें नव्हे. मी कधींहि श्लाघा करीत नाहीं. कारण स्वतःची प्रशंसा करणें हे असदाचरण होय.

हे महाराज, पांडव, मत्स्य, केकयांसह पांचाल, सात्यकि व वासुदेव या सर्वांना मीं जिंकल्याचें तूं ऐकशील. ज्याप्रमाणें नदी समुद्राला प्राप्त होतांच

नाहींशी होते, त्याप्रमाणें पांडव आपल्या सर्व अनुयायांसह माझ्या समीप येतांच सर्वशः नष्ट होतील. माझी बुद्धि, तेज, वीर्य, विद्या, व योग हीं सर्व श्रेष्ठ असून पांडवांपेक्षां वरिष्ठ आहेत. पितामह, द्रोण, कृप, शल्य, व शल हे जी अस्त्रविद्या जाणतात, ती सर्व मला अवगत आहे.

राजा जनमेजया, नंतर धृतराष्ट्रानें दुर्योधनाचें हें सर्व भाषण संजयाला निवेदन केलें व त्याला पूर्वोक्त अर्जुनमाहात्म्य विचारलें. 'माझ्या पुत्रांचें हें बल तूं पाहिलेंच आहेस. आतां पांडवांचें बल कथन कर' असें म्हटलें आणि 'हे सर्व कौरव नाश पावले असतां वैश्यापुत्र युयुत्सूला तर राज्यलाभ होणार नाहीं ना? कारण तो पांडवांवर अनुरक्त आहे' असा प्रश्न केला. ५. ५, ६१.

---

## अध्याय ६२ वा.

[ १ 'मी एकटाच पांडवांचा वध करण्याला समर्थ आहें, हे भीष्मादिक धृतराष्ट्राच्या समीप राहूं देत' अशी कर्णाची आत्मश्लाघा. २ भीष्मानें केलेली कर्णाची निंदा. ३ भीष्मानें शस्त्रत्याग केल्यावांचून मी युद्ध करणार नाहीं, अशी प्रतिज्ञा करून कर्णाचें सभेंतून स्वगृहीं निर्गमन. ४ भीष्मानें पुनः केलेला कर्णाचा उपहास. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, याप्रमाणें राजा धृतराष्ट्र अतिशय उत्सुकतेनें संजयाला पार्थाविषयीं प्रश्न करीत असतां, त्याकडे दुर्लक्ष करून कर्ण त्या कौरवसभेंत दुर्योधनाला हर्ष देत म्हणाला—" हे राजन्, पूर्वी भार्गवरामाला ' मी ब्राह्मण आहें ' असें मिथ्याच सांगून त्याच्यापासून परम श्रेष्ठ ब्रह्मास्त्र मीं संपादन केलें. परंतु माझें हें असत्य वचन त्या जामदग्न्यानें तत्काल जाणलें आणि ' चोरा, तुला अंतकालीं हें अस्त्र स्फुरणार नाहीं. ' एवढाच शाप देऊन मला सोडून दिलें. तो महर्षि सागरान्त पृथ्वीला दग्ध करण्यास समर्थ आहे. परंतु माझा महान् अपराध असतांहि त्या महात्म्यानें मला घोर शाप दिला नाहीं. याचें कारण मीं आपल्या पराक्रमानें व शुश्रूषेनें त्याला प्रसन्न केलें होतें.

तस्मात् माझा अंतकाल समीप येईपर्यंत त्या श्रेष्ठ अस्त्राचा मला प्रयोग करतां येईल व त्यामुळें मी अर्जुनाला जिंकण्यास समर्थ होईन. पांडवांचा नाश करण्याचा भार मजवर आहे. त्या ऋषीचा प्रसाद संपादन करून मी एका

निमिषांत पांचाल, करूष, मत्स्य व पुत्र-पौत्रांसह पार्थ यांचा संहार करून हे सव शस्त्रानें जिंकलेले लोक प्राप्त करून घेईन. हे राजा धृतराष्ट्रा, पितामह भीष्म, द्रोण आणि हे सर्व प्रमुख भूपति यांना तुझ्या समीप राहूं दे. मी मुख्य सैन्यासह जाऊन पांडवांचा वध करीन. हा भार मीं स्वीकारला आहे."

( २ ) जनमेजया, कर्ण याप्रमाणें आत्मश्लाघा करीत असतां भीष्म त्याला म्हणाला—" अरे कर्णा, कालानें तुझी बुद्धि विपरीत झाली आहे, असेंच दिसतें, तूं ही आत्मप्रौढी कसली सांगतोस ! तुझ्यासारखा प्रमुख वीर हत झाला असतां सर्व धार्तराष्ट्रांचा विनाश होईल, यास्तव बाबारे, स्वतःच्याच जीवाचें रक्षण कर.

ज्याला श्रीकृष्णाचें साह्य आहे, ज्या धनंजयानें खांडववन दग्ध केलें, त्याचें तें अद्भुत कर्म ऐकून पांडवांशीं युद्ध करण्याविषयीं आपल्या बांधवांसह तूं आपल्या मनाचें नियमन करावयास पाहिजे होतें. अर्जुनाचें दुर्जयत्व जाणून त्याच्या द्वेषापासून निवृत्त होणेंच तुला योग्य होय.

भगवान् महेंद्रानें तुला जी शक्ति दिली आहे, तिला केशवानें युद्धांत आपल्या चक्रानें विशीर्ण करून दग्ध केल्याचें तूं पहाशील. तुझ्यापाशीं जो सर्पमुख बाण आहे, ज्याचें तूं नित्य मोठ्या यत्नानें पुष्प-माल्यादिकांनीं पूजन करितोस, तो तुझा बाण पांडुपुत्राच्या शरौघानें तुझ्यासह नाश पावेल. बाण व भौम या असुरांचा निहंता आणि तुझ्यासारखे व तुझ्याहूनहि वरिष्ठ अशा योद्धयांचा तुमुल युद्धांत वध करणारा वासुदेव अर्जुनाचें रक्षण करीत आहे, हें लक्षांत ठेव."

( ३ ) कर्ण—तो वृष्णिपति श्रीकृष्ण मोठा महात्मा असेल, किंवा भीष्मानें त्याचें जितकें वर्णन केलें आहे, त्याहूनहि तो श्रेष्ठ असेल ! मला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. पण पितामहानें मला जें कठोर वचन ऐकविलें आहे, त्याचें फल त्यानें आतां ऐकावें. हा मीं शस्त्रत्याग केला. मी युद्धाला जाणार नाहीं व यापुढें पितामह मला सभेंत कदापि पहाणार नाहीं. ज्यावेळीं हा भीष्म इहलोक सोडील, त्यावेळीं हे सर्व पृथ्वीवरील भूपाल माझा विजय झालेला पहातील. मी जर युद्ध करीन तरच हा भीष्म जिवंत राहील. पण तो जिवंत राहणें मला इष्ट वाटत नाहीं. यास्तव हा दुर्बल वृद्ध मरण पावूं दे.

( ४ ) वैशंपायन—राजा, असें बोलून तो महा धनुर्धर कर्ण सभेंतून उठून आपल्या घरीं निघून गेला. तेव्हां भीष्म हंसतच सर्व कौरवांच्या समक्ष

दुर्योधनाला असें उपहासयुक्त वचन बोलला—"खरोखर, हा सूतपुत्र तर मोठा सत्यप्रतिज्ञच दिसत आहे! 'प्रथम मी युद्ध करीन' अशी प्रौढी मिरवून आतां 'मी जिवंत असेपर्यंत शस्त्रग्रहण करणार नाहीं' असें म्हणतो! हा मित्र कसला! आवंत्य, कालिंग, जयद्रथ, चेदि, बाह्लिक इत्यादि भूपालांच्या समक्ष 'मी शत्रूंच्या सहस्त्रावधि योद्ध्यांचा संहार करीन' अशा वल्गना करून ज्यानें युद्धाचा भार आपल्या शिरावर घेतला होता, तोच आतां युद्धापासून परावृत्त होत आहे! अहो, भीमसेन कौरवांच्या व्यूहावर प्रतिव्यूह रचून व योद्ध्यांचीं मस्तकें तोडून लोकक्षय आरंभील, या भीतीनें हा मूढ अशा युक्तीनें युद्धापासून दूर रहात आहे. या अधम कर्णानें ज्या वेळीं निष्पाप परशुरामाला 'मी ब्राह्मण आहें' असें असत्य सांगून अस्त्रविद्या प्राप्त करून घेतली, त्याच वेळीं त्याचा धर्म व तप नष्ट झालें आहे."

**वैशंपायन**—हे राजन्, याप्रमाणें भीष्मानें भाषण केलें असतां व कर्ण शस्त्रत्याग करून निघून गेला असतां धृतराष्ट्राचा मंदमति पुत्र दुर्योधन शान्तनव भीष्माला पुढील वचन बोलला. ५. ५. ६२.

---

## अध्याय ६३ वा.

[ १ 'मीं हें युद्ध भीष्मादिकांच्या विश्वासावर आरंभिलें नसून कर्णादिकांच्या साह्यानेंच शत्रूंचा वध करीन' असें दुर्योधनाचें वचन २ दुर्योधनाला उद्देशून विदुरानें केलेली दमाची प्रशंसा. ]

(१) **दुर्योधन**—हे पितामह, आम्ही सर्व मनुष्ययोनींत उपन्न झालों आहों. आमचा जन्म समान कुलांत झालेला आहे. असें असतां तूं पांडवांचाच निश्चित जय होईल, असें कसें मानितोस! आम्ही आणि ते वीर्य व पराक्रम यांनीं तुल्य आहों. वयानें समान आहों. आमची समयस्फूर्ति व अध्ययन एकसारखेंच आहे. अस्त्रविद्या, युद्धकला व शरसंधान यांत आम्ही पांडवांहून हीन नाहीं. आम्ही सर्व एकाच जातीचे व समान वर्णाचे आहों, मग हे पितामह, पार्थांचाच विजय होईल, हें तुला कसें कळलें?

असो. हे राजन्, मीं भीष्माचार्य, द्रोण, कृप, बाह्लिक किंवा अन्य नृपति यांच्या बलावर कांहीं हें युद्ध आरंभिलें नाहीं. तर मी स्वतः, वैकर्तन कर्ण व माझा भ्राता दुःशासन असे आम्ही तिघेच तीक्ष्ण शरांनीं युद्धांत पांची पांड-

यांचा वध करूं. नंतर हे राजन्, मी विपुल दक्षिणायुक्त विविध महायज्ञ करून गायी, अश्व व धन यांच्यायोगानें ब्राह्मणांना तृप्त करीन. ज्याप्रमाणें मृगांना जाळ्यांत बद्ध करावें, किंवा कर्णधारावांचून असलेल्या नौकेला जलौघानें आवर्तांत ओढावें, त्याप्रमाणें माझे योद्धे पांडवांना हातांनीं ओढतील. जेव्हां रथ व गज यांनीं युक्त असलेली आम्हां शत्रूंची सेना ते पहातील, तेव्हां पांडव आणि केशव यांचा दर्प उतरेल.

( २ ) दुर्योधनाचें हें भाषण ऐकून 'हा अदमनशील दुरात्मा कुलक्षय करील' असें बोलणारा विदुर दमाची प्रशंसा करीत म्हणाला—"'दम' हाच ब्रह्मजिज्ञासूचा कल्याणप्रद सनातन धर्म आहे, असें तत्त्वदर्शी वृद्ध म्हणतात. ज्या दान्त पुरुषाचें मनोदमन त्याला दानादिकांत प्रवृत्त करितें, त्याला त्या दानाचें क्षमा व सिद्धि हें फल मिळतें. दमाच्या योगानें दान, तपानें अध्ययन व ज्ञान प्राप्त होतें आणि दमानें तेजाची वृद्धि होते, तस्मात् दम हें पावन करणारें उत्तम साधन आहे. निष्पाप पुरुषाला दमाच्या योगानें महद्ब्रह्माचा लाभ होतो.

प्राण्यांना हिंस्रपशु व राक्षसादिक यांपासून जसें भय असतें, तसेंच अदान्त मनुष्यांपासूनहि असतें. त्यांच्या निषेधासाठींच स्वयंभू ब्रह्मदेवानें क्षत्रियसृष्टि निर्माण केली. चारी आश्रमांत दम हेंच उत्तम व्रत आहे. दम ज्यांच्या उदयाला कारण होतो, त्यांचें लक्षण मी तुला सांगतों, ऐक.

हे राजेंद्रा, क्षमा, धृति, अहिंसा, समता, सत्य, आर्जव, इंद्रियनिग्रह, धैर्य, मार्दव, अकार्याविषयीं लज्जा, वाक्, शरीर व मन यांचें स्थैर्य, अदैन्य, गांभीर्य, संतोष आणि श्रद्धा हे गुण ज्याच्या अंगीं असतात, तो पुरुष दान्त समजला जातो. दान्त पुरुष काम, लोभ, दर्प, क्रोध, निद्रा, आत्मश्लाघा, मान, ईर्ष्या व शोक, यांचें सेवन करीत नाहीं. निष्कपटपणा व शुद्ध मन हें दान्ताचें लक्षण आहे.

आशाहीन, स्त्र्यादि विषयांचें चिंतन न करणारा व गंभीर पुरुषच दान्त म्हटला जातो. सदाचरणी, शीलसंपन्न, शुद्धचित्त, आत्मवेत्ता व ज्ञानी या लोकीं सन्मानाला प्राप्त होऊन मरणोत्तर उत्तम गतीला जातो. ज्याच्यापासून सर्व भूतांना अभय असतें, आणि सर्वांपासून ज्याला भय नसतें, तो पूर्णप्रज्ञ 'मनुजोत्तम' म्हणून प्रसिद्ध होतो. तो सर्वभूतांच्या हितांत रत असतो,

त्याची सर्वांबरोबर मैत्री असते आणि लोक त्याच्यापासून उद्विग्न होत नाहींत. तो समुद्रासारखा गंभीर असतो व आत्मसाक्षात्कारामुळें तृप्त होऊन परम निर्वाणाला प्राप्त होतो.

दान्त-शमपरायण पुरुष प्रथमच शिष्टांनीं आचरिलेला धर्म आचरितात व प्राप्तस्थितींत संतोष मानितात. ते दैवानें प्राप्त झालेल्या दुःखद स्थितीविषयीं खेद करीत नाहींत. ज्ञानानें तृप्त झालेला जितेंद्रिय पुरुष कर्मत्याग करून आपलें अवशिष्ट आयुष्य पर्यटनांत घालवून ब्रह्मभावाला पोंचतो. ज्याप्रमाणें आकाशांत संचार करणाऱ्या पक्ष्यांचीं पावलें उमटलेलीं दिसत नाहींत, त्याप्रमाणें प्रज्ञातृप्त मुनींचा मार्ग कळत नाहीं. तो मुनि गृहस्थाश्रमाचा त्याग करून किंवा ब्रह्मचर्याश्रमांतूनच संन्यास घेऊन पुनरावृत्तिशून्य मोक्षाचीच इच्छा करितो. अग्निष्टोमादि क्रियांचा अभिलाष धरीत नाहीं. त्यामुळें त्याला शाश्वत पुनरावृत्तिशून्य तेजोमय लोक प्राप्त होतात. ५. ५. ६३.

---

## अध्याय ६४ वा.

[ १ विदुरानें सांगितलेली दोन पक्ष्यांची आख्यायिका. २. विवादानें दोन्ही पक्षांचा नाश होत असल्यामुळें वैरत्यागाचा उपदेश. ]

( १ ) विदुर—हे राजन्, आम्हीं वृद्धांच्या मुखानें अशी एक आख्यायिका ऐकली आहे. एकदा कोणा एका व्याधानें पक्षी पकडण्यासाठीं भूमीवर जाळें पसरलें. त्यांत एकाच वेळीं दोन पक्षी बद्ध झाले व त्या दोघांनीं जाळ्यासह आकाशांत उड्डाण केलें. तेव्हां ते पक्षी आकाशमार्गानें जात असलेले पाहून तो व्याध खिन्न न होतां त्यांच्या मागोमाग भूमीवरून धांवतच निघाला.

याप्रमाणें आकाशस्थ पक्ष्यांचा पाठलाग करणाऱ्या भूमिचर व्याधाला एका कृताह्निक आश्रमस्थ मुनीनें पाहिलें व त्याला असा प्रश्न केला—"हे व्याधा, हे दोन पक्षी अंतरिक्षांतून उडत आहेत आणि तूं भूमीवरून पायांनींच त्यांचा पाठलाग करीत आहेस, हें मला मोठें विचित्र दिसतें. आकाशांतून जाणारे ते तुज भूचराच्या हातीं कसे लागणार?"

व्याध—हे दोघे पक्षी एक मतानें माझें एक जाळें घेऊन उडून चालले आहेत. त्यांचा जेथें कलह होईल, तेथें ते माझ्या हातीं सांपडतील. म्हणून मी त्यांच्या मार्गाला अनुलक्षून धांवत आहें.

विदुर—हे राजा, नंतर त्या पक्ष्यांचा मृत्यु समीप आल्यामुळें ते दोघे दुर्बुद्धि परस्पराशीं विवाद करूं लागले व त्या जाळ्यासह भूमीवर पडले. मृत्यु-पाशांत सांपडलेले ते दोन पक्षी युद्ध करीत असतां व्याध समीप आल्याचेंहि त्यांस भान राहिलें नाहीं. इतक्यांत व्याधानें हळूच त्यांच्या जवळ जाऊन त्या दोनहि पक्ष्यांना पकडलें.

( २ ) हे महाराज, याप्रमाणें जे ज्ञातिबांधव अर्थासाठीं व्यर्थ कलह करितात ते या कलह करणाऱ्या दोघां पक्ष्यांप्रमाणें शत्रूंच्या हातीं सांपडतात. सहभोजन, कृत गोष्टींचें परस्परांस कथन, परस्परांस कुशलप्रश्न व सहवास हीं ज्ञातिकार्यें आहेत. परस्परविरोध हें ज्ञातिकार्य नव्हे. जे ज्ञातिबांधव परस्पर प्रेमानें राहून प्रसन्नचित्तानें वृद्धांची उपासना करितात, ते सिंहानें संरक्षण केलेल्या अरण्याप्रमाणें अजिंक्य होतात. हे भरतश्रेष्ठा, जे लोक सतत अर्थ मिळवूनहि दीनासारखे रहातात, त्यांचें सर्व ऐश्वर्य शत्रूला प्राप्त होतें. जळणाऱ्या काष्ठाप्रमाणें ज्ञातिजन पृथक् असले म्हणजे धुमसतात व एकत्र असले कीं प्रज्वलित होतात.

हे धृतराष्ट्रा, मीं पर्वतशिखरावर पाहिलेली दुसरी एक गोष्ट तुला सांगतों. ती ऐक व मग तुला जें योग्य वाटेल तें कर. एकदा आम्ही किरातांसह गंधमादन पर्वतावर गेलों होतों. आमच्याबरोबर देवतुल्य ब्राह्मण, ज्योतिषी व ओषधि-वनस्पतिवेत्ते होते. तो उत्तर दिशेंतील उच्च पर्वत सर्वतः वृक्ष-लतांनीं झांकून गेला होता. त्यावर देदीप्यमान ओषधींची समृद्धि होती. सिद्ध, गंधर्व त्या पर्वताचें सेवन करीत असत, तेथें आम्हीं एक मधानें भरलेलें सुवर्णासारखें पोळें पाहिलें.

तें कुंभासारखें दिसणारें प्रचंड पोळें पर्वताच्या कड्यावर विषम प्रदेशीं होतें. सर्प त्याचें रक्षण करीत असून तें कुबेराला अतिशय प्रिय होतें. त्यांतील मधुसेवनानें मर्त्य मनुष्यहि अमर होतो, चक्षुर्हीनाला दृष्टि प्राप्त होते व वृद्ध तरुण होतो, असें आम्हांला त्या वनस्पतिज्ञ ब्राह्मणांनीं सांगितलें. तेव्हां किरातांनीं मधाच्या लोभानें त्या सर्पयुक्त विषम गिरिगह्वरांत प्रवेश केला आणि ते सर्व नाश पावले.

त्याप्रमाणें हे महाराज, तुझा हा पुत्र एकटाच समग्र पृथ्वीचें राज्य मिळविण्याची इच्छा करीत आहे. हा मूढ मध पहातो, पण मोहामुळें त्याला पुढील



**धृतराष्ट्र**—हे विदुरा, मला झोंपहि येईनाशी झाली आहे.

**विदुर**—हे महाराज, परद्रव्याच्या अभिलाषानें तर तूं संतप्त होत नाहींस ना ?

( पृ. १७० )

कडा दिसत नाहीं. हा दुर्योधन सव्यसाची अर्जुनाबरोबर समरांगणांत युद्ध करण्याची इच्छा करीत आहे. परंतु मला याच्या अंगीं तशा प्रकारचें तेज किंवा पराक्रम दिसत नाहीं. ज्या वीरानें एका रथानें सर्व पृथ्वी जिंकिली, रणांगणांत सावधपणानें वागणाऱ्या भीष्म-द्रोणादिकांनाहि त्रस्त करून विराटनगरींतून पलायन करावयास लाविलें, त्या धनंजयाचें अतुल सामर्थ्य तुला दिसत नाहीं काय! तो पार्थ केवल तुझा आशय कळेपर्यंतच दुर्योधनाला क्षमा करीत आहे.

वायूनें प्रज्वलित केलेल्या अग्नीप्रमाणें द्रुपद, मत्स्यराज व क्रुद्ध झालेला धनंजय युद्धामध्यें तुमचा अवशेषहि ठेवणार नाहींत. यास्तव हे धृतराष्ट्रा, तूं राजा युधिष्ठिराला आपल्या जवळ घे. युद्धाचा प्रसंग आणूं नको. दोवांचें युद्ध झालें असतां एकाचा जय व दुसऱ्याचा नाश होत असतो आणि या दोहोंतील कोणत्याहि पक्षाचा नाश तुला अनिष्टच आहे. ५. ५. ६४.

---

## अध्याय ६५ वा.

[ १ 'पांडवांना जिंकणें अशक्य आहे,' असें धृतराष्ट्राचें पुत्राला कथन. ]

( १ ) धृतराष्ट्र—बा वत्सा, दुर्योधना, मी काय सांगतों, तें ऐक. तूं मार्ग न जाणणाऱ्या अज्ञ पांथस्थाप्रमाणें अमार्गालाच मार्ग समजत आहेस. लोकांना धारण करणाऱ्या पंचमहाभूतांप्रमाणें पांच पांडुपुत्रांचें तेज आहे. त्याचें राज्य हरण करण्याची तूं इच्छा करीत आहेस ( पण तें सर्वथा अशक्य आहे. ) कारण कुंतीपुत्र युधिष्ठिर परम धर्मांत स्थित आहे. त्याला इहलोकीं जिंकणें शक्य नाहीं. जय मिळण्याऐवजीं तूंच जीवाला मुकशील. रणामध्यें भीमसेनाची बरोबरी करणारा दुसरा योद्धा नाहीं. युद्धांत त्याचा अंत करण्याची श्लाघा करणें, म्हणजे एखाद्या वृक्षानें सोसाट्याच्या वायूची गति कुंठविण्यासारखेंच आहे.

सर्व पर्वतामध्यें जसा मेरु वरिष्ठ, तसा सर्व शस्त्रधारण करणाऱ्या वीरांत गांडिवधारी धनंजय श्रेष्ठ आहे. त्याच्याशीं कोणता बुद्धिमान् मनुष्य युद्धाला उभा राहील! अशनीचा वर्षाव करणाऱ्या देवराज इंद्राप्रमाणें शत्रूवर शर सोडणारा पांचाल्य धृष्टद्युम्न कोणाचा नाश करणार नाहीं! अंधक-वृष्णींना संमत असलेला सात्यकि दुर्धर्ष आहे. तो पांडवांच्या हितामध्यें तत्पर आहे. तो वीर तुझ्या सेनेचा विध्वंस करील.

पुंडरीकाक्ष श्रीकृष्णाचें सामर्थ्य त्रैलोक्याचें अतिक्रमण करण्यासहि पुरेसें आहे. त्या महात्म्याशीं कोणता सुज्ञ युद्ध करील ! वासुदेवाला त्याच्या सर्व भार्या, बांधवांसह ज्ञातिजन, त्याचा स्वतःचा जीव आणि पृथ्वी एका बाजूला व एकटा धनंजय दुसऱ्या बाजूला, इतका तो प्रिय आहे.

जेथें पांडुपुत्र अर्जुन तेथें यतात्मा व दुर्धर्ष वासुदेवहि असतो आणि केशवाचें सामर्थ्य पृथ्वीलाहि असह्य आहे.

यास्तव हे वत्सा, तुझ्या सर्व सुहृदांचें हें हितवचन ऐक. हा वृद्ध पितामह भीष्म तुझें कल्याण इच्छिणारा आहे. त्याचें सांगणें मान्य कर. एवढें माझें ऐक. द्रोण, कृप, विकर्ण व महाराज बाल्हिक या सर्वांचेंहि माझ्यासारखेंच मत आहे. ते सर्व धर्मवेत्ते आहेत व त्यांचें पांडव व कौरव या दोघांवरहि सारखेंच प्रेम आहे. यास्तव तूं त्यांना मजप्रमाणेंच मानावेंस, हें योग्य होय.

हे भारता, विराटनगरींत त्या एकट्या धनुर्धरानें तुझ्या विपुल सैन्याचा पराभव केला, तेव्हां तुझ्या सर्व भ्रात्यांसह त्रस्त झालेल्या सैन्यानें गायींना सोडून पलायन केलें. हें जें त्याचें अद्भुत कर्म आम्हीं ऐकलें, तेवढें एकच उदाहरण पार्थाच्या बलाचें निदर्शन करण्यास पुरेसें आहे. एकट्या अर्जुनाचा पराक्रम जर अशा प्रकारचा आहे, तर मग तो सर्व भ्रात्यांनीं युक्त असल्यावर काय सांगावें ! यास्तव तूं पांडवांचें अर्धें राज्य त्यांना परत दे. ५. ५. ६५.

---

## अध्याय ६६ वा.

[ १ धृतराष्ट्राचा संजयाला प्रश्न. २ या रणयज्ञांत तुमची आहुति पडणार नाहीं, असा यत्न करा, असें अर्जुनसंदेशकथन. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, महाप्राज्ञ धृतराष्ट्रानें दुर्योधनाला याप्रमाणें बोलून पुनः संजयाला असा प्रश्न केला—"संजया, वासुदेवाच्या भाषणानंतर अर्जुन काय म्हणाला तें मला सांग. त्याचें वचन ऐकण्याविषयीं मला फार उत्सुकता वाटत आहे."

**संजय**—हे महाराज, वासुदेवाचें वचन ऐकून दुर्धर्ष धनंजय योग्यकालीं त्याच्या समक्ष मला असें वचन बोलला—"हे संजया, पितामह भीष्म, धृतराष्ट्र, द्रोण, कृप, कर्ण, महाराज बाल्हिक, अश्वत्थामा, सोमदत्त, शकुनि, दुःशासन, शल, पुरुमित्र, विविंशति, विकर्ण, चित्रसेन, जयत्सेन, आवंत्य, विंदानुविंद, दुर्मुख,

सैंधव, दुःसह, भूरिश्रवा, भगदत्त, जलसंध आणि दुसरेहि जे पार्थिव कौरवांचें प्रिय करण्यासाठीं तेथें जमले आहेत व पांडवांच्या प्रदीप्त अग्नींत होम करण्यासाठीं ज्या मुमुर्षूंना दुर्योधनानें बोलविलें आहे, त्या सर्वांना यथान्याय कुशल विचारून माझा नमस्कार कथन कर. नंतर त्या राजसभेंत पापाचें निधानच, असा जो पापात्मा लोभी दुर्योधन त्याला अमात्यांच्या समक्ष माझा हा निरोप ऐकीव."

राजा, त्यानंतर ज्याचे नेत्र रक्तकमलासारखे आरक्त व दीर्घ आहेत असा बुद्धिमान् पार्थ वासुदेवाच्या समक्ष मला पुढील अर्थवत् व धर्मयुक्त वचन पुनः बोलला—

( २ ) धनंजय—हे संजया, तूं ज्याप्रमाणें महात्म्या मधुसूदनाचें युक्त भाषण ऐकलेंस, तसेंच माझेंहि हें वचन तेथें जमलेल्या सर्व पार्थिवांना कथन कर. त्या सर्व भूपालांना सांग कीं, ज्या रणयज्ञांत शरांच्या संघर्षणानें धूम उत्पन्न होईल, रथचक्रांचा निनाद ऐकूं येईल, धनुष्यरूप स्रुवेनें अस्त्रांचें बल पसरविलें जाईल, अशाप्रकारचा होम होऊं नये, याविषयीं तुम्ही सर्व यत्न करा. शत्रूंचा नाश करणाऱ्या युधिष्ठिराचें न्यायप्राप्त अर्धें राज्य त्याला जर न द्याल, तर मी तुम्हांला सर्व सेना, पदाति, अश्व व गज यांसह तीक्ष्ण शरांनीं पितरांच्या अशुभ मार्गाला पोंचवीन. ( यमलोकीं पाठवीन. )

संजय—हे महाराज, अर्जुनाचें हें वचन ऐकून मीं त्याचा निरोप घेतला, चतुर्भुज श्रीकृष्णाला वंदन केलें व हा महत्त्वाचा संदेश तुला सत्वर कळवावा म्हणून मोठ्या वेगानें तेथून निघालों आणि येथें येऊन पोचलों. ५. ५. ६६.

---

## अध्याय ६७ वा.

[ १ कौरवसभेंतील राजांचें स्वस्थानीं निर्गमन. २ कोणतें सैन्य अधिक बलवान् आहे असा धृतराष्ट्राचा प्रश्न. ३ संजयाच्या वचनावरून व्यास व गांधारी यांचें तेथें आगमन. ]

( १ ) वैशंपायन—राजा, दुर्योधनानें संजयाच्या या भाषणाचा अनादर केला असतां सर्व राजे स्वस्थ बसले आहेत असें पाहून भीष्मप्रभृति नरश्रेष्ठ सभेंतून उठून गेले. याप्रमाणें पृथ्वीवरील सर्व भूपति निघून गेल्यानंतर धृतराष्ट्रानें संजयाला एकांतांत प्रश्न करण्यास आरंभ केला. पुत्रांच्या वश

झालेल्या त्या राजानें कौरवांच्या जयाची इच्छा करीत पुनः आपल्या व पांडवांच्या बलाबलाचा विचार करण्याचा निश्चय केला.

( २ ) धृतराष्ट्र—हे गावल्गणे, आमच्या सैन्यांत जें कांहीं सार किंवा असार असेल व तसेंच पांडवसैन्यांतहि जें सारासार असेल तें तूं मला सांग. तूं पांडवांचें सर्व सामर्थ्य जाणतोस. तेव्हां आमचें बल श्रेष्ठ आहे, किंवा त्यांचें श्रेष्ठ व आमचें गौण आहे हें मला कथन कर. तूं सर्वदर्शी आहेस. त्यांचें सार जाणतोस. तूं निश्चयज्ञ असून धर्म व अर्थ यांतहि निपुण आहेस. यास्तव हे संजया, आमच्या पक्षांत कोणते वीर उदासीन आहेत, तें मला कळूं दे.

संजय—हे राजन्, अशा एकान्तामध्यें मी तुला कांहीं एक सांगणार नाहीं. कारण तुझ्या मनांत असूयेचा प्रवेश होईल. यास्तव हे आजमीढा, तुझा पिता महातपस्वी व्यास आणि महिषी गांधारी यांना येथें बोलावून आणीव. कारण हे नरेंद्रा, तीं दोघेंहि धर्मज्ञ, निपुण व कार्यांचा निश्चय जाणणारी आहेत. त्यांच्या समक्ष मी तुला केशव व पार्थ यांच्याविषयीं माझें समग्र मत निवेदन करीन.

( ३ ) वैशंपायन—संजय असें बोलला असतां व्यास आणि गांधारी यांना घेऊन विदुर तेथें आला. त्या दोघांनीं सभेंत मोठ्या त्वरेनें प्रवेश केला. नंतर आपला आत्मज धृतराष्ट्र व संजय, यांचा आशय जाणून महाप्राज्ञ कृष्णद्वैपायनानें त्यांच्या समीप जाऊन असें म्हटलें—

व्यास—हे संजया, हा धृतराष्ट्र तुला जें कांहीं विचारीत आहे, तें सर्व त्याला सांग. तुला कृष्णार्जुनाविषयीं जितकें कांहीं ठाऊक आहे, तें यथावत् त्याला कथन कर. ५. ५. ६७.

---

## अध्याय ६८ वा.

[ १ व्यासाज्ञेवरून संजयानें केलेलें कृष्णार्जुनाच्या यथार्थ स्वरूपाचें वर्णन. ]

संजया—हे महाराज, कृष्ण व अर्जुन हे दोघेहि परमपूज्य धनुर्धर आहेत. त्यांचा जन्म पूर्वकर्मानें होत नाहीं.तर ते लोकांवर अनुग्रह करण्यासाठीं सूर्याप्रमाणें आविर्भूत होत असतात. ते दोघेहि साक्षात् ब्रह्मरूपच आहेत. वासुदेवाच्या चक्राच्या मधला व्यास एक वांवभर आहे.पण त्याच्या ज्या ज्या प्रमाणाचें चिंतन करावें त्या त्या प्रमाणाचें तें होतें. त्या महात्म्याच्या हातून सुटलेलें तें चक्र मायेनें अदृश्य रहातें. तें कौरवांचा संहार करणारें असल्यामुळें पांडवांना अतिशय संमत

आहे. सारासार बल जाणण्यासाठीं तें चक्र तेजःपुंजानें प्रकाशित होतें. महाबलाढ्य माधवानें अतिशय घोर असलेले नरक, शंबर इत्यादि असुर व कंस, चैद्यादि राजे यांना जणुकाय खेळण्याप्रमाणें जिंकलें. तो विशिष्टात्मा पुरुषोत्तम पृथ्वी, अंतरिक्ष व द्यौ यांना केवल मनाच्या संकल्पानेंच वश करितो.

हे राजन्, पांडवांचें सारासार बल जाणण्यासाठीं तूं पुनः पुनः मला जें विचारीत आहेस, तें मी तुला संक्षेपतः सांगतों, ऐक. एका बाजूला जनार्दन व दुसऱ्या बाजूला समग्र जगत् ठेवून जर तुलना केली, तर सगळ्या जगाचें अतिक्रमण करून जनार्दनाचेंच सामर्थ्य अधिक भरेल. हा माधव केवल संकल्पानेंच अखिल जगाचें भस्म करील, परंतु हें समग्र जगत् माधवाचें भस्म करण्यास समर्थ होणार नाहीं. जेथें सत्य, धर्म, न्ही व आर्जव असतात, तेथेंच गोविंद रहातो आणि जेथें कृष्ण तेथें जय निश्चित असतो.

हा सर्व भूतांचा अंतरात्मा पुरुषोत्तम स्वर्ग, पृथ्वी व अंतरिक्ष यांतील सर्व व्यवहार जणुकाय क्रीडा करीत असल्याप्रमाणेंच करवितो. तो भगवान् पांडवांचें मिष करून सर्व लोकांना मोहित करीत तुझ्या अधर्मनिरत मूढ पुत्रांना दग्ध करण्याची इच्छा करीत आहे. हा कृष्ण संवत्सरात्मक कालचक्र, जगताचा जन्म, स्थिति व लय यांचा जो प्रवाह तेंच युगचक्र व कर्मचक्र, या सर्वांचें परिवर्तन रात्रंदिवस स्वतःच्या चैतन्यानें करवीत असतो.

हे राजा, कर्मचक्र म्हणजे काय, तें सांगतों ऐक—कृतयुगांत धर्म चार पादांनीं युक्त होता. त्रेतायुगांत तीन पाद धर्म व एक पाद अधर्म प्रवृत्त झाला. द्वापरांत अर्धा धर्म व अर्धा अधर्म राहिला आणि कलीमध्यें तीन पाद अधर्म—पातक व एक पाद धर्म प्रत्ययास येऊं लागला. तें हें कर्मचक्र पुनर्जन्म-मरणाचें हेतु असल्यामुळें पुनः कर्म व पुनः संसार अशा क्रमानें फिरत असतें. स्थावर-जंगम पदार्थांच्या आयुष्याचें हरण करणारी देवता म्ह० काल व देह आणि प्राण यांचा वियोग करणारा मृत्यु यांचेंहि नियमन वासुदेवच करीत असतो, हें मी तुला सत्य सांगतों. हा भगवान् ईश्वर व महायोगी असूनहि सर्व जगाचीं कर्में आरंभितो. धान्यादिकांची वृद्धि करणारा कृषीवल, धनाची वृद्धि करणारा दरिद्री, किंवा देहादिकांचा नाश करणारा यम, यांप्रमाणेंच तो हरि जगद्व्यवहार करितो. जे मानव त्यालाच शरण जातात, ते कदापि मोहित होत नाहींत व तो केशव अशा सज्जनांना आपल्या मायेनें फसवीत नाहीं. ५.५.६८.

---

## अध्याय ६९ वा.

[ १ संजयमुखानें कृष्णमाहात्म्यश्रवण. २ श्रीकृष्णाला शरण जाण्याविषयीं धृतराष्ट्राचा दुर्योधनाला उपदेश. दुर्योधनानें केलेला त्याचा अनादर. ३ गांधारीनें केलेली पुत्राची निंदा. ४ संजयाचें भगवत्प्राप्त्युपायकथन. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—संजया, माधव सर्वलोकमहेश्वर आहे, हें तूं कसें जाणलेंस व मला त्याचें यथार्थ स्वरूप कां जाणतां आलें नाहीं! ज्ञानसाधनें कोणतीं व ज्ञानप्रतिबंधक काय आहे ! हें मला सांग.

**संजय**—हे राजन्, ऐक. तत्त्वमस्यादि-वाक्यजन्य ज्ञान तुझ्या ठिकाणीं नाहीं व माझी ती विद्या हीन झालेली नाहीं. जो या निर्विषय आनंदमात्रापासून च्युत होतो, तो केशवाचें यथार्थ स्वरूप जाणत नाहीं. हे प्रभो, मी विद्येच्या योगानें त्रियुग मधुसूदनाला जाणतों. ज्या परमात्म्याच्या ठिकाणीं रज्जूवरील सर्पाप्रमाणें स्थूल, सूक्ष्म व कारण शरीरांचा आरोप केला जातो त्या भगवानाला त्रियुग असें म्हटलें आहे. अज्ञानकल्पित अवस्थात्रयाचा विद्येनें बाध झाला असतां निरुपाधिक प्रत्यगात्मरूप ज्ञात होतें. मी त्याला सर्व विश्वाचें निमित्तकारण मानितों. तो भगवान् नित्यसिद्ध असल्यामुळें कर्मांनीं असाध्य आहे. आकाशादि भूतांचें उत्पत्ति-लयस्थान आहे.

**धृतराष्ट्र**—हे गावल्गणपुत्रा, जनार्दनाचें तुला जें आराध्यत्वानें ज्ञान झालें आहे, तें कशाप्रकारचें आहे ! तूं त्या भगवानांचें ध्यान राजाप्रमाणें तटस्थत्वानें करितोस कीं प्रत्यगात्मत्वानें ? म्हणजे तुझ्या स्वरूपाहून तो पृथक् आहे असें समजून त्याचें ध्यान करितोस कीं आपल्या साक्षिस्वरूपानें ! हे सूता, तूं यांतील ज्या भक्तीनें त्या त्रियुग मधुसूदनाला जाणत असशील, ती मला सांग.

**संजय**—तुझें कल्याण असो. मी स्त्री-पुत्रादि आकारांनीं परिणत झालेल्या अविद्येचें सेवन करीत नाहीं. व भगवदर्पणावांचून वृथा धर्माचेंहि आचरण करीत नाहीं. काम-क्रोधादिकांनीं रहित होऊन निर्मल मनानें मी केशवाचें ध्यान करितों आणि तत्त्वमस्यादि वाक्यावरून जनार्दनाचें यथार्थ स्वरूप जाणतों.

( २ ) **धृतराष्ट्र**—बा दुर्योधना, हृषीकेश जनार्दनाला शरण जा. हा संजय आपला हितचिंतक आप्त आहे. यास्तव तूं केशवाचा अवमान करूं नको.

दुर्योधन—हे तात, जोंवर हा भगवान् देवकीनंदन अर्जुनाशीं सख्य ठेवून लोकांचा संहार करील, तोंवर मी त्या केशवाला शरण जाणार नाहीं. अर्जुन काम-क्रोधादि मलशून्य आहे, त्याच्याशीं भगवानाचें सख्य आहे आणि मी कामादिकांनीं व्याप्त आहें. यास्तव त्याला प्राप्त होणार नाहीं. मला आसुर भावाचा त्याग करतां येणें शक्य नाहीं. म्हणून मला केशवाच्या प्राप्तीचा संभवहि नाहीं.

धृतराष्ट्र—हे गांधारि, हा तुझा दुरात्मा पुत्र खरोखर अधोगतीलाच प्राप्त होत आहे. हा मानी ईर्ष्यावान् व सज्जनांच्या उपदेशाचा अवमान करणारा आहे.

( ३ ) गांधारी—दुष्टा, तूं वृद्धांची अवज्ञा करणारा आहेस. तुला ऐश्वर्याचा मोठा हव्यास सुटला आहे. पण हे मूढा, तूं आपला पिता, माता, ऐश्वर्य व जीवित यांचा त्याग करून कर्णादि दुष्टांची प्रीति संपादन करीत आहेस व माझा शोक वाढवीत आहेस. परंतु भीमसेन जेव्हां तुझा वध करील, तेव्हां तुला आपल्या पित्याच्या या वचनाचें स्मरण होईल.

व्यास—हे राजन् धृतराष्ट्रा, ज्या तुझा संजय दूत आहे व जो तुला श्रेयः-साधनांत नियुक्त करीत आहे, तो तूं कृष्णाला प्रिय आहेस. यास्तव तूं माझें हें वचन ऐक. जो या देवकीपुत्राला उत्कृष्ट ब्रह्म आहे, असें जाणतो व एकाग्र चित्तानें हृषीकेशाची उपासना करितो, तो महद्भयापासून मुक्त होतो. जे पुरुष क्रोध व हर्ष यांनीं युक्त असतात, ते अनेक पाशांनीं बद्ध होतात व स्वतःच्या धनांनीं संतुष्ट होत नाहींत. ते कामानें मूढ झालेले पुनः पुनः स्वकर्मानींच यमाच्या वश होतात आणि एका अंधानें दुसऱ्या अंधाला मार्ग दाखविण्याप्रमाणेंच त्यांची गति होते. ब्रह्माची प्राप्ति करून देणारा हाच एक ज्ञानमार्ग आहे. तो मार्ग जाणणारे संसाराचें अतिक्रमण करितात. केवल महात्मेच या संसारांत आसक्त होत नाहींत.

धृतराष्ट्र—हे संजया, ज्या मार्गानें गेलें असतां हृषीकेशाची प्राप्ति होऊन मोक्षाचा लाभ होतो, तो निर्भय मार्ग मला सांग.

( ४ ) संजय—हे राजन्, कोणीहि अजितेंद्रिय पुरुष इंद्रियनिग्रहावांचून केवल यज्ञ-यागादि उपायांनीं नित्य सिद्ध प्रत्यगात्म्याला जाणण्यास समर्थ होत नाहीं. प्रबल कामनांचा त्याग, अहिंसा व विषयदोषदर्शन हीं ज्ञानप्राप्तीचीं

साधनें आहेत. यास्तव हे राजेंद्रा, तूं सावधान चित्तानें इंद्रियांचें नियमन कर. तुझी बुद्धि तत्त्वापासून चलित न होवो. अंतर्बाह्य विषयांपासून इंद्रियांचा निग्रह कर. मनासह इंद्रियांचा निग्रह करणें यालाच विप्र ज्ञानाचें मुख्य साधन समजतात.

याच ज्ञानानें व मार्गानें विद्वान् जात असतात. ज्यांनीं इंद्रियनिग्रह केला नाहीं, त्यांना केशवाची प्राप्ति होत नाहीं. शास्त्र व युक्ति यांच्या लाभानें व चित्तवृत्तिनिरोधानें ईश्वर प्रसन्न होतो व आपल्या यथार्थस्वरूपाच्या ज्ञानानें अनुग्रह करितो. ५. ५. ६९.

---

## अध्याय ७० वा.

[ १ श्रीकृष्णाच्या कांहीं नांवांची व्युत्पत्ति. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, श्रीकृष्णाचीं नांवें व कर्मे यांचा अर्थ जाणला असतां मी पुरुषोत्तमाला प्राप्त होईन, यास्तव त्यांची जिज्ञासा करणाऱ्या मला त्या पुण्डरीकाक्षाचीं नांवें व कर्में पुनः सांग.

संजय—हे राजन्, मीं वासुदेवाचें शुभ नामनिर्वचन ऐकलें आहे. वस्तुतः केशव वाणीला अगोचर आहे, तथापि त्याच्या नांवांचें निर्वचन मला जितकें ठाऊक आहे, तितकें मी तुला सांगतों. तो प्रभु आपल्या मायेनें सर्वांना आच्छादित करितो, किंवा सर्व भुवनाला स्थिर धारण करितो, किंवा भुवन त्याच्यामध्यें रहातें, म्हणून तो वासु. हाच प्रकाशमान असल्यामुळें वासुदेव. किंवा देव त्याच्यामध्यें रहातात म्हणून तो वासुदेव, म्हणजे तो इंद्रियांच्या उत्पत्ति-प्रलयांचें स्थान होय. त्याला व्यापकत्वामुळें विष्णु म्हणतात. तो सर्वांना व्यापतो म्हणून त्याला व्यापकत्व आहे. मा म्ह० बुद्धिवृत्ति, त्या उपाधिभूत वृत्तीला मौनादिकांच्या योगानें दूर करितो, म्हणून माधव किंवा मुनीचें कर्म जें मनन म्ह० मौन, शास्त्रतः व युक्तितः तत्त्वाचें आलोचन म्ह० ध्यान आणि निश्चित तत्त्वांत चित्तनिरोध म्ह० योग, यांच्या योगानें माधवाला जाणावें. मधुदैत्याचा वध करणारा म्हणून मधुसूदन. चोवीस तत्त्वांचा स्वतःमध्यें उपसंहार करितो म्हणून मधुहा. ‘ कृषि ’ हा शब्द ‘ भू’-वाचक आहे व ‘ ण ’ हा सुख या अर्थी आहे. या दोन धात्वर्थांच्या संबंधानें कृष्ण सन्मात्र आनंदरूप होतो.

पुंडरीक म्ह० श्वेतपद्माप्रमाणें असलेल्या हृदयकमलांत त्याचा निवास आहे व तो तेथून कदापि क्षय पावत नाहीं, म्हणून त्या हरीला **पुंडरीकाक्ष** आणि जनतेला त्रास देणारे जे तस्करादि, त्यांना पीडा देतो म्हणून **जनार्दन** म्हणतात. तो सत्त्वापासून च्युत होत नाहीं व तत्त्वमस्यादि अबाधित सत्त्व त्याचा त्याग करीत नाहीं, म्हणून तो '**सात्वत**' म्हटला जातो. आर्ष म्ह० वेद, त्यांनीं भासतो म्ह० प्रकाशित होतो म्हणून **आर्षभ**. तो औपनिषद पुरुष असल्यामुळें **वृषभेक्षण**, किंवा वृष म्ह० धर्म, त्याला प्रकाशित करविणारा जो वृषभ, म्ह० वेद, तो चक्षुवत् ज्याचा ज्ञापक आहे तो **वृषभेक्षण** होय.

हा विभु जनकापासून उत्पन्न होत नाहीं, म्हणून अज, इंद्रियांमध्यें स्वयंप्रकाशत्वामुळें हा कृष्ण **अनीकजित्**, म्ह० सेनाजित् आहे. ज्याला दम आहे, तो दाम व जो उत्कर्षानें प्रकाश पावतो तो उदरः म्हणून याला **दामोदर** असें म्हणतात. ज्याच्या योगानें मनुष्य हृष्ट म्ह० सुखी होतो तो हृषीक म्ह० वृत्तिसुख. सुख म्ह० स्वरूपानंद, या दोहोंचेंहि तो नियमन करीत असल्यामुळें केशवाला **हृषीकेश**त्व प्राप्त होतें. तो परमात्मा आपल्या बाहूंनीं द्यावा-पृथ्वीला धारण करितो म्हणून **महाबाहु** म्हटला जातो. त्याला संसारधर्माचा स्पर्श नसल्यामुळें तो सतत ऊर्ध्वरूप आहे म्हणून **अधोक्षज**. सर्व जीवांचा आधार असल्यामुळें **नारायण**. जो सर्वांना पूर्ण करितो व त्याच्यामध्यें सर्व लीन होतें, म्हणून याला **पुरुष** म्हणतात व तो क्षराक्षर पुरुषांहून उत्तम असल्यामुळें **पुरुषोत्तम** होय. असत् म्ह० कारण, तोच अक्षर पुरुष आणि **सत्** म्हणजे कार्य. हाच क्षर पुरुष. हाच पुरुष अशा सर्व सदसदांचें उत्पत्ति प्रलयस्थान आहे. म्हणून त्याचें पुरुषोत्तमत्व योग्यच आहे. याला सर्व वस्तूंचें सर्वदा ज्ञान असतें म्हणून **सर्वज्ञ** म्हणतात.

कृष्ण सत्यांत स्थित आहे व सत्य त्याच्या ठिकाणीं प्रतिष्ठित आहे. गोविंद सत्याहूनहि सत्य आहे, म्हणून तो सत्य या नांवानेंहि प्रसिद्ध आहे.

त्या देवानें तीन पावलांत सृष्टीचें आक्रमण केलें. म्हणून त्याला **विष्णु** असेंहि म्हणतात. सर्वदा विजयशील असल्यामुळें **जिष्णु**, तो शाश्वत असल्यामुळें **अनंत** व इंद्रियांच्या प्रकाशामुळें **गोविंद**, म्हटला जातो. तो मिथ्याभूत जगालाहि आपली सत्ता व स्फूर्ति देऊन सत्य असल्याप्रमाणें करतो आणि त्यामुळें सर्व लोकांना मोह पाडतो.

हे राजन्, अशा प्रकारचा हा मधुसूदन धर्मामध्यें नित्य संनिहित असतो. तो महाबाहु अच्युत कौरवांचा क्षय होऊं नये, म्हणून तुम्हांवर कृपा करण्यासाठीं लवकरच येथें येईल. ५. ५. ७०.

## अध्याय ७१ वा.

[ १ धृतराष्ट्रानें स्वतःच्या भगवद्भक्तीचें केलेलें आविष्करण. ]

(१) धृतराष्ट्र—हे संजया, आपल्या चिन्मात्रस्वरूपानें शोभणाऱ्या आणि दिशा व उपदिशा यांना प्रकाशित करणाऱ्या वासुदेवाला समीप आलेला जे पहातील, त्यांच्या भाग्याची मी स्पृहा करितों. हे चक्षुष्मान् लोक धन्य होत. तो भगवान् पांडवांचें वचन कौरवांच्या सभेंत कथन करील. तो ऐश्वर्य इच्छिणारांचें कल्याण करणारें भाषण करील व त्याचें ग्रहण न करणारांचा मृत्यु ओढवेल. देहरूपानें प्रकट झालेला तो सात्वत वीर अद्वितीय आहे. तो यादवश्रेष्ठ यादवांचा प्रेरक आहे. शत्रूंना क्षुब्ध करून त्यांचा वध करणारा व त्यांचें यश हरण करणारा आहे. अशा त्या वरणीय महात्म्याला येथें जमलेले सर्व कौरव पहातील.

तो वृष्णिश्रेष्ठ दयायुक्त वाणीनें माझ्या पुत्रांना मोहित करील. तो सनातन ऋषि म्हणजे मुख्य नारायण आहे. तो प्रभु आत्मज्ञ असून त्याची वाणी समुद्रासारखी आहे. यतींना तो हातांतील कलशाप्रमाणें गोचर आहे. त्याची गति अप्रतिहत असून सुंदर पक्षांनीं युक्त असलेला गरुड तोच आहे. तो अच्युत प्रजांचा हर्ता व भुवनांचा आधार आहे.

तो पुराण पुरुष सहस्रशीर्षांनीं युक्त आहे. तो आदि म्ह० कारण, मध्य व अन्त यांनीं रहित असून त्याची कीर्ति अनंत आहे. तो कर्मजन्य बीजभूत पुण्यादिकांचें फल देणारा आत्मा नित्य व अज आहे. त्या विराडादिकांहून श्रेष्ठ असलेल्या परमात्म्याला मी शरण जातों. तो त्रैलोक्याची रचना करणारा व देवासुर, नाग व राक्षस यांचा जनयिता आहे. विद्वान् पुरुषांतील तो प्रमुख आहे. अशा त्या इंद्रानुजाला मी शरण जातों. ५. ५. ७१.

येथें पांचवें यानसंधिपर्व समाप्त झालें.

# भगवद्यानपर्व ६.



## अध्याय ७२ वा.

[ १ कृष्ण व युधिष्ठिर यांचा भगवद्यानाच्या उपोद्धातत्वानें संवाद. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, संजय परत गेला असतां धर्मराज युधिष्ठिर दाशार्हश्रेष्ठ सात्वताला म्हणाला—"हे मित्रवत्सला कृष्णा, साह्य करण्याचा खरा काल आतां प्राप्त झाला आहे. या आपत्तींतून आम्हांला तारणारा तुजवांचून अन्य कोणी दिसत नाहीं. हे माधवा, तुझ्याच आश्रयानें आम्ही वृथा दर्प करणाऱ्या अमात्यांसह दुर्योधनाशीं वैर करण्यास निर्भयपणानें उद्युक्त झालों आहों. हे अरिंदमा, तूं वृष्णींना जसा सर्व आपत्तींतून रक्षितोस तसें आम्हां पांडवांचें या महद्भयापासून संरक्षण कर.

**श्रीभगवान्**—हे महाबाहो, तुझी काय इच्छा आहे, तें सांग. तुझें प्रिय करण्यास हा मी सज्ज आहें. तूं जें कांहीं सांगशील, तें सर्व मी करीन.

**युधिष्ठिर**—हे वासुदेवा, पुत्रांसह धृतराष्ट्राची काय करण्याची इच्छा आहे, तें सर्व संजयानें मला सांगितलें. त्याचें तें सर्व भाषण तूंहि ऐकलेंच आहेस. संजय धृतराष्ट्राचें हृद्गत जाणणारा आहे. त्यानें त्याचें खरें मत आम्हांला स्पष्टपणें सांगितलें. कारण दूतानें यथोक्त भाषण करावें. विपरीत बोलणारा दूत वध्य होत असतो. हा धृतराष्ट्र आमचें राज्य परत न देतां आमच्या वैराची शांति करूं पहात आहे. तो लोभी व पापबुद्धि आमच्याशीं कपटाचरण करीत आहे.

धृतराष्ट्राच्या आज्ञेनें आम्ही बारा वर्षें वनांत राहिलों व एक वर्ष अज्ञातवासांत काढले. त्यावेळीं हे प्रभो, 'चौदाव्या वर्षीं आमचें राज्य आम्हांला परत मिळेल,' हें कौरवांचें वाक्य आम्ही निश्चित समजलों व आमच्या प्रतिज्ञेचा भंग केला नाहीं; ही गोष्ट सर्व ब्राह्मण जाणतात.

हा लोभी धृतराष्ट्र स्वधर्माकडे लक्ष देत नाहीं व लोभानें पुत्राच्या वश होऊन त्या मंदमतीच्या मतानें चालत आहे. हे जनार्दना, हा धनलुब्ध राजा दुर्योधनाच्या मतानें वागून आमच्याशीं मिथ्याचरण करीत आहे व आपल्या पुत्राचें प्रिय करीत आहे. हे केशवा, माझी माता व विदुरासारखे सुहृद् यांचेंहि

योग्यप्रकारें पोषण करण्यास मी समर्थ नाहीं; याहून अधिक दुःखकर काय आहे !

हे मधुसूदना, काशिराज, चेदिपति, पांचाल, मत्स्य व तुझ्यासारखा समर्थ नाथ इतके साह्यकर्ते असूनहि केवल अविस्थल, वृकस्थल, माकन्दी, वारणावत व ज्यांवर यावज्जीव निर्वाह करतां येईल असें पांचवें कोणतें तरी एक गांव मी मागत आहें. कौरवांनीं आम्हांला हीं पांच गांवें किंवा नगरें दिल्यास आम्ही तेथें राहूं. परंतु आमच्यासाठीं भीष्मादि भरतवंशजांचा नाश होऊं नये; अशी माझी इच्छा आहे. पण दुष्टात्मा दुर्योधन तेंहि मान्य करीत नाहीं व तो स्वतःलाच समग्र पृथ्वीचा स्वामी समजत आहे; याहून अधिक कष्टतर तें काय असणार !

हे गोविंदा, सत्कुलांत उत्पन्न झालेला वृद्ध धृतराष्ट्र दुसऱ्याच्या वित्ताचा अभिलाष करीत आहे. परंतु लोभानें बुद्धीचा नाश होतो. प्रज्ञाहीनाची लज्जा नाहींशी होते. लज्जा गेली म्हणजे धर्माचा बाध होतो. धर्म नष्ट झाला कीं श्री सोडून जाते व श्रीरहित पुरुष नाश पावतो. कारण निर्धनत्व हाच पुरुषाचा वध आहे, हें त्याच्या लक्षांत येत नाहीं. हे कृष्णा, फलपुष्पहीन वृक्षाला पक्षी जसे सोडून जातात, तसे निर्धन मनुष्यापासून त्याचे सुहृद्, ज्ञातिजन व याचक द्विज हे निवृत्त होतात. बा कृष्णा, मृत देहापासून प्राण जसे निवृत्त होतात, किंवा पतितापासून त्याचे ज्ञातिजन निघून जातात, त्याप्रमाणेंच माझ्यापासून माझे ज्ञातिबांधव दूर होतात. हेंच मरण आहे.

'ज्यामध्यें आज किंवा उदयिक भोजन मिळत नाहीं, तिच्या सारखी दुसरी अति दुःखदावस्था नाहीं' असें शंबरानें म्हटलें आहे. धनालाच परम धर्म म्हणतात व धनांत सर्व प्रतिष्ठित आहे. या लोकीं धनिकच खरे जिवंत होत. निर्धन नर मृततुल्यच असतात. जे लोक आपल्या बलाचा आश्रय करून इतरांच्या धनाचा अपहार करितात, ते त्या पुरुषाला धर्म, अर्थ व काम यांपासून च्युत करितात. या निर्धनावस्थेस प्राप्त झालेले कित्येक ग्रामांतराला निघून

१ कुले जातस्य वृद्धस्य परवित्तेषु गृद्ध्यतः । लोभः प्रज्ञानमाहन्ति प्रज्ञा हन्ति हताह्रियम् ॥ ह्रीर्हता बाधते धर्मं धर्मो हन्ति हतः श्रियम् । श्रीर्हता पुरुषं हन्ति पुरुषस्याधनं वधः ॥ अधनाद्धि निवर्तन्ते ज्ञातयः सुहृदो द्विजाः । अपुष्पादफलाद्वृक्षाद्यथा कृष्ण पतत्रिणः ॥

जातात, कोणी वनवास स्वीकारतात, कांहीं संन्यास घेतात तर कित्येक मरणाचें अवलंबन करितात. कोणाला उन्माद होतो, कोणी शत्रूच्या वश होतात आणि कित्येक द्रव्यासाठीं परक्याचें दास्यहि पत्करतात.

पुरुषाला ही आपत्ति मरणाहूनहि कष्टकर आहे. द्रव्यहानि हेंच पुरुषाच्या धर्म व काम यांच्या विनाशाचें निमित्त आहे. देहस्वभावानें प्राप्त झालेलें मरणच शाश्वत आहे. पण दारिद्र्यादि निमित्तानें प्राप्त झालेलें मरण शाश्वत नाहीं. स्वाभाविक मरण हा लोकमार्ग असून तो सर्व भूतांना संमत व अपरिहार्य आहे. त्या मरणाचें अतिक्रमण कोणी करूं शकत नाहीं.

हे कृष्णा[1], ऐश्वर्याला प्राप्त होऊन सुखांत वाढलेले लोक वित्तहीन झाले असतां त्यांना ती निर्धनावस्था जशी क्लेशकर होते, तशी ती जन्मतःच निर्धन असलेल्या लोकांना बाधक होत नाहीं. तो निर्धन पुरुष स्वतःच्या अपराधानेंच हें महत्संकट ओढवून घेतो व इंद्रासह देवांची निंदा करितो. पण स्वतःला कदापि दोष देत नाहीं. त्यानें अध्ययन केलेल्या सर्व शास्त्रांचें ज्ञान त्याच्या संकटाचा परिहार करण्यास उपयोगी पडत नाहीं. तो धनहीन पुरुष आपल्या भृत्यांवर क्रुद्ध होतो व सुहृदांची असूया करितो.

आपत्कालीं पुरुष क्रोधाच्या अधीन होऊन वारंवार मोहित होतो, मोहवश झाल्यामुळें कार्याकार्य जाणत नाहीं व क्रूर कर्मांत प्रवृत्त होतो. पापकर्मानें[2] संकटाची वृद्धि होते व संकटामुळें नरकप्राप्ति होते. पापकर्मांची नरक हीच परा गति आहे. हे मुकुंदा, पापी पुरुष जर सावध झाला नाहीं, तर तो नरकांतच पडतो.

[ याप्रमाणें श्रीनें युक्त असलेल्या पुरुषाची नरकप्राप्ति सांगून आतां युधिष्ठिर त्याच्या उद्धाराचा उपाय सांगतो— ] त्या श्रीमानाच्या अविद्येचा नाश करणारा जो विवेक तीच त्याची जागृति होय. प्रज्ञाचक्षु म्ह० विवेकवान् पुरुष अविद्येला तरून जातो. प्रज्ञायुक्त पुरुष शास्त्रांचें अन्वेक्षण करितो. तो शास्त्रनिष्ठ झाला म्हणजे धर्म जाणतो. त्यामुळें त्याला अकार्याविषयीं लज्जा वाटूं लागते. कारण लज्जाहीन पुरुषाचा धर्महि अधर्मच होय. पण लज्जावान्

१ न तथा बाध्यते कृष्ण प्रकृत्या निर्धनो जनः । यथा भद्रां श्रियं प्राप्य तया हीनः सुखैधितः ॥

२ पापकर्मतया चैव संकरं तेन पुष्यति । संकरो नरकायैव सा काष्ठा पापकर्मणाम् ॥

मनुष्य पापाचा द्वेष करितो. त्याच्या ऐश्वर्याची अभिवृद्धि होते. तो जोंवर श्रीमान् असतो, तोंवरच पुरुष म्हटला जातो. तो प्रशान्तात्मा धर्मनिष्ठ असतो. तो सर्वदा स्वकर्तव्याविषयीं दक्ष रहातो. त्याची बुद्धि अधर्म किंवा पाप यांत प्रवृत्त होत नाहीं. पण याच्या उलट लज्जाहीन पुरुष स्थावर किंवा तिर्यक् यांच्या तुल्य आहे. तो मूढ स्त्रीहि नव्हे व पुरुषहि नव्हे. त्याचा धर्मांत अधिकार नाहीं. जसा शूद्र तसाच तो समजावा.

पण याच्या उलट अकार्याविषयीं लज्जा बाळगणारा पुरुष देवांचें, पितरांचें, व स्वतःचें रक्षण करितो आणि त्याच्या योगानें अमृतत्वाला म्ह० मोक्षाला प्राप्त होतो. पुण्यकर्में करणाऱ्या पुरुषांची तीच श्रेष्ठ गति आहे. हे मधुसूदना, अकार्यांविषयीं लज्जा माझ्या ठिकाणीं तूं प्रत्यक्ष पहात आहेस. त्यामुळेंच मी इतकीं वर्षें राज्यभ्रष्ट होऊन राहिलों आहें. पण कोणत्याहि कारणानें आम्ही न्यायानें प्राप्त झालेली आमची संपत्ति सोडण्यास समर्थ नाहीं. आपलें ऐश्वर्य परत मिळविण्याचा यत्न करीत असतां आमचा जरी वध झाला तरी त्यांत आमचें कल्याणच आहे.

हे माधवा, तथापि आम्हीं कौरवांशीं शम करून प्रशांत चित्तानें ऐश्वर्याचा उपभोग घ्यावा हा प्रथम पक्ष आहे. कारण आम्हीं कौरवांचा वध करून राज्य प्राप्त करून घेणें, ही क्षयपूर्वक उत्कर्ष करणारी क्रूरकर्माची पराकाष्ठा आहे. बा कृष्णा, अबांधव व अनार्य शत्रूंचाहि वध करूं नये, मग अशा प्रकारच्या आम्हांविषयीं काय सांगावें ! आमचे हे सर्व ज्ञातिजन अतिशय श्रेष्ठ आहेत. ते आम्हांला पूज्य आहेत व आम्हांहून ज्येष्ठ आहेत. त्यांचा वध करणें अतिशय पापयुक्त आहे ! अरे अरे, या युद्धांत शुभ काय आहे !

खरोखर हा क्षात्रधर्म मूर्तिमंत पापच आहे आणि आम्ही तर क्षत्रिय आहों. आम्हांला स्वधर्म अधर्मयुक्त जरी वाटला तरी, त्याचें पालन केलेंच पाहिजे. कारण शास्त्रानें स्वधर्माहून अन्य वृत्ति निंद्य मानली आहे. शूद्र शुश्रूषा करितात, वैश्य व्यापरावर निर्वाह करितात, आम्ही क्षत्रिय युद्धावर उपजीविका करितों आणि ब्राह्मण भिक्षापात्राचें अवलंबन करितात. क्षत्रिय क्षत्रियाचा वध करितो, मत्स्य मत्स्यावर प्राण धारण करितो, व श्वान श्वानाचें मांस खातो. हे दाशार्हा, कुलपरंपरेनें प्राप्त झालेली ही योजना कशी आहे पहा !

हे कृष्णा, युद्धांत नित्य कलह व प्राणांचा नाश होतो; यास्तव मी नीतीच्या बलावर युद्ध करीन. कारण जय-पराजय व प्राण्यांचें जीवित-मरण हीं

आपल्या इच्छेवर अवलंबून नाहींत. सुख किंवा दुःख हीं त्यांचा काल प्राप्त झाल्यावांचून येत नसतात. एक मनुष्य अनेकांचा संहार करितो व केव्हां केव्हां अनेकांच्या हातून एकाचाच वध होतो. कांहीं प्रसंगीं क्षुद्र मनुष्यहि शूराला मारितो आणि अयशस्वी पुरुष यशस्वी माणसाचा घात करितो. दोन्ही पक्षांचा एकाच वेळीं जय किंवा पराजय होणें केव्हांहि शक्य नाहीं. पराजयाच्या भीतीनें पलायन करणाऱ्या क्षत्रियाला दैन्य, मरण व द्रव्यादिकांचा नाश यांची प्राप्ति होते. यास्तव युद्ध हें सर्वथा पाप आहे. कारण प्रहार करणारावर अतिप्रहार कोण करणार नाहीं ! मारणाराचा अवश्य वध होतोच. आणि मृत झाल्यावर जय व पराजय समानच आहेत.

हे हृषीकेशा, पराजय मरणाहून भिन्न आहे, असें मला वाटत नाहीं. ज्यांचा विजय होतो, त्यांचाहि इष्टजननाशामुळें वस्तुतः तो पराजयच आहे. युद्धांत आपला स्वतःचा जरी वध झाला नाहीं, तरी आपल्या पुत्रादि प्रियजनांस इतर लोक मारितात. ज्ञातिबलानें हीन झालेला तो मनुष्य जीवंत राहिला, तरी त्याचे पुत्र, सुहृद्, बांधव त्याच्या दृष्टीं पडत नाहींत. त्यामुळें शेवटीं तो जीविताला कंटाळून सर्वतः विरक्त होतो.

हे कृष्णा, जे धीर, ह्रीमान्, दयाळु व सज्जन असतात, त्यांचा युद्धांत वध होतो व कनिष्ठ प्रतीचे लोक त्यांतून सुटतात. शत्रूंना मारूनहि त्याविषयीं आपल्याला नित्य पश्चात्ताप होतच असतो. तो पश्चात्ताप दोषोत्पादक असून क्लेशकरहि आहे. कारण शत्रूचा नाश केला तरी त्याचा अवशेष शिल्लक रहातोच व तो शेष पुढें बलाढ्य होऊन आपला शेष राहूं देत नाहीं. तो वैराचा अंत करण्याच्या इच्छेनें शत्रूंचा समूल उच्छेद करण्याचा यत्न करीत रहातो. जय वैर उत्पन्न करितो व पराजित झालेला दुःख भोगतो.

हे अच्युता, जो मनुष्य जय-पराजयाविषयीं उदासीन असतो, तो प्रशान्तात्मा सुखानें झोंप घेतो. पण ज्याच्या मनांत वैर उत्पन्न झालें आहे, त्याला सर्पयुक्त गृहांत वास करणाऱ्या मनुष्याप्रमाणें अशान्त मनानें नित्य मोठ्या कष्टानें निद्रा येते. त्याला सुखाची झोंपहि मिळत नाहीं. जो मनुष्य शत्रूचें निर्मूलन करितो, त्याला यश सोडून जातें. त्याची सर्व लोकांत शाश्वत अकीर्ति पसरते. वैरभाव दीर्घकालपर्यंत शांत होत नाहीं. त्या कुलांतील वंशजांना त्यांच्या पूर्वजांच्या वधाच्या अज्ञात कथा सांगणारे लोकहि असतातच !

त्यामुळें हे केशवा, वैरानें वैराची शांति कदापि होणार नाहीं. हविर्द्रव्यानें अग्नि जसा वृद्धि पावतो, तसें वैर वैरानें अधिकच प्रवृद्ध होतें.

हे मधुसूदना, यास्तव शत्रूचा किंवा आपला नाश झाल्यावांचून शांति प्राप्त होत नाहीं. शत्रु विद्यमान असला म्हणजे त्याला आपलें एखादें छिद्र तर सांपडणार नाहींना! असा संशय वाटत असतो व छिद्र सांपडणें अपरिहार्य आहे. छिद्र पहाणाराच्या अंगीं हा नाशाख्य दोष निरंतर वास करितो. हा पुरुषाचा दोष अतिशय दुर्धर्ष असून तो हृदयाला पीडा देणारा महान् आधि आहे.

मनानें त्याग केल्यानें किंवा मरणानेंच त्या वैराची शांति होते. अथवा शत्रूंचें निर्मूलन करून निष्कंटक राज्यप्राप्ति होईल; पण त्यासारखें दुसरें क्रूरतर कर्म नाहीं. राज्यत्यागानें शांति होईल, पण शत्रूचा वध झालेला नसल्यामुळें तो आपल्या छिद्रावर प्रहार करील कीं उपेक्षा करील, असा संशय ऐश्वर्यहीन झालेल्या त्या पुरुषाला सतत येतो. त्यामुळें प्रसंगीं त्याचा नाश होण्याचाहि संभव आहे. यास्तव आम्ही राज्यत्याग करण्याची इच्छा करीत नाहीं व कुलक्षय व्हावा, हेंहि आम्हांला इष्ट नाहीं. या समयीं कौरवांची प्रार्थना करून शांति करणेंच मला श्रेयस्कर वाटतें. युद्धाची सर्वथा इच्छा न करणारानें साम-दान-भेद इत्यादि उपायांनीं राज्यप्राप्तीचा यत्न करावा व शमाला प्रतिबंध झाल्यास शेवटीं अवश्य युद्धच करावें. कारण पराक्रम न करणें म्हणजे स्वतःचें दुर्बलत्वच व्यक्त करणें होय.

शमाला प्रतिबंध झाला असतां दारुण युद्ध प्रवृत्त होतें, तें श्वानांच्या कलहाप्रमाणें निंद्य होय, असें पंडितांनीं म्हटलें आहे. श्वानाच्या लांगूलाप्रमाणें युद्धांत उभय पक्षांचे ध्वज उभारतात. एकमेकांवर भुंकणाऱ्या श्वानांप्रमाणें हे योद्धे परस्परांचें छिद्रान्वेषण, निंदा व प्रशंसा करितात. श्वान भूमीवर लोळून मुख उघडून दांत दाखवितात व ओरडतात, त्याप्रमाणें हे वीरहि परस्परांना लोळवून दांत-ओंठ खातात व सिंहनाद करितात. अशाप्रकारें युद्ध प्रवृत्त होत असतें आणि त्या भांडणाऱ्या श्वानांतील जो बलवान् असतो तो इतरांना पळवून लावून आमिष मिळवितो व खातो.

हे कृष्णा, हाच न्याय मनुष्यांना लागू आहे. श्वानापेक्षां मानवांत कांहीं विशेष नाहीं, पण बलवानापुढें अशा प्रकारें लांगूलचालन करणें दुर्बलालाच

उचित आहे. त्यांचा सर्वथा अनादर केला तर राज्यप्राप्ति होत नाहीं. युद्ध केलें तर कुलक्षय होतो, आणि प्रार्थना केली तर आपलें दुर्बलत्व व्यक्त होतें.

हे जनार्दना, पिता, राजा व वृद्ध हे सर्वथा मानाला पात्र आहेत. तस्मात् धृतराष्ट्र आम्हांला मान्य व पूज्य आहे. परंतु धृतराष्ट्राचा पुत्रस्नेह मोठा बलवान् आहे. तो पुत्रांच्या वश होऊन आमच्या प्रणिपाताचा तिरस्कार करील. तस्मात् हे माधवा, यावेळीं आम्हीं काय केलें असतां धर्म व अर्थ यांपासून च्युत होणार नाहीं, असें तुला वाटतें! अशा या अर्थाची अतिशय हानि होणाऱ्या संकटांत तुझ्यावांचून मीं अन्य कोणाला शरण जावें! हे पुरुषोत्तमा, तूं आम्हांला प्रिय आहेस, आमचें प्रिय करणारा आहेस. तूं सर्व कर्मांची गति जाणतोस! तुझ्यासारखा निश्चय करणारा सुहृद् दुसरा कोण आहे!

**वैशंपायन**—हे राजा, धर्मराजाचें हें भाषण ऐकून जनार्दन त्याला म्हणाला—" हे युधिष्ठिरा, तुम्हां दोघांच्याहि हितासाठीं मी कौरवांच्या सभेंत जातों. तेथें तुमच्या अर्थाची हानि होऊं न देतां मला जर शम करतां आला, तर महाफल देणारें पुण्य मला लाभेल. कौरवांनीं शम मान्य केल्यास क्षुब्ध झालेले कुरु, सृंजय, पांडव, धार्तराष्ट्र व ही समग्र पृथ्वी, या सर्वांस मीं मृत्युपाशांतून सोडविलें असें होईल."

**युधिष्ठिर**—हे कृष्णा, तूं कौरवांच्या सभेंत जावेंस हें मला योग्य वाटत नाहीं. कारण तुझें सयुक्तिक भाषणहि दुर्योधन ऐकणार नाहीं. दुर्योधनाच्या अधीन असलेले सर्व भूपाल व क्षत्रिय तेथें जमले आहेत, त्यांच्या समुदायांत तुझें जाणें मला रुचत नाहीं. हे माधवा, तुझ्याशीं द्रोह करून सर्व देवांचें ऐश्वर्य, द्रव्य किंवा देवत्व जरी प्राप्त होत असलें, तरी आम्हांला तें प्रिय नाहीं मग त्यापासून सुख कोठचें!

**भगवान्**—हे महाराज युधिष्ठिरा, धार्तराष्ट्राची पापमति मी जाणून आहें. परंतु मीं कौरवसभेंत जाऊन शमाचें बोलणें केलें असतां सर्व लोकांत अनिंद्य होईन. आम्ही शमाचे सर्व प्रयत्न करून शेवटीं युद्धाला सज्ज झालों, असें समजून आमची कोणी निंदा करणार नाहीं. ज्याप्रमाणें सिंहापुढें मृगांचे कळप उभे रहात नाहींत, त्याप्रमाणें क्रुद्ध झालेल्या माझ्याशीं युद्ध करण्यास कौरवांकडे जमलेले सर्व पार्थिवहि समर्थ नाहींत आणि त्यांनीं जर माझ्याशीं यत्किंचितहि अयोग्य वर्तन केलें, तर मी त्या सर्व कुरूंना दग्ध करून टाकीन, असा

माझा निश्चय आहे. हे पार्था, माझें त्यांच्याकडे जाणें व्यर्थ होणार नाहीं. झाली तर राज्यप्राप्ति होईल, नाहीं तर निदान आपली कोणी निंदा तरी करणार नाहीं.

युधिष्ठिर—हे कृष्णा, तुला जर योग्य वाटत असेल, तर तूं कौरवांकडे खुशाल जा. तुला कुशल व कृतार्थ होऊन परत आलेला मी पाहीन. हे विश्वक्सेना, ज्यायोगानें आम्ही सर्व संतुष्ट होऊं, अशाप्रकारें कौरवसभेंत जाऊन तूं आम्हां भारतांचा शम कर. हे प्रभो, तूं आमचा भ्राता व सखा आहेस. अर्जुनाला व मला प्रिय आहेस. तुझ्या सौहार्दाविषयीं आम्हांला संशयच नाहीं. आमच्या कल्याणासाठीं तूं कौरवांकडे जा. तूं आम्हांला जाणतोस व शत्रूलाहि ओळखतोस. यथार्थ भाषण करणें तुला उत्तम प्रकारें अवगत आहे. यास्तव जें आमच्या हिताचें असेल, तेंच वचन तूं दुर्योधनाला सांग. शम करून आमचें अर्धें राज्य, निदान पांच गांवें तरी देण्यास सांग. किंवा द्यूत खेळून अधर्मानें राज्य परत मिळविण्याचीहि माझी तयारी आहे. मी आतां बृहदश्वापासून अक्षविद्या शिकलों आहें. यास्तव हे केशवा, त्यांचा आशय जाणून सान्त्व किंवा क्रूरवचन यांतील तुला जें योग्य वाटेल, तसेंच तूं भाषण कर. ५. ६. ७२.

---

## अध्याय ७३ वा.

[ १ श्रीकृष्णाचें धर्मराजास सयुक्तिक उत्तर व आपल्या गमनांतील गूढ हेतूचें कथन. ]

( १ ) श्रीभगवान्—युधिष्ठिरा, मीं संजयाचें व तुझेंहि भाषण ऐकलें. त्यावरून कौरवांचा व तुझाहि आशय मीं जाणला आहे. तुझी बुद्धि धर्माश्रित आहे व त्यांची वैराचा आश्रय करीत आहे. त्यामुळें युद्धावांचून जें प्राप्त होईल, तेंच तूं पुष्कळ मानशील. परंतु हे पृथ्वीपाला, क्षत्रियाला नैष्ठिक कर्म उचित नाहीं. म्हणजे यावज्जीव ब्रह्मचर्य किंवा संन्यास क्षत्रियाला विहित नाहीं. कारण क्षत्रियानें भिक्षाटन करूं नये, असें सर्व आश्रमी सांगतात.

संग्रामांत जय होवो किंवा वध होवो, विधात्यानें हाच क्षत्रियांचा सनातन स्वधर्म सांगितला आहे. त्यांनीं दीनपणानें कदापि याचना करूं नये. तस्मात् हे युधिष्ठिरा, कौरवांपाशीं ' निदान पांच गांवें तरी द्या ' अशा प्रकारचें दीन

वचन बोलून त्यांवर आपला निर्वाह चालविणें तुला योग्य नाहीं. हे महाबाहो, तूं पराक्रमाचें अवलंबन करून शत्रूंचा नाश कर.

हे परंतपा, धृतराष्ट्रपुत्र अतिशय लोभी आहेत. त्यांचा परस्परांवर स्नेह आहे. ते दीर्घकाल एकत्र राहिले आहेत. त्यांना मित्र व सैन्य यांचें चांगलें साह्य आहे. असें असतांना ते तुझ्याशीं शम करतील असा कोणताच उपाय मला दिसत नाहीं. भीष्म, द्रोण, कृप, यांच्या बलावर ते धार्तराष्ट्र स्वतःला बलवान् समजत आहेत. हे राजन्, जोंवर तूं त्यांच्याशीं मृदु भाषण करशील, तोंवर ते तुझ्या राज्याचा असाच अपहार करतील. ते दुर्योधनादि तुझ्यावर दया करण्यासाठीं, किंवा तुझें दैन्य पाहून, अथवा धर्म व अर्थ यांसाठींहि तुझी इच्छा कदापि पूर्ण करणार नाहींत.

हे पांडवा, तुला त्यांच्याशीं शम न करण्याला पुष्कळ कारणें आहेत. तूं जेव्हां कौपीन धारण करून वनवासासारखें दुष्कर कर्म केलेंस, तेव्हां त्यांना यत्किंचित्हि पश्चात्ताप झाला नाहीं. पितामह भीष्म, द्रोण, धीमान् विदुर, ब्राह्मण, साधु, भूपति, नागरिक व सर्व कुरुश्रेष्ठ यांचा अनादर करून त्यांच्या समक्ष तुझ्यासारख्या दानशील, मृदु, दान्त, धर्मनिष्ठ व व्रताचें पालन करणाऱ्या धर्मात्म्याला त्यानें द्यूतामध्यें कपटानें फसविलें. परंतु त्या निर्दयाला आपल्या कर्माची लज्जा वाटली नाहीं. अशा दुःशील व दुराचरणी दुर्योधनाला तुझ्याविषयीं प्रेम कोठचें वाटणार ! तो दुरात्मा सर्व लोकांना वध्य आहे ! मग त्यानें ज्याचे अक्षम्य अपराध केले आहेत, त्या तुझ्याविषयीं काय सांगावें ! त्यानें तुला अनुजांसह कठोर वचनांनीं पीडा दिली व भ्रात्यांसह संतुष्ट होऊन आत्मश्लाघा करीत असें भाषण केलें—

" आतां पांडवांचें नांव व गोत्र यांवांचून स्वतःचें असें कांहींच राहिलेलें नाहीं व कांहीं दिवसांनीं तेंहि शिल्लक रहाणार नाहीं. आतांच माझ्या समीप त्यांचा पराक्रम लोपला आहे. तेरा वर्षांच्या दीर्घ कालानें तर त्यांचा शौर्यादिरूप स्वभावहि नष्ट होऊन जाईल."

राजा, तें कपटद्यूत प्रवृत्त झालें असतां दुरात्म्या पापी दुःशासनानें त्या राजसभेंत देवी द्रौपदीला अनाथाप्रमाणें केंस धरून ओढीत आणलें. तिच्या रोदनाकडेहि लक्ष दिलें नाहीं. भीष्म-द्रोणादिकांच्या समक्ष 'सर्व भोग्य' या अर्थी उपहासानें 'गौः गौः' असें वारंवार म्हटलें. त्यावेळीं हे राजन्, तूं निवारण

केल्यामुळें तुझे अतुल पराक्रमी भ्राते धर्मपाशानें बद्ध होऊन त्यांना प्रतिबंध करूं शकले नाहींत. तूं वनांत निघून गेल्यावरहि तो दुष्ट या व अशा प्रकारच्या कठोर शब्दांनीं तुमची निंदा करून ज्ञातीच्या पुढें आत्मश्लाघा करीत होता. त्यावेळीं तुझे क्लेश पाहून कौरवसभेंतील सभासद सद्गदित कंठानें अश्रु ढाळीत असत.

हे राजन्, ब्राह्मणांसह सर्व भूपाल या दुर्योधनाची निंदा करीत असतात. कोणीहि सभासद त्याचें अभिनंदन करीत नाहींत. कुलीनाची निंदा व वध यांतील वध त्याच्या गुणाचा उत्कर्ष करणारा आहे. परंतु निंदा हें निंद्य जीवन आहे. हे महाराज, या निर्लज्ज धार्तराष्ट्राची पृथ्वीवरील सर्व राजांनीं जेव्हां निंदा केली, तेव्हांच तो वास्तविक मृत झाला आहे. युधिष्ठिरा, अशा प्रकारचें ज्याचें चरित्र आहे, त्याचा वध करणें आतां अगदीं सुलभ आहे. ज्याचीं मूळेंच छिन्न झालीं आहेत असा वृक्ष केवल पाराच्या आश्रयानें जसा उभा असतो, तशी दुर्योधनाची स्थिति झालेली आहे. हा दुर्मति व अनार्य कौरव सर्व लोकांना सर्पाप्रमाणें वध्य आहे. यास्तव हे राजन्, तूं याचा वध कर. व्यर्थ साशंक होऊं नको.

हे निष्पापा, तूं धृतराष्ट्र व भीष्म यांना प्रणिपात करावास हें कार्य तुला सर्वथा उचित आहे व मलाहि तें प्रिय आहे, पण दुरात्म्या दुर्योधनाला क्षमा करणें सर्वथा अनुचित आहे. यास्तव मी कौरवांकडे जाऊन 'हा दुर्योधन सज्जन आहे कीं दुर्जन आहे, यांविषयीं द्विधाचित्त असलेल्या सर्व लोकांचा संशय दूर करीन. तेथें जमलेल्या सर्व वीरांना तुझे असामान्य गुण कथन करीन व दुर्योधनाच्या दोषांचें वर्णन करीन. याप्रमाणें माझें हितावह व धर्मार्थयुक्त भाषण ऐकून सर्व पार्थिव व नानादेशांतील प्रमुख योद्धे तूं धर्मात्मा व सत्यवक्ता आहेस, असा निश्चय करतील व दुर्योधनाचें लोभमूलक वर्तन ओळखतील. तेथें जमलेल्या चातुर्वर्ण्याच्या आबाल वृद्ध नागरिकांपाशीं मी त्याची निंदा करीन.

युधिष्ठिरा, शमाची याचना करणाऱ्या तुला अधर्माचा दोष कदापि लागणार नाहीं. परंतु धृतराष्ट्र व कौरव यांची मात्र सर्व भूपाल निंदा करतील. याप्रमाणें लोकापवादानें दुर्योधन मृतप्राय झाला असतां कोणतें कार्य अवशिष्ट रहाणार ! त्याच्या वधाला दुसऱ्या कोणत्या पुरुषार्थाची आवश्यकता आहे !

यास्तव मी तुमच्या स्वार्थाला बाध न आणतां कौरवांकडे जाऊन तुमचा शम करण्याचा प्रयत्न करीन व त्याचवेळीं त्यांचा काय व्यवसाय चालला आहे, याचेंहि सूक्ष्म निरीक्षण करीन. कौरवांची युद्धाची तयारी व त्यांच्या जय-पराजयाचें चिह्न पाहून तुझ्या विजयासाठीं मी परत येईन. हे भारता, शत्रूबरोबर युद्ध व्हावें अशीच मी अपेक्षा करीत आहें व तशाप्रकारचीं सर्व दुश्चिह्नेंहि दिसत आहेत.

हे पहा, पशु-पक्षी भीषण शब्द करीत आहेत. रात्रीं मुख्य मुख्य हत्ती व अश्व घोर रूपें धारण करितात. त्यांचीं तीं अग्नीसारखीं विविध घोररूपें अनुभवास येतात.

मनुष्यलोकाचा क्षय करणारा हा अंतक समीप येऊन ठेपला नसता, तर अशीं दुश्चिह्नें झालीं नसतीं. यांवरून विनाशकाल प्राप्त झाला आहे, हें स्पष्ट दिसत आहे. यास्तव योद्धयांनीं आपापलीं शस्त्रास्त्रें, यंत्रें, कवचें, रथ, गज, अश्व इत्यादि सर्व सज्ज करावे. हे नरेंद्रा, तुला जी युद्धसामग्री जमा करावयाची असेल, ती सर्व सिद्ध कर. पूर्वीं तुझें समृद्ध असलेलें जें राज्य दुर्योधनानें कपटद्यूतानें हरण करून घेतलें आहे, तें तो जिवंत असतांना सुखानें कदापि परत देणार नाहीं. तें परत मिळविण्यास युद्धावांचून दुसरा उपाय नाहीं. ५. ६. ७३.

---

## अध्याय ७४ वा.

[ १ दुर्योधनाशीं मृदु भाषणानें शम करण्याविषयीं भीमाची कृष्णाला विज्ञप्ति.]

(१) भीम—हे कृष्णा, कौरवांशीं आमचा शम होईल असेंच तूं मृदु भाषण कर. त्यांच्या मनांत शांतीला बाधक होणारें भय उत्पन्न होईल, असें कठोर वचन बोलूं नको. किंवा त्यांना युद्धानें भिववूं नको. हे मधुसूदना, हा दुर्योधन अतिशय मानी व असहिष्णु आहे. तो कल्याणाचा द्वेष करणारा आहे. त्याच्याशीं कठोर भाषण करूं नको. सामानेंच त्याचें मन वळीव. त्याचें अंतःकरण स्वभावतःच पापी आहे. त्याचा स्वभाव तस्करांसारखा क्रूर आहे. तो ऐश्वर्यमदानें मत्त झाला आहे. तो दुरात्मा पांडवांशीं सतत वैर करीत असतो.

तो धार्तराष्ट्र अदूरदर्शी, निष्ठुर, निंदक, क्रूर, पराक्रमी, दीर्घद्वेषी, उपदेश करण्यास अयोग्य, कपटप्रिय व पापी आहे. तो प्राण गेला तरी वांकणार नाहीं.

किंवा स्वमत सोडणार नाहीं. अशाप्रकारच्या दुराग्रही पुरुषाशीं शम करणें अतिशय दुष्कर आहे, असें मला वाटतें. तो सुहृदांशींहि विपरीत वर्तन करितो, त्या अधार्मिकाला अनृतच प्रिय आहे. तो मित्रांचे उपदेश व इच्छा यांचा तिरस्कार करीत असतो.

हे केशवा, क्रोधवश होऊन त्यानें दुष्टस्वभाव धारण केला आहे. तृणाखालीं लपून बसलेल्या सर्पाप्रमाणें तो स्वभावतःच हिंसा करील. किंबहुना दुर्योधनाचें सैन्य, शील, स्वभाव, बल व पराक्रम हें सर्व तुला ठाऊकच आहे. पूर्वीं कौरवांनीं पुत्रांसह मोठ्या सौख्यांत काल घालविला, त्याचप्रमाणें आम्हींहि बांधवांसह इंद्रप्रमुख देवांप्रमाणें ऐश्वर्य भोगलें.

परंतु आतां हे प्रभो, शिशिर-ऋतूच्या शेवटीं हुताशन जसा वनें जाळून त्याचें भस्म करितो, तसा दुर्योधन आपल्या क्रोधाग्नीनें सर्व भारतांना दग्ध करील !

हे वासुदेवा, धर्माचा अन्तकाल प्राप्त झाला असतां कलीचा प्रादुर्भाव होतो. तो झाला असतां आपल्या प्रज्वलित राजस तेजानें समृद्ध असलेल्या असुरांमध्यें दुर्मति पुरुष उत्पन्न होतात व ते आपली ज्ञाति, सगोत्र, बांधव, मित्र व श्वशुरादि आप्तजन यांचा नाश करितात. अशाच प्रकारचे हे प्रख्यात अठरा राजे आहेत. मी तुला त्यांचीं नांवें सांगतों, तीं ऐक.

१ हैहय कुलांतील मुदावर्त, २ नीपांतील जनमेजय, ३ तालजंघांचा बहुल, कृमींतील ४ उद्धत व ५ वसु, ६ सुवीरांतील अजबिंदु, ७ सुराष्ट्रांतील रुषर्द्धिक, ८ बलीहांतील अर्कज, ९ चीनांतील धौतमूलक, १० विदेहांतील हयग्रीव, ११ महौजसांतील वरयु, १२ सुंदरवंशांतील बाहु, १३ दीप्ताक्षांतील पुरूरवा, १४ चेदिमत्स्यांतील सहज, १५ प्रवीरांतील वृषध्वज, १६ चंद्रवत्सांतील धारण, १७ मुकुटांतील विगाहन, व १८ नंदिवेगांतील शम, हे ते कुलाला दूषित करणारे राजे होत.

हे कृष्णा, युगान्तसमयीं कुलामध्यें असे पुरुषाधम उत्पन्न होत असतात. त्याचप्रमाणें आतां युगान्त प्राप्त झाल्यामुळें आमच्या कुरुकुलांत हा दुष्टात्मा जन्म पावला आहे. दुर्योधन कुलांगार व पापी पुरुष आहे. तस्मात् तूं त्याच्याशीं हितकर व धर्मार्थयुक्त मृदु भाषण कर. आपला इष्टार्थ बाधित न होईल अशा रीतीनें, त्याला रुचेल असेंच वचन बोल.

हे कृष्णा, आम्ही सर्व दुर्योधनाचें स्वामित्व सहन करूं; त्याच्यापेक्षां हीन वृत्ति धारण करून त्याचें अनुयायी होऊं, त्याच्या अधिकारांतहि राहूं, पण भारतांचा नाश न होवो. आम्ही कौरवांशीं उदासीन वृत्ति स्वीकारूं. पण आम्हांला कुलक्षयाचा दोष न लागेल, असें तूं कर. हे अरिंदमा, 'आम्हां भ्रात्यांमध्यें प्रेम वाढावें व दुर्योधनाशीं शम व्हावा, असा प्रयत्न करा' असें वृद्ध भीष्म पितामहाला सांग. माझें हें सांगणें राजा युधिष्ठिराला मान्य आहे आणि अर्जुन अतिशय दयावान् असल्यामुळें त्यालाहि युद्धाची इच्छा नाहीं, असें त्या कुरुश्रेष्ठाला निवेदन कर. ५. ६. ७४.

---

## अध्याय ७५ वा.

[ १ भीमाचा क्रोध उद्दीपित करण्यासाठीं कृष्णानें केलेला त्याचा उपहास. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, गिरीचें लघुत्व किंवा अग्नीचें शीतलत्व, यांप्रमाणें आश्चर्यकारक असलेलें भीमाचें हें मार्दवयुक्त वचन ऐकून महाबाहु केशव विस्मित झाला व वायु जसा अग्नीला प्रज्वलित करितो, तसें कृपायुक्त झालेल्या भीमाला आपल्या वाणीनें उद्दीपित करीत असें बोलला—

**श्रीभगवान्**—हे भीमसेना, तूं सर्वदा युद्धाची प्रशंसा करीत असतोस, क्रूर धार्तराष्ट्रांचें मर्दन करण्याची इच्छा करितोस व त्यांच्या वधाचें सदा अभिनंदन करीत असतोस. हे परंतपा, तुला स्वस्थ झोंप येत नाहीं. तूं जागत असतोस व अधोमुख होऊन भूमीवर पडतोस. तूं सतत घोर व रोषयुक्त भाषण करीत असतोस. क्रोधानें अग्निवत् संतप्त होतोस व निश्वास सोडितोस. धूमयुक्त अग्नीप्रमाणें तूं मनांत सर्वदा धुमसत असतोस !

हे वृकोदरा, भारार्त दुर्बल माणसाप्रमाणें तूं निश्वास टाकीत एकांतांत पडून राहातोस, तुझी ही स्थिति ज्यांनीं पाहिली आहे, ते लोक तुला उन्मत्त समजतात. तूं गजाप्रमाणें वृक्षांना समूल उपटून टाकितोस. भूमीवर पाय आपटतोस व धांवत सुटतोस. हे पांडवा, तुझें मन जनसमूहांत रमत नाहीं. तूं एकांतांत जाऊन बसतोस. रात्रं-दिवस तुला कोणतीच गोष्ट अभिनंदनीय वाटत नाहीं. कांहीं कारणावांचून अकस्मात् हंसतोस व एकांतांत जणुकाय रडत असल्याप्रमाणें दोन गुडघ्यांत डोकें घालून दीर्घकाल स्वस्थ बसून राहातोस.

हे भीमा, तूं वारंवार भ्रुकुटि वक्र करून दांत-ओंठ खातोस, क्रोधानें भयंकर दिसतोस. पण रश्मिवान् सूर्य ज्याप्रमाणें पूर्व दिशेस आपलें तेज पसरीत उगवत असलेला दिसतो व कांहीं वेळानें अस्त पावून निश्चल असलेला तो मेरूला पुनः पुनः प्रदक्षिणा घालतो, त्याप्रमाणेंच आज तुझी मनोवृत्ति झाली आहे; हें मी तुला सत्य सांगत आहें.

हे कौंतेया, ' मी गदाप्रहारानें दुर्योधनाचा वध करीन ' अशी तूं भ्रात्यांच्या पुढें आपल्या गदेला स्पर्श करून प्रतिज्ञा केली आहेस. त्या तुझी बुद्धि आज शमाला कशी प्रवृत्त झाली ! हे भीमा, या तुझ्या भीतीवरून मला हेंच दिसतें कीं, युद्धाचा काल प्राप्त झाला असतां युद्धाची इच्छा करणारांचीं मनेंहि भीतीनें व्याकुल होतात व त्यांना शमाचें भाषणच अनुकूल वाटूं लागतें. हे पार्था, तूं स्वप्नांत व जागृतींत दुश्चिन्हें पहात आहेस, म्हणून तूं शमाची इच्छा करितोस. पण एखाद्या क्लीबाप्रमाणें तूं आपल्या ठिकाणीं थोड्याशा पराक्रमाचीहि आकांक्षा कशी धरीत नाहींस ! खरोखर हें मोठें आश्चर्य आहे !

बा भीमा, तुझें मन मोहानें व्याप्त झाल्यामुळेंच असें विकृत झालें आहे. तुझें हृदय कांपत आहे, मन खिन्न झालें आहे, पाय लटपटूं लागले आहेत, म्हणून तूं शमाची इच्छा करितोस. हे पार्था, वायुवेगानें अतिशय हालणाऱ्या शिवरीच्या बोंडाप्रमाणें मनुष्याचें चित्त, अनित्य व चंचल आहे. तुझी ही विकृत बुद्धि गायींना प्राप्त होणाऱ्या मानुषी वाणीप्रमाणें मोठी आश्चर्यकारक आहे. ही तुझी बुद्धि नौकारहित पुरुषाप्रमाणें पांडवांच्या अंतःकरणांना निरुत्साहरूप सागरांत बुडवीत आहे. हे पांडुपुत्रा, पर्वतानें जसें चलित व्हावें, तसेंच तुझें हें भाषण ऐकून मला महदाश्चर्य वाटत आहे. तुझें हें वचन अयुक्त आहे. हे वीरा, ऊठ, आपलें कर्म, कुल व जन्म यांकडे लक्ष दे, खिन्न होऊं नको, स्थिर हो. अशा प्रकारची ग्लानि तुला शोभत नाहींत. क्षत्रिय आपल्या पराक्रमानें जें संपादन करीत नाहींत, त्याचा ते उपभोग घेत नाहींत. ५.६.७५.

---

## अध्याय ७६ वा.

[ १ श्रीकृष्णाच्या उपहासवचनानें क्षुब्ध झालेल्या भीमाचें स्वपौरुषकथन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजेंद्रा, नित्य क्रोधी व असहिष्णु भीम वासुदेवाचें हें भाषण ऐकतांच एखाद्या जातिवंत अश्वाप्रमाणें उसळला व कृष्णाला असें वचन बोलला—

**भीमसेन**—हे अच्युता, माझा आशय वेगळाच असतांना तूं तो भलताच समजत आहेस. माझा युद्धांतील अभिनिवेश व सत्यपराक्रम यांस तूं जाणतोस. हे दाशार्हा, माझी सत्यप्रतिज्ञाहि तुला ठाऊक आहे. कारण तूं माझ्या सहवासांत दीर्घकाल राहिला आहेस, तथापि वरवर पोहणाराला जसा डोहाचा तळ दिसत नाहीं, तसा दीर्घकाल माझ्या सहवासांत असलेला तूंहि माझा आशय जाणत नाहींस, असें मला वाटतें; त्यामुळेंच तूं अशा अनुचित वाणीनें माझी निर्भर्त्सना करीत आहेस.

हे माधवा, तूं मला जें अननुरूप वचन बोलत आहेस, तसें मज भीमसेनाला जाणणारा दुसरा कोण बोलण्यास समर्थ आहे ! तस्मात् माझा पराक्रम व बल हीं दोन्ही शत्रूंच्या तुल्य नाहींत. हें दर्शविण्यासाठींच मी तुला जें सांगत आहें, तें ऐक—

मधुसूदना, वस्तुतः स्वतःची प्रशंसा करणें, हें अनार्य कर्म सर्वथा अयोग्य आहे. परंतु ज्याअर्थी तूं माझा असा उपहास करीत आहेस, त्याअर्थी माझें बल किती आहे, तें मी तुला सांगतों. या द्यावा-पृथ्वी अचल आहेत, अनंत आहेत, सर्व प्रजांचा आधार आहेत व त्या सर्व जगताच्या माता आहेत. त्या जरी क्रुद्ध होऊन दोन शिलेप्रमाणें मजवर धांवून आल्या, तरी मी त्यांनाहि चराचरांसह दोन बाहूंमध्यें धरून ठेवीन.

हे कृष्णा, माझ्या या दोन बाहूंचा परिघ पहा. यांत सांपडलेला कोणताहि पुरुष जिवंत सुटल्याचें मला माहित नाहीं. माझ्या पाशांत सांपडलेल्या शत्रूला सोडविण्यास हिमालय, महासागर किंवा बलवान् इंद्र हे तिघेहि आपलें बल एकवटून आले, तरी तेहि त्याचें रक्षण करूं शकणार नाहींत. पांडवांचे अपराध करणाऱ्या या सर्व युद्धोत्सुक क्षत्रियांना मी पायांखालीं तुडवीन, त्यांना भूमीवर लोळवून त्यांच्या अंगांवर उभा राहीन. हे अच्युता, तुला माझा पराक्रम ठाऊक नाहीं, असें नाहीं. सर्व नृपतींना जिंकून मीं वश करून घेतलें, हें तुला माहीत असून उदय पावणाऱ्या सूर्याच्या प्रभेप्रमाणें स्पष्ट असलेल्या मला तूं जर अजून जाणत नसशील तर हे जनार्दना, जेव्हां तुमुल युद्ध सुरू होईल, तेव्हां तुला माझा पराक्रम दिसून येईल.

पुवानें भरलेल्या व्रणाला जसें टोचावें, तसें या असह्य वचनानें तूं माझ्या अंतःकरणाला बोंचीत आहेस, म्हणून मीं हें तुला यथामति कथन केलें, परंतु

माझें बल याहूनहि अधिक आहे, असें तूं समज. घनघोर रणसंग्राम प्रवृत्त झाला म्हणजे तूं प्रति दिवशीं शत्रूंचा विनाश झालेला पहाशील. मीं हत्ती, रथी, अश्वसादी यांचें मर्दन करून श्रेष्ठ क्षत्रिय व क्रुद्ध योद्धे यांचा वध व प्रमुख वीरांचा संहार केलेला तुझ्या दृष्टीं पडेल. हे कृष्णा, माझीं गात्रें शिथिल झालेलीं नाहींत. माझ्या मनाला कंप सुटलेला नाहीं. सर्व लोक जरी क्रुद्ध झाले, तरी मला त्यांचें भय वाटत नाहीं. तर केवल स्नेहभावानें मला अनुकंपा वाटते व भारतांचा नाश होऊं नये म्हणून मी हे सर्व क्लेश सहन करीत आहें. ५.६.७६.

---

## अध्याय ७७ वा.

[ १ श्रीकृष्णानें भीमाला सांगितलेला दैव व पौरुष यांच्या बलाबलांचा विचार. ]

( १ ) **श्रीभगवान्**—हे भीमसेना, मी तुझा आशय जाणण्यासाठीं प्रेमानें तुला असें बोललों. तुला दोष देण्यासाठीं, माझें पांडित्य प्रकट करण्यासाठीं, किंवा क्रोधानें बोललों नाहीं. अथवा तूं स्वतःचा पुरुषार्थ कथन करावास, असाहि माझा हेतु नव्हता. कारण तुझा पराक्रम मीं पूर्वींच जाणला आहे. मला तुझा महिमा, बल व कर्म ठाऊक आहे. मी तुझा तिरस्कार करीत नाहीं. हे पांडवा, तूं स्वतःचें जितकें सामर्थ्य सांगत आहेस, त्यांहून सहस्रपटीनें तें अधिक आहे, हें मी सत्य मानितों. हे भीमा, सर्व राजांना पूज्य असलेल्या ज्या कुलांत तुझा जन्म झाला आहे, त्याला अनुरूप असाच तूं आहेस व तुझे सुहृद् व बांधवहि तसेच आहेत.

हे वृकोदरा, यावर तूं कदाचित् म्हणशील कीं, तर मग तूं माझी निंदा कां केलीस ? त्याचेंहि कारण सांगतों; ऐक—लोक देव आणि मानुष यांच्या संदिग्ध धर्मांचा निश्चय जाणण्याची इच्छा करीत असतात. ते ज्योतिष्यादिकांकडून भावि पुण्य-पापांच्या फलाचा निश्चय करण्याची इच्छा करितात, पण ते निश्चय करूं शकत नाहींत. कारण केव्हां केव्हां दैवज्ञांनीं वर्तविलेल्या भविष्याच्या विपरीत अनुभव येत असतो. त्याचप्रमाणें पुरुषप्रयत्नाचा परिणामहि प्रतिकूल होत असतो. तस्मात् पुरुषार्थांचा बलाबलनिर्णय निश्चित नाहीं. तसेंच शूराच्या ठिकाणींहि दुर्बलत्व दिसून येतें.

पुरुषाच्या अर्थसिद्धीला तोच धर्महेतु संदिग्ध फल देतो किंवा विनाश करितो. दोषदर्शी विद्वानांनीं कार्यांचा निश्चय एकाप्रकारें केलेला असतां

वायूच्या बदलणाऱ्या वेगाप्रमाणें त्याचें अन्यथा परिवर्तन होतें. मनुष्यानें विचारपूर्वक उत्तम प्रकारें व न्यायानें केलेलें कर्महि दैववशात् प्रतिकूल फल देतें. किंवा ज्या कर्मांचें दैवज्ञांनीं भविष्य वर्तविलें आहे, तें प्रारब्ध कर्म फलोन्मुख होण्यापूर्वींच पुरुषप्रयत्नानें प्रतिहत करतां येतें. शीतोष्ण, पर्जन्यवृष्टि किंवा क्षुत्पिपासा इत्यादि जरी कालस्वभावजन्य आहेत, तरी वस्त्र-प्रावरण, अन्नोदक इत्यादि उपायांनीं त्यांचें निवारण करतां येतें. पुरुषानें जें स्वतः केलेलें कर्म त्याचें फल प्रयत्नानें अनुकूल होऊं शकतें. परंतु पूर्वजन्मीं केलेलें जें संचित कर्म तें जरी भोगानेंच क्षीण होणारें आहे, तरी प्रायश्चित्तानें किंवा ज्ञानानें त्या संचित पापाचा नाश होतो, याविषयीं अनेक श्रुति-स्मृतिप्रमाणें आहेत. ज्या जन्मांत कर्म करावें, त्याच जन्मांत त्याचें फल मिळतें, असा कांहीं नियम नाहीं. तर एका जन्मांत केलेलें कर्म पुढल्या जन्मांत अनुवृत्त होतें. तस्मात् सर्वदा प्रयत्न करीत असावें.

हे पांडवा, या लोकीं पुरुषार्थावांचून केवल दैवावर अवलंबून रहाण्यानें जीविका चालत नाहीं. तस्मात् प्रयत्न करावा. दैव आणि प्रयत्न या दोहोंच्या संयोगानेंच फल मिळत असतें. या दोहोंवांचून फलनिष्पत्ति होत नाहीं. ज्याचा असा निश्चय झाला आहे, तो कर्मांतच प्रवृत्त होतो. कृषीवल निरलसपणें श्रम करून शेत पेरतो, दैवाच्या अनुकूल्यानें फल आलें तरी अति हर्ष मानीत नाहीं, किंवा प्रतिकूल दैवामुळें फल मिळालें नाहीं तरी खिन्न होत नाहीं. हाच न्याय व्यवहारांतहि योजावा.

हे भीमसेना, मी तुला हाच निश्चित सिद्धान्त सांगतों. शत्रूंशीं युद्ध करीत असतां केवल स्वपराक्रमाच्या बलावर अवलंबून राहूं नये. दैवाचीहि अनुकूलता असेल, तरच सिद्धि प्राप्त होईल. यास्तव मनुष्यानें कदापि निस्तेज होऊं नये किंवा विषादानें खिन्न होऊं नये. म्हणून मी तुला युद्धाची प्रेरणा करीत आहें.

पांडवा, उद्यां मी धृतराष्ट्राच्या समीप जाऊन तुमच्या हिताला बाध न आणतां शमाचा यत्न करीन. त्यांनीं जर शम केला तर त्यांत माझें यश होईल,

---

१ 'क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे'—परमात्म्याचा साक्षात्कार झाला असतां पुरुषाचीं सर्व संचित कर्में क्षीण होतात. ( मुं. भा. २–२–८ पृ. ६० ) अशा अर्थाचीं अनेक प्रमाण वचनें आहेत.

तुमचा मनोरथ पूर्ण होईल व त्यांचेंहि परम कल्याण होईल. पण त्यांनीं अभिनिवेशानें युद्धाचाच आग्रह धरिला व माझें म्हणणें मान्य केलें नाहीं, तर कौरवांचें युद्ध होऊन घोर कर्म प्रवृत्त होईल.

हे भीमसेना, या युद्धाचा भार तुजवर आहे. तूं रथस्थानीं असून अर्जुन अश्वस्थानीं आहे. तुम्हां दोघांना इतर जनांना वाहून न्यावयाचें आहे. ( म्ह० त्या सर्वांचा भार तुम्हां दोघांवर आहे. ) मी स्वतः युद्ध करण्याची इच्छा करीत नाहीं, असें नाहीं. परंतु मी सारथ्य करावें अशी अर्जुनाची इच्छा आहे. म्हणून मी युद्ध करणार नाहीं. तस्मात् हे वृकोदरा, मी तुझ्या आशयाविषयीं साशंक झालों व हताश होऊन दुर्बलासारखें भाषण करणाऱ्या तुझें तेज उद्दीपित करण्यासाठीं तुला हें वचन बोललों. ५. ६. ७७.

---

## अध्याय ७८ वा.

[ १ अर्जुनाची श्रीकृष्णाला पुढील कर्तव्याच्या निश्चयाविषयीं प्रार्थना. ]

( १ ) अर्जुन—हे जनार्दना, कौरवांना शमाविषयीं काय सांगावयाचें तें युधिष्ठिरानें तुला सांगितलेंच आहे. त्याविषयीं आम्हांला कांहीं सांगावयाचें राहिलें नाहीं. परंतु हे प्रभो, कौरवांशीं शम करणें तूं सुकर मानीत नाहींस, असें मला वाटतें. कारण धृतराष्ट्राच्या लोभामुळें व आम्हांला प्राप्त झालेल्या दैन्यामुळें शम संभवत नाहीं. अनुकूल दैवावांचून सर्वांच्या रक्षणाचा यत्न करणें निष्फल समजून तूं शमाचीच इच्छा करीत आहेस.

आतां ‘मला युद्धाची इच्छा नाहीं असें नाहीं’ हें जें तूं म्हटलेंस तें खरें नव्हे. तरीहि माझें सारथ्य करण्याविषयीं तुझें म्हणणें मला मान्य आहे. त्याप्रमाणेंच सर्व घडून येईल. परंतु तुला शम करणेंहि असाध्य नाहीं. हें युद्ध म्हणजे महत्संकट ओढवणार आहे, हें जाणत असूनहि आम्हां कौरव-पांडवांचा शम संभवनीय नाहीं, असें मानून तूं युद्धाची इच्छा करीत आहेस. शत्रूशीं शमादि तीन उपाय निष्फल झाल्यावर चवथ्या दंडाचा प्रयोग करावा अशी युद्धनीति आहे. कौरव सामानें वश होणारे नाहींत. त्यांना केवळ युद्धानेंच जिंकणें शक्य आहे. त्यांच्याशीं शम होणें दुष्कर आहे, हें सर्व जाणत असूनहि हे कृष्णा, तूं सामच करावा, असें म्हणत आहेस. पण चवथ्या उपायानेंच साध्य होणाऱ्या रिपूशीं साम

करणें हें अकार्य आहे, असें नीतिज्ञांनीं सांगून ठेविलें आहे. कौरव केवल दंडानेंच साध्य होणारे आहेत. त्यांच्या ठिकाणीं सामाचा प्रयत्न करणें निष्फल आहे. हें जाणत असूनहि हे प्रभो, तूं जर सामच करणार असशील तर त्याविषयीं माझें कांहीं बोलणें नाहीं. कारण तूं असाध्य कार्यहि घडवून आणण्यास समर्थ आहेस. सम्यक् संपादन केलेलें कार्य कदापि निष्फल होत नाहीं. तस्मात्, हे प्रभो, ज्यायोगानें आमचा शत्रूंशीं साम होईल असेंच वर्तन कर. प्रजापति जसा सुरासुरांचा सुहृद् आहे, तसा तूं पांडव व कौरव यांचा प्रथम सुहृद् आहेस. यास्तव कौरव-पांडवांचें कुशल संपादन कर. आमच्या हिताची गोष्ट तुला दुष्कर नाहीं. हे जनार्दना, असें केल्यानेंच तुझें कार्य यथोचित होईल. तूं कौरवांकडे जाऊन असेंच कार्य करशील, यांत संशय नाहीं.

हे वीरा, तो दुरात्मा दुर्योधन जरी शमाची इच्छा करीत नसला, तरी तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तूं त्यांच्याशीं शम कर किंवा तुझ्या इच्छेस वाटेल तसें कर. तुझा विचार व आशय हाच आमचा उपदेष्टा गुरु आहे. हे कृष्णा, पुत्रबांधवांसह तो दुर्मति दुर्योधन वधाला अपात्र नाहीं. त्या दुष्टानें धर्मपुत्र युधिष्ठिराची राजलक्ष्मी धर्मयुद्धानें जिंकून घेतलेली नाहीं. तर कपटद्यूताच्या नृशंस उपायानें तिचें हरण केलें आहे.

युद्धाचें किंवा द्यूताचें आह्वान केलें असतां क्षत्रिय कुलोत्पन्न धनुर्धर पुरुष त्यापासून कसा निवृत होईल ! प्राणत्यागाचा प्रसंग आला, तरीहि तो त्यापासून परत फिरणार नाहीं. हे वार्ष्णेया, ज्यावेळीं त्या दुरात्म्या दुर्योधनानें आम्हांला अधर्मानें जिंकून वनवासाला पाठविलें, त्याचवेळीं तो मला निश्चयानें वध्य झाला. हे कृष्णा, तूं आमचा सुहृद् आहेस. आम्हां मित्रांसाठीं तूं जें हें कार्य करीत आहेस त्यांत अद्भुत असें कांहींच नाहीं. तुझा हा प्रयत्न सामादि मृदु उपायांनीं सफल होवो, किंवा युद्धाच्या क्रूर साधनानें फलद्रूप होवो. अथवा त्यांचा वध करणेंच जर तूं प्रशस्त मानीत असशील तर तत्काल वध कर. त्या विषयीं यत्किंचित्हि विचार करूं नको.

हे माधवा, त्या पापबुद्धि धार्तराष्ट्रानें द्रौपदीला सभेमध्यें जे असह्य क्लेश दिले, ते तुला ठाऊक आहेत. परंतु आम्हीं त्यांचा तोहि अपराध सहन केला. यास्तव हे परंतपा, तो दुर्योधन आम्हां पांडवांशीं सरळ वागेल ही गोष्ट मला खडकावर पेरलेलें बीज उगवण्यासारखीच अशक्य वाटत आहे. यास्तव

हे प्रभो, पांडवांना जें हितावह होईल व तुला जें योग्य वाटेल, तेंच तूं कर आणि आमच्या पुढील कार्याचाहि सत्वर निश्चय कर. ५. ६. ७८.

---

## अध्याय ७९ वा.

[ १ श्रीकृष्णाचें अर्जुनाला उत्तर. ]

( १ ) **श्रीभगवान्**—हे पांडवा, तूं म्हणतोस तें खरें आहे. कौरव-पांडवांचें हित मी संपादन करीन. परंतु हे बीभत्सो, शम किंवा युद्ध हीं दोन्ही मी दूत असल्यामुळें जरी माझ्या अधीन आहेत, तरी मला दैवाच्या अनुकूलतेची अपेक्षा आहेच. कारण एखादें शेत चांगल्या प्रकारें नांगरून विहिरीच्या जलानें भिजविलें व त्या दोषरहित भूमींत बीज पेरलें, तर कदाचित् पर्जन्यवृष्टीवांचूनहि तें फलद्रूप होईल ! पण, यांत पुरुषप्रयत्नाचें श्रेष्ठत्व जरी दिसत असलें, तरी दैवाधीनत्वहि आहेच. प्रतिकूल दैवामुळें पर्जन्यच जर पडला नाहीं, तर विहिरींतील जल शुष्क होईल व जलाच्या अभावीं फलनिष्पत्ति होणार नाहीं. यावरून बीज पेरण्यापर्यंत पुरुषानें जरी दीर्घ यत्न केला, तरी दैवाच्या अनुकूलतेवांचून त्याला फल मिळत नाहीं, असा पूर्वींच्या महात्म्यांनीं निश्चय केला आहे. यास्तव दैव व प्रयत्न हीं दोन्हीं लोकहिताचीं संयुक्त साधनें आहेत.

तस्मात् हे अर्जुना, मी शक्य त्या प्रयत्नाची पराकाष्ठा करीन, परंतु प्राक्तन कर्मे बदलण्यास मात्र मी समर्थ नाहीं. तो दुर्मति दुर्योधन धर्म व लोक यांचा त्याग करून यथेष्ट आचरण करीत आहे आणि तशाप्रकारच्या कर्मानें त्याला यत्किंचित्हि संताप होत नाहीं. उलट शकुनि, कर्ण व भ्राता दुःशासन हे त्याचे मंत्री त्याची पापबुद्धि अधिकच वाढवीत असतात. यास्तव तो धार्तराष्ट्र राज्यदानानें कदापि शम करणार नाहीं. परिवारासह दुर्योधनाचा वधच केल्यावांचून राज्यप्राप्ति होणार नाहीं. युधिष्ठिर राज्यत्याग करून प्रणिपातानें केवल नम्र होऊन रहाण्यास तयार नाहीं व दुर्योधन राज्य परत देऊं इच्छित नाहीं. यास्तव 'आम्हांला पांच गांवें तरी द्या.' हा युधिष्ठिराचा निरोप त्याला कळविणें मला इष्ट वाटत नाहीं.

हे भारता, धर्मराजानें शमाचीं जीं कारणें सांगितलीं आहेत, तीं त्या पापी कौरवाला कदापि मान्य होणार नाहींत व तो शम करणार नाहीं. परंतु मी त्याला युधिष्ठिराचा निरोप एवढ्याच हेतूनें सांगणार आहें कीं, पांडवांचें

म्हणणें दुर्योधनानें अमान्य केलें असतां तो दुर्मति लोकदृष्टीनेंहि वध्य होईल. तो दुरात्मा मला तर वध्य आहेच, पण सर्व जगत्‌हि त्याला वधार्ह मानील.

हे पार्था, त्या निर्दय धार्तराष्ट्रानें बालपणापासूनच तुम्हांला क्लेश दिले असून तुमच्याशीं सर्वदा विपरीत आचरण केलें आहे. युधिष्ठिरानें स्वपराक्रमानें ऐश्वर्य संपादन केलें असतां त्या दुष्टाला तें सहन झालें नाहीं आणि त्यानें कपटानें तुमचें राज्य हरण केलें. तुमच्याविषयीं माझ्या मनांत भेद उत्पन्न करण्याचा त्यानें अनेकदा प्रयत्न केला. परंतु मीं त्याचा तो पापी हेतु मान्य केला नाहीं. हे परंतपा, दुर्योधनाचा आशय काय आहे, तो तुला ठाऊकच आहे, त्याचप्रमाणें तूं माझेंहि मत पूर्णपणें जाणतोस. असें असतां एखाद्या अज्ञ माणसाप्रमाणें मला शमाची इच्छा नाहीं, अशी शंका कशी घेतोस !

हे पांडवा, भूभार उतरण्यासाठीं देवांनीं भूतलावर अवतार घेतले आहेत, हें दिव्य विधानहि तुला अवगत आहे. अशा स्थितींत शत्रूंशीं शम कसा संभवतो ! हे पार्था, तुमच्या हितासाठीं मला वाणी व कर्म यांनीं जें करणें शक्य आहे, तें सर्व मी करीन. परंतु शत्रूबरोबर शम होईल, अशी मला आशा नाहीं.

गेल्या वर्षीं गोग्रहणाहून परत येत असतां मार्गामध्यें भीष्मानें दुर्योधनाला शम करण्याविषयीं परोपरीनें विनविलें व त्याची प्रार्थना केली. परंतु त्यानें ती ऐकली नाहीं. पार्था, ज्यावेळीं त्यांच्या वधाचा तूं मनांत संकल्प केलास, त्याच वेळीं ते कौरव पराभूत झाले आहेत. तो दुष्ट सुयोधन तुम्हांला एक क्षणभरहि राज्यांश देणार नाहीं. यास्तव मला सर्वथा धर्मराजाच्या आज्ञेप्रमाणेंच केलें पाहिजे व त्या दुरात्म्याच्या पापकर्माचा पुनः विचार केला पाहिजे. ५. ६. ७९.

---

## अध्याय ८० वा.

[ १ नकुलाचें श्रीकृष्णाला प्रसंगाला जें उचित असेल तेंच करण्याविषयीं कथन. ]

( १ ) **नकुल**—हे माधवा, धर्मज्ञ धर्मराजानें तुला अनेकप्रकारें जें सांगितलें तें तूं ऐकलेंच आहेस. त्याचप्रमाणें भीमसेनानें राजाच्या मताला संमति देऊन शमाची इच्छा प्रकट केली व स्वतःच्या पराक्रमाचें वर्णन केलें. फाल्गुनाचें म्हणणेंहि तूं ऐकलें आहेस आणि स्वतःचें मत अनेकदा व्यक्त केलें आहेस. तस्मात् या सर्वांचें अतिक्रमण करून शत्रूंचें मत ऐकून घे व या प्रसंगीं जें करणें श्रेयस्कर वाटेल, तेंच तूं कर.

हे केशवा, भिन्न भिन्न कारणांनीं मनुष्याचीं मतें परस्पर विरोधी होत असतात. आतांच पहा, कुलाचा नाश होऊं नये, म्हणून कुलाधार युधिष्ठिराला शम करणें इष्ट वाटत आहे. परंतु कौरवांनीं सभेंत केलेल्या केशाकर्षणाच्या स्मरणानें शत्रूचें निर्मूलन व्हावें, अशी द्रौपदीची उत्कट इच्छा आहे. यास्तव हे अरिंदमा, तुला यावेळीं जें कार्य उचित वाटेल, तेंच तूं घडवून आण. या लोकीं मनुष्य एक चिंतीत असतो व त्याच्या विपरीत घडत असतें. या लोकांतील पुरुषांच्या मति अस्थिर असतात.

आमचीच स्थिति पहा ! आम्ही जेव्हां वनवासांत व अज्ञातवासांत होतों, तेव्हां आमचे विचार वेगळे होते आणि आतां प्रकट झाल्यावर तेच विचार निराळे झाले. आम्हांला आतां जसा राज्य परत मिळविण्याचा अभिनिवेश वाटत आहे, तसा आम्ही वनांत फिरत असतांना वाटत नव्हता.

हे पुरुषोत्तमा, आम्ही वनवासांतून परत आल्याचें ऐकतांच तुझ्या प्रसादानें सात अक्षौहिणी सैन्य घेऊन हे सर्व भूपाल जमा झाले आहेत. अचिंत्य बल व पराक्रम यांनीं युक्त असलेल्या या शस्त्रधारी पुरुषश्रेष्ठांना पाहून कोणता पुरुष रणांगणांत व्यथित होणार नाहीं ! तथापि ज्याच्या परिणामीं भय आहे, असें सान्त्ववचन तूं कौरवसभेंत सांग, परंतु त्यायोगें मंदमति सुयोधनाचें मन व्यथित होऊं देऊं नको. तो प्रसन्न होईल अशाच रीतीनें त्याला तें सांग.

हे केशवा, रक्त-मांसांनीं युक्त असलेला कोणता मर्त्य, युधिष्ठिर, भीमसेन, अजिंक्य अर्जुन, सहदेव, मी, तूं, बलराम, सात्यकि, पुत्रांसह महापराक्रमी विराट, अमात्यासह द्रुपद, धृष्टकेतु व चेदिराज, इत्यादि शूरांच्या पुढें उभा राहून युद्ध करण्यास समर्थ आहे ! कौरवांकडे तुझ्या नुस्त्या गमनानेंच धर्मराजाचा इष्टार्थ साधेल, यांत संशय नाहीं. विदुर, भीष्म, द्रोण व बाल्हिक बुद्धिमान् आहेत, ते तुझ्या भाषणावरून आपलें श्रेय कशांत आहे हें जाणण्यास समर्थ आहेत. ते जनाधिप धृतराष्ट्र व अमात्यांसह पापाचरणी सुयोधन यांचें मन वळवितील. हे जनार्दना, तुझ्यासारखा वक्ता व विदुरासारखा श्रोता असल्यावर कोणतें नष्ट होणारें कार्य स्वस्थानीं स्थित होणार नाहीं ! म्हणजे कोणतें असाध्य कार्य सिद्ध होणार नाहीं ! ५. ६. ८०.

---

## अध्याय ८१ वा.

[ १ कौरवांशीं युद्ध घडवून आणण्याविषयीं सहदेवानें केलेली कृष्णाची प्रार्थना. २ सर्वांचें त्याला अनुमोदन. ]

( १ ) **सहदेव**—हे अरिंदमा, धर्मराजानें तुला जें कांहीं सांगितलें, तो सनातन धर्मच आहे. यास्तव ज्यायोगें युद्धच होईल असें घडवून आण. हे दाशार्हा, पांडवांशीं शम करण्याची जरी इच्छा असली, तरीहि तूं त्यांच्याशीं युद्धच होईल, अशी योजना कर. हे कृष्णा, पांचालीला तशा प्रकारें सभेंत आणलेली पाहून मला आलेला क्रोध दुर्योधनाच्या वधावांचून कसा शांत होईल ! धमनिष्ठ धर्मराज व भीमार्जुन यांना जर धार्मिक व्हावयाचें असलें तर त्यांना खुशाल होऊं दे. मला त्यांचा तो धर्म नको. मी त्या धर्माचा त्याग करून युद्धाचीच इच्छा करीत आहें.

**सात्यकि**—हे महाबाहो, हा बुद्धिमान् सहदेव सत्य सांगत आहे. दुर्योधनाच्या वधावांचून त्याचा व माझाहि क्रोध शांत होणार नाहीं. पुरुषोत्तमा, वल्कलें धारण करून वनांत दुःख भोगणाऱ्या पांडवांना पाहून तुझाहि क्रोध प्रज्वलित झाला होता, याची तुला आठवण नाहीं काय ! तस्मात् हा रणधुरंधर शूर माद्रीनंदन जें बोलला तें त्याचें वचन या सर्व योद्ध्यांना संमत आहे.

( २ ) **वैशंपायन**—राजा, महा बुद्धिमान् सात्यकीचें हें वचन ऐकून सर्व योद्ध्यांनीं सर्व बाजूंनीं प्रचंड सिंहनाद केला. युद्धाची इच्छा करणाऱ्या त्या सर्व हृष्ट वीरांनीं त्याच्या वचनाचा गौरव केला व 'धन्य धन्य' अशा उद्गारांनीं सात्यकीचा बहुमान केला. ५. ६. ८१.

---

## अध्याय ८२ वा.

[ १ 'दुर्योधनाला दंड केल्यावांचून माझें हृदय शांत होणार नाहीं' अशी द्रौपदीची श्रीकृष्णाला प्रार्थना. २ तुझा मनोरथ पूर्ण होईल असें भगवानांचें आश्वासन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, युधिष्ठिराचें धर्मार्थयुक्त हितवचन ऐकून दुःखानें कृश झालेली पांचाली पांडवांच्या समीप बसलेल्या कृष्णाला असें वचन बोलली. त्या द्रुपदराजकन्येचा दीर्घ केशकलाप मस्तकापासून पायांपर्यंत रुळत

होता. त्या मानी पतिव्रतेनें सहदेव व सात्यकि यांचा सत्कार केला व शांत चित्तानें स्वस्थ बसलेल्या भीमसेनाकडे पाहून ती साध्वी अतिशय व्यथित झाली आणि अश्रुपूर्ण नेत्रांनीं त्याच्याकडे पहात म्हणाली—

हे मधुसूदना, अमात्यांसह त्या धृतराष्ट्राच्या पुत्रानें कपटाचा आश्रय करून पांडुपुत्रांना सुखापासून कसें च्युत केलें, तें तुला ठाऊकच आहे. धृतराष्ट्रानें एकान्तांत संजयाशीं काय संकेत केला व युधिष्ठिरानें संजयाला कोणता निरोप सांगितला, तेंहि सर्व तुला माहित आहेच. 'अविस्थलादि पांच गांवें आम्हांला द्या' असा युधिष्ठिरानें संजयाला जो निरोप सांगितला, तोहि तूं ऐकला आहेस. राजानें दुर्योधन व त्याचे सुहृद् यांना शमाच्या आशेनें जरी असा निरोप पाठविला असला, तरी तो दुर्बुद्धि धृतराष्ट्र-पुत्र तसें करणार नाहीं. यास्तव हे कृष्णा, तो दुर्योधन आमचें राज्य परत दिल्यावांचून जर संधि करण्याची इच्छा करीत असेल, तर तेथें जाऊन तूं ही गोष्ट कदापि मान्य करूं नको. प्रतिपक्षांत स्थित असलेल्या घोर व क्रुद्ध कौरव-सेनेला शिक्षा करण्यास सृंजयांसह पांडव समर्थ आहेत. ते धार्तराष्ट्र सामानें किंवा दानानें अनुकूल होणें शक्य नाहीं. तस्मात् तूं त्यांच्यावर दया करूं नको. जे शत्रु सामानें किंवा दानानें शांत होत नाहींत, त्यांच्यावर स्वतःच्या जीविताचें रक्षण करणारानें दंडाचाच प्रयोग करावा. यास्तव सृंजयांसह पांडव व तूं सत्वर त्यांच्यावर यमदंडाचीच योजना कर. शत्रूशीं असें आचरण करणेंच पार्थांना युक्त, तुला यशस्कर व सर्व क्षत्रियांना सुखकर होईल.

हे महाबाहो दाशार्हा, स्वधर्माचें अनुष्ठान करणाऱ्या क्षत्रियानें लोभाचा आश्रय केलेला क्षत्रिय असो किंवा अक्षत्रिय असो, त्याचा अवश्य वध करावा. ब्राह्मणाचा मात्र वध करूं नये. ब्राह्मण सर्व प्रकारच्या पापाचरणांत जरी निमग्न झालेला असला तरी तो वधार्ह नाहीं. तो सर्व वर्णांत श्रेष्ठ असल्यामुळें पूज्य आहे. हे जनार्दना, [1]अवध्याच्या वधानें जो दोष लागतो, तोच वध्य-माणसाचा वध न केल्यानेंहि लागतो, असें धर्मवेत्ते म्हणतात. तस्मात् हे कृष्णा, ज्याच्या योगानें तुला हा दोष लागणार नाहीं, तसेंच तूं ससैनिक सृंजय, दाशार्हसिंह व पांडव यांच्या साह्यानें घडवून आण.

---

१ यथाऽवध्ये वध्यमाने भवेद्दोषो जनार्दन ।
स वध्यस्यावधे दृष्ट इति धर्मविदो विदुः ॥

हे जनार्दना, मी विश्वासानें तुझ्याजवळ ही पुनरुक्ति करीत आहें. या समग्र पृथ्वीतलावर माझ्यासारखी अद्वितीय स्त्री दुसरी कोणी आहे काय ! हे कृष्णा, मी यज्ञवेदींतून उत्पन्न झालेली द्रुपदाची अलौकिक कन्या, धृष्टद्युम्नाची भगिनी व तुझी प्रिय सखी आहें. मी महात्म्या पांडुनृपतीची स्नुषा होऊन या आजमीढकुलाला प्राप्त झालें आहें. इंद्रतुल्य असलेल्या पांच पांडुपुत्रांची सम्राज्ञी असून त्या पांच वीरांपासून मला पांच महारथ पुत्र झाले आहेत. हे केशवा, माझे हे पुत्र अभिमन्यूसारखेच तुझे धर्मतः भागिनेय आहेत.

हे गोविंदा, अशा प्रकारच्या श्रेष्ठ वीरांची कन्या, भगिनी, स्नुषा, भार्या व माता असलेल्या मीं, पांडवांच्या समक्ष आणि तूं जिवंत असतांना कौरवांच्या सभेंत क्लेश भोगिले. त्या दुरात्म्यानें मला केंस धरून ओढलें. हे पांडुपुत्र, पांचाल व वृष्णिवीर जिवंत असतांना मी दासीभावाला प्राप्त होऊन त्या पापात्म्यांच्या सभेंत उभी राहिलें. त्या प्रसंगीं हे पांडव क्रोधशून्य होऊन निश्चल बसलेले पाहून 'हे गोविंदा, माझें रक्षण कर' असें मी मनानें तुझें चिंतन केलें. त्या वेळीं माझा श्वशुर राजा धृतराष्ट्र म्हणाला—"हे पांचालि, वर माग, तूं वर देण्यास योग्य आहेस, असें मी समजतों."

तेव्हां मीं 'रथ व आयुधें यांसह पांडव दासभावापासून मुक्त होवोत' असा वर मागितला असतां त्यानें तो मान्य करून पांडवांना वनवासाला पाठविलें. अशा प्रकारचीं आमचीं दुःखें तूं जाणतोस. यास्तव हे पुण्डरीकाक्षा, ज्ञातिबांधव व पति यांसह तूं माझें संरक्षण कर. हे कृष्णा, वास्तविक पहातां मी भीष्म व धृतराष्ट्र या दोघांची धर्मतः स्नुषा आहें, परंतु अशा मला दुष्ट कौरवांनीं बलात्कारानें दासी केलें.

हे कृष्णा, ज्यानें आमचे असे अक्षम्य अपराध केले आहेत, तो दुर्योधन ज्याअर्थी अद्यापि जिवंत राहिला आहे, त्याअर्थी अर्जुनाच्या धनुर्धरत्वाला व भीमसेनाच्या सामर्थ्याला धिक्कार असो. हे गोपाला, मी जर तुझ्या अनुग्रहाला पात्र असेन, तुझी जर माझ्यावर कृपा असेल तर आपला सर्व क्रोध धार्तराष्ट्रावर प्रवृत्त करून त्यांचा नाश कर."

वैशंपायन—राजा, इतकें बोलून ती गजगामिनी साध्वी अश्रुपूर्ण नेत्रांनीं आपला विपुल, रम्य, सुगंधयुक्त व सर्वलक्षणसंपन्न केशकलाप डाव्या हातानें धरून श्रीकृष्णाच्या समीप आली. तिच्या नीलवर्ण केंसांची रचना महाभुजंगा-

सारखी शोभत होती. ती कमलनयना पुंडरीक्षाला आपला केशकलाप दाखवीत पुनः म्हणाली—" हे मधुसूदना, हा माझा केशपाश दुःशासनानें हातीं धरून ओढला, या गोष्टीचें तुला स्मरण असूं दे. सर्व कार्यांत शत्रूंशीं संधि करतेवेळीं तूं माझे हे क्लेश विसरूं नको.

हे मधुसूदना, हे भीमार्जुन दीन होऊन जर संधीची इच्छा करीत असतील तर त्यांना खुशाल कृपायुक्त होऊं दे. माझा वृद्ध पिता आपल्या महारथ पुत्रांसह शत्रूशीं युद्ध करील. त्याचप्रमाणें अभिमन्यूला पुढें करून माझे महा पराक्रमी पांच पुत्र कौरवांशीं युद्ध करतील. जोंपर्यंत दुःशासनाचा तो श्यामवर्ण भुज छिन्न-भिन्न होऊन धुळीनें माखलेला माझ्या दृष्टीं पडला नाहीं, तोंवर माझ्या हृदयाला शांति कोठची !

शत्रूला भयंकर वाटणाऱ्या हे कृष्णा, प्रदीप्त अग्नीप्रमाणें अंतःकरणांत संताप बाळगून मी तेरा वर्षें योग्य प्रसंगाची वाट पहात आहें, धार्तराष्ट्रांच्या वाक्शल्यानें पीडित झालेलें माझें हृदय अद्यापि विदीर्ण होत आहे आणि यावेळीं या महाबाहु भीमसेनाला मोठा धर्म आठवला आहे ! "

असें बोलून ती कमलपत्राक्षी कृष्णा सद्गदित कंठानें रोदन करूं लागली. तिच्या अंगाला कंप सुटला. जणुकाय हृदय द्रवीभूत झाल्याप्रमाणेंच तिच्या नेत्रांतून अश्रूंच्या उष्ण धारा वाहूं लागल्या व त्यांनीं तिचें उन्नत वक्षःस्थल भिजून गेलें.

( २ ) तेव्हां महाबाहु केशव तिचें सान्त्वन करीत तिला म्हणाला—" हे कृष्णे, त्या भारतांच्या स्त्रिया रडत असलेल्या लवकरच तुला दिसतील. हे भामिनि, ज्यांच्यावर तूं इतकी क्रुद्ध झाली आहेस, ते कौरव ज्ञातिबांधवांसह वध पावले असतां हतमित्र व हतबल झालेल्या त्यांच्या स्त्रिया अशाच प्रकारें अश्रु ढाळतील. हे भीरु, तूं अशी हताश होऊं नको. युधिष्ठिराच्या आज्ञेनें मी भीमार्जुन व नकुल-सहदेव यांच्या हातून विधिनियमानुसार दैववशात् कौरवांचा संहार करवीन.

धृतराष्ट्रपुत्रांचा काल समीप आला आहे. त्यांनीं जर माझें शमाचें बोलणें अमान्य केलें, तर ते मृत होऊन भूमीवर निजतील व त्यांचे देह श्वान आणि शृगाल यांच्या भक्ष्यस्थानीं पडतील. कदाचित् हिमालयपर्वत चलित होईल, पृथ्वी शतधा विदीर्ण होईल, नक्षत्रांसह सर्व आकाश खालीं पडेल, परंतु माझें

हें वचन कदापि व्यर्थ होणार नाहीं. हे कृष्णे, मी तुला हें सत्यप्रतिज्ञेनें सांगत आहें. यास्तव तूं आपले अश्रु आवरून धर. शत्रूंचा वध करून तुझे पति ऐश्वर्यानें युक्त झाले आहेत, असें लवकरच तुझ्या दृष्टीं पडेल. ५. ६. ८२.

---

## अध्याय ८३ वा.

[ १ अर्जुनाचा निरोप व कृष्णाचें प्रस्थान. कुंतीला आश्वासन देण्याविषयीं युधिष्ठिराची कृष्णाला प्रार्थना. २ मार्गामध्यें ऋषींचें दर्शन. ३ भगवद्वचन ऐकण्यासाठीं त्यांचें कौरवसभेंत गमन. ]

( १ ) **अर्जुन**—हे केशवा, आज सर्व कुरूंचा तूंच श्रेष्ठ सुहृद् आहेस. तूं आम्हां उभय पक्षांचा आप्तसंबंधी असून सर्वदा आम्हांला प्रिय आहेस. पांडव व धृतराष्ट्राचे पुत्र यांचें कुशल संपादून शम करण्यासहि तूं समर्थ आहेस. हे पुंडरीकाक्षा, तूं आतां आमच्या त्या असहिष्णु दुर्योधन भ्रात्याकडे जा व शमार्थ जेवढें उचित असेल तेवढें त्याला सांग. तूं कल्याणकारक व धर्मार्थयुक्त शुभ भाषण करीत असतांहि तें हितवचन जर त्या मूर्खाला रुचलें नाहीं, तर तो दैवाधीन होऊन भवितव्यतेप्रमाणें फल भोगील.

**भगवान्**—हे पार्था, कुरूंचें कुशल व आपलें हित ज्यांत आहे, असें धर्मयुक्त कार्य साधण्यासाठीं मी राजा धृतराष्ट्राकडे हा निघालोंच आहें.

**वैशंपायन**—त्यानंतर रात्र संपून निर्मल आकाशांत सूर्य उगवला. दिवाकराचीं मृदु किरणें सर्वत्र पसरलीं. तो कार्तिक मास होता. शरदृतु प्रायः संपून शीतकालाला आरंभ झाला होता. तृणधान्याची समृद्धि होऊन सर्व लोक सुखांत होते. त्या दिवशीं रेवती नक्षत्र असून शुभ मैत्रमुहूर्त होता.

अशा शुभ वेळीं ऋषींचे मंत्रघोष श्रवण करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्या सात्वतश्रेष्ठ वीरानें ब्राह्मणांचे सत्य व मंगलकारक पुण्यनिर्घोष ऐकत प्रातःस्नान केलें. आपलें आह्निक कर्म उरकलें. शुचिर्भूत होऊन वस्त्रालंकार धारण केले. सूर्य व अग्नि यांची उपासना केली. वृषभाच्या पृष्ठभागाला स्पर्श करून ब्राह्मणांना वंदन केलें. शुभ वस्तूंचें दर्शन घेत अग्नीला प्रदक्षिणा केली. नंतर युधिष्ठिराचें वचन स्मरून समीप बसलेल्या सात्यकीला म्हटलें—

"हे शैनेया, माझा रथ सज्ज करून त्यांत शंख, चक्र, गदा, भाते, शक्ति व इतर आयुधें ठेव. दुर्योधन दुष्टात्मा आहे व कर्ण आणि शकुनि त्याचेच

अनुयायी आहेत. त्यांचा विश्वास नाहीं, आपण कितीहि बलाढ्य असलों, तरी दुर्बल शत्रूंचीहि उपेक्षा करूं नये, अशी नीति आहे.''

याप्रमाणें चक्रगदाधर केशवाची आज्ञा होतांच त्याचे सेवक रथ सज्ज करण्यासाठीं निघून गेले. त्याचा तो रथ कालाग्नीसारखा प्रदीप्त व सूर्यासारखा सत्वर गमन करणारा होता. तो सूर्य व चंद्र यांच्यासारख्या दोन तेजस्वी चक्रांनीं अलंकृत केला होता. तो अर्धचंद्र, पूर्णचंद्र, मत्स्य, मृग व पक्षी यांच्या आकृति व विविध पुष्पें, मणि व रत्नें यांच्या योगानें चित्र-विचित्र दिसत होता. उदय पावलेल्या आदित्याप्रमाणें आरक्त वर्ण दिसणारा तो विशाल रथ सुंदर दिसत होता. त्यावर रत्नजडित सुवर्णाचें उत्कृष्ट काम केलेलें होतें. त्यावर उत्तम ध्वज व पताका उभारल्या होत्या. तो श्रेष्ठ रथ सुंदर उपकरणांनीं युक्त होता. व्याघ्रचर्मानें मढविलेल्या त्या देदीप्यमान रथाकडे नुस्ता दृष्टिक्षेप करण्यासहि कोणी समर्थ होत नसे. तो यदुनंदनाचा रथ शत्रूंचें यश हरण करणारा व यादवांचा हर्ष वाढविणारा होता.

दारुकानें शैब्य, सुग्रीव, मेघपुष्प व बलाहक या चार अश्वांना स्नान घालून व सर्व प्रकारच्या अलंकारांनीं भूषित करून रथास जोडिलें. त्यामुळें भगवानाचा महिमा अधिकच वाढला. शेवटीं त्यानें मेघाप्रमाणें गर्जना करणाऱ्या त्या रथावर गरुडध्वज स्थापिला असतां मेरूच्या शिखराप्रमाणें शोभणाऱ्या व मेघ किंवा दुन्दुभि यांप्रमाणें ध्वनि करणाऱ्या त्या रथावर शौरि कामगामी विमानाप्रमाणें आरूढ झाला. त्या पुरुषोत्तमानें सात्यकीलाहि आपल्या समीप बसावयास सांगितलें आणि तो शैनेय रथारूढ होतांच भगवान् आपल्या रथघोषानें पृथ्वी व अंतरिक्ष यांस निनादित करीत हस्तिनापुराकडे जावयास निघाला.

तत्क्षणीं सर्व आकाश निरभ्र झालें. सुखकर वायु वाहूं लागला. धूलि शांत झाली. भगवान् वासुदेव सात्यकीसह रथांत बसून जाऊं लागला असतां पशु व पक्षीहि त्याला प्रदक्षिणा घालून आपलें आनुकूल्य व मांगल्य सुचवूं लागले. सर्व लोकांच्या तोंडून 'विजयी भव' असे उद्गार निघाले. सारस, शतपत्र, हंस इत्यादि जलचर पक्षी मधुसूदनाला उद्देशून मधुर ध्वनि करूं लागले.

---

१ न च शत्रुरवज्ञेयो दुर्बलोऽपि बलीयसा ।

मंत्रयुक्त आहुत्या देऊन ज्याचें हवन केलें आहे, असा अग्नि धूमरहित होऊन प्रज्वलित झाला व त्याच्या ज्वाला उजवीकडे जाऊं लागल्या. वसिष्ठ, वामदेव, भूरिद्युम्न, गय, क्रथ, शुक्र, नारद, वाल्मीकि, मरुत्, कुशिक, भृगु, इत्यादि देवर्षि व ब्रह्मर्षि यांनीं एकत्र जमून यादवांना सुख देणाऱ्या कृष्णाला प्रदक्षिणा घातली. याप्रमाणें महर्षि व सज्जन यांनीं सत्कार केला असतां श्रीकृष्ण कौरवांच्या सदनाकडे जावयास निघाला.

तो वासवानुज निघाला असतां कुंतीपुत्र युधिष्ठिर त्यांच्या मागोमाग चालला. तेव्हां भीमार्जुन, दोघे माद्रीपुत्र, चेकितान, चेदिपति धृष्टकेतु, द्रुपद, काशिराज, शिखंडी, धृष्टद्युम्न, पुत्रांसह विराट व केकयराजे इत्यादि सर्व भूपाल व क्षत्रियश्रेष्ठ कार्यनिष्पत्तीसाठीं त्याला अनुसरले. श्रीकृष्ण कामानें, भयानें, लोभानें किंवा अन्य अर्थप्राप्तीसाठीं कदापि अन्याय करणारा नाहीं. त्याची बुद्धि स्थिर असून तो अनासक्त होता. तो धर्मज्ञ ईश्वर सर्व भूतांचा नियामक व ज्ञानी होता. श्रीवत्स धारण करणारा तो सनातन देवाधिदेव सर्वगुणसंपन्न होता. युधिष्ठिरानें त्याच्या समीप जाऊन सर्व नृपतींच्या समक्ष त्याला आलिंगन दिलें व असा निरोप सांगितला—

युधिष्ठिर—हे जनार्दना, जिनें बालपणापासून आमचें संगोपन करून आम्हांला वाढविलें, ती आमची माता आमच्या स्वास्थ्यासाठीं उपवास व तप यांत सर्वदा निरत असते. ती अबला पुत्रवत्सल आहे. तिला आम्ही अतिशय प्रिय आहों. ती देवता, अतिथिपूजन व गुरुशुश्रूषा यांतच आपला सर्व काल घालवीत असते. दुर्योधनानें आम्हांला प्राणसंकटांत घातलें असतां समुद्रांतून तारणाऱ्या नौकेप्रमाणें त्या आमच्या जननीनें आम्हांला मृत्युमुखांतून वांचविलें. हे माधवा, ती वस्तुतः दुःखाला पात्र नसूनहि आमच्याच कृतीमुळें तिला हें महद्दुःख अनुभवावें लागल. यास्तव तूं त्या आमच्या मातेला प्रथम कुशल विचार.

हे कृष्णा, पुत्रशोकांत मग्न झालेल्या त्या आमच्या जननीला आम्हां पांडवांच्या वतीनें नमस्कार कर. तिला आलिंगन देऊन पुनः पुनः आश्वासन दे. हे अरिंदमा, ती आमची प्रेमल जननी विवाह होऊन पतिगृहीं आल्यापासून सारखीं दुःखें भोगीत आहे. निर्भर्त्सनेला योग्य नसतांहि ती तिरस्काराचे क्लेश भोगीत आहे.

हे केशवा, माझ्या क्लेश भोगणाऱ्या मातेचें हें सर्व दुःख नाहींसें करून मी तिला सुख देईन, अशी वेळ कधीं तरी येईल का! आम्ही वनवासाला निघालों असतां ती पुत्रवत्सला दीन होऊन आमच्या मागें धांवत आली. त्यावेळीं आम्ही त्या शोकार्त माउलीला रडत टाकून, तिची उपेक्षा करून वनांत निघून गेलों. हे आनर्तदेशांत पूज्य असलेल्या गोविंदा, ती पुत्रांवर अतिशय स्नेह करणारी आमची दुःखमग्न माता या शोकभारानें मरण तर पावली नसेल ना! ती आमची जननी सुदैवानें जर जिवंत असली तर हे केशवा, तिला माझ्या वतीनें अभिवादन कर.

त्याचप्रमाणें हे प्रभो, कुरुपति धृतराष्ट्र, वयोवृद्ध राजे, भीष्म, द्रोण, कृप, बाल्हिक, द्रौणि, सोमदत्त, सर्व भारत व कौरवांचा मंत्री महाप्राज्ञ धर्मज्ञ विदुर या सर्वांस दृढ आलिंगन दे.

सर्व राजाच्या समक्ष श्रीकृष्णाला असें बोलून युधिष्ठिरानें त्याची अनुज्ञा घेतली व त्याला प्रदक्षिणा घालून तो परत फिरला. परंतु अर्जुन आपला सखा जो पुरुषश्रेष्ठ दाशार्ह, त्याच्या बरोबर पुढें चालला व त्याला म्हणाला—"हे अपराजित विभो, आमचें अर्धें राज्य मिळालें तरच संधि करावा, असा आम्हीं सर्वानुमतें जो निश्चय केला आहे, तो या सर्व नृपालांना विदित आहेच. दुर्योधन आमचा अवमान न करतां राज्यासक्ति सोडून सत्कारानें आमचें राज्य जर परत देईल, तरच माझें प्रिय होईल व कौरव मृत्युरूप महाभयापासून मुक्त होतील.

परंतु अपाय करण्यांत प्रवीण असलेला धार्तराष्ट्र जर याच्या विपरीत वागेल, तर मी सर्व क्षत्रियांचा अंत करीन, हें मी तुला सत्य सांगतों.

**वैशंपायन**—राजा, धनंजयाचें हें भाषण ऐकून वृकोदर अतिशय हृष्ट झाला. तो क्रोधावेशानें वारंवार थरथरां कांपूं लागला, अंगाला कंप सुटला असतां धनंजयाच्या भाषणानें त्याला वीरश्रीचें स्फुरण चढलें व आनंदातिशयानें तो उच्च स्वरानें सिंहनाद करूं लागला. त्याची ती गर्जना ऐकून योद्धयांचा थरकांप झाला. अश्वादि पशूंचीं गात्रें भीतीनें शिथिल होऊन ते जागच्या जागीं देहधर्म करूं लागले.

याप्रमाणें केशवाला आपला निश्चय सांगून पार्थानें त्याला आलिंगन देऊन त्याचा निरोप घेतला व तो परत फिरला असतां हृष्ट झालेला जनार्दन त्वरेनें

पुनः आपल्या श्रेष्ठ वाहनांत बसला. त्याच्या रथाला शैब्य व सुग्रीव हे दोन जातिवंत अश्व जोडिले होते. वासुदेवाच्या त्या अश्वांना दारुकानें प्रेरणा करतांच ते वायुवेगानें निघाले. ते वेगवान् अश्व इतक्या शीघ्रगतीनें चालले होते कीं, ते मार्गाला जणुं काय प्राशनच करीत आहेत, किंवा आकाशाला ग्रासीतच आहेत, असा भास होत होता.

( २ ) इतक्यांत महाबाहु केशवानें मार्गामध्यें कांहीं ब्रह्मर्षींना पाहिलें; ब्राह्म तेजानें युक्त असलेले ऋषि मार्गांत दोन्ही बाजूला उभे असलेले त्याला दिसले. त्यांना पाहतांच जनार्दन रथांतून सत्वर खालीं उतरला व यथाविधि वंदन करून त्यांस म्हणाला—" हे भगवन्, सर्व लोकांत कुशल आहेना! सर्व धर्मकार्यांचें योग्य प्रकारें अनुष्ठान होत आहेना! त्रैवर्णिक ब्राह्मणांच्या आज्ञेंत वागत आहेत ना?"

राजा, याप्रमाणें कुशल प्रश्नानें त्यांचा सत्कार करून त्या मधुसूदनानें त्यांस पुनः म्हटलें—" आज या मार्गानें महर्षि कोठें निघाले? कोणत्या हेतूनें आपलें भूतलावर आगमन झालें! आपलें येथें कोणतें कार्य आहे! मीं आपलें कोणतें कार्य करावें, त्याची आज्ञा व्हावी."

(३) तेव्हां सुरासुरपतींचा सखा जामदग्न्य-मुनि मधुसूदनाच्या समीप येऊन त्याला आलिंगन देऊन म्हणाला—" हे दाशार्हा, पुण्यशील देवर्षि, बहुश्रुत ब्राह्मण, राजर्षि व तपस्वी या सर्वांना तूं मान्य आहेस. पूर्वींच्या देवासुरांचे कलह तूं पाहिले आहेस व आतां देवतुल्य भीष्म-विदुरादि व आसुरी वृत्तीचे दुर्योधनादि यांना भेटावयास चालला आहेस. कौरवसभेंत एकत्र जमलेले भूपति, क्षत्रिय, सर्व सभासद व तूं—सत्यस्वरूप जनार्दन, यांचा अतिशय प्रेक्षणीय समागम पहावा व हे माधवा, कौरवांच्या सभेमध्यें सर्व राजांसमक्ष तूं जें धर्मार्थयुक्त भाषण करशील तें श्रवण करावें, या इच्छेनें आम्ही तेथेंच निघालों आहों. हे गोविंदा, भीष्म-द्रोणादि वीर, महामति विदुर व तूं—यादवश्रेष्ठ सभेंत एकत्र जमून जीं दिव्य भाषणें कराल, तीं हितावह सत्य वचनें ऐकण्याची आमची इच्छा आहे. यास्तव हे गोविंदा, आम्ही आतां तुझा निरोप घेतों. आम्ही तुला पुनः भेटूं. हे वीरा, तूं निर्विघ्नपणें जा. बल व तेज यांनीं युक्त असलेल्या तुला आम्ही कौरवसभेंत दिव्यासनावर बसलेलें पाहूं. ५. ६. ८३.

## अध्याय ८४ वा.

[ १ हस्तिनापुरास जात असलेल्या कृष्णाला मार्गांत झालेले शुभाशुभ शकुन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, देवकीपुत्र निघाला असतां शत्रूंच्या वीरांचा नाश करण्यास समर्थ असलेले दहा महारथ शस्त्रांनीं सज्ज होऊन त्याला अनुसरले. त्यांशिवाय त्याच्याबरोबर एक सहस्र पदाति व अश्वारोही, शेकडों सेवक आणि विपुल अन्नसामग्री होती.

**जनमेजय**—भगवन्, तो महात्मा दाशार्ह कसा गेला व मार्गांत त्याला कोणते शकुन झाले, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**वैशंपायन**—हे राजन्, तो महात्मा जात असतां मार्गामध्यें त्याला कोणते शुभ शकुन झाले, तें सांगतों; ऐक. आकाश निरभ्र असूनहि मेघांची गर्जना होऊं लागली, विजा चमकूं लागल्या व मेघावांचूनच जोराची पर्जन्यवृष्टि झाली. सिंधूसह पूर्वाभिगामी असलेल्या सप्त नद्या पश्चिमाभिमुख वाहूं लागल्या. दश दिशा विपरीत होऊन ओळखूं येईनाशा झाल्या. सर्वत्र प्रज्वलित अग्नीच्या शिखा पसरल्या. भूकंप झाले. जलानें भरलेल्या कुंभांतील जल भूमीवर सांडूं लागलें. सर्व दिशा व विदिशा धूलीनें आच्छादित झाल्यामुळें कळेनाशा झाल्या व सर्व जगत् अंधकारानें आवृत झालें. आकाशांत भूतांवांचून महाशब्द उठला. सर्व देशांत तो एक अद्भुत प्रकारच घडला. नैर्ऋत्येकडील वायूनें हस्तिनापुराला जणुकाय उडवूनच दिलें. असंख्य वृक्ष मोडून पडले. विजेच्या भयंकर गर्जना झाल्या.

पण हे भारता, अशा प्रकारचीं दुःचिन्हें जरी होत होतीं, तरी भगवान् ज्या ज्या मार्गानें जात होता त्या त्या प्रदेशांत शुभ शकुन होऊं लागले. वायु सुखकर वाहूं लागले व सर्व अनुकूल घडलें. पुष्पांची व कमलांची विपुल वृष्टि झाली. त्याचे मार्ग सम, निष्कंटक व क्लेशरहित झाले. सहस्रावधि ब्राह्मणांनीं वसुप्रद वासुदेवाचीं स्तोत्रें गात त्याचें स्तवन केलें व धन आणि मधुपर्क यांनीं त्याचा सत्कार केला. स्त्रियांनीं मार्गांत एकत्र जमून सर्व भूतांच्या हितांत रत असलेल्या गोविंदावर सुगंधयुक्त वन्य पुष्पांची वृष्टि केली.

हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें तो भगवान् अनेक पशु, रम्य नगरें व आल्हादकारक ग्राम पहात आणि विविध राष्ट्रांचें आक्रमण करीत शालिभवनाला प्राप्त झाला. तें क्षेत्र सर्व प्रकारच्या धान्यांनीं समृद्ध असून तेथील लोक परम

धार्मिक व सुखी होते. त्या विष्वक्सेन भगवानाला पहाण्याच्या इच्छेनें उपप्लव्य नगरांतील प्रजाजन मार्गावर वाट पहात बसले होते. ते सर्व नागरिक नित्य संतुष्ट व प्रसन्नचित्त होते. भारतांकडून सुसंरक्षित असल्यामुळें त्यांना परचक्राच्या संकटाचें भय वाटत नव्हतें व त्यामुळें ते उद्वेगरहित होते. त्या सर्वांनीं त्यांच्या देशांत अतिथिरूपानें आलेल्या श्रीकृष्णाचा सत्कार केला. त्यावेळीं तो प्रभु प्रदीप्त अग्नीप्रमाणें तेजस्वी दिसत होता.

परवीरहा केशव वृकस्थल-ग्रामांत जाऊन पोंचतो, तोंच अस्त पावणाऱ्या आदित्याचे किरण सर्वत्र पसरल्यामुळें आकाश रक्तवर्ण दिसूं लागलें. तें पहातांच तो भगवान् रथांतून सत्वर खालीं उतरला व दारुकाला रथ सोडवावयास सांगून यथाविधि शुचिर्भूत होऊन सायं-संध्यावंदनादि कर्म करावयास बसला. तेव्हां दारुकानें अश्वांना रथापासून वेगळें केलें. त्यांचीं सर्व बंधनें सोडून त्यांना मोकळें केलें व अश्वशास्त्रविधीनें त्यांची परिचर्या केली.

त्यानंतर मधुसूदन त्यास म्हणाला—" आपण धर्मराजाच्या कार्यासाठीं आजची रात्र येथेंच काढूं या. "

तेव्हां प्रभूचा हा आशय कळतांच त्याच्याबरोबर असलेल्या लोकांनीं एका क्षणांत अन्न-पानादिकांची उत्तम व्यवस्था केली. त्या ग्रामांत जे कुलीन, प्रतिष्ठित व धर्मनिष्ठ प्रमुख ब्राह्मण होते, ते सर्व महात्म्या हृषीकेशाच्या दर्शनासाठीं प्राप्त झाले. त्यांनीं भगवंताचें यथान्याय पूजन करून त्याला मंगल आशीर्वाद दिले. सर्व लोकांत पूज्य असलेल्या दाशार्हाचा सत्कार करून त्या महात्म्याला आपलीं रत्नयुक्त गृहें निवेदन केलीं. तेव्हां प्रभूनें त्यांचा स्वीकार करून त्यांचा यथान्याय आदर केला. त्या सर्वांच्या घरीं जाऊन त्यांच्यासह केशव पुनः आपल्या निवासस्थलीं आला व त्या सर्व ब्राह्मणांना उत्तम मिष्टान्नाचें भोजन देऊन व आपण स्वतः भोजन करून त्यानें सर्वांसह ती रात्र सुखानें घालविली. ५. ६. ८४.

---

## अध्याय ८५ वा.

[ १ श्रीकृष्णाच्या स्वागतार्थ दुर्योधनानें मार्गांत निर्माण केलेलीं समृद्ध निवासालयें. २. श्रीकृष्णाचें हस्तिनापुरीं गमन. ]

( १ ) **वैशंपायन—**राजा, मधुसूदन कौरवांकडे येण्यास निघाल्याची वार्ता दूतमुखानें ऐकून धृतराष्ट्र रोमांचित झाला. त्यानें भीष्म, द्रोण व महा-

प्राज्ञ विदुर, यांस सत्कारपूर्वक बोलावून आणिलें व एकत्र जमलेल्या त्यांच्या समक्ष अमात्यांसह दुर्योधनाला म्हटलें—" हे कुरुनंदना, एक अद्भुत आश्चर्य माझ्या कानीं आलें आहे. महापराक्रमी दाशार्हश्रेष्ठ पांडवांच्या कार्यासाठीं आपल्याकडे येणार आहे. ही गोष्ट घरोघर स्त्रिया व आबालवृद्ध यांच्या तोंडीं झाली आहे. कित्येक ही वार्ता आदरानें दुसऱ्याला सांगत आहेत, तर कांहीं लोक सभांमधून व चवाठ्यावर जमून हीच चर्चा करीत आहेत. तो माधव आम्हांला मान्य व पूज्य आहे. तो सर्व भूतांचा प्रभु असल्यामुळें लोकांचें जीवनच आहे. धृति, वीर्य, प्रज्ञा व तेज यांनीं युक्त असलेला तो नरश्रेष्ठच साक्षात् सनातन धर्म आहे. त्या महात्म्याचा सन्मान करा. त्या विभूचा आदर केला असतां कल्याण होतें व अनादर केला असतां अहित होतें.

हे परंतपा, तो अरिंदम दाशार्ह आमच्या आदरातिथ्यानें जर संतुष्ट झाला तर सर्व राजामध्यें आमचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. यास्तव हे दुर्योधना, तूं त्या प्रभूच्या सन्मानाच्या योजनेस आजपासूनच लाग. मार्गामध्यें जागोजाग समृद्ध सभा निर्माण कर. त्याला सर्व इष्ट वस्तु मिळतील अशी व्यवस्था ठेव. तात्पर्य, ज्यायोगानें त्याला तुझ्याविषयीं प्रेमभाव वाटूं लागेल, अशीच योजना कर."

दुर्योधनाला असें सांगून धृतराष्ट्र म्हणाला—" काय, भीष्माला हें संमत आहे ना ! "

तेव्हां भीष्मादि सर्वांनीं ' हा विचार आम्हांला अतिशय मान्य आहे ' असें म्हणून जनाधिप धृतराष्ट्राच्या वचनाचा आदर केला. नंतर त्यांची अनुमति आहे, असें जाणून दुर्योधनानें जनार्दनाच्या मार्गांतील रमणीय प्रदेशांत रम्य सभागृहें निर्माण करण्यास आरंभ केला. हस्तिनापुरांतील शिल्प्यांनीं दुर्योधनाच्या आज्ञेनें भिन्न भिन्न स्थानीं अनेक रत्नजडित सभा निर्माण करविल्या. राजानें त्यांत विविध प्रकारचीं विचित्र आसनें, सुंदर स्त्रिया, सूक्ष्म वस्त्रें, अलंकार, सुगंधी द्रव्यें, विविध भोज्य पदार्थ, मिष्टान्नादिकांनीं युक्त असलेलें अन्नपान आणि सुगंधी पुष्पमाला इत्यादिकांची समृद्धि करविली. दुर्योधनानें वृकस्थल ग्रामामध्यें मधुसूदनाच्या निवासार्थ विशेष प्रकारची सभा निर्माण करविली होती. ती अनेक प्रकारच्या रत्नांनीं मनोरम दिसत होती. याप्रमाणें सर्व व्यवस्था करवून दुर्योधनानें राजा धृतराष्ट्राला तें वृत्त निवेदन केलें.

( २ ) परंतु दाशार्ह कृष्ण त्या सर्व विविध रत्नयुक्त सभांकडे दुर्लक्ष करून मोठ्या त्वरेनें हस्तिनापुरास येऊन पोंचला. ५. ६. ८५.

---

## अध्याय ८६ वा.

[ १ श्रीकृष्णाला अर्पण करावयाच्या वस्तूंचें धृतराष्ट्रानें विदुराला केलेलें कथन. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे क्षत्त्या, जनार्दन उपप्लव्य नगरींतून येथें यावयास निघाला आहे. तो आज वृकस्थलांत राहून उद्यां सकाळीं येथें येऊन पोंचेल. तो उदार महावीर्यवान् बलाढ्य माधव आहुकांचा अधिपति व सर्व सात्त्वतांचा पुरस्कर्ता आहे. विस्तृत वृष्णिराष्ट्राचा तो भर्ता व गोप्ता असून त्रैलोक्याचा प्रपितामह आहे. आदित्य-वसु-रुद्रादि देव ज्याप्रमाणें बृहस्पतीच्या मतानुसार वागतात, त्याप्रमाणें बुद्धिमान् वृष्णि-अंधकादि प्रसन्न मनानें या दाशार्हाच्या आज्ञेंत रहातात. हे धर्मज्ञा, त्या महात्म्याचा मी तुझ्या समक्ष विशेष प्रकारें सत्कार कसा करणार आहें, तें सांगतों ऐक.

बाल्हिक देशांतील जातिवंत, एकवर्णाचे, अलंकृत केलेले चार अश्व ज्याला जोडिले आहेत, असे सोळा सुवर्णरथ आणि ज्यांच्या गंडस्थलांतून मद गळत आहे, ज्यांचे नांगरासारखे स्थूल व दीर्घ दांत आहेत व ज्यांतील एकेका गजाला आठ अनुचर आहेत, असे आठ हत्ती मी त्या माधवाला देईन. त्याचप्रमाणें सुवर्णालंकारांनीं भूषित झालेल्या यौवनसंपन्न कल्याणकारक शंभर दासी व तितकेच दास त्या मधुसूदनाला मी अर्पण करीन. माझ्या जवळ पर्वतवासी लोकांनीं आणलेलीं उत्तम मऊ व ऊबदार लोकरीचीं वस्त्रें असंख्य आहेत. त्यांतील दहा हजार आठ वस्त्रें मी त्याला देईन. तशींच चीन देशांतील सहस्रावधि अजिनें माझ्या संग्रहीं आहेत. त्यांतील कृष्णाला जेवढीं पाहिजे असतील तेवढीं त्याला देईन. शिवाय हा माझा रात्रंदिवस प्रकाशणारा देदीप्यमान मणि मी त्याला अर्पण करीन. कारण केशवच त्याला सर्वथा पात्र आहे. एका दिवसांत चौदा योजनें जाणाऱ्या अतिशय वेगवान् घोड्या ज्याला जोडल्या आहेत, असा माझा जो एकच रथ आहे, तोहि मी त्या हृषीकेशाला अर्पण करीन.

केशवाच्या बरोबर जेवढीं वाहनें व मनुष्यें असतील, त्यांच्या आठपटीनें मी त्यांस तृण-धान्यादि व भोज्य पदार्थ देईन. दुर्योधनावांचून माझे सर्व पुत्र व पौत्र उत्तम अलंकारांनीं भूषित होऊन शुद्ध सुवर्ण रथांतून त्या दाशार्हाला

सामोरे जातील. त्याप्रमाणें सहस्रावधि सुंदर वारयोषिता वस्त्रालंकारांनीं भूषित होऊन त्या महाभागाला पहाण्याच्या इच्छेनें पायांनींच तेथें जातील. शिवाय नगरांतील ज्या कन्या केशवाच्या दर्शनाविषयीं उत्सुक आहेत, त्याहि अवगुंठनावांचूनच त्याला सामोऱ्या जातील.

हे विदुरा, सर्व प्रजा उदय पावणाऱ्या आदित्याकडे जशी पहाते, तस आबालवृद्ध स्त्री-पुरुषांसह सर्व नगर महात्म्या मधुसूदनाला पाहो. त्या प्रभूच्या स्वागतार्थ दाही दिशांत महाध्वज व पताका उभारा. त्याच्या येण्याचे मार्ग सुगंधयुक्त जलसिंचनानें धूलीरहित करा. दुर्योधनाच्या सदनापेक्षां दुःशासनाचें भुवन अधिक श्रेष्ठ आहे. त रंग, सफेती लावून स्वच्छ व उत्तम वस्तूंनीं सुशोभित करा. कारण तेंच मंदिर अनेक सुंदर प्रासादांनीं युक्त असल्यामुळें अतिशय शोभिवंत आहे. यास्तव त्या गृहामध्यें माझ्या व दुयाधनाच्या गृहांतील सर्व पवित्र, रमणीय व सर्व ऋतूंमध्यें उपयुक्त असलेल्या वस्तु आणि रत्नें नेऊन ठेवा. सारांश वार्ष्णेयाला जें जें इष्ट व उचित असेल, तें तें सर्व त्याला निःशंकपणें द्या. ५. ६. ८६.

---

## अध्याय ८७ वा.

[ १ कृष्णाचा पांडवांपासून भेद करतां येणें शक्य नाहीं, अशी विदुराची स्पष्टोक्ति. ]

( १ ) विदुर— हे भारता, तू त्रैलोक्यांत श्रेष्ठ व मान्य राजा असून सर्व लोकांना संमत आणि पूज्य आहेस. हे राजन्, तुझ्या या वृद्धावस्थेमध्यें तूं अशाप्रकारचें शास्त्र व तर्क यांनीं युक्त असलेलें जें वचन बोलत आहेस, तें योग्यच आहे. यावरून तुझें सर्वांगीण वृद्धत्व सिद्ध होतें. हे प्रभो, शशीच्या जशा कला, सूर्याची जशी प्रभा किंवा सागराच्या जशा महाऊर्मि त्यांच्या ठिकाणीं नित्य असतात, तसा धर्म तुझ्या ठिकाणीं स्थित आहे, अशी तुझ्याविषयीं लोकांत प्रसिद्धि आहे. तुझ्या गुणौघानें सर्व लोक संतुष्ट होतात. यास्तव सद्गुणाच्या रक्षणासाठीं बांधवांसह यत्न कर. सरलपणानें वाग. मूर्खपणानें सर्वस्वाचा नाश करून घेऊं नको.

हे राजन्, अतिथिरूपानें येणाऱ्या कृष्णाला तूं आपले प्रिय पुत्र, पौत्र, सुहृद् इत्यादि जें कांहीं अर्पण करणार आहेस, त्या सर्वांस किंबहुना समग्र

पृथ्वीलाहि तो दाशार्ह पात्र आहे. परंतु हे नृपते, तूं धर्मबुद्धीनें किंवा कृष्णाचें प्रिय करण्यासाठीं कांहीं त्याला या अमूल्य देणग्या देत नाहींस, तुझें हें सर्व कपट आहे. ही फसवणूक आहे हेंच खरें व मी हें प्रतिज्ञेवर सांगतों. तुझ्या बाह्य वर्तनावरूनच मीं तुझें अंतःकरण जाणलें आहे.

हे राजन्, पांच पांडव केवल पांच गांवें मागत आहेत, परंतु तींहि तूं त्यांना देत नाहींस किंवा शमहि करीत नाहींस. परंतु विपुल वित्त देऊन तूं वार्ष्णेयाला आपल्या पक्षांत घेण्याची इच्छा करीत आहेस. या उपायानें त्याचा पांडवांपासून भेद करण्याचा तुझा आशय आहे; पण हे राजा, तो मधुसूदन वित्तानें, पांडवांच्या निंदेनें किंवा अन्य कोणत्याहि उपायानें मद्रराज शल्याप्रमाणें धनंजयापासून पृथक् करतां येणें शक्य नाहीं, हें मी तुला सत्य सांगतों.

मी श्रीकृष्णाचें माहात्म्य जाणतों व अर्जुनाची त्याच्यावरील दृढभक्तिहि मला माहित आहे. तो प्राणाप्रमाणें प्रिय असलेल्या धनंजयाचा त्याग कदापि करणार नाहीं. तो जनार्दन पादप्रक्षालन, कुंभभर जल व कुशल प्रश्न, यांशिवाय तूं अर्पण केलेल्या कोणत्याहि वस्तूचा स्वीकार करणार नाहीं. यास्तव तुला जर त्या पूज्य केशवाचें आतिथ्य करावयाचें असेल, तर त्याला प्रिय असलेली गोष्ट कर. तो श्रीकृष्ण मानार्ह आहे, यांत संशय नाहीं. कुरूंचें कल्याण व्हावें या हेतूनें तो हृषीकेश तुम्हांकडे येत आहे. पांडवांचें हित व्हावें अशी त्याची इच्छा आहे. तस्मात् त्याचें वचन मान्य करणें, हेंच त्याचें खरें आतिथ्य आहे. तुम्हां कौरव-पांडवांचा शम व्हावा हाच त्या दाशार्हाचा हेतु आहे. त्याचें तें म्हणणें तूं मान्य कर. हे प्रभो, तूं पांडवांना पितृतुल्य आहेस व ते तुला पुत्रांसमान आहेत. तूं वृद्ध आहेस, ते शिशु आहेत. ते तुझ्याशीं पुत्रवत् आचरण करीत आहेत. यास्तव हे राजेंद्रा, तूंहि त्यांच्याशीं पित्याप्रमाणें वाग. ५. ६. ८७.

---

## अध्याय ८८ वा.

[ १ कृष्ण जरी पूजार्ह आहे, तरी त्याचा सत्कार करण्याची ही वेळ नव्हे, असें दुर्योधनाचें वचन. २. कृष्णाची अवज्ञा न करतां पांडवांशीं शम करण्याविषयीं भीष्माचा उपदेश. ३ कृष्णाला बद्ध करण्याचा दुर्योधनाचा विचार. ४ क्रुद्ध भीष्मानें केलेला त्याचा निषेध.]

( १ ) दुर्योधन—विदुरानें कृष्णाविषयीं जें म्हटलें तें सर्व सत्य आहे. तो जनार्दन पार्थावर अतिशय अनुरक्त आहे. यास्तव त्याचा भेद करतां येणें

शक्य नाहीं. हे राजेंद्रा, तूं जें अनेक प्रकारचें अमूल्य द्रव्य माधवाला देणार आहेस, तें त्याला देऊं नको. कारण केशवाचा अशा प्रकारचा सत्कार करण्याचा हा काल नव्हे. हा देशहि उचित नाहीं. कारण त्यामुळें तो केशव ‘ हा राजा भयानें माझा सत्कार करीत आहे ’ असें समजेल! हे राजन्, कृष्णानें तूं अर्पण केलेल्या वस्तूंचा जर स्वीकार केला नाहीं, तर आपला अवमान होईल आणि ज्यामुळें क्षत्रियांचा अवमान होईल, असें कार्य बुद्धिमानानें कदापि करूं नये, असें माझें निश्चित मत आहे.

तो कृष्ण त्रैलोक्यांत सर्व लोकांना पूज्य आहे, हें मला व सर्वांना माहित आहे. परंतु हे प्रभो, त्याच्या आतिथ्यासाठीं त्याला कोणतीहि देणगी देऊं नये, असें माझें मत आहे. कारण आतां युद्ध उपस्थित झालें आहे, यावेळीं आतिथ्य करणें योग्य नव्हे. नुसत्या आतिथ्यानें युद्धाचा प्रसंग टळणार नाहीं.

( २ ) वैशंपायन—राजा, दुर्योधनाचें हें वचन ऐकून कुरुपितामह भीष्म धृतराष्ट्राला असें वचन बोलला—“ हे वैचित्रवीर्या, जनार्दनाचा तूं सत्कार केलास किंवा न केलास, तरी तो त्यासाठीं कदापि तुष्ट किंवा क्रुद्ध होणार नाहीं. तथापि तूं त्याची अवज्ञा करूं नको. कारण केशव अवज्ञेय नाहीं. आपण मनानें जें कर्तव्य ठरविलें असेल व जें कर्तव्यत्वानें प्राप्त झालें असेल, तें कोणालाहि कोणत्याहि उपायानें टाळतां येत नाहीं. यास्तव तो महाबाहु तुला जें कार्य सांगेल तें तूं निःशंकपणें कर आणि वासुदेवाच्या द्वारा तूं पांडवांशीं शम कर. तो जनार्दन धर्म व अर्थ यांनीं युक्त असेंच भाषण करणारा आहे. यास्तव तूं बांधवांसह त्याच्याशीं प्रिय भाषण कर.

( ३ ) दुर्योधन—हे राजन्, पांडवांना दासभावाला प्राप्त करून मला समग्र पृथ्वीचें ऐश्वर्य दीर्घ काल भोगतां येईल, असा अन्य उपाय दिसत नाहीं. यास्तव मीं एक फार मोठें कार्य करण्याचा निश्चय केला आहे. पांडवांचा मुख्य आधार जो जनार्दन त्यालाच मी आतां येथें बांधून ठेवितों. त्या दाशार्हाला बद्ध केलें असतां समग्र पृथ्वी, सर्व वृष्णि व पांडव माझ्या अधीन होतील. तो वासुदेव उद्यां प्रातःकालीं येथें येईल. पण हा आमचा संकेत ज्याप्रकारें जनार्दनाला कळणार नाहीं व आपल्याला अपाय होणार नाहीं, असेच उपाय आपल्याला योजिले पाहिजेत. यास्तव, हे पितामह, त्याला बद्ध कसें करावें तें सांग.

वैशंपायन—राजा, पुत्राचें कृष्णाविषयीं हें घोर भाषण ऐकून अमात्यासह धृतराष्ट्र व्यथित व खिन्न झाला. तो दुर्योधनाला असें वचन बोलला—हे प्रजापाला, असें बोलूं नको. हा सनातन धर्म नाहीं. हृषीकेश आपल्याकडे दूतभावानें येत आहे व दूताला कोणत्याहि प्रकारें अपाय करूं नये, असें शास्त्रवचन आहे. शिवाय तो आमचा आप्तसंबंधी असून आम्हांला प्रिय आहे. त्यानें कौरवांचा कोणताहि अपराध केलेला नाहीं, असें असतां तो बंधाला कसा पात्र होईल !

( ४ ) भीष्म—हे धृतराष्ट्रा, तुझ्या या मंदमति पुत्राचें मरणच ओढवलें आहे, असें समज. त्याची बुद्धि विपरीत झाली आहे. सुहृज्जन परोपरीनें याचना करीत असतांहि तो अनर्थाची इच्छा करीत आहे, अर्थाची इच्छा करीत नाहीं आणि तूंहि सुहृदांच्या वचनांचा अनादर करून उन्मार्गानें गमन करणाऱ्या या पापनिश्चयी पाप्यालाच अनुसरतोस ! पण हा श्रीकृष्ण अक्लिष्ट कर्में करणारा आहे, त्याला अपाय करणारा हा तुझा दुर्मति पुत्र अमात्यांसह एका क्षणांत नाश पावेल. हा दुर्योधन पापी व निर्दय आहे. त्या दुरात्म्यानें सद्धर्माचा त्याग केला आहे. त्याचें हें अनर्थयुक्त वचन ऐकण्यास मी समर्थ नाहीं.

असें बोलून तो अतिशय क्रुद्ध झालेला सत्यपराक्रमी वृद्ध कुरुपितामह सभेंतून उठून निघून गेला. ५. ६. ८८.

---

## अध्याय ८९ वा.

[ १ श्रीकृष्णाचा हस्तिनापुरांत प्रवेश. २ धृतराष्ट्रादिकांची भेट ३ विदुरगृहीं निवास. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, इकडे श्रीकृष्णानें दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं उठून आपलें सर्व आह्निक उरकलें, ब्राह्मणांची अनुज्ञा घेतली व तो नगरांत यावयास निघाला. तेव्हां वृकस्थलांतील सर्व पौरजन त्या बलाढ्य महाबाहूला निरोप देऊन परत फिरले. हृषीकेश हस्तिनापुराच्या समीप येतांच अलंकारांनीं भूषित झालेले दुर्योधनावांचून सर्व धार्तराष्ट्र व भीष्म-द्रोण-कृपादिक सर्व श्रेष्ठ वीर त्याला सामोरे गेले. असंख्य पौरजन विविध वाहनांतून, तर कित्येक पायांनींच केशवाला पहाण्याच्या इच्छेनें निघाले. तेव्हां अक्लिष्टकर्में करणारा भीष्म, द्रोण व धृतराष्ट्रपुत्र यांना मार्गांतच भेटून श्रीकृष्णानें त्यांच्यासह नगरांत प्रवेश केला.

हे राजन्, कृष्णाच्या स्वागतासाठीं तें सर्व नगर सुशोभित केलें होतें, सर्व राजमार्ग सुंदर वस्तूंनीं भूषविले होते. नगरांतील सर्व आबालवृद्ध स्त्री-पुरुष वासुदेवाला पहाण्याच्या इच्छेनें बाहेर गेल्यामुळें कोणत्याहि गृहांत एकहि मनुष्य दिसत नव्हतें. हे महाराज, हृषीकेशानें नगरांत प्रवेश करतांच राजमार्गावर अनेक पुरुषांनीं त्या प्रभूच्या चरणांवर मस्तक ठेवून त्याला साष्टांग प्रणिपात केला व त्याची स्तुति आरंभिली. त्यावेळीं हस्तिनापुरांतील मोठमोठीं गृहेंहि श्रेष्ठ स्त्रियांनीं व्यापून गेलीं. त्यांच्या भारानें भूतलावरील तीं गृहें जणुकाय हलत आहेत, असा भास झाला. त्यावेळीं जनसमूहानें मार्ग इतका व्याप्त झाला होता कीं, वासुदेवाच्या वेगवान् अश्वांचीहि गति कुंठित झाली.

(२) याप्रमाणें त्या शत्रुकर्शन पुंडरीकाक्षानें धृतराष्ट्राच्या राजमंदिरांत प्रवेश केला. तें भव्य राजभुवन शुभ्र असून अनेक प्रासादांनीं सुशोभित दिसत होतें. केशव त्या प्रासादाच्या तीन कक्षांचें उल्लंघन करून राजगृहांत गेला व राजा धृतराष्ट्रापाशीं येऊन पोंचला. दाशार्ह समीप येत आहे, हें पहातांच भीष्म-द्रोणादिकांसह प्रज्ञाचक्षु धृतराष्ट्र उठून उभा राहिला. कृप, सोमदत्त, महाराज बाल्हिक इत्यादि सर्वांनीं आपापल्या आसनांवरून उठून जनार्दनाचा सत्कार केला.

नंतर वार्ष्णेयानें भीष्मासह धृतराष्ट्राला कुशल प्रश्न विचारून त्याचा सन्मान केला. त्या वृद्धांची धर्मक्रमाला अनुसरून पूजा केल्यावर माधव सर्व राजांना वयःक्रमानें भेटला. नंतर द्रोणादिकांची भेट घेऊन धृतराष्ट्राच्या आज्ञेनें तो तेथें तयार ठेवलेल्या उज्ज्वल व श्रेष्ठ सुवर्णाच्या आसनावर बसला. तेव्हां राजा धृतराष्ट्राच्या पुरोहितांनीं गायी, मधुपर्क व उदक यांनीं जनार्दनाचें यथाविधि पूजन केलें. याप्रमाणें ज्याचें आतिथ्य केलें आहे, असा गोविंद सर्व कौरवांबरोबर थट्टाविनोद करीत व सर्व बांधवांविषयीं कुशल प्रश्न विचारीत त्या सर्वांना भेटला.

(३) नंतर राजाची अनुज्ञा घेऊन व सर्व कौरवांना भेटून तो अरिंदम कौरवसभेंतून निघाला व विदुराच्या रम्य गृहापाशीं आला. तेव्हां विदुरानें सर्व शुभ पदार्थांनीं वार्ष्णेयाचें पूजन केलें व त्याला प्रिय असलेल्या वस्तूंनीं त्याचा सत्कार करून म्हटलें—"हे पुष्कराक्षा, तुझ्या दर्शनानें मला जो आनंद झाला आहे तो काय सांगावा ! त्याचें वर्णन करतां येणें शक्य नाहीं. तूं सर्वांचा अंतरात्मा आहेस, तेव्हां तूं तो जाणतोसच."

असें बोलून विदुरानें मधुसूदनाचें आतिथ्य करून त्याला पांडवांचें कुशल विचारिलें. तेव्हां दाशार्हानें त्या धर्मार्थनिष्ठ, क्रोधशून्य व बुद्धिमान् विदुराला पांडवांकडील प्रत्यक्ष पाहिलेला सर्व वृत्तान्त सविस्तर निवेदन केला. ५. ६. ८९.

---

## अध्याय ९० वा.

[ १ श्रीकृष्णाला पाहून कुंतीचा पुत्राच्या स्मरणानें विलाप. २ कृष्णानें केलेलें तिचें सान्त्वन. ]

( १ ) **वैशंपायन**—याप्रमाणें विदुराच्या घरीं जाऊन जनार्दन अपराह्ण-कालीं आपली पितृभगिनी जी कुंती तिच्यापाशीं आला. तेव्हां प्रसन्न व सूर्या-सारख्या तेजस्वी वासुदेवाला पहातांच तिनें त्याला आलिंगन दिलें. त्यावेळीं त्या पुत्रवत्सल पृथेला पुत्रांचें स्मरण होऊन ती विलाप करूं लागली. त्या बलाढ्य पांडवांच्या सहवासांत नेहमीं असणारा वार्ष्णेय दीर्घकालानें दृष्टीं पडल्यामुळें तिचे नेत्र अश्रूंनीं भरून आले, कंठ दाटून आला व मुखाला कोरड पडली. त्या साध्वीनें कृष्णाचें आतिथ्य करून आसनावर सुखानें बस-लेल्या त्याला म्हटलें—

" हे जनार्दना, माझे पुत्र बालपणापासूनच गुरुशुश्रूषेंत तत्पर असत. ते परस्परांचे सुहृद् असून एकमेकांस संमत आहेत. ज्यांची परस्परांविषयीं सम-बुद्धि आहे, असे ते माझे निष्पाप पुत्र कपटानें राज्यापासून भ्रंश पावले व वास्तविक जनांत रहाण्यास योग्य असलेले ते राजपुत्र निर्जन वनांत निघून गेले. ते सत्यवादी वीर क्रोध व हर्ष यांनीं रहित असून ब्राह्मणभक्त आहेत. ते आपल्या सर्व प्रिय सुखाचा त्याग करून व रडत असलेल्या मला सोडून निघून गेले.

हे कृष्णा, वनांत जाणाऱ्या त्यांनीं माझ्या हृदयाचें समूल हरण केलें. हे केशवा, वनवासाला पात्र नसलेले माझे महात्मे पुत्र सिंह-व्याघ्रांनीं व्यास असलेल्या महावनांत कसे राहिले ! बा कृष्णा, बालपणींच पितृहीन झालेल्या त्या अर्भकांचें मीं सतत लालन-पालन करून त्यांना वाढविलें. त्यांनीं माता-पितरांवांचून महावनांत कसे दिवस काढले असतील ! हे माझे प्रिय पुत्र बाल्यापासून शंख, मृदंग, दुन्दुभि यांच्या मधुर ध्वनीनें जागे होत असत. हत्तीचा चीत्कार, घोड्यांचें खिंकाळणें, रथनेमींचा घोष व शंख, भेरी इत्यादि

मंगलवाद्यांचा नाद शयनगृहांत निजलेल्या त्यांना जाग आणीत असे. ते राजपुत्र प्रासादशिखरावरील सौधावर रंकुमृगांच्या मऊ चर्मावर निजलेले असतां प्रातःकालीं मंगल वाद्यें वाजूं लागत. विद्वान् ब्राह्मण त्या माझ्या पुत्रांचें पुण्याहं घोषमिश्र वेदवाक्यांनीं पूजन करीत असत आणि उलट ते वस्त्रें, रत्नें व अलंकार यांनीं ब्राह्मणांची पूजा करीत असत. महात्मे ब्राह्मण मंगलयुक्त पूज्य वाणीनें त्यांना आशीर्वाद देत असत. पण हे जनार्दना, तेच माझे प्रिय पुत्र बारा वर्षें वनांत रहात असतांना श्वापदांचा घोर शब्द ऐकून त्यांना झोंप तरी येत असेल का ! जे पांडव खांडवप्रस्थांत असतांना स्त्रियांचे मधुर गीतध्वनि चारणाच्या स्तुति व मंगल वाद्यांचे ध्वनि ऐकून प्रातःकालीं जागे होत असत तेच आतां वनांतील क्रूर श्वापदांच्या गर्जनेनें जागे होत असतील नाहीं !

हे मधुसूदना, माझा तो ज्येष्ठ पुत्र अतिशय नम्र, सत्यनिष्ठ, धैर्यवान् , निग्रही, भूतमात्रावर दया करणारा आणि काम व द्वेष यांना अधीन ठेवून सज्जनांचें अनुवर्तन करणारा आहे. तो युधिष्ठिर अम्बरीष, मान्धाता, ययाति, नहुष, भरत, दिलीप, शिबि व उशीनर या प्राचीन राजर्षींचा दुर्धर भार धारण करितो, तो धर्मज्ञ शील व सदाचार यांनीं संपन्न असून, सत्यप्रतिज्ञ आहे. तो सर्व गुणांनीं युक्त असलेला अजातशत्रु समग्र त्रैलोक्याचाहि राजा होण्यास योग्य आहे. त्या धर्मात्म्याची कांति सुवर्णासारखी असून तो धर्माचरण व सदाचार यांत सर्व कुरूंमध्यें श्रेष्ठ आहे. तो माझा प्रियदर्शन महाबाहु युधिष्ठिर कुशल आहे ना !

हे वासुदेवा, माझा वृकोदर दहा हजार हत्तींच्या बलानें युक्त आहे. तो वायुसारखा वेगवान् , बलाढ्य, असहिष्णु, भ्रात्यांचें नित्य प्रिय करणारा व त्यांनाहि प्रिय आहे. त्यानें बांधवांसह सर्व कीचकांचा संहार केला. त्या शूरानें क्रुद्ध होऊन हिडिम्ब व बक यांचा वध केला. तो प्रहार करणारांतील श्रेष्ठ भीम इंद्रासारखा पराक्रमी, वायूसारखा बलवान् व महेश्वरासारखा क्रोधी आहे. तो जितात्मा पांडव जरी इतका अमर्षी आहे, तरी आपला क्रोध, बल व अमर्ष यांना आंवरून ज्येष्ठ भ्रात्याच्या आज्ञेंत रहातो. तो माझा तेजस्वी महात्मा उदार मनाचा असूनहि त्याची चर्या उग्र दिसत असते. तो भीमसेन कसा आहे ! हे वार्ष्णेया, त्या मध्यम पांडवाचे बाहु परिघासारखे आहेत, तो माझा बलाढ्य पुत्र कुशल असल्याचें मला सांग.

हे कृष्णा, माझा अर्जुन केवल दोन बाहूंनींच सहस्रबाहु अर्जुनाशीं नित्य स्पर्धा करीत असतो. तो एका वेगानें पांचशें बाण सोडितो. तो अस्त्रविद्येंत कार्तवीर्याच्या तुल्य आहे. तो धनंजय आदित्यासारखा तेजस्वी, महर्षीसारखा दमनशील, पृथ्वीसारखा क्षमावान् व महेंद्रासारखा पराक्रमी आहे. त्या सव्यसाचीनें स्वपराक्रमानें कुरूंना अतिशय उज्ज्वल असें सार्वभौमत्व मिळवून दिलें. सर्व पांडवांना त्याच्याच बाहुबलाचा आधार आहे. तो पांडुपुत्र सत्यपराक्रमी असून सर्व रथ्यांमध्यें श्रेष्ठ आहे. युद्धामध्यें त्याच्या पुढें उभा राहिलेला कोणताहि योद्धा जिवंत परत जात नाहीं. तो जिष्णु सर्व भूतांचा जेता असून अजिंक्य आहे, देवांचा जसा इंद्र, तसा अर्जुन पांडवांचा आधार आहे. तो तुझा भ्राता व सखा धनंजय कुशल आहे ना!

माझा आवडता सहदेव सर्व भूतांवर दया करणारा, लज्जावान्, अस्त्रवेत्ता, मृदु, सुकुमार व धार्मिक आहे. तो मला अतिशय प्रिय आहे. युद्धांत शोभणारा तो शूर माद्रीनंदन भ्रात्यांच्या शुश्रूषेंत तत्पर व धर्मार्थांत कुशल आहे. सहदेवाचे महात्मे भ्राते त्याच्या शुभ आचरणाची नित्य पूजा करितात. तो वीर सहदेव ज्येष्ठ भ्रात्यांचें पूजन करणारा आहे. तो माझ्या सेवेंतहि सदैव रत असे. त्या माद्रीपुत्राचें क्षेम आहे ना!

हे वार्ष्णेया, माझा नकुल अतिशय सुकुमार व रूपवान् आहे. तो यौवनसंपन्न शूर सर्व भ्रात्यांना अतिशय प्रिय असून जणुकाय त्यांचा बाहेर संचार करणारा दुसरा प्राणच आहे. तो माद्रेय विचित्र युद्ध करणारा, महाबलाढ्य व धनुर्धर आहे. तो सुखांत वाढलेला माझा वत्स नकुल कुशल आहे ना! खरोखर, तो सुकुमार महारथ सर्वथा सुखालाच उचित आहे. तो दुःखाला मुळींच पात्र नाहीं. त्या माझ्या प्रिय नकुलाला मी पुनः पाहीन का! हे वीरा, एक निमेषमात्र जर नकुल माझ्या दृष्टीं पडला नाहीं, तर ज्या माझें मन अस्वस्थ होत असे, तीच मी आज त्याच्यावांचून अद्यापि जिवंत राहिलें आहें, पहा!

हे जनार्दना, माझ्या सर्व पुत्रांहूनहि मला द्रौपदी अधिक प्रिय आहे. ती राजनंदिनी कुलीन, रूपसंपन्न व सर्व श्रेष्ठ गुणांनीं युक्त आहे. ती सत्यवादिनी पुत्रांचें सांनिध्य टाकून पतींना अनुसरली. तिनें प्रिय पुत्रांना दूर ठेवून पतीबरोबर वनवास स्वीकारला. सर्व प्रकारें कल्याणप्रद असलेली ती द्रौपदी

कशी आहे ! हे अरिंदमा, अग्नितुल्य तेजस्वी, शूर व धनुर्धर अशा पांच पतींना प्राप्त झालेली ती पांचाली या चौदा वर्षांत माझ्या दृष्टीं पडली नाहीं.

खरोखर, अशा पुण्यशील द्रौपदीलाहि ज्याअर्थीं अव्यय सुख लाभलें नाहीं, त्याअर्थीं केवल पुण्यकर्मांनींच मनुष्याला सुखप्राप्ति होत नाहीं, हेंच सिद्ध होतें. हे कृष्णा, माझ्या पांच पुत्रांतील एकहि पुत्र याज्ञसेनीहून मला अधिक प्रिय नाहीं. त्या साध्वीला तशाप्रकारें कौरवसभेंत नेलेलें पहाण्याचें माझ्या दैवीं आलें, याहून दुःखतर दुसरें काय असणार ? यापूर्वी मीं असें दुःख कधींच अनुभविलें नव्हतें. क्रोध व लोभ यांनीं युक्त असलेल्या त्या अनार्य धार्तराष्ट्रानें एकवस्त्रा असलेल्या द्रौपदीला सर्व कुरूंच्या समक्ष श्वशुरांच्या समीप आणलें. त्यावेळीं तेथें धृतराष्ट्र, महाराज बाह्लिक, कृप, सोमदत्त व इतर कौरव उद्विग्न होऊन बसले होते. त्या सभेंतील सर्वांत मला विदुरच पूज्य वाटतो. कारण हे कृष्णा, आचरणानेंच मनुष्य श्रेष्ठ होतो. धनानें किंवा विद्येनें पूज्य होत नसतो.[1] त्या महाबुद्धिमान् गंभीर महात्म्या विदुराचें सच्छील हाच अलंकार सर्व लोकांचें अतिक्रमण करून राहिला आहे.

वैशंपायन—राजा, अशाप्रकारें शोकार्त झालेली ती पृथा गोविंदाला पाहून हृष्ट झाली व त्याला आपलीं नानाप्रकारचीं सर्व दुःखें कथन करूं लागली. ती पुनः म्हणाली—हे अरिंदमा, पूर्वींच्या जेवढ्या व्यसनी राजांनीं द्यूत किंवा मृगवध, हें पाप केलें, त्यांतील कोणा एकाला तरी तें सुपरिणामी झालें का ! मग माझ्या पुत्राचें हें कपटद्यूत व माझ्या पतीनें केलेला मृगवध यांचा परिणाम तरी सुखावह कसा व्हावा !

हे परंतपा, त्या दुष्ट धार्तराष्ट्रांनीं कुरूंच्या समक्ष कृष्णेला सभेंत नेऊन जे क्लेश दिले, त्यांच्या स्मरणानें माझ्या अंतःकरणाचा जितका व जसा दाह होत आहे तसा व तितका दाह मरणानेंहि होणार नाहीं. पांडवांचें नगरांतून बहिर्गमन, त्यांचा वनवास, अज्ञातवास व राज्य परत न देणें, अशा नानाप्रकारच्या दुःखांचा मी अनुभव घेत आहें. दुर्योधनानें कपटाचरण केलें त्याला आज चौदा वर्षें झालीं. दुःखाच्या भोगानें जर पापाचा क्षय होत असेल, तर आम्ही त्या दुःखाला भिणार नाहीं.

---

१ वृत्तेन हि भवत्यार्यो न धनेन न विद्यया ॥

हे कृष्णा, मीं माझे पुत्र व धृतराष्ट्राचे पुत्र यांच्यांत कधींहि भेदभाव ठेविला नाहीं. त्या सत्याच्या प्रभावानें शत्रूचा नाश करून संग्रामांतून मुक्त झालेल्या पांडवांसह तुला मी पुनः ऐश्वर्यानें युक्त झालेलें पाहीन. माझे पुत्रांचा अलौकिक जन्म झालेला आहे, त्यांचा कौरवांना पराभव करतां येणें शक्य नाहीं.

हे वार्ष्णेया, मी माझी स्वतःची निंदा करीत नाहीं, किंवा दुर्योधनाला दोष देत नाहीं. तर माझ्या पित्यालाच दूषण देतें. मी हातांत कंदुक घेऊन खेळ-णारी लहान बाला होतें, तेव्हां तुझ्या पितामहानें एखाद्याला जसें उदारपणानें धनादिकांचें दान करावें, तसें त्यानें आपला सखा जो महात्मा कुंतिभोज त्याला कन्यकारूपानें माझें समर्पण केलें.

याप्रमाणें पित्यानें माझें दान केलें व भीष्मादि श्वशुरांनीं माझी अशी वंचना केली. हे कृष्णा, अशा अत्यंत दुःखांत बुडालेल्या माझ्या जीविताचा काय उपयोग !

धनंजय जेव्हां जन्म पावला, तेव्हां त्याच्या जननाशौच्यांतच असतांना— ' हे कुंति, हा तुझा पुत्र पृथ्वीला जिंकून महायुद्धांत कौरवांचा पराभव करील, त्याचें यश स्वर्गापर्यंत पोंचेल व तो भ्रात्यांसह तीन अश्वमेध यज्ञ करील ' अशी आकाशवाणी झाली. हे कृष्णा, त्या आकाशवाणीची मी निंदा करीत नाहीं. पण त्या विश्वकर्त्या विधात्याला व महेश्वरालाहि नमस्कार असो. खरो-खर कर्मरूपी धर्मच प्रजेची उत्पत्ति व तिचें धारण करतो. ईश्वराची आराधना व्यर्थ आहे. जगांत जर धर्म असेल तर हे कृष्णा, त्या देववाणीप्रमाणें तूं सर्व घडवून आणशील. हे माधवा, पुत्रांच्या वियोगाचा शोक माझ्या अंतः-करणाला जसा जाळीत आहे, तशी व्यथा मला वैधव्यानें, अर्थनाशानें किंवा वैरानेंहि झाली नाहीं.

हे गोविंदा, सर्व शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ जो धनंजय तो माझ्या दृष्टीं पडल्यावांचून माझ्या हृदयाला शांति कोठली ! हर हर ! युधिष्ठिर-अर्जुन यांसारख्या लोकोत्तर पुत्रांच्या जननीचीहि अशी दशा व्हावी ना ! माझ्या पांची पुत्रांना पाहून आतां चौदा वर्षें होऊन गेलीं. तेव्हांपासून त्यांतील एकहि वीर मला दिसला नाहीं. जीविताचा नाश झाला असतां मानव त्या मृतांचें श्राद्ध तरी करीत असतात. परंतु हे जनार्दना, वस्तुतः माझे पुत्र मला

मृत झाले असून मीहि त्यांना मृतवत् झालें आहें. पण परस्परांच्या श्राद्धांनीं समाधान करून घेण्याचा उपायहि साध्य नाहीं. हे माधवा, धर्मात्म्या युधिष्ठिराला सांग कीं, तूं क्षात्रधर्मापासून च्युत होत आहेस. पण हे वत्सा, असें करूं नको.

मी जी परक्यांच्या आश्रयानें जिवंत राहिलें आहें, त्या माझ्या जीविताला धिक्कार असो. खरोखर दुसऱ्याच्या घरीं राहून उदरनिर्वाह करण्यापेक्षां मरण श्रेष्ठ होय. धनंजय व वृकोदर यांना म्हणावें कीं, क्षत्रिय स्त्री ज्यासाठीं पुत्र प्रसवते, ती वेळ आतां प्राप्त झाली आहे. हा योग्य काल जर व्यर्थ घालवाल, तर लोकांत पूज्य असलेले तुम्ही फार मोठें पातक कराल. तुम्ही अशी आत्महिंसा कराल तर मी तुमचा कायमचा त्याग करीन. क्षत्रियानें प्रसंगीं आपल्या जीविताचाहि त्याग करावा, अशी धर्मनीति आहे. त्याचप्रमाणें क्षात्रधर्मांत रत असलेल्या दोघां माद्रीपुत्रांना सांग कीं, तुम्ही स्वपराक्रमानें संपादन केलेलें राज्य जीवावर उदार होऊन पुनः मिळवा. क्षात्रधर्मानें रहाणारांचें ऐश्वर्य पराक्रमाच्या अधीन असतें व त्यानेंच मनुष्याच्या मनाला समाधान वाटत असतें.

हे पुरुषोत्तमा, येथून जाऊन तूं सर्व धनुर्धरांत श्रेष्ठ असलेल्या अर्जुनाला सांग कीं, तूं द्रौपदीच्या क्लेशांचें परिमार्जन करून तिचें प्रिय कर. हे वार्ष्णेया, क्रुद्ध झालेले भीमार्जुन साक्षात् अंतकासारखे आहेत. ते देवांनाहि परम गति दाखवितील, हें तुला ठाऊकच आहे. असें असतां त्यांच्या समक्ष कौरवांनीं कृष्णेला सभेंत नेलें, दुःशासन व कर्ण यांनीं कठोर भाषणें केलीं, हा त्या वीरांचा अवमानच नव्हे का ! दुर्योधनानें भीमाच्या गतीचा हावभाव करून त्याचा उपहास केला, त्याचें फल तो कौरवांच्या समक्ष लवकरच भोगील. एकदां वैर उत्पन्न झाल्यावर वृकोदर कधींहि शांत होत नाहीं. जोंपर्यंत तो शत्रुकर्शन भीम शत्रूचा अंत करणार नाहीं, तोंवर त्याच्या मनांतील वैर दीर्घकाल जरी लोटला तरी शांत होणार नाहीं.

हे मधुसूदना, माझ्या पुत्रांच्या राज्याचा अपहार, त्यांचा द्यूतांतील पराजय व वनवास यांचें मला इतकें दुःख होत नाहीं, परंतु महासाध्वी द्रौपदी

---

१ पराश्रया वासुदेव या जीवति धिगस्तु ताम् ।
वृत्तेः कार्पण्यलब्धाया अप्रतिष्ठैव ज्यायसी ॥

स्त्रीधर्मिणी व एकवस्त्रा असतांना तिला सभेंत नेऊन तशा प्रकारचीं कठोर वचनें ऐकविलीं, याहून अधिक दुःखप्रद काय असणार ! त्यावेळीं हे कृष्णा, सनाथ असलेल्या त्या पतिव्रतेला कोणी त्राता भेटला नाहीं. हे मधुसूदना, अशा माझा पुत्रांसह तूं नाथ आहेस; बलवानांतील श्रेष्ठ राम व महारथ प्रद्युम्न हेही माझे कैवारी आहेत; दुर्धर्ष भीम व युद्धांतून परत न फिरणारा विजय हे माझे दोघे पुत्र जिवंत आहेत, तथापि मी हें अशाप्रकारचें दुःख भोगीत आहें, हें आश्चर्य नव्हे का !

वैशंपायन—राजा, त्यानंतर पार्थसख्या शौरीनें पुत्रवियोगानें व्याकुळ झालेल्या पृथेला आश्वासन दिलें.

(२) वासुदेव—हे पितृभगिनि, तुझ्यासारखी श्रेष्ठ स्त्री या लोकीं दुसरी कोण आहे ! तूं अत्यंत कुलीन आहेस. कमलिनीनें एका सरोवरांतून दुसऱ्या सरोवरांत जसा प्रवेश करावा, तशी तूं ' शूर'-भूपतीच्या कुलांतून 'आजमीढ'-कुलाला प्राप्त झालीस. तूं सर्व कल्याणानें युक्त असून भर्त्याला पूज्य होतीस. सर्व गुणांनीं संपन्न असलेली तूं सर्वांची स्वामिनी, वीरपत्नी व वीरमाता आहेस. यास्तव हे महाप्राज्ञे, तुझ्यासारख्या श्रेष्ठ स्त्रिया सुख-दुःख सहन करण्यास समर्थ असतात.

तुझे पुत्र निद्रा-आलस्य, क्रोध-हर्ष, क्षुत्पिपासा, शीतोष्ण, या सर्वांस जिंकून नित्य वीरांच्या सुखांत रत आहेत. ते पार्थ ग्राम्य सुखांचा त्याग करून वीरांना उचित असलेलें सुखच सतत प्रिय मानीत आहेत. उत्साह व बल यांनीं युक्त असलेले ते वीर अल्पलाभानें कदापि संतुष्ट होणार नाहींत. ते राज्य किंवा वन यांतील कांहीं तरी एक स्वीकारतील. ज्यांना ग्राम्य सुख प्रिय असतें, ते मूढ अल्प ऐश्वर्यांत समाधान मानितात. धीर पुरुष असह्य क्लेश किंवा अलौकिक भोग अनुभवितात. एक तर ते ब्रह्मानंदांत निमग्न असतात किंवा सुषुप्तीचा अनुभव घेतात. कारण दोन्ही अवस्थांमध्यें द्वैताच्या अदर्शनामुळें सुखच आहे. या दोन अवस्थांच्या अंतरालीं असणाऱ्या ज्या जागृति व स्वप्न या दोन अवस्था, त्या दुःखरूप आहेत. स्वतः आत्मा सर्व दुःखशून्यच आहे, यास्तव त्यांतच खरें सुख आहे. जागृति व स्वप्न या अवस्थांमध्यें उपाधिसंबंधामुळें भासणारें जें दुःख ते आगमापायि म्ह० अनित्य आहे. तुझे पुत्र तेंच सहन करीत आहेत, यास्तव तूंहि तें सहन कर.

कृष्णेसह पांडवांनीं तुला अभिवादन करून आपलें कुशल निवेदन केलें आहे व अनामय विचारिलें आहे. तूं लवकरच व्याधिरहित पांडवांना शत्रूचा संहार करून ऐश्वर्याला प्राप्त झालेलें पहाशील. सर्व मनोरथ पूर्ण होऊन सर्व लोकांचे प्रभु झालेले तुझे पुत्र अल्पावधींतच तुझ्या दृष्टीं पडतील.

राजा, जनार्दनानें असें आश्वासन दिलें असतां पुत्रांच्या क्लेशानें दुःखी झालेल्या पृथेचें अज्ञान दूर झालें. देहादि अनात्मवस्तूवरील अभिमानामुळें उत्पन्न झालेलें विपरीत ज्ञान दूर सारून ती वासुदेवाला असें म्हणाली—

कुंती—हे मधुसूदना, धर्माचा लोप न होतां व कपटाचा आश्रय न करतां तुला जें जें कांहीं पांडवांच्या हिताचें वाटेल, तें तें तूं कर. हे कृष्णा, तुझें उच्च कुल, तुझी सत्यनिष्ठा व तुझा प्रभाव मी पूर्णपणें जाणत्यें. मित्र व शत्रु यांच्या भूमि-दानादिकांचा विभाग करून देण्यांत तत्पर असलेली तुझी बुद्धि व पराक्रम मला माहित आहे.

आमच्या कुलाचा तूंच धर्म, सत्य व महत्तप आहेस. तूंच आमचा त्राता असून तूं महद्ब्रह्म आहेस. तुझ्या ठिकाणीं सर्व प्रतिष्ठित आहे. तस्मात् तूं जें बोलत आहेस तें सर्व सत्यच होईल.

वैशंपायन—राजा, त्यानंतर गोविंद कुंतीचा निरोप घेऊन व तिला प्रदक्षिणा घालून दुर्योधनाच्या घरीं जावयास निघाला. ५. ६. ९०.

---

## अध्याय ९१ वा.

[ १ कौरवांनीं कृष्णाला केलेलें भोजनाचें निमंत्रण, कृष्णानें केलेला निषेध. २ दुर्योधनानें विचारलेलें कारण. ३ कृष्णाचें सयुक्तिक उत्तर व विदुरगृहीं भोजनार्थ गमन. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, याप्रमाणें पृथेचा प्रदक्षिणापूर्वक निरोप घेऊन अरिंदम शौरी दुर्योधनाच्या घरीं आला. दुर्योधनाचा तो अतिशय शोभिवंत प्रासाद इंद्रभुवनाच्या तुल्य असून विचित्र आसनांनीं युक्त होता. जनार्दनानें त्याच्या तीन कक्षांचें उल्लंघन करून जेव्हां आंत प्रवेश केला, तेव्हां द्वारपालांनीं त्याचें कोठेंहि निवारण केलें नाहीं. नंतर त्या अच्युतानें अभ्रसमुदायासारख्या शुभ्र, पर्वतशिखराप्रमाणें उंच व देदीप्यमान ऐश्वर्यानें शोभणाऱ्या त्या प्रासादावर आरोहण केलें.

तेथें सहस्रावधि राजे व कौरव यांनीं आवृत असलेला महाबाहु दुर्योधन आसनावर बसलेला त्यानें पाहिला. त्याचप्रमाणें दुःशासन, कर्ण, शकुनि हेहि दुर्योधनाच्या समीपच आसनावर बसलेले त्याच्या दृष्टीं पडले. महायशस्वी दाशार्ह येत आहे, हें पहातांच अमात्यांसह धार्तराष्ट्र त्याचा सत्कार करीत उठून उभा राहिला. तेव्हां केशवानें अमात्यांसह दुर्योधनाला भेटून इतर सर्व भूपालांची यथान्याय भेट घेतली व तो जनार्दन सुवर्णाच्या श्रेष्ठ आसनावर बसला. तें सिंहासन उत्तम प्रकारें भूषविलेलें असून त्यावर विविध प्रकारचीं मऊ व रम्य आस्तरणें घातलीं होतीं.

त्या श्रेष्ठ सिंहासनावर बसलेल्या मधुसूदनाला कौरवानें गाय, मधुपर्क व उदक अर्पण करून त्यास आपलीं गृहें व राज्य निवेदन केलें. याप्रमाणें आदित्यवत् तेजस्वी असलेल्या त्या आसनस्थ गोविंदाची सर्व भूपतींसह कौरवांनीं परिचर्या केली. नंतर दुर्योधनानें अजिंक्य वार्ष्णेयाला भोजनाचें निमंत्रण दिलें, परंतु केशवानें तें स्वीकारलें नाहीं.

( २ ) तेव्हां त्या कौरवसभेंत दुर्योधन कर्णाला संबोधून कृष्णाला बाह्यतः मृदु पण परिणामीं शाठ्यपूर्ण असें वचन बोलला—हे जनार्दना, तुझ्यासाठीं तयार केलेल्या या अन्न-पानांचा व वस्त्राभरणाचा स्वीकार तूं कां करीत नाहींस ! तूं आम्हां कौरव-पांडवांना साह्य केलें आहेस, उभयतांच्या हितासाठीं झटत आहेस. शिवाय तूं धृतराष्ट्राचा संबंधी असून त्याला प्रिय आहेस. तूं सर्व धर्मार्थ जाणतोस, यास्तव हे मुकुंदा, आमच्या अन्नाचें ग्रहण न करण्याचें कारण ऐकण्याची माझी इच्छा आहे, तें मला तत्त्वतः सांग.

( ३ ) वशंपायन—राजा दुर्योधन असें बोलला असतां उदार मनाचा गोविंद आपला भव्य उजवा बाहु वर करून योग्य कालीं पर्जन्यवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें गंभीर वाणीनें असें वचन बोलला. गोविंदाचें तें भाषण अस्खलित, स्पष्ट, सयुक्तिक, अर्थपूर्ण व प्रसन्न होतें. तो राजीवलोचन हरि म्हणाला—" हे भारता, दूत कृतार्थ होऊन भोजन व सत्कार यांचा स्वीकार करीत असतात. यास्तव अमात्यांसह तूं मला कृतार्थ करून मग माझें पूजन कर."

जनार्दनाचें हें उत्तर ऐकून दुर्योधन त्याला पुनः म्हणाला—हे मधुसूदना, तूं आमच्याशीं असें वागावेंस हें योग्य नव्हे. तूं कृतार्थ किंवा अकृतार्थ कसाहि

असलास तरी आम्हीं तुझा सत्कार करण्याचा यत्न केला, पण तूं त्याचा स्वीकार करीत नाहींस. परंतु त्याचें कारण आम्हांला कळत नाहीं. आम्हीं मोठ्या संतोषानें केलेल्या पूजेचाहि तूं सत्कार करीत नाहींस, याला काय म्हणावें! हे गोविंदा, तुझ्याशीं आमचें वैर नाहीं, किंवा युद्धहि होणारें नाहीं. असें असतांना तूं अशाप्रकारचें भाषण कां करितोस तें आम्हांला सांग.

वैशंपायन—धार्तराष्ट्राच्या या भाषणाला दाशार्हानें हंसतच उत्तर दिलें. तो अमात्यांकडे पाहून दुर्योधनाला म्हणाला—" मी कामानें, क्रोधानें, द्वेषानें, कपटानें, लोभानें, किंवा अर्थलाभासाठीं कदापि धर्माचा त्याग करणार नाहीं. परान्न दोन प्रसंगांनीं ग्रहण करावें लागत असतें. एक, परस्पर प्रीतिभोजन होत असतें, किंवा आपत्प्रसंगीं परान्न सेवन करावें लागतें. परंतु आज तशी दोन्ही प्रकारची स्थिति नाहीं. कारण हे राजन्, तूं माझें प्रिय करीत नाहींस व आज आम्ही आपद्ग्रस्तहि झालों नाहीं.

हे धार्तराष्ट्रा, तूं पांडवांचा जन्मापासून द्वेष करीत आहेस. ते सर्व गुणांनीं युक्त असलेले तुमचे भ्राते तुमचें प्रिय करण्यांत तत्पर असतांना तुम्हीं त्यांचा असा निष्कारण द्वेष करणें योग्य नव्हे. धर्मांत स्थित असलेल्या पांडवांविषयीं कोण काय बोलूं शकणार! जो त्या पार्थांचा द्वेष करितो, तो माझाच द्वेष करितो व त्यांना अनुसरणारा मलाच अनुसरतो. इतकें त्या धर्माचरणी पांडवांशीं माझें ऐकात्म्य झालेलें आहे. जो कोणी काम-क्रोधाच्या अधीन होऊन मोहानें गुणवानाशीं विरोध करितो व त्याचा द्वेष करूं लागतो, त्याला पुरुषाधम म्हणतात. जो अजितात्मा लोभामुळें व मोहामुळें ज्ञातिबांधवांच्या श्रेष्ठ गुणांकडे दुर्लक्ष करितो, त्या क्रोधाला न जिंकणाऱ्या पुरुषाजवळ श्री फार वेळ रहात नाहीं. परंतु याच्या उलट जो जितात्मा आपल्याला अप्रिय असलेल्याहि गुणसंपन्न मनुष्याचें प्रिय करितो, तो दीर्घकाल यशस्वी होतो. या सर्व कारणास्तव दुष्टबुद्धि मनुष्याच्या घरचें अन्न कदापि ग्रहण करूं नये. याप्रसंगीं एकट्या विदुराचें घरच मला भोजनास योग्य आहे, असें माझें मत आहे."

अमर्षी दुर्योधनाला असें बोलून तो महाबाहु जनार्दन धार्तराष्ट्राच्या शुभ्र प्रासादांतून बाहेर पडला व महात्म्या विदुराच्या घरीं विश्रांति घेण्यासाठीं आला. तेव्हां भीष्म, द्रोण, कृप, बाल्हिक व इतर कौरव त्यांच्या मागोमाग विदुराच्या घरीं स्थित असलेल्या वासुदेवापाशीं आले व म्हणाले—" हे वीरा मधुसूदना, आम्ही आमचीं रत्नयुक्त गृहें तुला निवेदन करीत आहों."

तेव्हां त्या सर्व कौरवांना महातेजस्वी माधव म्हणाला—" आपण सर्वांनीं माझा योग्य सत्कार केला आहे. आतां आपण सर्व घरीं जा. "

इकडे अपराजित दाशार्ह आपल्या घरीं आला आहे, हें पहातांच विदुरानें सर्व इष्ट वस्तूंनीं त्याचा मोठ्या यत्नानें परम सत्कार केला व पवित्र आणि षड्रसयुक्त अन्नोदक महात्म्या केशवाला अर्पण केलें. तेव्हां मधुसूदनानें प्रथम तें अन्न व द्रव्य वेदवेत्त्या ब्राह्मणांना दिलें व नंतर मरुद्गणासह भोजन करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्यानें स्वतः आपल्या सर्व अनुयायांसह विदुराच्या घरीं मिष्टान्नयुक्त पवित्र भोजन केलें. ५. ६. ९१.

---

## अध्याय ९२ वा.

[ १ मर्यादारहित दुष्टबुद्धि धार्तराष्ट्रांमध्यें तुझें गमन मला संमत नाहीं, असें विदुराचें श्रीकृष्णाला कथन. ]

( १ ) वैशंपायन—राजा, याप्रमाणें श्रीकृष्णानें भोजन करून विश्रांति घेतल्यानंतर रात्रीं विदुर त्यास म्हणाला—" हे केशवा, तुझें हें आगमन विचारपूर्वक झालेलें आहे, असें मला वाटत नाहीं. कारण तो दुर्योधन धर्मार्थाचें अतिक्रमण करणारा, मंदमति, क्रोधी, वृद्धांची आज्ञा व धर्मशास्त्र यांचें पालन न करणारा आणि मूढ आहे. तो दुरात्मा अत्यंत दुराग्रही आहे. तो स्वतः मानाची इच्छा करणारा असून इतरांची मानहानि करणारा आहे. तो स्वतःला प्राज्ञ समजणारा धार्तराष्ट्र कोणावरहि विश्वास ठेवीत नाहीं. त्याला अनृत प्रिय असून तो अनुपकारक आहे. धर्माचा त्याग करणाऱ्या दुर्योधनाचा कोणत्याहि कार्यांत एक निश्चय नाहीं. तो अजितेंद्रिय मूढ अत्यंत कृतघ्न आहे. त्याची बुद्धि स्थिर नाहीं. या व अशा प्रकारच्या अनेक दोषांनीं युक्त असलेला तो दुर्योधन क्रोधानें तुझें श्रेयस्कर वचनहि कदापि मान्य करणार नाहीं.

त्या धृतराष्ट्रपुत्रानें भीष्म, द्रोण, कृप, कर्ण, अश्वत्थामा व जयद्रथ यांना त्यांनीं युद्ध करून राज्य मिळवून द्यावें, म्हणून विपुल धन दिलें आहे. तो दुरात्मा शमाला कदापि तयार होणार नाहीं. भीष्म-द्रोणादिकांकडे पार्थ पहाण्यासहि समर्थ नाहीं, असें कर्णासह ते सर्व धार्तराष्ट्र समजतात. दुर्योधनानें भूपतींच्या सैन्याचा समुदाय जमविला आहे व तो मूढ स्वतःला कृतार्थ

मानीत आहे. शत्रूंना जिंकण्यास एकटा कर्ण पुरेसा आहे, असें त्या दुर्बुद्धि धार्तराष्ट्राचें निश्चित मत असल्यामुळें तो शमाला तयार होणार नाहीं.

हे माधवा, ते सर्व धृतराष्ट्रपुत्र परस्परांच्या अनुमतानें वागणारे आहेत. यास्तव कौरव व पांडव या भ्रात्यांचें कल्याण इच्छिणाऱ्या तुझ्या शमाचा प्रयत्न व्यर्थ होणार आहे, 'पांडवांना उचित असलेला राज्यभागहि आम्ही देणार नाहीं' असा त्यांचा निश्चय आहे. त्यांना तुझें हितवचन रुचणार नाहीं. जेथें युक्त किंवा अयुक्त वचन समान समजलें जातें, तेथें तें प्राज्ञानें कदापि बोलूं नये. कारण तें बधिरापुढें गायन करण्यासारखेंच व्यर्थ होतें. यास्तव हे जनार्दना, तत्त्वज्ञानरहित, विपरीतज्ञानानें युक्त व मर्यादाशून्य अशा धार्तराष्ट्राला चांडाळाला तत्त्वज्ञान न सांगणाऱ्या द्विजाप्रमाणें तूं हितोपदेश करूं नको.

तो बलाढ्य मूर्ख दुर्योधन तुझें वचन कदापि ऐकणार नाहीं. तूं त्याला केलेला उपदेश व्यर्थ होईल. त्या सर्व पापबुद्धि दुरात्म्यांच्या समूहांत तुझें जाणें मला योग्य वाटत नाहीं. हे कृष्णा, ते सर्व दुष्टबुद्धि व अशिष्ट आहेत. त्यांच्या सभेंत जाऊन तूं प्रतिकूल भाषण करावेंस, हें मला उचित दिसत नाहीं.

त्यानें आजपर्यंत वृद्धांचा सहवास केलेला नाहीं. तो ऐश्वर्य व तारुण्य यांच्या मदानें मूढ बनला आहे व तो स्वभावतःच अमर्षी आहे. त्यामुळें तो तुझें हितवचन ऐकणार नाहीं. तूं जरी त्याला युक्तियुक्त व समर्थ वचन सांगितलेंस तरी तुझ्याविषयीं तो साशंक आहे. ते सर्वच दुष्ट आहेत. ते तुझें सांगणें ऐकणार नाहींत. आपल्याजवळ बलाढ्य सैन्य आहे. त्यामुळें देवांसह इंद्रालाहि युद्धामध्यें धार्तराष्ट्राचा पराभव करतां येणार नाहीं, असा त्यांचा दृढ निश्चय आहे. अशाप्रकारें काम-क्रोधांच्या वश झालेल्या त्या राजपुत्रांना अनुकूल करण्यास तुझें समर्थ वाक्यहि असमर्थ होईल ! रथ, अश्व, गज इत्यादि चतुरंग सैन्यानें युक्त असलेला तो मूढ दुर्योधन स्वतःला निर्भय समजून 'मीं सर्व पृथ्वी जिंकलीच आहे' असें मानीत आहे. तो धृतराष्ट्राचा पुत्र समग्र पृथ्वीच्या निष्कंटक सार्वभौमत्वाची आशा करीत आहे. त्याचें ऐश्वर्य वस्तुतः प्रतिबद्ध असूनहि तो तें आपल्याला प्राप्त झालेंच आहे, असें समजतो. त्यामुळें त्याच्या ठिकाणीं शमाची आशा करणें व्यर्थ आहे.

---

१ यत्र सूक्तं दुरुक्तं च समं स्यान्मधुसूदन ।
न तत्र प्रलपेत्प्राज्ञो बधिरेष्विव गायनः ॥

दुर्योधनासाठीं पांडवांशीं युद्ध करण्याकरितां पृथ्वीवरील सव योद्धे भूपाल व क्षत्रिय जमले आहेत. त्यामुळें कालानें परिपक्क झालेली ही पृथ्वी जणु-काय विनाशोन्मुख झाली आहे.

हे कृष्णा, दुर्योधनाच्या पक्षाला येऊन मिळालेले हे सर्व राजे तुझ्याशीं वैर करीत आहेत. पूर्वी तूं त्यांचें ऐश्वर्य हरण केलें आहेस. त्यामुळें तुझ्या भीतीनें ते सर्व एकमत होऊन कर्णासह धृतराष्ट्रपुत्रांना येऊन मिळाले आहेत. त्यांनीं दुर्योधनाबरोबर प्राणत्याग करण्याचा निश्चय केला आहे व ते सर्व योद्धे पांडवांशीं युद्ध करण्यास अतिशय उत्सुक आहेत. यास्तव हे वृष्णिवीरा, तूं त्या शत्रुसंघामध्यें प्रवेश करावास, असें मला वाटत नाहीं. ते सर्व दुष्ट राजे एकत्र बसले असतांना त्या अनेक शत्रूंच्या समूहांत तूं प्रवेश कसा करशील !

हे शत्रुनाशका, तुझा प्रभाव, पराक्रम व बुद्धि मी जाणतों. साक्षात् देवहि तुला कोणत्याहि प्रकारें पीडा करूं शकणार नाहींत. तथापि माझें पांडवांवर जेवढें प्रेम आहे, त्याहूनहि तुझ्यावर अधिक आहे. त्या प्रेमामुळें, आदरामुळें व स्नेहामुळें मी तुला हें सांगत आहें. हे कमलनयना, तुझ्या दर्शनानें मला जो संतोष झाला आहे तो काय तुला प्रत्यक्ष शब्दांनीं सांगावयास पाहिजे ! अर्थात् नको. कारण तूं सर्व प्राण्यांचा अन्तरात्मा आहेस. ५. ६. ९२.

---

## अध्याय ९३ वा.

[ १ सर्व पार्थिवांचा समुदायहि मला अपाय करण्यास समर्थ नाहीं. कौरव-पांडवांचा शम झाल्यास पुण्य कर्म घडेल, या हेतूनें मी आलों आहें, असें कृष्णाचें वचन. ]

( १ ) **श्रीभगवान्**—हे विदुरा, ज्याप्रमाणें एखाद्या महाबुद्धिमानानें किंवा विद्वानानें भाषण करावें, किंवा तुझ्यासारख्या सुहृदानें माझ्यासारख्याला हितवचन सांगावें, त्याप्रमाणेंच तुझें हें धर्मार्थयुक्त सत्य वचन आहे व तें तुझ्या ठिकाणींच संभवतें. तूं हें माता-पितरांसारखेंच सत्य, प्रसंगाला योग्य व युक्त असें वचन बोललास, यास्तव माझ्या आगमनाचा हेतु तुला सांगतों, तो लक्ष देऊन ऐक.

धार्तराष्ट्रांचा दुष्टपणा व इतर राजांचें वैर हें सर्व जाणत असूनहि मी आज कौरवांकडे आलों आहें. अश्व, रथ व गज यांसह विपरीत भावाला प्राप्त

झालेल्या या पृथ्वीला जो मृत्युपाशांतून सोडवितो, तो श्रेष्ठधर्माला प्राप्त होतो. जो मानव यथाशक्ति धर्मकार्य करण्याचा यत्न करितो, त्याला त्यांत जरी यश आलें नाहीं, तरी त्याला त्याचें पुण्यफल निःसंशय प्राप्त होतें. जो मनानें पापाचें केवल चिंतन करितो, परंतु तें आचरीत नाहीं, त्याला त्या पापाचें फल भोगावें लागत नाहीं, असें धर्मवेत्ते म्हणतात.

यास्तव हे विदुरा, संग्रामांत नाश पावणाऱ्या कौरव-सृंजयांचा शम करण्याचा मी निष्कपटपणें यत्न करीन. कर्ण व दुर्योधन यांच्या दुराचरणामुळें सर्व कौरवांवर ही महाघोर आपत्ति ओढवली आहे. युद्धाकरितां सज्ज झालेले हे लोक त्यांच्याच वंशांत उत्पन्न झाले आहेत. संकटांत बुडणाऱ्या मित्राला जो साह्य करीत नाहीं, उलट त्याला अनर्थांत पाडण्याचा यत्न करितो, त्याला विद्वान् लोक निर्दय म्हणतात. परंतु बुडणाऱ्याला केंस धरून बाहेर ओढण्याचा जो मनुष्य यथाशक्ति यत्न करितो, त्याची निंदा कोणीहि करीत नाहीं. धार्तराष्ट्रांनीं माझें शुभ, धर्मार्थयुक्त व समर्थ वचन ग्रहण करावें, हाच उत्तम पक्ष होय. माझें म्हणणें मान्य करणें हेंच त्यांस उचित आहे. यास्तव मी कौरव, पांडव आणि पृथ्वीवरील सर्व क्षत्रिय यांच्या हिताचाच निष्कपटपणें यत्न करीन. पण असा हिताचाच प्रयत्न करणाऱ्या मजविषयीं दुर्योधनाला जर शंका आली, तर तेंहि माझें प्रियच आहे. त्यामुळें मी ऋणमुक्त होईन. कारण ज्ञातींतील परस्पर विरोध नाहींसा करण्यासाठीं जो मध्यस्थ होऊन सर्वप्रकारें झटत नाहीं, तो मित्रच नव्हे, असें ज्ञात्यांचें म्हणणें आहे. ‘ कृष्ण समर्थ असूनहि त्यानें संतप्त झालेल्या कुरु-पांडवांचें निवारण केलें नाहीं ’ अशी अधर्मिष्ठ, मूढ व असुहृद् लोकांनीं माझी निंदा करूं नये, या हेतूनें दोघांचेंहि हित साधण्यासाठीं मी येथें आलों आहें. तो यत्न करून मी परत जाईन. त्यामुळें मी लोकांच्या निंदेला पात्र होणार नाहीं.

माझें धर्मार्थयुक्त व हितावह वचन ऐकूनहि तो मूढ जर पांडवांचा राज्यांश त्यांना परत देणार नाहीं, तर मृत्युवश होईल. विदुरा, मी पांडवांच्या हिताला बाध न येतां कौरवांशीं जर शम करूं शकलों, तर माझ्या हातून एक पुण्यकर्म घडेल, महात्मे पांडव दुःखांतून मुक्त होतील व कौरव मृत्युपाशांतून सुटतील. ते धार्तराष्ट्र जर माझें अवर्णनीय, धर्मयुक्त, अर्थपूर्ण व हिंसारहित वचन मान्य करतील, तर मी कौरवांच्या पूजेचा स्वीकार करीन. हे विदुरा, सिंहापुढें जसे

मृगांचे कळप उभे रहाण्यास समर्थ नाहींत, तसे हे सर्व पार्थिव एकत्र जमून जरी आले, तरी ते मला कांहीं करूं शकणार नाहींत.

**वैशंपायन**—राजा, असें वचन बोलून वृष्णिसिंह यदुनंदनानें सुखावह मऊ शय्येवर शयन केलें. ५. ६. ९३.

---

## अध्याय ९४ वा.

[ १ श्रीकृष्णाचा कौरव सभेंत प्रवेश. २ सभा पाहाण्यासाठीं ऋषींचें आगमन. ३ ते सत्कारपूर्वक आसनस्थ झाल्यावर सर्व सभासदांचा आसनपरिग्रह. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें संभाषण करीत त्या दोघांनीं ती शरदृतूंतील नक्षत्रयुक्त आल्हादकारक रात्र सुखानें घालविली. महात्म्या विदुराचें भाषण विचित्र पदें व अक्षरें यांनीं युक्त व धर्मार्थ प्रतिपादन करणारें असल्या-मुळें श्रवणीय होतें. त्याच्या प्रसंगानुरूप विविध कथा ऐकत असतां अमित तेजस्वी कृष्णाची ती रात्र नकळत गेली. दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं अनेक सूत व मागध यांनीं सुस्वर स्तवनानें व शंख-दुंदुभींच्या घोषानें केशवाला जागें केलें. तेव्हां सात्वतश्रेष्ठ जनार्दन शय्यात्याग करून उठला. त्यानें आपलें सर्व आवश्यक प्रातःकार्य उरकलें. स्नान-आचमनादि व संध्योपासना करून अग्नींत आहुत्या दिल्या आणि सूर्याची उपासना केली.

इतक्यांत शकुनीसह दुर्योधन तेथें आला व संध्या करीत असलेल्या कृष्णाच्या समीप येऊन ते दोघे त्याला म्हणाले—" भीष्मादि कौरव, सर्व राजे व योद्धे यांसह धृतराष्ट्र सभेंत गेला आहे आणि हे गोविंदा, स्वर्गांत देव जशी इंद्राची प्रतीक्षा करितात, तशी ते सर्व तुझी वाट पहात आहेत. "

तेव्हां गोविंदानें अतिशय मधुर वाणीनें व शमपूर्ण वचनानें त्या दोघांचें अभिनंदन केलें व सूर्योदय होतांच ब्राह्मणांना विपुल रत्नें, सुवर्ण, वस्त्रें, गायी व अश्व यांचें दान दिलें. त्यानंतर सारथ्यानें दाशार्हाच्या समीप येऊन त्याला वंदन केलें व त्याचा श्रेष्ठ रथ सत्वर सज्ज करून आणला.

दाशार्हाचा तो प्रचंड शुभ्र रथ क्षुद्रघंटिकांनीं ( घुंगरूंनीं ) सुशोभित केला असून जातिवंत अश्वांनीं युक्त होता. दारुकानें सर्व रत्नांनीं भूषविलेला व मेघाप्रमाणें गंभीर ध्वनि करणारा आपला दिव्य रथ आणलेला पहातांच महात्म्या जनार्दनानें अग्नि व ब्राह्मण यांना प्रदक्षिणा केली आणि आपला कौस्तुभ-

मणि कंठांत धारण करून परम श्रीनें देदीप्यमान होणारा तो शौरी रथावर चढला. त्या वेळीं कौरवांनीं परिवेष्टित असलेला तो यादवनंदन वृष्णिवीरांकडून अभिरक्षित होता. सर्व प्राण्यांतील श्रेष्ठ व सर्व बुद्धिमानांतील वरिष्ठ दाशार्हाच्या मागून धर्मवेत्ता विदुर त्याच्याच रथांत बसला. दुर्योधन व शकुनि परंतप कृष्णाच्या मागोमाग दुसऱ्या रथांतून निघाले. त्यांच्या मागून सात्यकि, कृतवर्मा व इतर वृष्णिवीर अनेक रथ, गज, अश्व इत्यादि वहानांतून कृष्णाला अनुसरले.

हे राजन्, त्यांचे ते सुवर्णानें भूषविलेले व श्रेष्ठ अश्वांनीं युक्त असलेले विचित्र रथ गंभीर ध्वनि करीत जात असतां सुवासिक जलानें सिक्त केलेले ते राजमार्ग अतिशय शोभले. ज्या मार्गांवरून अनेक राजर्षींनीं संचार केला होता, त्या राजमार्गांवरून आपल्या उज्ज्वल कांतीनें प्रकाशणारा धीमान् कृष्ण चालला असतां शंख-भेरी इत्यादि अनेक वाद्यें वाजूं लागलीं. सिंहतुल्य पराक्रमी तरुण वीर शौरीच्या रथाला वेढून चालले होते व विचित्र वस्त्रें परिधान केलेले व विविध आयुधांनीं युक्त असलेले सहस्रावधि योद्धे कृष्णाच्या पुढें चालले होते. पांचशें गज व हजारों रथ दाशार्हाच्या मागून येत होते.

जनार्दनाला पहाण्यासाठीं कौरवांची सर्व राजधानी राजमार्गांत आली, त्यामुळें आबालवृद्ध स्त्रीपुरुषांनीं ते सर्व राजमार्ग व्यापून गेले. घरांच्या ओट्यावर स्त्रियांची गर्दी जमल्यामुळें तीं घरें त्यांच्या भारानें हालतच आहेत कीं काय असा भास झाला.

याप्रमाणें कौरवांकडून सत्कार होत असतां तो जनार्दन मधुर कथा ऐकत व लोकांचा उलट सन्मान करीत, त्याच्या सन्मानार्थ केलेली मार्गांतील शोभा पहात, हळुहळू कौरवसभेच्या समीप आला. श्रीकृष्ण सभाद्वारीं येऊन पोंचतांच त्याच्या अनुयायांनीं मंगल वाद्यांच्या ध्वनींनीं सर्व दिशा भरून टाकिल्या. श्रीकृष्णाच्या आगमनाची आकांक्षा करणारी ती अमित तेजस्वी राजांची सभा हर्षानें रोमांचित झाली. मेघाप्रमाणें गंभीर रथनिर्घोष कानीं पडतांच श्रीकृष्ण समीप येऊन पोंचला आहे, हें जाणून ते सर्व भूपाल हृष्ट झाले.

नंतर तो सात्वतश्रेष्ठ कैलासशिखराप्रमाणें उंच व शुभ्र असलेल्या रथांतून खालीं उतरला व विदुर आणि सात्यकि यांचे हात धरून त्या शौरीनें इंद्रभुवनासारख्या कौरवसभेंत प्रवेश केला. तें सभागृह नवमेघांप्रमाणें देदीप्यमान

दिसत होतें. त्या सभेंत जातांच आदित्य जसा आपल्या प्रकाशानें सर्व ग्रहांना लोपवून टाकितो, तसें कृष्णानें आपल्या तेजानें सर्व कौरवांना दिपवून टाकिलें.

हे राजन्, सभेंत प्रवेश करतेवेळीं वासुदेवाच्या अग्रभागीं कर्ण व दुर्योधन होते आणि पृष्ठभागीं कृतवर्मा व वृष्णिवीर होते.

श्रीकृष्णानें सभेंत प्रवेश केलेला पहातांच धृतराष्ट्राला पुढें करून भीष्म-द्रोणादि सर्व आपापल्या आसनावरून उठून उभे राहिले व त्यांनीं जनार्दनाचें स्वागत केलें. जनेश्वर प्रज्ञाचक्षु राजा धृतराष्ट्र उठून उभा राहिला आहे, असें पहातांच इतर सहस्रावधि राजेहि सर्वतः उठून उभे राहिले. धृतराष्ट्राच्या आज्ञेनें त्या सभेंत सुवर्णानें अलंकृत केलेलें अष्टकोनी श्रेष्ठ सिंहासन श्रीकृष्णासाठीं ठेविलें होतें. माधवानें धृतराष्ट्र व भीष्म-द्रोण यांच्याशीं स्मितपूर्वक संभाषण करून इतर सभासदांशींहि त्यांच्या वयोनुरूप यथान्याय भाषण केलें. त्यावेळीं सभेंत आलेल्या केशवाचा सर्व पार्थिव व कौरव यांनीं सर्वप्रकारें सत्कार केला.

( २ ) याप्रमाणें त्या राजसभेंत परंतप दाशार्हाचा सन्मान होत असतां अंतरिक्षांत ऋषिसमुदाय त्याच्या दृष्टीं पडला. तेव्हां त्या नारदादि श्रेष्ठ ऋषींना पाहून श्रीकृष्ण शांतनव भीष्माला हलकेच म्हणाला—"हे नृपा, भूलोकांतील ही सभा पहाण्यासाठीं ऋषी आले आहेत. त्यांना विशेष सत्कारपूर्वक निमंत्रण देऊन आसनें द्या. ते अतीन्द्रिय महात्मे आसनांवर बसल्यावांचून आपल्यांपैकीं कोणालाहि बसतां येणें शक्य नाहीं. यास्तव सत्वर त्यांचें पूजन करा."

( ३ ) इतक्यांत शांतनव भीष्मानें सभाद्वारांत उभ्या असलेल्या ऋषींना पाहिलें व सत्वर आसनें तयार करण्याची सेवकांना आज्ञा केली. तेव्हां त्यांनीं रत्नजडित सुवर्णाचीं प्रशस्त व विपुल आसनें तत्काल तेथें आणून ठेविलीं. त्यांवर ते महर्षि बसले. त्यांना अर्घ्यादि अर्पण केल्यावर कृष्ण व इतर सर्व राजे आपापल्या आसनावर आरूढ झाले.

हे भारता, दुःशासनानें सात्यकीला उत्तम आसन दिलें. विविंशतीनें कृतवर्म्याला सुवर्णाचें सिंहासन दिलें. श्रीकृष्णाच्या समीप एकाच विशाल आसनावर अमर्षी कर्ण व दुर्योधन बसले. गांधारवीरांनीं ज्याचें रक्षण केलें आहे, असा गांधारराज शकुनि आपल्या पुत्रांसह एका विस्तीर्ण आसनावर बसला. विदु-

रावें आसन रत्नजडित असून तें शुक्लपक्षांतील चंद्रप्रभेशीं स्पर्धा करणाऱ्या शुभ्र अजिनानें मढविलें होतें. महाबुद्धिमान् विदुर शौरीच्या सिंहासनाला हातानें स्पर्श करून मग आसनारूढ झाला.

अमृतानें जशी तृप्ति होत नाहीं, तशी दीर्घकालानें दृष्टीं पडलेल्या दाशार्हाला पाहून ते पार्थिव तृप्त झाले नाहींत. त्यावेळीं जनार्दनानें पिवळा पितांबर परिधान केला असून त्याची अंगकांति आतसीपुष्पाप्रमाणें नीलवर्ण होती. सुवर्णाच्या कोंदणांत बसविलेल्या रत्नाप्रमाणें त्या राजसभेंत तो भगवान् शोभत होता. अशा गोविंदाकडे पहाण्यांत सर्वांचें मन तल्लीन झाल्यामुळें तेथें पूर्णपणें शांतता पसरली होती. कोणाहि पुरुषानें मुखांतून एक शब्दहि उच्चारला नाहीं. ५. ६. ९४.

---

## अध्याय ९५ वा.

[ १ पुत्रांचा निग्रह करून पांडवांचा राज्यांश त्यांना परत देण्याविषयीं श्रीकृष्णाचा धृतराष्ट्राला उपदेश. २ पांडव शम किंवा युद्ध या दोहोंला तयार आहेत. यांतील तुला जें हितावह वाटेल तें कर. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें ते सर्व भूपाल स्वस्थ बसले असतां श्रीकृष्णानें घनगंभीर वाणीनें भाषणास आरंभ केला. वर्षाकालीं होणाऱ्या मेघगर्जनेप्रमाणें सर्व सभेला ऐकूं जाईल अशा उच्च स्वरानें माधव धृतराष्ट्राकडे पाहून असें वचन बोलला—

**भगवान्**—हे भारता, कौरव आणि पांडव यांचा शम व्हावा व क्षत्रिय वीरांचा नाश होऊं नये, अशी याचना करण्यासाठीं मी आलों आहें. हे राजन्, तुला सर्व निःश्रेयस अवगत आहे. जेवढें वेद्य आहे तें सर्व तूं जाणतोस. तुझें हें भारतकुल सर्व राजकुलांत श्रेष्ठ आहे. या कुलांतील पुरुष सर्व उत्तम गुणांनीं युक्त असून विद्या व शील यांनीं संपन्न आहेत. कुरुकुलांतील पुरुष परदुःखानें दुःखित होणारे, दुसऱ्याचे क्लेश दूर करण्याची इच्छा करणारे आणि अपकार करणारांवरहि स्नेह करणारे आहेत, त्यांच्या ठिकाणीं क्रौर्य नसून ते आर्जव, क्षमा व सत्य यांनीं युक्त आहेत.

अशाप्रकारच्या श्रेष्ठ कुलांत विशेषतः तुझ्या निमित्तानें असे विपरीत प्रकार घडावे, हें योग्य नव्हे. ( तुझे पुत्र दया, सत्य, आर्जव इत्यादि गुणांच्या विप-

रीत असलेल्या परपीडा, कौटिल्य इत्यादि दोषांनीं युक्त आहेत. ) हे कुरुसत्तमा, तूंच कौरवांतील श्रेष्ठ आहेस. तुझे दुर्योधनादि पुत्र धर्मार्थाला दूर सारून पांडवांशीं क्रूर आचरण करीत आहेत. त्यांनीं द्यूतादि उघड व जतुगृहादि गुप्त कपटाचरण केलें आहे.

शिष्टाचार व मर्यादा यांचें उल्लंघन करणाऱ्या त्या धार्तराष्ट्रांचें मन लोभानें व्याप्त झालें आहे. ते पांडवांशीं कसें व किती अश्लाघ्य वर्तन करीत आहेत, हें सर्व तुला अवगत आहे. पण त्यामुळें आतां कौरवांवरच ही फार मोठी आपत्ति ओढवली आहे.

त्याची उपेक्षा केल्यास पृथ्वीचा नाश होईल. हे भारता, आपल्या कुलाचा क्षय व्हावा, अशी जर तुझी इच्छा नसेल तर तूं आपल्या पुत्रांचें निवारण करून शम कर. शम करणें दुष्कर आहे, असें मला वाटत नाहीं. हे राजा, शम करणें तुझ्या व माझ्या हातीं आहे. तूं पुत्रांना स्वस्थ कर. मी पांडवांना स्थिर करतों. हे राजेंद्रा, तुझ्या पुत्रांनीं अनुयायांसह तुझ्या आज्ञेचें पालन करावें, हें त्यांचें कर्तव्यच आहे. कारण तुझ्या आज्ञेंत राहाण्यांतच बलाढ्य असलेल्या त्यांचें कल्याण आहे व पांडवांचेंहि हित आहे.

हे विशांपते, शम करण्यासाठीं पुत्रांना आज्ञेंत ठेवण्याची इच्छा करणाऱ्या तुझें व शमाचा यत्न करणाऱ्या माझेंहि त्यांत हितच आहे. यास्तव वैर नाहींसें करून शम कर. शमामध्यें सर्व भारत तुला साह्य करतील. पांडवांशीं शम करून त्यांच्याकडून अभिरक्षित असलेला तूं धर्मार्थांत स्थित हो. पांडवांसारखे संरक्षक तुला मोठ्या यत्नानेंहि मिळणार नाहींत. महात्म्या पांडवांकडून संरक्षित असलेल्या तुला जिंकण्यास सर्व देवांसह इंद्रहि समर्थ होणार नाहीं.

हे भरतश्रेष्ठा, ज्याच्या पक्षांत भीष्म-द्रोणादि आचार्य, पांडवांसारखे वीर व सोमदत्त-सात्यकि-बाल्हिकादि बलाढ्य भूपाल आहेत, त्याच्याशीं युद्ध करण्यास कोणता अविचारी मनुष्य उभा राहील ! कौरव-पांडवांचें सख्य झालें असतां, तूं शत्रूकडून दुराधर्ष होऊन पृथ्वीचा सार्वभौम राजा होशील. तुझ्या समान इतर भूपति तुझ्याशीं स्पर्धा न करतां स्नेह जोडतील व बलाढ्य राजे संधि करतील. याप्रमाणें पुत्र, पौत्र, भ्राते, सुहृद्, यांच्याकडून सर्वतः सुरक्षित असलेल्या तुझें जीवन सुखी होईल.

यास्तव राजा, पांडवांना पूर्ववत् त्यांचा राज्यभाग दे. म्हणजे तूं समग्र पृथ्वीचें निष्कंटक राज्य भोगशील. याप्रमाणें हे सर्व राजे, पांडव व तुझे पुत्र,



" जी मी परक्यांच्या आश्रयानँ जिवंत राहिल्यँ आहँ, त्या माझ्या जीविताला धिक्कार असो."

( पृ. ३८६ )

त्या प्रतिज्ञेपासून मुळींच च्युत झालों नाहीं, हें सर्व ब्राह्मणांना ठाऊक आहे. यास्तव तूंहि आपली प्रतिज्ञा आतां खरी कर.

हे राजन्, आम्हीं प्रतिज्ञेचें पालन करीत असतां अतिशय क्लेश सहन केले. यास्तव आम्हांला आमचा राज्यांश परत मिळावा. तूं धर्मार्थांना योग्यप्रकारें जाणतोस, तूंच आमचें रक्षण कर. तूं आमचा पिता आहेस. त्या संबंधाकडे लक्ष देऊनच आम्हीं अनेक प्रकारचे क्लेश सहन केले. तो तूं आमच्याशीं पितृ-मातृवत् वर्तन कर, शिष्यांनीं गुरूच्या ठिकाणीं जशी वृत्ति ठेवावयास पाहिजे, तसेच आम्ही तुझ्याशीं वागलों आहों. यास्तव तूंहि आमच्याशीं तसाच वाग. आम्ही उन्मार्गानें वागूं लागलों असतां तुझ्या सारख्या पित्यानें आम्हांला सन्मार्गात स्थापावें, असा न्याय आहे. तस्मात् आम्हांला सन्मार्गात स्थापून स्वतः तूंहि सद्धर्मात स्थित हो.

हे भरतश्रेष्ठा, तुला असा निरोप सांगून पांडवांनीं या सभेला उद्देशून असें सांगितलें आहे कीं, येथें जमलेल्या सर्व धर्मज्ञ सभासदांनीं या प्रसंगीं स्वस्थ बसून हा अन्याय पहाणें योग्य नव्हे. ज्या सभेंत धर्माची अधर्मानें व सत्याची असत्यानें हानि होत असते, त्या सभेंतील तो अधर्म स्वस्थपणानें पहाणारे सभासदहि हत होतात. ज्या सभेंत अधर्मानें धर्म विद्ध होत असतां तेथील सभासद तें शल्य दूर करीत नाहींत, ते सभासदहि अधर्मानें विद्ध होतात. नदी ज्याप्रमाणें तीरावरील वृक्षांचें उन्मूलन करिते, त्याप्रमाणें आपल्या समक्ष घडणाऱ्या अधर्माकडे पहात स्वस्थ चिंतन करीत बसणाऱ्या सभासदांचा धर्म त्यांचा समूळ नाश करितो. तस्मात् या प्रसंगीं धर्मज्ञ सभासदांनीं तटस्थ राहूं नये. तर जें धर्म्य व न्याय असेल तें स्पष्ट सांगावें.

हे जनेश्वरा, पांडव धर्मनिष्ठ आहेत. ते धर्मावर श्रद्धा ठेवून प्रतिज्ञेप्रमाणें आतांपर्यंत स्वस्थ बसले आणि जेव्हां योग्य काल प्राप्त झाला, तेव्हांच ते आपला राज्यांश मागत आहेत. त्यांचा हा निरोप सत्य, धर्म व न्याय यांनीं युक्त आहे. या प्रसंगीं त्यांचें राज्य परत देण्यावांचून दुसरें कोणतें उत्तर देणें तुला शक्य आहे! माझें हें बोलणें जर धर्मार्थांच्या विरुद्ध असेल, तर या सभेंत जमलेल्या सभासदांनीं तसें सांगावें. हे पुरुषश्रेष्ठा, पांडवांची प्रार्थना मान्य करून तूं या सर्व क्षत्रियवीरांस मृत्युपाशांतून सोडीव. हे राजन्, क्रोधाच्या अधीन होऊं नको. शान्त हो. पांडवांना त्यांच्या पितरांच्या राज्याचा उचित अंश देऊन तूं पुत्रांसह कृतार्थ हो व सर्व ऐश्वर्याचा उपभोग घे.

अजातशत्रु युधिष्ठिर सर्वदा सज्जनांच्या धर्मांत स्थित आहे, हें तूं जाणतोसच आणि पुत्रांसह तूं पांडवांशीं कशाप्रकारें वागलास हेंहि लक्षांत आण. तुम्हीं त्यांना लाक्षागृहांत जाळण्याचा यत्न केलात. कपटद्यूतानें राज्यापासून दूर केलेंत. तरीहि त पुनः तुझ्याच आश्रयाला आले आहेत. तूंच पुत्रांसह युधिष्ठिराला इंद्रप्रस्थांत रहाण्यास पाठविलेंस. त्यानें तेथें राहून तुझ्यासह सर्व पार्थिवांना आपल्या अधीन करून घेतलें, परंतु त्यानें तुझें उल्लंघन कदापि केलें नाहीं. अशा प्रकारें वागणाऱ्या युधिष्ठिराच्या राष्ट्राचें व धन-धान्याचें हरण करण्याची इच्छा करणाऱ्या शकुनीनें त्यांच्याशीं कपटद्यूत केलें. तथापि दासत्वास प्राप्त होऊन व कौरवसभेंत कृष्णेला आणलेली पाहूनहि क्षत्रधर्मांत स्थित असलेला तो गंभीरवृत्ति युधिष्ठिर धर्मापासून यत्किंचित्‌हि च्युत झाला नाहीं.

हे राजा, मी त्यांचें व तुझें श्रेय इच्छीत आहें. धर्म, अर्थ व सुख यांपासून च्युत होऊन प्रजेचा नाश करूं नको. अनर्थाला अर्थ व स्वतःच्या हिताला अहित मानणारे तुझे पुत्र लोभामध्यें आसक्त झाले आहेत. त्यांचा निग्रह कर. हे परंतपा, पार्थ तुझ्या सेवेला तत्पर आहेत व युद्धालाहि सज्ज आहेत. यास्तव यांतील तुला जें कांहीं हितावह वाटेल, तें तूं कर.

**वैशंपायन**—राजा, सर्व भूपालांनीं कृष्णाच्या या भाषणाचें मनःपूर्वक अभिनंदन केलें. त्यांतील कोणीहि त्याच्यापुढें एक शब्ददेखील उच्चारण्यास समर्थ झाला नाहीं. ५. ६. ९५.

---

## अध्याय ९६ वा.

[ १ जामदग्न्यानें गर्वानें होणारा विनाश व अर्जुनाचें माहात्म्य सांगण्यासाठीं केलेलें दम्भोद्भव आख्यानाचें कथन. ]

**वैशंपायन**—जनमेजया, महात्म्या केशवाचें तें भाषण ऐकून सर्व सभासद रोमांचित व स्तब्ध होऊन बसले. कोणताहि पुरुष त्याला उत्तर देण्यास समर्थ नाहीं, असें सर्व राजे मनांत समजले. याप्रमाणें ते सर्व भूपति स्वस्थ बसले असतां त्या कौरवसभेंत जामदग्न्य राम असें वचन बोलला—

(१) **जामदग्न्य**—माझें हें दृष्टान्तपूर्वक सत्य भाषण निःशंक मनानें श्रवण कर व हे राजा, तुला जर तें योग्य वाटलें तर तूं आपल्या हिताचा मार्ग स्वीकार.

पूर्वी दम्भोद्भव नामक एक सार्वभौम राजा होऊन गेला. त्यानें समग्र पृथ्वीचें राज्य भोगलें, असें आम्हीं ऐकलें आहे. तो पराक्रमी राजा नित्य रात्र संपून दिवस उगवतांच ब्राह्मण व क्षत्रिय यांना असा प्रश्न करीत असे-"या पृथ्वीतलावर माझ्या सारखा युद्धनिपुण किंवा माझ्याहून श्रेष्ठ शास्त्रवेत्ता असा एखादा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र आहे काय !"

असा प्रश्न करीत त्या राजानें समग्र पृथ्वीवर संचार केला. तो भूपाल दर्पानें अतिशय मत्त झाला होता व कोणाचीहि गणना करीत नसे. वारंवार आत्मश्लाघा करणाऱ्या त्या राजाचा विद्वान् निस्पृह ब्राह्मण निर्भयपणें निषेध करीत असत. तरीहि निषेध करणाऱ्या त्या द्विजांना ऐश्वर्यानें मत्त झालेला तो मानी राजा पुनः पुनः तोच प्रश्न करीत असे. तेव्हां ब्रह्मात्मैक्य जाणणारे ते तपस्वी महात्मे क्रोधसंतप्त होऊन त्या दृप्त राजाला म्हणाले—"हे राजन्, युद्धांत अनेकांना जिंकणारे दोघे श्रेष्ठ पुरुष आहेत, त्यांच्यासारखा तूं केव्हांहि होणार नाहींस."

ब्राह्मणांनीं असें म्हटलें असतां राजानें त्या द्विजांना पुनः प्रश्न केला—"ते वीर कोठें आहेत ! त्यांचा जन्म कोठें झाला ! ते कोणतें कर्म करितात व ते कोण आहेत ! हें मला सांगा."

ब्राह्मण—हे पार्थिवा, ते नर-नारायणनांवाचे तापस आहेत. ते दोघे पृथ्वीतलावर आले आहेत, असें आम्ही ऐकतों. त्यांच्याशीं तूं युद्ध कर. ते दोघे महात्मे नर-नारायण गंधमादन पर्वतावर अनिर्वाच्य असें घोर तप आचरीत आहेत, असें म्हणतात.

ब्राह्मणांचें हें वचन ऐकून तो अमर्षी राजा रथ, अश्व, गज, उंट, पदाति व वहानें या सहा अंगांनीं युक्त असलेली आपली प्रचंड सेना घेऊन त्या अपराजित वीरांकडे जावयास निघाला.

गंधमादन पर्वतावर जाऊन त्या दुर्गम व घोर अरण्यांत वनाचा आश्रय करून राहिलेल्या त्या दोघां तापसांचा त्यानें शोध केला. तेव्हां क्षुत्पिपासेनें कृश झालेले व शीत, वात, उष्ण यांचे क्लेश सहन करणारे ते दोघे पुरुषोत्तम त्याच्या दृष्टीं पडले. त्या दोघांचाहि अस्थिपंजर उरला होता. त्यांच्या शरीरावरील शिरा स्पष्ट दिसत होत्या. राजानें त्यांच्या समीप जाऊन त्यांना वंदन केलें व कुशल विचारलें.

तेव्हां त्या तापसांनीं राजाला फलें, मूळें, उदक, आसनादि अर्पण करून त्याचें आतिथ्य केलें व ‘ आम्हीं तुझें कोणतें कार्य करावें ! ’ असा प्रश्न केला.

राजानें आपला पूर्वीपासूनचा सर्व वृत्तान्त त्यांना कथन केला व स्वतःची कीर्तिहि निवेदन केली. तो म्हणाला—“ मीं सर्व शत्रूंचा संहार करून आपल्या बाहुबलानें समग्र पृथ्वी जिंकली आहे व आतां तुम्हां दोघांशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें या पर्वतावर आलों आहें. यास्तव माझी फार दिवसांपासूनची इच्छा पूर्ण करा म्हणजे माझें योग्य आतिथ्य होईल.

नर-नारायण—हे राजश्रेष्ठा, आमचा हा आश्रम क्रोध व लोभ यांनीं रहित आहे. या आश्रमांत युद्ध कोठलें ! व शस्त्र कोठलें ! आणि अनृजुता तरी कोठली असणार ! यास्तव तूं अन्यत्र जाऊन युद्धाची इच्छा कर. या पृथ्वीतलावर पुष्कळ क्षत्रिय आहेत.

राम—धृतराष्ट्रा, याप्रमाणें त्या महात्म्यांनीं त्याला क्षमा करून वारंवार त्याचें सान्त्वन केलें. तथापि तो मत्त राजा शांत झाला नाहीं. उलट युद्धाची इच्छा करणाऱ्या दम्भोद्भवानें त्या तापसांना युद्धाचें आह्वान केलें. तेव्हां नरानें मुठींत ‘ ईषीका ’-नांवाचें तृण घेऊन त्याला म्हटलें—“हे युद्धकामुक क्षत्रिया, ये, युद्ध कर. तूं आपलीं सर्व शस्त्रें व सैन्य सज्ज कर. मी आजपासून तुझी युद्धाची आकांक्षा घालवितों. ”

दम्भोद्भव—हे तापसा, तूं आमच्याशीं युद्ध करण्यास हेंच अस्त्र जर युक्त मानीत असलास, तर हरकत नाहीं. मी यानेंहि तुझ्याशीं युद्ध करीन. कारण मी युद्धार्थी आहें.

राम—हे भारता, असें बोलून दम्भोद्भवानें आपल्या सैनिकांसह त्या तापसाच्या वधेच्छेनें त्याला शरवृष्टीनें सर्वतः व्यापून टाकिलें. पण तो दम्भोद्भव शत्रूंच्या शरीरांस छिन्न-भिन्न करणारे घोर शर सोडीत असतांनाहि त्या सर्वांस तुच्छ करून त्या अपराजित मुनीनें आपलें घोर ईषीकास्त्र सोडिलें. तें अस्त्र अनिवार्य असल्यामुळें त्यानें मोठें आश्चर्य घडवून आणिलें. त्या लक्ष्यवेधी मुनीनें आपल्या हातांतील ईषीकांनीं दम्भोद्भव व त्याचे सैनिक यांचे डोळे, कान व नासिका यांस वेध केला.

तेव्हां सर्व श्वेत आकाश ईषीकांनीं व्यापलेलें पाहून तो राजा त्या तापसाच्या चरणांवर मस्तक ठेवून ‘ माझें स्वास्थ्य राहो ’ असें म्हणाला.

तें ऐकून शरण जाण्यास योग्य असलेला तो नर त्या शरणागत राजास म्हणाला—" हे राजन्, तूं ब्राह्मणभक्त व धर्मात्मा हो. पुनः असें करूं नको. मनानें क्षत्रधर्माचें स्मरण करणारा कोणताहि पुरुष असें वर्तन करीत नाहीं. यास्तव हे नृपश्रेष्ठा, तूं असा दृप्त होऊं नको. आपल्याहून हीन किंवा विशिष्ट असलेल्या कोणाचाहि धिक्कार करूं नको. आपलें चित्त शान्त कर.

हे पार्थिवा, तूं कृतप्रज्ञ, लोभरहित, निरहंकार, सावधान, दान्त, क्षान्त, मृदु व सौम्य होऊन प्रजेचें पालन कर. दुसऱ्याचें बलाबल जाणल्यावांचून पुनः असा कोणाचा तिरस्कार करूं नको. मी तुला आतां परत जाण्याची अनुज्ञा देतों. तूं सुखानें जा व पुनः असें वर्तन करूं नको. आमच्या सांगण्यावरून तूं ब्राह्मणांना त्यांचें कुशल विचार.

असें बोलून तो राजा त्या दोघां तापसांच्या चरणांना वंदन करून आपल्या नगरीस निघून गेला व पुढें धर्माचरणच करीत राहिला.

पूर्वी नरानें असें अद्भुत कर्म केलें, पण नारायण त्याच्याहून असंख्य गुणांनीं श्रेष्ठ आहे. तस्मात् जोंवर अर्जुनानें आपल्या श्रेष्ठ गांडीव धनुष्यावर अस्त्र योजिलें नाहीं, तोंवर मान सोडून धनंजयाला शरण जा. कांकुदीक, शुक, नाक, अक्षिसंतर्जन, संतान, नर्तक व घोर आस्यमोदक या आठ अस्त्रांनीं विद्ध होऊन

---

१ ज्या अस्त्रानें पराभूत झालेले वीर रथांत किंवा गजादि वाहनांच्या खांद्यावर शयन करितात तें काकुदिक. यालाच प्रस्वापन म्हणतात. ज्या अस्त्राच्या योगानें शुक-नलिकान्यायानें अभयस्थानींहि भीतीची कल्पना करून अश्व, रथ इत्यादिकांना दृढ धरून ठेवितात, तें शुकास्त्र त्यालाच मोहनास्त्र म्हणतात. ज्याच्या योगानें वीर स्वर्गांतील नगर पहातो, तें नाकास्त्र, यालाच उन्मादन म्हणतात. ज्या अस्त्राचा प्रयोग करतांच विद्ध झालेले शत्रु शरीराच्या विविध द्वारांनीं मलस्राव करूं लागतात, तें अक्षिसंतर्जन. त्यालाच त्रासन असें दुसरें नांव आहे. शस्त्रांची सतत वृष्टि करणाऱ्या ऐंद्रादि दिव्य अस्त्रांना संतान म्हणतात. शत्रूंना नृत्य करावयास लावणाऱ्या अस्त्रास नर्तन किंवा पैशाच असें नांव आहे. शत्रूंचें कदन करणाऱ्या घोर अस्त्राला राक्षस असें दुसरें नांव आहे. ज्या अस्त्रानें विद्ध झालेले वीर तोंडांत पाषाण धरून मरणासाठींच प्रवृत्त होतात तें आस्यमोदक होय. यालाच 'याम्य' हें दुसरें नांव आहे.

सर्व मानव मरण पावतील. काम-क्रोध, लोभ-मोह, मद-मान व मात्सर्य आणि अहंकार हे आठ विकार हींच याचीं उदाहरणें आहेत.

या अस्त्रांच्या योगानें शत्रु उन्मत्त व भानरहित होऊन यथेष्ट चेष्टा करूं लागतात, अविवेकी होऊन झोंपतात, उड्या मारूं लागतात, शिंका देतात, मलोत्सर्ग करतात, सतत रडतात व हंसतात.

हे भारता, हा नारायण सर्व लोकांना निर्माण करणारा, सर्वांचें कर्म जाणणारा ईश्वर आहे. असा तो प्रभु ज्याचा सखा आहे, तो अर्जुन युद्धांत दुःसह आहे. त्याला जिंकण्यास तिन्ही लोकांत कोण समर्थ आहे ! कपिध्वज जिष्णूच्या समान युद्धांत दुसरा वीर नाहीं. पार्थ असंख्य गुणानीं संपन्न असून जनार्दन त्याच्याहूनहि विशिष्ट आहे. तूंहि कुंतीपुत्र धनंजयाला चांगला जाणतोस.

मीं जे नर-नारायण सांगितले, तेच हे वीरांतील श्रेष्ठ केशवार्जुन होत, असें तूं समज. हे भारता, मी जें सांगत आहें, तें जर तूं यथार्थ मानीत असशील, मजविषयीं साशंक नसशील, तर श्रेष्ठ बुद्धीचा आश्रय करून पांडवांशीं शम कर.

हे भरतश्रेष्ठा, युद्ध करण्याचें मनांत आणूं नको. तुमचें हें कुरुकुल भूलोकीं सर्वमान्य व प्रसिद्ध आहे. तें तसेंच कायम राहो. तुझें कल्याण असो. तूं आपल्या हिताचाच विचार कर. ५. ६. ९६.

---

## अध्याय ९७ वा.

[ १ महर्षि कण्वानें श्रीकृष्णाचें महत्त्व दर्शविण्यासाठीं केलेलें मातलिवरान्वेषण आख्यानाचें कथन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, परशुरामाचें वचन ऐकल्यानंतर भगवान् कण्वऋषिहि त्या कौरवसभेंत दुर्योधनाला असें म्हणाला—

कण्व—लोकपितामह ब्रह्मदेव जसा अक्षय व अव्यय आहे, तसेच ते दोघे भगवान् नर-नारायण आहेत. सर्व अदितिपुत्रांत एक सनातन विष्णुच शाश्वत, अजय्य म्ह० जिंकण्यास अशक्य, अक्षय, प्रभु म्ह० जगाचें उपादान कारण व ईश्वर आहे. चंद्र, सूर्य, पृथ्वी, जल, वायु, अग्नि, आकाश, ग्रह व तारागण हे सर्व नाशवंत आहेत. जगाच्या प्रलयकालीं ते तिन्ही लोकांचा त्याग करून क्षय पावतात व ते सर्व लोक पुनः पुनः निर्मिले जातात. त्याच-

प्रमाणें मानव, मृग, पक्षी, तिर्यक् व अन्य चर जीव-जंतु आपापला काल आला असतां मृत्युवश होतात.

असंख्य राजे ऐश्वर्याचा उपभोग घेऊन आयुष्य क्षीण झालें असतां आपलें सुकृत-दुष्कृत भोगण्यासाठीं तरुण असले तरी परलोकीं जातात. तस्मात् हे दुर्योधना, तूं युधिष्ठिराशीं शम करावास हेंच योग्य होय. पांडव व कौरव मिळून पृथ्वीचें पालन करोत. हे सुयोधना, 'मी बलवान् आहें' असा गर्व तूं बाळगूं नको. कारण बलवानांहूनहि उत्तरोत्तर बलढ्य लोक दिसतात. हे कौरवा, केवल विपुल सैन्यानें सामर्थ्य वाढत नसतें. स्वाभाविक बल सर्वांत श्रेष्ठ आहे. ते सर्व पांडव देवतुल्य पराक्रमी असून स्वाभाविक बलानें युक्त आहेत.

धृतराष्ट्रा, कन्यादानासाठीं योग्य वराचा शोध करणाऱ्या मातलीची एक पुरातन कथा सांगत असतात ती ऐक. इंद्राचा 'मातलि'-नामक प्रख्यात सारथि आहे. त्याला गुणकेशी नांवाची अतिशय रूपवती कन्या होती. एखाद्या देवांगनेप्रमाणें तिच्या अलौकिक लावण्याची प्रसिद्धि होती. अंगकांति व सौंदर्य यांत तिनें इतर सर्व स्त्रियांचें अतिक्रमण केलें होतें.

हे राजन्, तिच्या विवाहाचा काल प्राप्त झाला असतां भार्येसह मातलीनें पुष्कळ विचार केला व तो तत्पर होऊन वराचा शोध करूं लागला. तो म्हणाला—"उच्च, प्रसिद्ध व सात्त्विक मानवकुलांत कन्येचा जन्म होणें याला धिक्कार असो.

सज्जनांची कन्या मातृकुल, पितृकुल, व ज्या कुलांत ती द्यावयाची तें भावी पतीचें कुल या तीन कुलांना साशंक करिते ('या कन्येचा परिग्रह करावा कीं करूं नये' असा त्यांच्या मनांत संशय उत्पन्न होतो.) मीं देवलोक व मानुषलोक या दोन्ही लोकीं प्रवेश करून मानुषज्ञानानें वराचा शोध केला. पण मला एकहि अनुरूप वर आढळला नाहीं."

कण्व—हे राजन्, असें बोलून मातलीनें देव, दैत्य, गंधर्व व अनेक ऋषि या सर्वांचा वरार्थ शोध केला. पण त्यांतील कोणीहि त्याच्या मनाला योग्य वाटला नाहीं. नंतर एका रात्रीं मातलीनें आपल्या सुधर्मा भार्येशीं संकेत करून नागलोकीं जाण्याचा विचार केला.

मातली—देव किंवा मानव यांच्यामध्यें मला गुणकेशीच्या रूपाला अनुरूप असा वर एकहि दिसत नाहीं. पण अशा प्रकारचा वर नागलोकीं निश्चित असेल. तेथें मी जातों.

भार्येशीं असा संकेत करून मातलीनें तिला प्रदक्षिणा घातली. कन्येच्या मस्तकाचें अवघ्राण केलें व पातालांत प्रवेश केला. ५. ६. ९७.

---

## अध्याय ९८ वा.

[ १ वरान्वेषणासाठीं नागलोकीं जात असलेल्या मातलीची मार्गांत नारदाशीं भेट. त्याच्यासह वरुणलोकीं गमन. २ तेथील वर्णन. ]

( १ ) कण्व—धृतराष्ट्रा, याप्रमाणें मातलि जात असतां मार्गांत त्याची वरुणाला भेटावयास निघालेल्या महर्षि नारदाची यदृच्छेनें गांठ पडली. तेव्हां नारदानें त्याला विचारिलें—"हे सूता, तूं कोठें चालला आहेस ! तूं स्वतःच्या कार्यासाठीं निघाला आहेस ! किंवा इंद्राच्या आज्ञेनें कोठें जात आहेस !" नारदाचा हा प्रश्न ऐकून मातलीनें मार्गानें जात असतांनाच त्याला आपलें कार्य सविस्तर निवेदन केलें. तेव्हां मुनि त्याला म्हणाला—"तर मग आपण दोघेहि बरोबरच जाऊं या. मी सलिलाधिप वरुणाला भेटण्यासाठीं स्वर्गलोकांतून निघालों आहें. मी तुला समग्र पृथ्वी दाखवून सर्व माहिती देईन. तेथें एखादा योग्य वर आढळल्यास आपण त्याला निश्चित करूं."

असें बोलून मातलि व नारद या दोघां महात्म्यांनीं पातालांत प्रवेश केला व लोकपाल वरुणाचें दर्शन घेतलें. तेथें वरुणानें देवर्षीला योग्य अशा विधीनें नारदाचें पूजन केलें व इंद्राप्रमाणें मातलीचा सत्कार केला. नंतर आपलें कार्य त्याला निवेदन करून वरुणानें जाण्याची अनुज्ञा दिली असतां ते दोघे प्रसन्न चित्तानें नागलोकीं गेले. तेव्हां भूमीच्या अंतर्भागांत रहाणाऱ्या सर्व भूतांना जाणणाऱ्या नारदानें मातलीला असा निःशेष वृत्तान्त सांगितला—

(२) नारद—हे सूता, पुत्र-पौत्रांनीं परिवेष्टित असलेल्या वरुणाला तूं पाहिलेंच आहेस. आतां त्याचें हें सर्वतः समृद्ध व शुभ असलेलें स्थान पहा. जलाधिप वरुणाचा हा महाप्राज्ञ पुत्र शील, आचार व शुद्धि यांनीं विशिष्ट आहे. हा कमलनयन पुष्कर पित्याला अतिशय प्रिय आहे. त्या रूपवान् व दर्शनीय वरुणपुत्राला सोमकन्येनें पतित्वानें वरिलें आहे. 'ज्योत्स्नाकाली' या नांवानें प्रसिद्ध आणि रूपानें प्रतिलक्ष्मीच अशी सोमाची जी दुसरी कन्या, तिनें अदितीचा ज्येष्ठ व श्रेष्ठ पुत्र जो सूर्य त्याला आपला पति वरिलें, असें स्मृत

आहे. वारुणीचें सर्व सुवर्णमय असलेलें हें मंदिर पहा. या भवनाला प्राप्त होऊन देव सुरत्वाला प्राप्त झाले.

हे मातले, देवांनीं ज्यांचीं राज्यें हरण केलीं आहेत, अशा दैत्यांचीं हीं सर्व देदीप्यमान आयुधें पहा. हीं सर्व अक्षय्य आयुधें शत्रूंचा वध करून पुनः आपल्या स्वामीच्या हातीं परत येत असतात. याच प्रदेशांत पूर्वी राक्षसजातीय व दैत्यजातीय वीरांना देवांनीं युद्धांत जिंकलें होतें. या वारुण डोहांत ज्वाला-युक्त अग्नि सदैव प्रज्वलित असतो. या धूमरहित अग्नीनें विष्णूचें चक्रहि येथें प्रतिबद्ध केलें आहे, त्यामुळें येथें विष्णूच्या चक्रापासून भय नाहीं.

हें लोकांचा संहार करणारें गांडिव धनुष्य पहा. देवता याचें नित्य रक्षण करितात. हें धनुष्य गेंड्याच्या पाठीच्या कण्याचें केलें आहे. ज्या ज्या वेळीं जसें जसें कार्य उपस्थित होतें, त्या त्या वेळीं हें धनुष्य शतपट व सहस्रपट बल धारण करितें.

हें प्रचंड आयुध ब्रह्मवादी ब्रह्मदेवानें निमाण केलें आहे. तें राक्षसतुल्य अशासनीय राजांनाहि शासन करीत असतें. त्यामुळें राजांना हें चक्र सुदर्शना-हूनहि घोर भासतें. सलिलराज वरुणाचे पुत्र हें धनुष्य धारण करितात.

छत्रगृहांतील वरुणाचें हें छत्र पहा. हें मेघाप्रमाणें शीतल जलाची सर्वतः वृष्टि करितें. या छत्रापासून वहाणारें जल सोमाप्रमाणें निर्मल असूनहि तमानें आच्छादित झाल्यामुळें दृष्टीं पडत नाहीं. अशा अनेक प्रकारच्या अद्भुत वस्तु येथें आहेत. परंतु हे मातले, त्या पहाण्यांत वेळ घालविल्यास तुझ्या कार्याला विलंब होईल. यास्तव आपण आतां सत्वर जाऊं या. ५. ६. ९८.

---

## अध्याय ९९ वा.

[ १ नारदासह मातलीचें पातालदर्शन ]

( १ ) **नारद**—हे सूता, नागलोकाच्या मध्यभागीं स्थित असलेलें हें नगर 'पाताल' या नांवानें प्रसिद्ध आहे. दैत्य-दानव त्याचें सेवन करितात. भूलोकांतील जे जङ्गम प्राणी येथें जलप्रवाहाबरोबर प्रवेश करितात, ते भयार्त प्राणी येथें आक्रोश करीत असतात. येथें जलाचें शोषण करणारा असुर अग्नि सतत प्रज्वलित असतो. या अग्नीनें सर्व समुद्र व लोक यांना दग्ध करूं नये, म्हणून देवतांनीं मोठ्या यत्नानें त्याचा निग्रह केला आहे.

असुरांचा वध केल्यावर देवांनीं प्राशन करून उरलेलें अमृत येथेंच ठेविलेलें आहे. त्यामुळेंच येथून चंद्रोची क्षय-वृद्धि दिसत नाहीं.

अदितीचा पुत्र विष्णु या नाम-रूपात्मक जगाला वेदवाणीनें भरून काढण्यासाठीं याच पाताल लोकांत 'हयग्रीव'-नामक अवतार वेळोवेळीं धारण करितो. चंद्रकांत मण्यांतून जसा जलस्राव होत असतो, तसें येथील सर्व जलमूर्तीपासून 'अलं' म्ह० जलाचा 'पात'-म्ह० प्रवाह स्रवत असतो म्हणून हें स्थल '**पाताल**' या नांवानें प्रसिद्ध झालें.

जगाच्या हितासाठीं ऐरावत येथूनच जल नेऊन मेघांत स्थापितो व इंद्र त्याच शीतल जलाची पर्जन्यवृष्टि करितो. विविध प्रकारचे 'तिमि'-नामक जलचर प्राणी चंद्रप्रकाश प्राशन करून या जलांतच रहातात. या पातालतलाचा आश्रय करून रहाणारे कांहीं प्राणी आहेत. ते दिवसा सूर्याच्या प्रखर किरणांनीं मरण पावतात व रात्रीं चंद्रप्रकाशानें पुनः जिवंत होतात. येथें चंद्र नित्य उदय

---

१ ज्याअर्थी देवांनीं आपल्या शत्रूंना मारून व अमृत प्राशन करून राहिलेलें अमृत येथें स्थापिलें आहे, त्याअर्थी सोमाचे वृद्धि-क्षय दिसतात. हा भूगोल कंदुकाकार आहे. त्याला प्रदक्षिणा घालणाऱ्या सूर्याच्या व चंद्राच्या आड या भूगोलाचा कांहीं प्रदेश येतो. त्यामुळें सूर्य व चंद्र आच्छादित होऊन त्यांचें दर्शन होत नाहीं. तीच त्यांची रात्र होय. पण जे भूलोकाच्या ऊर्ध्वभागीं व अधोभागीं स्थित असतात, ते सूर्यादिकांना सर्वदाच पहातात. त्यांतील चंद्रमंडल जलमय आहे, सूर्याच्या तेजोमय रश्मींनीं तें प्रकाशित केलें जातें. सूर्य व चंद्र यांच्या मध्यें गतिवशात् जितकें जितकें अधिक अंतर पडतें, तितका चंद्र अधिक भासतो व ते जसे जसे परस्परांच्या समीप येऊं लागतात, तसे तसे सूर्याच्या अग्रभागीं असलेल्या अग्न्यादि देवतांकडून आमच्या दृष्टीनें चंद्रमंडल आच्छादित होतें. यालाच अनुलक्षून "प्रथमां पिबते वह्निर्द्वितीयां पिबते रविः"—चंद्राच्या पहिल्या कलेचें प्राशन अग्नि करितो, दुसरीचें सूर्य करितो, इत्यादि शास्त्र प्रवृत्त झालें आहे. येथील 'प्राशन' म्हणजे सांनिध्यानें केवल पोषण होणें, एवढाच अर्थ समजावा. पातालाच्या मध्यभागीं स्थित असलेल्या लोकांना मेरुशिखरावरील लोकाप्रमाणेंच चंद्र सर्वदा पूर्णच दिसतो. कारण त्यांच्या दृश्यप्रदेशीं अग्न्यादिकांचें आवरण नसतें. त्यामुळें या स्थानांतून चंद्राचे वृद्धि-क्षय दिसत नाहींत.

पावून आपल्या किरणांनीं अमृताला स्पर्श करितो व त्या अमृतमय किरणांनीं देह धारण करणाऱ्या जीवाचें संजीवन करितो.

हे सूता, इंद्रानें ज्यांचें ऐश्वर्य हरण करून घेतलें आहे असें अधर्मनिरत, बद्ध व कालानें पीडित झालेले दैत्य येथेंच रहातात. भूतपति महेश्वरानें सर्व भूतांच्या उत्कर्षासाठीं याच प्रदेशांत श्रेष्ठ तप आचरिलें. वेदपठन करणाऱ्या विप्रांनीं येथेंच गोव्रत आचरिलें व ज्यांनीं प्राणत्याग करून स्वर्ग जिंकला आहे, असे महर्षीहि येथेंच रहातात.

जेथें जागा सांपडेल, तेथें शयन करावें, जें कांहीं यदृच्छेनें प्राप्त होईल तें भक्षण करावें व जें मिळेल तें वस्त्र परिधान करावें, या नियमाला '**गोव्रत**' असें म्हणतात.

सुप्रतीकाच्या वंशांत उत्पन्न झालेले ऐरावण, वामन, कुमुद, व अंजन हे श्रेष्ठ गज येथेंच असतात. यास्तव हे मातले, यांतील एखादा गुणवान् वर तुला जर योग्य वाटत असेल तर पहा. तुला जर कोणीं संमत असेल, तर मी मोठ्या यत्नानें तुझ्या कन्येसाठीं तो मिळवून देईन.

आपल्या तेजानें देदीप्यमान होणारें हें ब्रह्माण्ड प्रजोत्पत्तीपासूनच या जलांत स्थापिलेलें आहे. पण तें भेद पावत नाहीं किंवा चलित होत नाहीं. तें केव्हां उत्पन्न झालें व त्याचा स्वभाव कसा आहे हेंहि कोणीं कथन केल्याचें मीं ऐकलें नाहीं. किंवा त्याचे जनक-जननी कोण हेंहि कोणाला ठाऊक नाहीं. प्रलयकालीं या पाताललोकांतून प्रचंड अग्नि उत्पन्न होतो व तो चराचरासह सर्व त्रैलोक्याचें भस्म करून टाकितो.

नारदाचें हें भाषण ऐकून मातलि म्हणाला—हे भगवन्, तूं सांगितलेस, यांतील एकहि वर मला रुचत नाहीं, यास्तव अन्यत्र चल. आतां विलंब लावूं नको. ५. ६. ९९.

---

## अध्याय १०० वा.

[ १ नारद व मातलि यांचें हिरण्यपुर नामक दैत्यनगरीस गमन. ]

( १ ) **नारद**—हे मातले, अनेक प्रकारच्या मायावी रूपानें संचार करणाऱ्या दैत्यांची व दानवांची ही विस्तृत नगरी पहा. ती 'हिरण्यपुर'-नांवानें प्रसिद्ध आहे. विश्वकर्म्या मयानें महत्प्रयासानें ही नगरी निर्माण

केली. तीच ही पातालतलाचा आश्रय करून येथें राहिली आहे. या नगरींत सहस्रावधि माया निर्माण करणारे महा ओजस्वी दानव निवास करितात. ते शूर असून त्यांनीं पूर्वी वर मिळविलेले आहेत. त्यामुळें इंद्र, यम, कुबेर, किंवा अन्य कोणीहि त्या दानवांना वश करून घेण्यास समर्थ नाहीं.

कालखंज असुर, विष्णुपदापासून उत्पन्न झालेले नैर्ऋत्य व ब्रह्मदेवाच्या चरणापासून उद्भवलेले यातुधान हे सर्व मायावी राक्षस येथेंच रहातात. ते दाढांनीं युक्त असून भयंकर वेगवान् आहेत. वायुवेगाप्रमाणें त्यांचा पराक्रम आहे. ज्यांना पीडा देण्यास शक्रहि समर्थ नाहीं, ते ‘ निवातकवच ’-नांवाचे दानव येथेंच रहातात. हे सूता, तूं, तुझा पुत्र गोमुख व पुत्रासह देवराज शचीपति इंद्र यांचा येथें अनेकदा पराभव झालेला आहे, हें तूं जाणतोसच.

हे इंद्रसारथे, या पुरींतील हीं शिल्पशास्त्रानुसार बांधलेलीं गृहें पहा. त्यांतील कांहीं सुवर्णाचीं, कांहीं रौप्यमय, कांहीं वैदूर्याचीं व कांहीं सुंदर पोवळ्याचीं आहेत. कित्येक शुभ्र स्फटिकाचीं सूर्यकांत मण्यासारखीं उज्ज्वल व पद्मरागासारख्या अमूल्य रत्नांचींहि भासत आहेत. त्यांत कांहीं मृत्तिकेचीं, दगडाचीं व लांकडांचींहि आहेत. तीं सूर्यासारखीं तेजस्वी व प्रदीप्त अग्नीप्रमाणें देदीप्यमान् आणि रत्नजडित असल्यामुळें विचित्र दिसत आहेत. तीं सर्व उंच व निबिड आहेत.

या गृहाचें यथार्थ स्वरूप किंवा तीं कोणत्या द्रव्यानें निर्माण केलीं आहेत याचें वर्णन करतां येणें शक्य नाहीं. तीं अनेक गुणांनीं युक्त असून त्यांत अद्भुत प्रमाण हा विशेष गुण आहे.

दैत्यांचीं हीं क्रीडास्थानें व शयनगृहें पहा. हीं सर्व रत्नजडित आसनें व अमूल्य पात्रें यांनीं समृद्ध आहेत. हे मेघासारखे पर्वत व जलप्रवाह, यांचें अवलोकन कर.

येथील वृक्ष कामचारी असून ते इच्छेस येतील तीं फलें व पुष्पें धारण करितात.

हे मातले, यांतील एखादा वर तुला योग्य वाटला तर पहा. तुझी इच्छा असल्यास आपण अन्य दिशेकडे किंवा पृथ्वीवर जाऊं.

नारदाचें हें भाषण ऐकून मातलि त्याला म्हणाला—‘ हे देवर्षे, देवांना अप्रिय असलेलें कार्य मला करावयाचें नाहीं. देव आणि दानव हे जरी भ्राते

आहेत, तरी त्यांचें वैर सतत अनुवृत्त आहे. तेव्हां शत्रुपक्षाशीं संबंध करणें मला कसें रुचेल ! या दानवांना भेटण्याची माझी इच्छा नाहीं. हे मुने, तूं अहिंसापर आहेस, हें मला ठाऊक आहे आणि हिंसापर दैत्यांची काय अपेक्षा असते, तीहि मी जाणतों. यास्तव, आपण अन्यत्र जाऊं या. ५. ६. १००.

---

## अध्याय १०१ ला.

[ १ नारदासह मातलीचें सुपर्णलोकनिरीक्षण. २ सुपर्णांचें वर्णन. ]

( १ ) नारद्—हे सूता, सर्पभक्षण करणाऱ्या गरुड पक्ष्यांचा हा लोक पहा. या सुपर्णांना अमित पराक्रम, दुर्गम प्रदेशीं वेगानें गमन व भार वहाणें इत्यादि कार्य करण्यांत यत्किंचित्‌हि परिश्रम वाटत नाहींत. विनतेचा पुत्र जो गरुड त्याच्या सुमुख, सुनामा, सुनेत्र, सुवर्चस, सुरुच व पक्षिराज सुबल या सहा पुत्रांनीं हें कुल व्यापिलें आहे. कश्यपाच्या वंशांत उत्पन्न झालेल्या व त्याचें ऐश्वर्य वाढविणाऱ्या या विनताकुलकर्त्या पक्षिराजांनीं गरुडाच्या सजातीय पक्ष्यांचीं शेंकडों व हजारों कुळें मोठ्या वेगानें वाढविलीं आहेत.

मातले, हे सर्व सुपर्ण श्रीनें युक्त असून श्रीवत्सलांछन धारण करणारे आहेत. ते सर्व ऐश्वर्याची इच्छा करणारे व बलवान् आहेत. ते सर्पभक्षक पक्षी क्रूर कर्में करणारे असल्यामुळें क्षत्रिय आहेत. त्यांनीं ज्ञातीचा क्षय केल्यामुळें त्यांना ब्राह्मण्य प्राप्त झालें नाहीं. विष्णूनें परिग्रह केलेलें हें कुल श्लाघ्य आहे. यांचें दैवत विष्णु असून ते केवल विष्णुपरायण आहेत. त्यांच्या हृदयांत सर्वदा विष्णु असतो व विष्णूच यांची सदा गति आहे. त्यांचीं मुख्य मुख्य नांवें मी तुला सांगतों, ऐक.

( २ ) सुवर्णचूडा, नागाशी, दारुण, चण्डतुंडक, अनिल, अनल, विशालाक्ष, कुंडली, पङ्कजित्, वज्र, विष्कम्भ, वैतनेय, वामन, वातवेग, दिशाचक्षु, निमेष, अनिमिष, त्रिराव, सप्तराव, वाल्मीकि, दीपक, दैत्यद्वीप, सरिद्वीप, सारस, पद्मकेतन, सुमुख, चित्रकेतु, चित्रबर्ह, अनघ, मेषहृद्, कुमुद, दक्ष, सर्पान्त, सोमभोजन, गुरुभार, कपोत, सूर्यनेत्र, चिरान्तक, विष्णुधर्मा, कुमार, परिबर्ह, हरि, सुस्वर, मधुपर्क, हेमवर्ण, माल्य, मातरिश्वा, निशाकर व दिवाकर.

मातले, याप्रमाणें यश, कीर्ति व बल यांनीं प्रसिद्ध असलेल्या प्रमुख गरुडपुत्रांच्या नांवांचा मीं निर्देश केला आहे. यांतील कोणीहि तुला जर रुचत नसला, तर आपण येथून जाऊं या. तुला जेथें योग्य वर सांपडेल, अशा प्रदेशांत मी तुला नेतों. ५. ६. १०१.

---

## अध्याय १०२ रा.

[ १ रसातलवर्णन. ]

( १ ) **नारद्**—हे मातले, हें ‘ रसातल’-नांवाचें सातवें पृथ्वीतल आहे. अमृतापासून उत्पन्न झालेली समग्र गोजातीची माता सुरभि म्ह० कामधेनु येथेंच असते. ती पृथ्वीच्या सारापासून उद्भवणारें क्षीर सतत स्रवत असते. षड्रसांच्या सारापासून हा उत्तम रस उत्पन्न झाला आहे. पूर्वी अमृतानें तृप्त होऊन ढेंकर देणाऱ्या पितामहाच्या मुखांतून ही निष्पाप सुरभि उत्पन्न झाली. तिची क्षीरधारा पृथ्वीवर वाहूं लागली. तिचा एक डोहच बनला. त्यालाच परम पवित्र क्षीरसागर म्हणतात. त्या समुद्राच्या तीरावर समंततः शुभ्र फेन पसरलेला असतो. त्याच्याकडे सादर अवलोकन करीत येथें जे मुनिसत्तम रहातात, त्यांना ‘ फेनप ’ असें म्हणतात. दुसरे कित्येक मुनि फेनाचा आहार करून उग्र तप आचरीत असतात, या सर्वांना देवताहि भितात.

हे मातले, या सुरभीपासून झालेल्या दुसऱ्या चार धेनु चार दिशांमध्यें रहातात व त्या आपापली दिशा धारण करून त्या दिशेचें पालन करितात. ‘ सुरूपा ’-नांवाची सुरभि पूर्व दिशा धारण करिते. ‘हंसिका’-नामक धेनु दुसरी दक्षिण दिशा धारण करते. महासमर्थ ‘ सुभद्रा’-पश्चिम दिशेचा आश्रय करिते. ही श्रेष्ठ धेनु या विश्वांतील इच्छेस येईल तें रूप धारण करणारी आहे आणि ‘ कामदुधा ’-नांवाची धेनु कुबेराच्या धर्म्य उत्तर दिशेला धारण करिते.

या चार धेनूंचें पय ज्या सागरांत मिश्र होतें, त्या क्षीरसागराचें देव-दानवांनीं मंदरपर्वताचा मंथा करून मंथन केलें आणि त्यांतून वारुणी, लक्ष्मी, अमृत, उच्चैःश्रवा अश्व व कौस्तुभमणि हीं रत्नें काढिलीं.

ही सुरभि देव-पितरादिकांना योग्य असा भिन्न भिन्न पयोरूप आहार देत असते. सुधा सर्पांचें भोजन आहे, स्वधा पितरांचें अन्न आहे व अमृत देवांचा आहार आहे. अशीं हीं भिन्न प्रकारचीं पेयें ही धेनु स्रवत असते.

मातले, रसातलवासी जनांनीं गायलेली ही प्राचीन गाथा इहलोकीं विद्वान् अद्यापि गात असतात. या रसातलांतील निवास जेवढा सुखकर आहे, तेवढा नागलोक, स्वर्ग, किंवा 'त्रिविष्टप' विमान यांतील वासहि सुखावह नाहीं. ५. ६. १०२.

---

## अध्याय १०३ रा.

[ १ मातलीसह नारदाचें सर्पपुरींत गमन. २ शेषाचें वर्णन. ३ सुमुख नागाला आपला जामाता करण्याची मातलीची मनीषा. ]

( १ ) **नारद्**—हे सूता, देवराज इंद्राच्या श्रेष्ठ अमरावती प्रमाणेंच ही वासुकीनें पालन केलेली भोगवती नगरी आहे. येथें शेष स्थित असतो व तपाच्या योगानें लोकांत प्रमुख झालेला तो पृथ्वीला तिच्या प्रभावासहित धारण करितो.

( २ ) या शेषाचा आकार कैलासपर्वतासारखा असून तो दिव्य आभरणांनीं भूषित आहे. हा महाबलाढ्य नाग आपल्या मस्तकानें सहस्रावधि ज्वालारूपी जिह्वा धारण करितो. येथें विविध आकाराचे व नानाप्रकारचीं भूषणें धारण केलेले कद्रूचे पुत्र निर्भयपणें रहातात. त्यांच्या मस्तकांवर मणि, चक्र, स्वस्तिक व कमंडलु यांचीं चिह्नें असून त्यांची संख्या सहस्रावधि आहे. ते सर्व बलवान् व क्रूर स्वभावाचे आहेत. त्यांतील कांहींना सहस्र, कांहींना पांचशें व कांहींना शंभर मस्तकें आहेत. कांहीं तीन, दोन, पांच व सात मुखांनीं युक्त आहेत. या नागांचीं शरीरें पर्वतासारखीं प्रचंड आहेत. एकाच वंशांत उत्पन्न झालेल्या या नागांची संख्या कोट्यवधि आहे. त्यांतील प्रमुखांचीं नांवें सांगतों, ऐक. वासुकि, तक्षक, कर्कोटक, धनंजय इत्यादि. याशिवाय इतरहि पुष्कळ मुख्य नाग आहेत. ते सर्व कश्यपाचेच पुत्र म्हटले जातात. यास्तव हे मातले, यांतील एखादा वर तुला रुचत असला तर पहा.

**कण्व**—राजा धृतराष्ट्रा, नारदांचें हें भाषण ऐकून मातलीनें अव्यग्र चित्तानें समंततः निरीक्षण केलें व जणुकाय संतुष्ट होऊन नारदाला असा प्रश्न केला—

---

१ या सर्पांचीं सविस्तर नांवें पूर्वी आलेलीं आहेत, त्याची येथें पुनरुक्ति केली नाहीं. भाग १ ला, अ. ३५, पृ. १०४ पहा.

**मातलि**—हे मुने, कौरव्य आर्यकाच्या पुढें बसलेला हा द्युतिमान् व दर्शनीय नाग कोणाचा कुलनंदन आहे ! या नागाचे माता-पितर कोण आहेत ! हा कोणाच्या वंशाचा केतुभूत होऊन राहिला आहे ! हा नाग नम्रता, धैर्य, रूप आणि वय या सर्व गुणांनीं गुणकेशीला योग्य वर आहे, असें मला वाटतें.

**कण्व**—राजा, याप्रमाणें सुमुखाच्या दर्शनानें मातलि संतुष्ट झाला आहे हें पाहून नारदानें त्या नागाचें माहात्म्य, जन्म व कर्म त्याला निवेदन केलें.

**नारद**—मातले, हा ऐरावत कुलोत्पन्न 'सुमुख'-नांवाचा श्रेष्ठ नाग आहे. हा आर्यकाचा संमत पौत्र व वामनाचा दौहित्र आहे. याच्या 'नागचिकुर'-नामक पित्याचा गरुडानें नुक्ताच वध केला.

( ३ ) नारदाचें हें वचन ऐकून प्रसन्न झालेला मातलि म्हणाला—हे मुने, हा जामाता मला मान्य आहे. मी याच्यावर प्रसन्न झालों आहें. याला आपली प्रिय कन्या द्यावी असें मला वाटत आहे, यास्तव त्याला अनुकूल करण्याचा यत्न कर. ५. ६. १०३.

---

## अध्याय १०४ था.

[ १ गुणकेशीचा स्वीकार करण्याविषयीं नारदानें केलेली आर्यकाची प्रार्थना. २ गरुडानें केलेल्या सुमुखभक्षणाच्या प्रतिज्ञेचें कथन. ३ नारदाचें मातलीसह इंद्रलोकीं गमन व विष्णूच्या संमतीनें सुमुखाला चिरायुष्य प्राप्ति. ]

( १ ) **कण्व**—राजा धृतराष्ट्रा, त्यानंतर मातलीसह नारदानें आर्यकनागाची भेट घेतली व त्याची अशी प्रार्थना केली.

**नारद**—हे सर्पश्रेष्ठा, हा मातलि शक्राचा प्रिय सारथि आहे. हा इंद्राचा हितचिंतक असून शुचिर्भूत, शीलवान्, गुणसंपन्न, तेजस्वी, वीर्यवान् व बलाढ्य आहे. हा इंद्राचा प्रिय सखा, मंत्री व सारथिहि आहे. प्रत्येक युद्धांत वासवाच्या व याच्या प्रभावांत फार थोडें अंतर असतें. देवासुरांच्या युद्धांत हा इंद्राच्या सहस्र अश्वांनीं युक्त असलेल्या श्रेष्ठ रथाचें मनानेंच नियमन करितो. अगोदर यानें आपल्या बाहुबलानें इंद्रशत्रूंना जिंकल्यावर मग वासव जय मिळवितो म्ह० शत्रूंवर अगोदर हा व याच्या मागून देवेंद्र प्रहार करितो.

याला गुणकेशी नांवाची सुशील व गुणसंपन्न कन्या आहे. तिच्यासारखी अप्रतिम रूपवती कुमारी भूलोकीं दुसरी कोणी नाहीं. तिला योग्य वर शोधण्यासाठीं हा सर्व त्रिभुवन हिंडला व त्यानें मोठ्या यत्नानें सर्वत्र शोध केला. त्यांत तुझा हा पौत्र सुमुख त्याला आपल्या कन्येला अनुरूप वर वाटत आहे. यास्तव हे भुजगोत्तमा, तुला जर मान्य असेल, तर याच्या कन्येचा परिग्रह करण्याचा सत्वर निश्चय कर.

विष्णूच्या कुलांत जशी लक्ष्मी, अग्नीला जशी स्वाहा, तशी ही सुंदरी गुणकेशी तुझ्या कुलाला भूषित करो. ती वासवाच्या शचीतुल्य आहे, तस्मात् तूं आपल्या पौत्रासाठीं तिचा प्रतिग्रह कर. हा सुमुख जरी पितृहीन आहे, तरी त्याचे गुण व तुझा आणि ऐरावताचा लौकिक यांकडे दृष्टि देऊन आम्ही त्याला कन्या देत आहों. सुमुखाचे गुण, शील, शौच, शम इत्यादि पाहून हा मातलि स्वतः येथें येऊन त्याला कन्या अर्पण करण्यास तयार झाला आहे. यास्तव तूं त्याचा आदर करावास हेंच योग्य आहे.

कण्व—नारदाचें हें भाषण ऐकून आर्यक संतुष्ट व दीनहि झाला आणि त्याला म्हणाला—

( २ ) आर्यक—हे देवर्षे, तुम्ही माझ्या पौत्राला वरण्यासाठीं आलां अहां खरे, पण माझा पुत्र नुक्ताच निधन पावला आहे, तेव्हां गुणकेशीला स्नुषा करण्याची मी कशी इच्छा करावी! यास्तव तुझें हें वचन मला संमत नाहीं. हा इंद्राचा सखा आहे, याच्याशीं संबंध करण्याची कोण इच्छा करणार नाहीं! पण हे महामुने, या सुमुखाच्या अल्पायुष्यामुळें मी याच्या विवाहाविषयीं सचिंत आहे. माझा पुत्र व याचा जन्मदाता यास वैनतेयानें भक्षण केलें व त्यामुळें आम्ही दुःखांत आहों. शिवाय तो गरुड जातां जातां असेंहि म्हणाला कीं, एका महिन्यानें मी सुमुखालाहि भक्षण करीन आणि हे प्रभो, तसें निश्चयानें घडून येईल. मला त्या सुपर्णाचा निश्चय ठाऊक आहे. त्यामुळें माझा सर्व हर्ष नष्ट झाला आहे.

आर्यकाचे हे निराशेचे दुःखपूर्ण उद्गार ऐकून मातलि त्याला म्हणाला—"तुझ्या या सुमुख-पौत्राला जामाता करण्याचा मीं निश्चय केला आहे. यास्तव तो आम्हां दोघांबरोबर सुरपति इंद्राकडे जाऊन त्याची भेट घेवो. याचें आयुष्य जर अवशिष्ट असलें तर याचें मरण टळण्यासाठीं गरुडाच्या शक्तीची

प्रशंसा कशी करावी हें मीं निश्चित करीन. किंवा यत्नानें काय करतां येईल तेंहि पाहीन. यास्तव कार्य साधण्यासाठीं सुमुखाला माझ्याबरोबर देवेशाकडे येऊं दे. हे भुजङ्गमा, तुझें स्वास्थ्य असो."

(२) असें बोलून सुमुखाला घेऊन ते दोघे महा ओजस्वी महात्मे आर्यकासह इंद्रलोकीं गेले व त्यांनीं तेथें आसनस्थ देवराजाचें दर्शन घेतलें. दैव-योगानें त्याच वेळीं चतुर्भुज भगवान् विष्णु तेथें आला होता. तेव्हां नार-दानें महाद्युतिमान् देवेंद्र व भगवान् या दोघांना मातलीचा सर्व वृत्तान्त निवेदन केला.

तें वृत्त ऐकून विष्णु पुरंदराला म्हणाले—हे वासवा, या सुमुखाला अमृत दे आणि त्याला देवतुल्य अमर होऊं दे. नारद, मातलि व सुमुख यांचे मनो-रथ तूं पूर्ण कर. यावर वैनतेयाच्या पराक्रमाचा विचार करून इंद्र विष्णूला म्हणाला—" हे भगवन्, आपणच त्यांना अमृत द्यावें."

विष्णु—हे देवराज, तूं या सर्व सचराचर लोकांचा ईश्वर आहेस. तूं दिलेलें अभय अन्यथा करण्यास कोण समर्थ आहे ! विष्णूचें हें वचन ऐकून इंद्रानें त्या नागाला दीर्घायुष्य दिलें. परंतु त्याला अमृत देऊन अमर केलें नाहीं. याप्र-माणें सुमुख वर मिळवून प्रसन्न वदन झाला व दारपरिग्रह करून कृतकृत्य होऊन आपल्या घरीं परत गेला. नारद व आर्यक या दोघांनींहि कृतकार्य होऊन संतुष्ट चित्तानें महाद्युतिमान् देवेंद्राचें पूजन केलें व ते आपापल्या लोकीं निघून गेले. ५. ६. १०४.

---

## अध्याय १०५ वा.

[ १ इंद्रानें सुमुखाला दीर्घायुष्य दिलेलें ऐकून गरुडाचा क्रोध, इंद्राची निर्भ-त्सना. २ विष्णूनें केलेलें त्याचें गर्वहरण. ३ कण्वाचा दृष्टांतपूर्वक दुर्योधनाला उपदेश. ४ दुर्योधनानें केलेला उपहास. ]

( १ ) कण्व—हे भारता, शक्रानें ' सुमुख'-नागाला पूर्ण आयुष्य दिल्याचें सविस्तर वर्तमान महाबलाढ्य गरुडानें जेव्हां ऐकलें, तेव्हां तो पक्षी अतिशय क्रुद्ध झाला व आपल्या पंखांच्या वेगानें त्रिभुवनाला रुद्ध करीत क्रोधानें वास-वावर धावून गेला.

गरुड—हे भगवन्, तूं माझी अवज्ञा करून माझ्या वृत्तीचा घात कां केलास! मला इच्छेप्रमाणें वागण्याचा वर देऊन पुनः त्यापासून तूं च्युत झालास. सर्व भूतेश्वर विधात्यानें मजसाठीं सर्व भूतें हा स्वभावतःच आहार निर्मिला आहे. तूं त्याला प्रतिबंध कां करितोस! या महानागाला भक्षण करण्याचा मीं निश्चय केला असून त्याचा समयहि नियत केला होता. हे दवा, याच्या योगानें माझ्या फार मोठ्या परिवाराचा निर्वाह होईल. यास्तव याला सोडून अन्य कोणाची हिंसा करण्याची माझी इच्छा नाहीं. हे देवराज, तूं मनाला वाटेल तशी क्रीडा चालविली आहेस; पण मी माझे सर्व परिजन व माझ्या गृहांत असलेले भृत्य यांच्यासह प्राणत्याग करीन. हे वासवा, तूं संतुष्ट हो.

हे इंद्रा, त्रैलोक्याचा ईश्वर असूनहि जो मी दुसऱ्याच्या दास्याला प्राप्त झालों आहें, तो मी असा आत्मघात करून घेण्यासच योग्य आहें. आतां तूं कदाचित् ‘ विष्णूनेंच याला दीर्घायुष्य दिलें आहे ’ असें म्हणशील तर हे देवेशा, तूं स्थित असतांना मी विष्णूला प्रमाण मानीत नाहीं. कारण त्रैलोक्याचें राज्य तुझ्या ठिकाणीं नित्य स्थित आहे. तथापि दक्षाची कन्या माझी माता असून कश्यप माझा पिता आहे. मीहि सर्वलोकांना वाहून नेण्यास समर्थ आहें. माझें विपुल बल सर्वभूतांना असह्य होत. मींहि दैत्यांच्या युद्धांत फार मोठें काम केलें आहे. श्रुतश्री, श्रुतसेन, विवस्वान्, रोचनामुख, प्रसृत, कालकाक्ष, या दितिपुत्रांचा मीं वध केला आहे.

पण मी ध्वजस्थानाला प्राप्त होऊन तुझा अनुज जो भगवान् विष्णु त्याची मोठ्या यत्नानें परिचर्या करितों व त्याला वाहून नेतों. म्हणून तूं माझा असा अवमान करीत आहेस. पण माझ्यासारखा भार सहन करणारा व माझ्याहून अधिक बलवान् दुसरा कोण आहे! मीच सर्वांहून विशिष्ट असल्यामुळें बांधवांसह या विष्णूला वाहून नेतों. परंतु तूं माझ्या वृत्तीचा छेद करून माझी अवज्ञा केलीस, त्यामुळे तुझ्याहून व या भगवानाहूनहि अधिक असलेलें माझें श्रेष्ठत्व नष्ट झालें आहे. अदितीचे हे सर्व पुत्र बल व पराक्रम यांनीं युक्त आहेत. त्या सर्व बलवानांहूनहि तूं बलवत्तर आहेस. अशा तुला मी माझ्या पंखाच्या एका टोकावर सहज वाहून नेतों. यावरून कोणाचें बल अधिक आहे, याचा तूंच शांतपणानें विचार कर.

कण्व—त्या गरुडाचें हें परिणामीं दारुण फल देणारें वचन ऐकून चक्रधर विष्णु अक्षोभ्य असलेल्याहि त्याला क्षुब्ध करीत म्हणाला—

( २ ) भगवान्—हे गरुत्मन्, वस्तुतः तूं अतिशय दुर्बल असून स्वतःला बलवान् समजत आहेस. हे अंडजा, आमच्या समक्ष ही आत्मश्लाघा पुरे कर. माझ्या देहाला धारण करण्यास समग्र पृथ्वीहि समर्थ नाहीं. वास्तविक मीच स्वतः आपल्याला वहातों व तुलाहि धारण करितों. बरें, तूं जर इतका बलवान् आहेस तर माझा हा एकच उजवा बाहु धारण कर पाहूं ! तूं आपल्या स्कंधावर माझा हा बाहू जर धारण करशील, तर तुझी ही आत्मश्लाघा सार्थ होईल.

कण्व—राजा, असें बोलून भगवानानें गरुडाच्या स्कंधावर आपला बाहु ठेवला. तेव्हां तो भारार्त पक्षी विह्वल झाला व मूर्च्छित होऊन भूमीवर पडला. त्यावेळीं विष्णूच्या एका बाहूचा भार त्या सुपर्णाला पर्वतासह समग्र पृथ्वीच्या भाराइतका दुःसह भासला. अच्युतानें त्याच्या स्कंधावर आपला बाहु सहज ठेवला होता; जोरानें ठेवून त्याला पीडा दिली नाहीं. त्यामुळें त्याचें जीवित नष्ट झालें नाहीं. त्या प्रचंड भारानें पीडित झालेला तो पक्षी आपले पंख फडफडवीत खालीं पडला. त्याचा देह गळून गेला. विह्वल होऊन त्यानें तोंड वासलें. मूर्च्छा गेल्यावर त्या वैनतेयानें विष्णूला शिरसा वंदन केलें व विह्वल होऊन दीन स्वरानें त्याला असें म्हटलें—

गरुड—हे भगवन्, तूं लोकसारभूत व पुष्ट अशा आपल्या सहज ठेवलेल्या भुजानें मला भूतलावर चिरडून टाकिलेंस. मी विह्वल झालों. हे देवा, मज मंदबुद्धीला क्षमा कर. तुझा हा ध्वजवासी पक्षी तुझ्या बलाच्या तेजानें दग्ध झाला आहे. हे विभो, तुझें परम बल आतांपर्यंत मीं जाणलें नव्हतें, त्यामुळें माझा पराक्रम अतिशय श्रेष्ठ आहे, इतरांसारखा नाहीं, असें मीं समजत होतों.

असें बोलून गरुड शरण आला असतां भगवानानें प्रसन्न होऊन स्नेहानें त्याला ‘ ठीक आहे, पुनः असा गर्व करूं नको ’ असें म्हणून आपल्या पायाच्या आंगठ्यानें सुमुखाला गरुडाच्या वक्षःस्थलावर उडवून दिलें. तेव्हांपासून हे राजेंद्रा, तो सुपर्ण सुमुखासह रहात असतो. याप्रमाणें तो महायशस्वी गरुड विष्णूच्या बलानें पराभूत होऊन त्याच्या गर्वाचा नाश झाला.

(३) कण्व—तस्मात् हे गांधारे, जोंवर वीर पांडुपुत्रांशीं तुझी रणांत गांठ पडली नाहीं, तोंवरच तूं जिवंत आहेस. वायुपुत्र महाबलाढ्य भीम प्रहार करणारांतील श्रेष्ठ आहे. धनंजय इंद्रसुत आहे. ते रणांत कोणाचा वध करणार नाहींत ! कृष्णासह हे पांच पांडव प्रत्यक्ष विष्णु, धर्म, वायु, इंद्र व दोघे अश्विनीकुमार आहेत, तेव्हां तूं त्यांच्याकडे नुस्तें पहाण्यासहि कसा समर्थ होशील? तस्मात् हे नृपात्मजा, हा विरोध पुरे झाला. आतां तूं पांडवांशीं शम कर. या वासुदेवाच्या मध्यस्थीनें तूं कुलाचें रक्षण करण्यास समर्थ आहेस. या चक्र-गदाधर विष्णूचें माहात्म्य प्रत्यक्ष अवलोकन करणारा हा महातपस्वी नारद येथेंच आहे.

(४) वैशंपायन—राजा, दुर्योधनानें कण्वाचें हें भाषण ऐकून एक निश्वास सोडला व भ्रुकुटी वक्र केली. तो दुरात्मा राधेयाकडे पाहून मोठ्यानें हंसला व त्या ऋषीच्या वाक्याला तुच्छ लेखून गजाच्या शुंडेसारख्या आपल्या मांडीवर थाप मारून कण्वास म्हणाला—" हे मुने, ईश्वरानें मला ज्यासाठीं उत्पन्न केलें असेल, माझें जें भवितव्य असेल आणि माझी जी गति होणार असेल, त्याप्रमाणेंच मी वर्तन करीत आहें. तूं व्यर्थ हे प्रलाप कशाला करतोस !" ५. ६. १०५.

---

## अध्याय १०६ वा.

[ १ जनमेजयाचा प्रश्न. २ नारदाचा दुर्योधनाला उपदेश. ३ गालवाख्यानाला आरंभ. ]

(१) जनमेजय—हे मुने, दुर्योधन अनर्थामध्येंच अभिनिवेश ठेवणारा, परार्थाचा लोभ करणारा, हीन कर्मांत रत असलेला, मरणाला उद्युक्त झालेला, ज्ञातिजनांना दुःख देणारा, बांधवांचा शोक वाढविणारा, सुहृदांना क्लेश देणारा व शत्रूंचा हर्ष वाढविणारा होता; तथापि अशा उन्मार्गानें वागणाऱ्या त्याचें भीष्मादि बांधवांनीं सौहार्दानें व भगवान् व्यासानें स्नेहानें अमार्गापासून निवारण कसें केलें नाहीं !

वैशंपायन—राजा, त्या दुरात्म्याला भगवंतानें व भीष्मानें योग्य उपदेश पूर्वीच केला होता. नारदानेंहि अनेक प्रकारें हितवचन सांगितलें. तेंच आतां सांगतों. ऐक.

( २ ) नारद—हे दुर्योधना, प्रत्युपकाराची अपेक्षा न करतां हिताचा उपदेश करणारा माझ्यासारखा सुहृद् दुर्मिळ आहे व तो हितोपदेश ऐकणारा सुहृद् श्रोताहि दुर्लभ आहे. ( पण हा दुर्योधन मूढ असल्यामुळें हितवचनहि ऐकणार नाहीं, असा याचा भावार्थ. ) पण ज्या महासंकटामध्यें सुहृद् रक्षण करण्यास सज्ज होतो, त्यांतच उपकाराच्या अपेक्षेनें उपकार करणारा बंधु स्थिर होत नाहीं. ( अशा बंधूहूनहि सुहृद्वचन श्रेयस्कर आहे, असा भावार्थ. )

हे कुरुनंदना, सुहृदांचें वचन श्रवण करणें युक्त आहे. एखाद्या कार्यांत फार मोठा प्रतिबंध असतांना त्याविषयीं आग्रह धरल्यास नाश होतो. दुराग्रहानें गालवाचा कसा पराभव झाला, याविषयीं एक पुरातन इतिहास प्रसिद्ध आहे, तो सांगतों, ऐक. हे भारता, पूर्वी एकदा साक्षात् धर्म सप्तर्षींतील एक ऋषि जो भगवान् वसिष्ठ त्याचा वेष धारण करून तप करणाऱ्या विश्वामित्राकडे जिज्ञासेनें आला. तो क्षुधित झालेला अतिथि भोजनेच्छेनें कौशिकाच्या आश्रमांत येतांच विश्वामित्रानें मोठ्या त्वरेनें चरु शिजविला. परंतु तें उत्तम अन्न सिद्ध होईपर्यंत वसिष्ठ थांबला नाहीं. त्यानें इतर तपस्व्यांनीं दिलेलें अन्न भक्षण केलें. इतक्यांत विश्वामित्र तें उष्ण अन्न घेऊन वसिष्ठापाशीं आला. तेव्हां ' माझें भोजन झालें. तूं आतां थांब ' असें बोलून भगवान् निघून गेला. हे राजन्, त्या ऋषीच्या आज्ञेप्रमाणें द्युतिमान् विश्वामित्र तें अन्न आपल्या हातांनीं मस्तकावर धारण करून वायु भक्षण करीत एखाद्या खांबाप्रमाणें निश्चल उभा राहिला.

( ३ ) त्यावेळीं विश्वामित्राचें गुरुत्व व लोकपूज्यत्व जाणून गालव-ऋषीनें कामनापूर्ण होण्याच्या इच्छेनें मोठ्या प्रेमानें त्याची शुश्रूषा करण्याचा यत्न केला. याप्रमाणें शंभर वर्षें पूर्ण झालीं असतां धर्म पुनः वशिष्ठाचा वेष घेऊन भोजनाच्या इच्छेनें कौशिकाच्या आश्रमांत आला व धीमान् विश्वामित्र वायुभक्षण करून तें अन्न मस्तकावर धारण करून तसाच उभा आहे हें पाहून त्या महर्षीनें त्या अन्नाचा स्वीकार केला. तें अन्न तसेंच उष्ण व ताजें राहिलें होतें. तें भक्षण करून व ' हे विप्रर्षे, मी संतुष्ट झालों,' असें बोलून तो मुनि निघून गेला. तेव्हां धर्माच्या वचनानें क्षत्रत्वापासून निवृत्त होऊन ब्राह्मणत्वाला प्राप्त झालेला विश्वामित्र अतिशय संतुष्ट झाला.

नंतर आपल्या तपस्वी गालव शिष्याच्या शुश्रूषेनें व भक्तीनें प्रसन्न झालेला

तो मुनि त्याला म्हणाला—हे वत्सा गालवा, माझी तुला जाण्याची अनुज्ञा आहे. तुला इष्ट असेल तेथें जा.

विश्वामित्राचें हें वचन ऐकून मोठ्या प्रेमानें व मधुर वाणीनें गालव त्या मुनिश्रेष्ठाला म्हणाला—हे भगवन्, मी आपल्याला ब्रह्मचर्यव्रताच्या समाप्तीची गुरुदक्षणा काय देऊं! कारण दक्षिणायुक्त कर्मानेंच सिद्धि प्राप्त होत असते, दक्षिणेनें दात्याला फल मिळतें. तेंच स्वर्गांतील क्रतुफल आहे. कारण दक्षिणा देणाराच त्याला प्राप्त होतो. म्हणूनच वेदानें 'दक्षिणा सर्व उपद्रवांची शांति करणारी आहे' असें म्हटलें आहे. यास्तव मीं गुरूसाठीं काय आणावें त्याची आज्ञा व्हावी.

गालवाचें हें भाषण ऐकून यानें सेवेनेंच आपल्याला वश करून घेतलें आहे, हें जाणणारा विश्वामित्र त्याला 'वत्सा, तुझ्या सेवेनें मी संतुष्ट झालों आहें, तुझी गुरुदक्षिणा मला पोंचली आहे, आतां तूं जा' असें अनेकदां म्हणाला. परंतु विश्वामित्र वारंवार 'तूं जा, तूं जा' असें म्हणत असतांहि गालव "काय देऊं, काय देऊं" असें पुनः पुनः विचारूं लागला. तेव्हां तपस्वी गालवाचा दुराग्रह पाहून किंचित् क्रुद्ध झालेला विश्वामित्र त्याला म्हणाला—"हे गालवा, एका बाजूनें श्यामकर्ण असलेले चंद्रासारखे शुभ्र आठशें अश्व मला सत्वर आणून दे, उशीर लावूं नको; जा." ५. ६. १०६.

---

## अध्याय १०७ वा.

[ १ अश्व देण्यास असमर्थ असलेल्या गालवाचा विलाप. २ गरुडानें त्याला त्रैलोक्य दाखविण्याविषयीं दिलेलें आश्वासन. ]

( १ ) नारद्—हे दुर्योधना, धीमान् विश्वामित्राचें हें वचन ऐकून गालव चिंताक्रांत झाला. त्याला झोंप येईनाशी झाली. त्यानें आहार सोडला. तो एका स्थानीं स्थिर बसेना. त्याचा केवल अस्थिपंजर उरला. शोकपरायण झालेला तो निस्तेज होऊन त्याचा वर्ण पांडुर दिसूं लागला. तो गालव दैन्यानें व चिंताग्नीनें दग्ध होऊन अतिशय शोकमग्न झाला व खिन्न होऊन दुःखानें असा विलाप करूं लागला—

गालव—अरे अरे, मला धनिक मित्र कोठले व द्रव्यसंचय कोठला!

तेव्हां चंद्रासारखे शुभ्र आठशें अश्व मी कोठून आणूं ! मला भोजनाची व सुखाची इच्छा कशी होणार ! माझी जीविताची आशाहि छिन्न झाली आहे. मला आतां जिवंत राहून तरी काय करावयाचें आहे ! मी आतां पृथ्वीपासून दूर निघून जातों किंवा समुद्राच्या परतीरीं जाऊन तेथें प्राणत्याग करितों. माझ्या जीविताचा काय उपयोग ! निर्धन, अकृतार्थ, धनादि विविध फलांनीं रहित व गुरूचें ऋण धारण करणाऱ्या मला आतां उद्यमावांचून सुख कोठलें !

सुहृदांच्या धनावर निर्वाह करून व 'इष्ट वस्तु देतों' असें आश्वासन देऊन, तें करण्यास असमर्थ असलेल्या मनुष्यानें जिवंत रहाण्यापेक्षां मरणें श्रेयस्कर आहे. 'मी अमुक कार्य करीन' असें एखाद्याला अभिवचन दिल्यावर तें पूर्ण करणें अवश्य आहे. पण त्याच्या उलट तें जर आपण पार पाडलें नाहीं, तर मिथ्यात्वाचा दोष लागतो व त्या मिथ्यावचनानें दग्ध झालेल्या त्या माणसाच्या इष्टापूर्त कर्मांचें फल नष्ट होतें.

असत्यवादि जिवंत असला तरी मृतच होय. त्याला संतति व आधिपत्य प्राप्त होत नाहीं; मग शुभ गति कोठली ! कृतघ्नाला यश, स्थान व सुख कोठलें ! कृतघ्न मनुष्य अविश्वसनीय असतो, कृतघ्नाला प्रायश्चित्त सांगितलेलें नाहीं. असा निर्धन पापी जिवंत रहात नाहीं, पापी पुरुष कुटुंबाचें धारण कसें करणार ! एखाद्यानें उपकार केले असतां ते विसरणारा पापी निश्चयानें विनाश पावतो.

गुरूपासून कृतकार्य होऊन ज्याअर्थी मी त्याला अभिवचन देऊन त्याचें प्रिय करण्यास समर्थ नाहीं, त्याअर्थी मी पापी, कृतघ्न, कृपण व अनृतवादीहि ठरलों. मी आतां विषप्राशनादि अधम उपायांचें अवलंबन करून प्राणत्याग करितों. यापूर्वी मीं देवांजवळहि कधीं याचना केलेली नाहीं, त्यामुळें ते सर्व देव यज्ञांत मला मान देतात. यास्तव मी आतां देवाधिदेव त्रिभुवनेश्वर कृष्णाला शरण जातों. तो भगवान् विष्णु गतिमानांत श्रेष्ठ आहे. त्याच्या ठिकाणीं आकाशादि सर्व प्रतिष्ठित आहेत. बीजापासून जसे वृक्ष उत्पन्न होतात, तसें हें सर्व जगत् त्याच्यापासून उद्भवतें. तो सर्व सुरासुरांना व्यापून राहिला आहे. अशा अव्यय श्रीकृष्णाला मी शरण जाऊन त्याचें दर्शन घेतों.

( २ ) गालव असा विलाप करीत असतां त्याचा सखा विनतात्मज गरुड त्याचें प्रिय करण्याच्या इच्छेनें तेथें प्रकट झाला व प्रसन्न होऊन म्हणाला—

हे विप्रा, तूं माझा मान्य सुहृद् आहेस व ऐका सुहृदामध्यें सामर्थ्य असल्यास त्यानें दुसऱ्या सुहृदाचा इष्ट मनोरथ पूर्ण करावा, असें सुहृदांचें मत आहे. माझ्यामध्यें सामर्थ्य आहे आणि हे गालवा, वासवाचा कनिष्ठ भ्राता जो भगवान् विष्णु, त्याच्या वरानें मला विभव प्राप्त झालें आहे. गालवाला साह्य करण्याची माझी इच्छा आहे, अशी मीं पूर्वींच त्या भगवंताला प्रार्थना केली आहे आणि त्यानें 'गालव गुर्वर्थ इष्ट धन मिळविण्यास समर्थ होवो,' असा वर दिला आहे, यास्तव तूं खिन्न होऊं नको. माझ्याबरोबर ये. मी तुला अनायासानें पृथ्वीच्या कोणत्याहि प्रदेशीं किंवा समुद्राच्या पलीकडे नेतों. चल, विलंब लावूं नको. ६. ५. १०७.

---

## अध्याय १०८ वा.

[ १ गरुडानें केलेलें पूर्व दिशेचें वर्णन. ]

( १ ) गरुड—हे गालवा, ज्ञानप्रवर्तक विष्णूनें मला अनुज्ञा दिली आहे. यास्तव आतां प्रथम कोणती दिशा पहाण्याची तुझी इच्छा आहे, तें सांग म्हणजे मी तुला तेथें घेऊन जातों. पूर्व, पश्चिम, दक्षिण किंवा उत्तर यांतील कोणत्या दिशेंत जाऊं !

हे विप्रा, सर्व लोकांना उत्पन्न करणारा सविता या दिशेंतच प्रथम उदय पावतो व येथेंच संध्यासमयीं आलोचनरूप तप करून साध्य सत्यकाम झाले. येथें प्रातःसंध्या केली असतां सूर्याच्या प्रसादानें सर्व जगताला व्यापणारी बुद्धि प्राप्त होते. अग्नि आणि सोम या ज्यांच्या देवता आहेत, असे आज्य भागाख्य यज्ञाचे दोन चक्षु यज्ञाच्या नियंत्रणासाठीं या पूर्व दिशेंतच सुप्रतिष्ठित आहेत. संस्कार केलेलें हव्य या दोन चक्षूंमध्यें होमिलें असतां यज्ञाचें रक्षण होतें व तेंच अन्यत्र होमिल्यास धर्मनाशक होतें.

ही दिशा दिवसाचें द्वार म्ह० आरंभ व देवयान आणि पितृयाण मार्गाचें मुख आहे. दक्ष प्रजापतीच्या कन्या पूर्वी येथेंच प्रजा प्रसवल्या व कश्यपाची संतति येथेंच प्रवृद्ध झाली. ही दिशा सर्व देवांच्या ऐश्वर्याचें मूळ असून शक्राला अभिषेक येथेंच झाला. देवांनींहि येथेंच तपश्चर्या केली. प्राचीन

---

१ सुहृद्भवान्मम मतः सुहृदां च मतः सुहृद् ।
ईप्सितेनाभिलाषेण योक्तव्यो विभवे सति ॥

कालीं म्हणजे सर्वांच्या पूर्वीं देवांनीं हीच दिशा व्यापिली होती. म्हणून तिला ‘ पूर्व ’ असें म्हणतात.

हे ब्रह्मन्, पूर्वी सुखाची इच्छा करणाऱ्या देवांनीं येथेंच सर्व धर्मकार्यें केलीं. लोकभावन भगवान् ब्रह्मदेवानें येथेंच वेदपाठ केला. याच दिशेंत सूर्यानें ब्रह्मवेत्त्यांना गायत्रीचा उपदेश केला. याज्ञवल्क्याला येथेंच यजुर्वेद दिला. वर मिळविलेले सुर येथेंच यज्ञांत सोमाचें प्राशन करितात व तृप्त झालेले हव्यवाहन अग्नि आपलें उत्पत्तिस्थान जें सोम, आज्य व पयादिरूप जल, त्यांत प्रवेश करितात.

वरुणानें याच दिशेनें पाताळांत प्रवेश करून ऐश्वर्य मिळविलें. मित्रावरुणाच्या यज्ञकालीं येथेंच पुराण ऋषि जो वसिष्ठ, त्याचा निमीच्या शापामुळें स्थूल देहाशीं वियोग झाला. त्याच यज्ञांत कुंभापासून त्याची उत्पत्ति झाली. प्रणवाचे शाखा-प्रशाखादि सहस्रावधि भेद येथेंच उत्पन्न झाले. धूमसेवन करणाऱ्या मुनींनीं येथेंच हविर्धूमाचें प्राशन केलें. इंद्रानें याच दिशेंत वराहादि अनेक वन्यपशूंचें प्रोक्षण करून दैवतांचे यज्ञभाग कल्पिले.

सूर्य याच पूर्व दिशेंत उदय पावून कृतघ्न मानव व असुर यांच्या आयुष्याचें क्रोधानें हरण करितो. ही पूर्व दिशा त्रैलोक्य, स्वर्ग व सुख यांचें द्वार असून हा सर्व दिशांचा पूर्वभाग आहे.

तुझी जर इच्छा असेल तर आपण या दिशेंत प्रवेश करूं. मी तुझ्या वचनांत स्थित असल्यामुळें तुझें प्रिय करणें मला उचित आहे. यास्तव हे गालवा, सांग. तूं सांगशील तेथें मी जाईन अथवा दुसऱ्या दिशांचें वर्णन करितों, तें ऐक. ५. ६. १०८.

---

## अध्याय १०९ वा.

[ १ दक्षिण दिशेचें वर्णन. ]

**गरुड**—हे गालवा, पूर्वीं सूर्यानें येथें यज्ञ करून कश्यपाला या दिशेची यथाविधि दक्षिणा दिली म्हणून या दिशेला ‘ दक्षिणा ’ म्हणतात. येथें तिन्ही लोकांतील पितर स्थित आहेत व उष्णान्न भोजन करणाऱ्या देवतांचा निवास

---

१ जोंवर अन्न उष्ण असतें, तोंवरच पितर त्यांचें सेवन करितात अशी स्मृति आहे.

याच दिशेंत असतो, असें श्रुत आहे. लोकांमध्यें पूज्य होऊन देवांच्या तुल्य भागाला प्राप्त झालेले तेरा विश्वदेवहि पितरांसह येथेंच रहातात. या दिशेला धर्माचें दुसरें द्वार म्हटलें आहे. या दिशेंतील घटीका पळें याच कालाच्या अवयवांनीं कालाची गणना व निश्चय केला जातो.

हे विप्रा, या दिशेंत सर्व देवर्षि, पितृलोकांतील ऋषि व राजर्षि क्लेशरहित होऊन सुखानें रहातात. मृतजीवांचें पूर्वजन्मांतील सत्याचरण व पुण्य-पापरूपी कर्म यांचें प्रकाशन चित्रगुप्तादिकांकडून येथेंच केलें जातें. मरणोत्तर सर्व जीव याच दिशेला प्राप्त होतात. पुण्यवान् किंवा पापी मुमूर्षु मरणकालीं तमानें आवृत होऊन अत्यंत मूढत्वामुळें दुःख भोगीत याच दिशेला जातात. या दिशेमध्यें सर्व प्राण्यांना प्रतिकूल असलेले असंख्य नैर्ऋत उत्पन्न केले आहेत. ज्यांना पुण्याचा संस्कार झालेला नसतो, त्यांनाच यांचें दर्शन होतें.

हे द्विजा, मंदरपर्वतावरील कुंजांत व विप्रर्षींच्या आश्रमांत गंधर्व योग्यांचें तत्त्वानुसंधान व प्रपंचमिथ्यात्वनिश्चय, यांचें हरण करणाऱ्या गाथा याच दिशेंत गातात. येथेंच पूर्वी 'रैवत'-नांवाचा दैत्य सामगायनानें युक्त असलेल्या गाथा ऐकण्यांत इतका तल्लीन झाला कीं, किती काल निघून गेला याचें त्याला भानहि राहिलें नाहीं. दीर्घ कालानें तो भूलोकीं परत आला, तेव्हां त्याची स्त्री, अमात्य व राज्य हीं सर्व नष्ट झाल्याचें त्याला आढळून आलें व तो वनांत निघून गेला.

येथेंच यवक्रीताचा पुत्र जो सावर्ण मनु त्यानें सूर्याचा रथ व त्याला वहाणाऱ्या देवता यांना मर्यादा घालून दिली; त्यामुळें सूर्य दक्षिणायनाचें अतिक्रमण करीत नाहीं. महात्म्या पौलस्त्य राक्षसराज रावणानें याच दिशेंत तपश्चर्या करून देवांपासून वर मिळविले. वृत्रासुरानेंहि आपल्या आचरणानें येथेंच शक्राशीं शत्रुत्व संपादन केलें. सर्व देहभृतांचे प्राण मरणोत्तर याच दिशेंत येऊन पुनः जन्म घेतात. दुष्कर्में करणाऱ्या पुरुषांना यमराज येथेंच पीडा देतो. याच दिशेंत 'वैतरणी'-नांवाची नदी आहे. ती वितरणसंज्ञक नरकगामी जीवांनीं आवृत झाली आहे. या दिशेंत जाऊन जीव प्रथम अतिशय

१ पूर्व दिशा प्रथमद्वार असल्यामुळें दक्षिणेला द्वितीय म्हटलें आहे. देवांचीं सर्व कर्में पूर्वाभिमुख बसून व पितरांचीं कर्में दक्षिणाभिमुख होऊन करावीं असें शास्त्रवचन आहे.

दुःखाला प्राप्त होतो व भोगानें दुःखाचा नाश झाला असतां स्वर्गसुखाला प्राप्त होतो.

हे गालवा, दक्षिणायनास प्राप्त झालेला सूय मधुर जलाची वृष्टि करितो. दक्षिणायनाच्या आरंभीं प्रायः आर्द्रा नक्षत्र असतें. तें नक्षत्र वर्षाकालाचें आरंभक आहे हें प्रसिद्ध आहे. सूर्य पुनः उत्तर दिशेला प्राप्त होऊन पुनः हिमाची वृष्टि करितो. पूर्वीं मी क्षुधार्त होऊन विचार करूं लागलों असतां मला युद्ध करणारे फार मोठे गजकच्छप येथेंच प्राप्त झाले.

'चक्रधनु'-नांवाचा महान् ऋषि येथेंच सूर्यापासून उत्पन्न झाला. त्याला कपिलदेव असें म्हणतात. त्यानेंच सगरात्मजांना दग्ध केलें. येथेंच 'शिवा'-नामक वेदपारग ब्राह्मण सिद्ध झाले व त्यांनीं समग्र वेदांचें अध्ययन करून अक्षय मोक्ष मिळविला. ऐरावत, तक्षक व वासुकि या नागांनीं पालन केलेली भोगावती नगरी याच दिशेंत आहे. साक्षात् सूर्य व अग्नि यांनाहि अभेद्य असें तमोरूपी अज्ञान मरणकालीं याच दिशेंत प्राप्त होतें.

हे गालवा, मी तुझा सेवक झालों आहें, यास्तव तुला जर हा मार्ग संमत असून तेथें जावयाचें असेल तर मला सांग. अथवा मी पश्चिमेचें वर्णन करितों; प्रथम तें ऐक. ५. ६. १०९.

---

## अध्याय ११० वा.

[ १ पश्चिमेचें वर्णन. ]

( १ ) गरुड—हे गालवा, ही दिशा सलिलराज वरुणाला प्रिय असून सूर्याची आदि प्रतिष्ठा येथेंच आहे. दिवसाच्या पश्चात् म्ह० अंतीं सूर्य आपल्या किरणांचें येथेंच विसर्जन करितो. म्हणून ही दिशा अंतिम 'पश्चिम' या नांवानें प्रसिद्ध झाली. भगवान् कश्यप-देवानेंच वरुणाला समुद्राच्या रक्षणासाठीं जलचरांच्या राज्यावर अभिषेक केला. याच दिशेंत वरुणाचे समग्र षड्रस प्राशन करून तमाचा नाश करणारा सोम शुक्लपक्षांत तारुण्याला प्राप्त होतो. वायूनें बद्ध करून जिंकलेले दैत्य त्या महावायूनें पीडित होऊन मोठमोठ्यानें घोरत येथेंच शयन करितात.

याच दिशेंत अस्ताचलपर्वत त्याला प्रिय असलेल्या सूर्याचें स्वागत करितो व पश्चिम संध्या प्रवृत्त होते. त्यानंतर दिवस संपला असतां प्राण्याचें अर्धें आयुष्य निद्रेच्या योगानें हरण करण्यासाठीं रात्र व निद्रा प्रवृत्त होतात. येथेंच गर्भ

धारण करून शयन करणाऱ्या देवी दितीला शक्रानें तिच्या गर्भापासून वियुक्त केलें व एकुणपन्नास मरुद्गण जन्म पावले. येथूनच हिमालयाचें मूळ समुद्रांत मग्न असलेल्या शाश्वत मंदराला भेटण्यासाठीं निघालें आहे. परंतु सहस्रावधि वर्षें लोटलीं तरी अद्यापि त्याचा अंत लागत नाहीं. यावरून हिमालयाचें मूळ व समुद्राचें जल यांचें अप्रमेयत्व व्यक्त होतें.

सुवर्णाचा पर्वत व सुवर्ण कमलें यांनीं युक्त असलेलें येथें एक समुद्रतुल्य विस्तृत सरोवर आहे. त्या सरोवराच्या तीरावर येऊन कामधेनु दुधाचा स्राव करिते. चंद्र-सूर्यांना ग्रासणाऱ्या राहूचें कबंध याच दिशेंत समुद्राच्या मध्यभागीं दृष्टीं पडतें. 'सुवर्णशिरस्'-नांवाचा नित्य तरुण असलेला मुनि अप्रमेय व अदृश्य आहे. त्याच्या गायनाचा ध्वनि येथें ऐकूं येतो. हरिमेधसाची 'ध्वजवती'-नांवाची कुमारी 'थांब थांब' अशा सूर्याच्या आज्ञेनें आकाशांत स्थित आहे.

या दिशेंत वायु, अग्नि, जल व आकाश या चारी महाभूतांचा स्पर्श रात्रंदिवस सुखावहच होतो. येथूनच सूर्य मेरूला प्रदक्षिणा करून तिर्यग्गतीनें जातो, त्यामुळें लोकांना तो खालीं जात आहे, असें भासतें. येथेंच आदित्यमंडल अग्न्यादि ज्योतींमध्यें प्रवेश करितें. नक्षत्रादिकहि जलमय असल्यामुळें वस्तुतः अप्रकाशक आहेत. तथापि रात्रीं आदित्याच्या प्रभेनेंच तीं भासतात आणि दिवसा त्या प्रभेच्या योगानेंच लुप्त होतात अशी लोकप्रसिद्धि आहे. अश्विन्यादिकांतील एकेक नक्षत्र सत्तावीस दिवस चंद्राबरोबर संचार करून चैत्रादि प्रत्येक महिन्याच्या अठ्ठाविसाव्या दिवशीं रात्रीं त्याच्याच बरोबर रहातें व एकूणतिसाव्या रात्रीं चंद्रापासून बाहेर पडतें. या चंद्रसंयोगाप्रमाणेंच सूर्यासंबंधानें सूर्याबरोबर संचार करून तीं नियतकालीं त्याच्यापासूनहि दूर होतात. सर्व नक्षत्रांचा सर्व ग्रहांशीं असाच संयोग होतो. समुद्राची पूर्ति करण्यासाठीं सर्व नद्यांचा उगम येथूनच होतो. या पश्चिमसमुद्रांत सर्व त्रैलोक्यांतील जलाचा संचय असतो.

येथेंच पन्नगराज, अनंत व आद्यंतरहित विष्णु यांचें अप्रतिम निवासस्थान आहे. अनलसखा पवन, महर्षि कश्यप व मारीच यांचें स्थानहि येथेंच आहे. याप्रमाणें हा पश्चिम मार्ग मीं तुला संक्षेपतः सांगितला आहे. आतां, हे द्विजश्रेष्ठा, तुझी इच्छा काय आहे, तें सांग म्हणजे आपण त्या दिशेंत जाऊं. ५. ६. ११०.

## अध्याय १११ वा.

[ १ उत्तरदिशेचें वर्णन. ]

(१) गरुड—हे गालवा, उत्तरमार्गानें जाणाऱ्या जीवांच्या पातकांचा नाश होऊन स्वर्गप्राप्ति होते. शब्दसामर्थ्यानेंच या दिशेमध्यें उद्धार करण्याचें सामर्थ्य आहे. म्हणून तिला 'उत्तर' असें म्हणतात. या उत्तर दिशेंत धनाचा निधि असतो. हें उत्तम निधींचें स्थान असल्यामुळें तोच स्वर्गमार्ग होय. ही दिशा पूर्व व पश्चिम यांच्यामध्यें असल्यामुळें तिला मध्यम मार्ग असेंहि म्हणतात. हे द्विजा, या श्रेष्ठ उत्तर दिशेंत असौम्य, अजितेंद्रिय व अधार्मिक लोक रहात नाहींत. येथेंच बदरिकाश्रमांत नारायण कृष्ण व नरोत्तम जिष्णु वास करितात. त्याचप्रमाणें शाश्वत ब्रह्माहि येथेंच रहातो.

याच उत्तर दिशेंतील हिमालयाच्या शिखरावर उमेसह महेश्वर नित्य निवास करितो. तो ईश्वर प्रलयाग्नीप्रमाणें तेजस्वी आहे. केवल नर-नारायणा-वांचून तो इतर कोणालाहि दृग्गोचर होत नाहीं. वासवासह देव, मुनिगण, यक्ष, गंधर्व, सिद्ध यांनाहि तो दिसत नाहीं. सहस्राक्ष, सहस्रचरण, सहस्रशीर्ष व अव्यय असा एक श्रीमान् विष्णुच आपल्या मायेनें त्याला पाहूं शकतो.

येथेंच विप्रांच्या राज्यावर चंद्राला अभिषेक करण्यांत आला. गगनांतून च्युत झालेली गंगा याच उत्तर दिशेंत महादेवानें मस्तकावर धारण करून ती मानुषलोकाला दिली. याच ठिकाणीं गौरीनें महेश्वराच्या प्राप्तीसाठीं तप आचरिलें. काम, रोष, शैल व उमा हीं येथेंच उत्पन्न झालीं. याच उत्तर दिशें-तील कैलास पर्वतावर कुबेराला राक्षस, यक्ष व गंधर्व यांच्या आधिपत्याचा अभिषेक केला. येथेंच रम्य चैत्ररथ वन, वैखानस आश्रम, मंदाकिनी व मंदर पर्वत आहे. नैर्ऋतांनीं रक्षण केलेलें सौगंधिक वनहि याच दिशेंत आहे.

येथेंच वैजयंती पताकेच्या स्तंभाप्रमाणें उंच जंबाल या नांवाचा देवता-भेद आहे. याच दिशांत 'संतानक'-नांवाचे कल्पवृक्ष आहेत. ज्यांना धारणा-ध्यानादि संयम कधींहि त्याज्य नाहीं, अशा स्वैरसंचार करणाऱ्या नित्य संयमी सिद्धांचीं इच्छेप्रमाणें भोग देणारीं अनुरूप विमानें येथेंच असतात.

सप्त ऋषि व देवी अरुन्धती येथेंच रहातात. स्वाति याच दिशेंत स्थित आहे. म्हणून येथेंच तिचा उदय स्मृत आहे. येथेंच यज्ञ करून पितामह ध्रुव-रूपानें स्थित आहे. याच दिशेंत ध्रुवाच्या सभोंवार नक्षत्रें व चन्द्र-सूर्य नित्य

परिवर्तन करितात. ज्यांची मूर्ति, आकृति किंवा तप हें कोणाला दिसत नाहीं ते 'धामा'-नांवाचे महात्मे सत्यवादी मुनि येथेंच राहून गंगामहाद्वाराचें रक्षण करितात. येथील गमनागमन व सहस्रावधि इष्टान्न देण्याचीं पात्रें यांचें दर्शन स्थूलदृष्टि लोकांना होत नाहीं.

हे गालवा, हिमालयाच्या उत्तर दिशेंत पुरुष जसा जसा पुढें जातो, तसा तसा तो नाश पावतो. नारायण देव आणि अव्यय जिष्णु यांच्यावांचून अन्य कोणीहि येथें पूर्वीं गेलेलें नाहीं. कुबेराचें 'कैलास'-नामक स्थान येथेंच आहे. 'विद्युत्प्रभा'-संज्ञक दहा अप्सरा येथेंच रहातात. त्रैलोक्याचें आक्रमण करीत असतांना विष्णूनें या उत्तर दिशेंत 'विष्णुपद' नांवाचें स्थान केलें. याच दिशेंत मरुत्त राजानें यज्ञ केला. हे विप्रर्षे, उशीरबीजस्थानीं जेथें जांबूनद सुवर्ण सरोवर आहे, तेथें महात्म्या जीमूत ब्रह्मर्षीला सुवर्णाचा आकर दिसला, तो पवित्र व विमल सुवर्णाकर साक्षात् हिमालयाचा होता. तो विपुल सुवर्णनिधि 'माझ्या नांवानें प्रसिद्ध व्हावा' असा त्यानें ब्राह्मणांपाशीं वर मागितला. तेव्हांपासून तें धन जैमूत या नांवानें प्रसिद्ध झालें. या दिशेंत सर्व दिक्पाल नित्य प्रातःकालीं व सायंकालीं 'कोणाचें काय कार्य आहे ?' असा आक्रोश करीत असतात.

हे द्विजश्रेष्ठा, हे व आणखींहि दुसरे श्रेष्ठ गुण या दिशेंत आहेत, म्हणून तिला 'उत्तरा' असें म्हटलें असून ती सर्व कर्मांमध्यें वरिष्ठ आहे. याप्रमाणें मीं तुला क्रमानें चारी दिशांचें सविस्तर वर्णन सांगितलें. आतां कोणत्या दिशेंत जाण्याची तुझी इच्छा आहे ! तुला सर्व दिशा आणि समग्र पृथ्वी दाखविण्यास मी उद्युक्त झालों आहें. यास्तव माझ्या पाठीवर आरूढ हो. ५. ६. १११.

---

## अध्याय ११२ वा.

[ १ गरुडावर आरूढ झालेल्या गालवाचें पूर्वेकडे गमन. २ गरुडाचा वेग व समुद्राची गर्जना ऐकून गालवाची व्याकुलावस्था. ३ गरुडाचें आश्वासन व ऋषभपर्वतावर विश्रांति. ]

(१) **गालव**—हे विनतात्मजा सुपर्णा, जेथें धर्माचे दोन चक्षु म्ह० अग्निषोम स्थित आहेत, त्या पूर्वदिशेंत मला ने. तूं प्रथम जिचें वर्णन केलेंस त्या दिशेंत चल. त्या दिशेंत देवतांचें सांनिध्य असतें, असें तूं म्हटलें होतेंस. तेथें

सत्य व धर्म स्थित आहे, असें तूं यथार्थ वर्णन केलें आहेस. तेथें सर्व देवतांना भेटण्याची व त्यांना पहाण्याची माझी इच्छा आहे.

नारद्—राजा, तें ऐकून विनतासुत त्याला म्हणाला—" हे द्विजा, माझ्या पाठीवर आरूढ हो." तेव्हां तो गालवमुनि गरुडाच्या पाठीवर आरूढ झाला.

( २ ) गालव—हे पन्नगाशना, आक्रमण करणाऱ्या तुझें रूप पूर्वाण्हीच्या सहस्ररश्मि भास्करासारखें भासत आहे. हे खगा, तुझ्या पंखापासून उत्पन्न झालेल्या वायूमुळें तुझ्या मागोमाग येत असलेले व तुझ्या प्रभेनें प्रकाशित झालेले हे सर्व वृक्ष तुझ्या किरणाप्रमाणें भासत आहेत. त्यामुळें सूर्याप्रमाणेंच तुझी गति आहे असें मला वाटतें. तूं आपल्या पंखांच्या वेगानें पर्वत, वन, सागर यांसह सर्व पृथ्वीचें आक्रमण करीत आहेस, असें भासतें. प्रचंड वायूनें व पंखांच्या वेगानें मत्स्य, नाग व नक्र यांच्यासह जल जणुकाय आकाशांत प्रस्थापित होत आहे. तिर्मिंगल, नाग, अश्व, नर, यांचें मंथन होत आहे, असें दिसतें.

या महार्णवाच्या गर्जनेनें माझे कान बधिर झाले आहेत, मला कांहीं ऐकूं येत नाहीं, कांहीं दिसत नाहीं. मी कशासाठीं निघालों, त्याचें प्रयोजनहि मला स्मरत नाहीं. यास्तव हे गरुडा, तूं हळू चल. नाहीं तर मी समुद्रांत पडून नाश पावेन व तुला ब्रह्महत्येचा दोष घडेल, हें लक्षांत ठेवून हळू चल. अरे बाबा, या वेळीं मला रवि, दिशा, किंवा आकाश कांहीं दिसत नाहीं. मला केवल तूं दिसत आहेस. तुझें शरीरहि दिसत नाहीं. तुझे नेत्र दोन श्रेष्ठ रत्नांसारखे मला भासत आहेत. तुझ्या देहापासून निघत असलेला अग्नि मला क्षणोक्षणीं दिसत आहे. यास्तव हे सुपर्णा, तूं आपली दृष्टि सौम्य करून शांत हो. आपला वेग कमी कर. मला पूर्वदिशेंत गमन करण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. हे महाभागा, तुझा हा वेग मला सहन होत नाहीं. तूं परत फिर. मीं एका बाजूनें श्यामकर्ण व चंद्रासारखे शुभ्र आठशें अश्व विश्वामित्र गुरूला देण्याचें अभिवचन दिलें आहे. ती गुरुदक्षिणा देण्याचा मार्ग मला दिसत नाहीं. हा जीवितत्यागाचा मार्ग मात्र माझ्या पुढें दिसत आहे. माझ्यापाशीं धन नाहीं. किंवा माझा एखादा धनाढ्य सुहृद्हि नाहीं. शिवाय विपुल धनानेंहि असे दुर्लभ अश्व संपादन करतां येणें शक्य नाहीं.

( ३ ) नारद्—हे राजा, असें अनेक प्रकारें दीन भाषण करणाऱ्या गालवाला वाहून नेत असतांनाच गरुड हंसून म्हणाला—" हे विप्रर्षे, तूं ज्याअर्थीं

प्राणत्याग करावयास सिद्ध झाला आहेस, त्या अर्थी तूं विचारी दिसत नाहींस. कारण मरण स्वेच्छेनें कदापि संभवत नाहीं. तो काल परमेश्वराच्या अधीन आहे. परंतु हे विप्रा, तूं मला हा गुरुदक्षिणेचा वृत्तान्त पूर्वीच कां सांगितला नाहींस ! अशा प्रकारचे अश्व प्राप्त करून घेण्याचा एक उत्तम सुलभ उपाय आहे; त्याच्या योगानें ते तुला प्राप्त होतील. हे गालवा, हा पहा, समुद्राच्या समीप ऋषभपर्वत आहे. त्यावर आपण उतरूं. येथें तूं विश्रांति घे. आहार कर. नंतर आपण परत फिरूं. ५. ६. ११२.

---

## अध्याय ११३ वा.

[ १ ऋषभपर्वतावरील शाण्डिलीच्या आश्रमांत विश्रांति घेणाऱ्या गरुडाचा पक्षभ्रंश. २ क्षमेच्या याचनेनंतर गरुडाला पुनः पक्षप्राप्ति. ]

(१) नारद—हे राजा, त्यानंतर गालवासह गरुड ऋषभपर्वताच्या शिखरावर उतरला. तेथें त्या दोघांनीं तपानें युक्त असलेली शांडिली ब्राह्मणी पाहिली. सुपर्णानें तिला वंदन केलें व गालवानें तिचा सत्कार केला. तेव्हां त्या तपस्विनीनें त्या दोघांचें स्वागत करून बलि व मंत्र यांनीं युक्त असलेलें सिद्ध अन्न त्यांना दिलें. तें अन्न भक्षण करून ते दोघे तृप्त झाले व श्रांत झालेल्या त्यांनीं तेथेंच भूमीवर शयन केलें.

थोड्या वेळानें गमन करण्याच्या इच्छेनें सुपर्ण जागा झाला. तेव्हां आपले दोन्ही पंख गळून गेले आहेत असें त्याला दिसून आलें. मुख व पाद यांनीं युक्त असलेला तो खग मांसाच्या पिंडासारखा बनला. गरुडाची ही अवस्था पाहून खिन्न झालेला गालव त्याला म्हणाला—हे सुपर्णा हा काय प्रकार आहे ! येथें येण्यानें तुला हें कसलें फल प्राप्त झालें ! आतां आपल्याला येथें किती काल रहावें लागेल ! तूं मनानेंहि कांहीं धर्मबाह्य अशुभ चिंतन केलें नाहींस. किंवा तुझ्याकडून यत्किंचित्‌हि धर्माचा अतिक्रम किंवा अन्याय घडणें शक्य नाहीं.

तें ऐकून सुपर्ण म्हणाला—हे विप्रा, माझ्या मनांत एक असत् विचार आला होता. ही सिद्ध तपस्विनी या क्लेशकर प्रदेशांत कशी रहात असेल ! तिला जेथें प्रजापति, महादेव, सनातन विष्णु, धर्म व यज्ञ स्थित आहे, तेथें न्यावें, असें मीं मनानें चिंतन केलें. त्यामुळें मला हें अनिष्ट फल प्राप्त झालें

असावें. यास्तव माझें प्रिय करण्याच्या इच्छेनें मी आतां या साध्वीची नम्र-पणें प्रार्थना करितों—"हे भामिनि, तूं येथें कशी रहात असशील याविषयीं खेद वाटून मीं मनानें असें चिंतन केलें. मीं तुझ्याविषयींच्या आदरानें तुला अनिष्ट असलेलें हें चिंतन केलें, यास्तव तें सुकृत असो किंवा दुष्कृत असो, तूं आपल्या माहात्म्यानें मला क्षमा करावीस, हें उचित आहे."

तेव्हां ती शाण्डिली संतुष्ट झाली व तो ब्राह्मण आणि पक्षी या दोघांना म्हणाली—"हे सुपर्णा, भिऊं नको. तूं उत्तम पंखानें युक्त होशील. तूं निश्चित हो. हे वत्सा, तूं माझी निंदा केलीस व मला तर निंदा मुळींच सहन होत नाहीं. जो पातकी मनुष्य माझी निंदा करितो, तो पुण्यलोकांतून तत्काल च्युत होतो. माझ्यामध्यें सर्व अशुभ लक्षणांचा अभाव आहे, तस्मात् मी सर्व लोकांना अनिंद्य आहें. मी शिष्टाचाराचें ग्रहण करून या श्रेष्ठ सिद्धीला प्राप्त झालें आहें. आचारानें धर्म फलित होतो, आचारानें धनप्राप्ति होते. सदाचारानें ऐश्वर्य लाभतें व सदाचारानेंच अशुभ लक्षणांचा नाश होतो. तस्मात् हे खग-पते, तुला इष्ट वाटेल तेथें जा. तूं आयुष्मान् हो. या पुढें माझी निंदा करूं नको. स्त्रियांची कदापि निंदा करूं नये. आतां तूं पूर्ववत् बल व पराक्रम यांनीं युक्त होशील."

(२) शाण्डिली असें बोलतांच गरुडाचे दोन्ही पंख पूर्वींपेक्षां बलवान् व वेग-संपन्न झाले. नंतर त्या तपस्विनीची अनुज्ञा घेऊन ते दोघे त्या पर्वतावरून उड्डाण करून जेथून निघाले होते, त्याच दिशेंत परत आले. परंतु अपेक्षित अश्व मात्र त्यांना प्राप्त झाले नाहींत.

तेव्हां मार्गांत स्थित असलेल्या श्रेष्ठ विश्वामित्रानें गालवाला वैनतेयाच्या समीप पाहून म्हटलें—"हे द्विजा, तूं स्वतःच मला जी वस्तु आणून देण्याची प्रतिज्ञा केलीस, तिच्या प्राप्तीचा कालहि निघून गेला. तेव्हां आतां तुझा काय विचार आहे! अजूनहि मी तुला अवकाश देतों व अपेक्षित कालाची वाट पहात रहातों. यास्तव ज्यायोगानें तुझा यत्न सिद्धीस जाईल, त्या मार्गाचा विचार कर."

---

१ आचारः फलते धर्ममाचारः फलते धनम् । आचाराच्छ्रियमाप्नोति आचारो हन्त्यलक्षणम् ॥ २ न च ते गर्हणीयाऽहं गर्हितव्याः स्त्रियः क्वचित् ॥

विश्वामित्राचें हें वचन ऐकून गालव अतिशय दुःखित व दीन झाला. त्याची ती स्थिति पाहून सुपर्ण त्याला म्हणाला—"हे विप्रा, विश्वामित्राचें भाषण मीं आतां प्रत्यक्षच ऐकलें आहे. तस्मात् ये, आपण दोघे विचार करूं. कारण गुरूला समग्र दक्षिणा दिल्यावांचून तुला स्वास्थ्य प्राप्त होणार नाहीं.' ५. ६. ११३.

---

## अध्याय ११४ वा.

[ १ धनाची याचना करण्यासाठीं सुपर्णाचें गालवासह ययातीपाशीं गमन. ]

( १ ) **नारद्**—राजा, त्यानंतर पक्षिश्रेष्ठ गरुड दीन झालेल्या गालवाला म्हणाला—" ज्याअर्थी हें जगत् अग्नीनें निर्माण केलेल्या व वायूनें शुद्ध केलेल्या सुवर्णानें युक्त आहे, त्याअर्थीं तें सर्वच हिरण्यप्रधान आहे. हें भूमीचें सार आहे. तसेंच तें शुद्ध व सर्व जगाला मोह पाडणारें असल्यामुळें त्याला हिरण्य असें म्हणतात. सुवर्ण लोकांचें पोषण करितें व त्यांना जीवन देतें म्हणून त्याला ' धन ' असें म्हणतात. तें हें धन तिन्ही लोकांत शाश्वत स्थित आहे.

शुक्रवारीं प्रोष्ठपदा नक्षत्रें आलीं असतां शुक्र म्ह० अग्नि कुबेराच्या वृद्धी-सार्ठीं मनुष्यांना धन देतो. यास्तव धनार्थी मनुष्यानें शुक्रवारीं पूर्वा व उत्तरा भाद्रपदा नक्षत्रांच्या योगावर अग्नीची प्रार्थना करावी. यागादिकांच्या द्वारा किंवा भूमींत पुरून ठेवल्यानें धन कुबेराला प्राप्त होतें. पूर्व व उत्तर भाद्र-पदाच्या देवता अजैकपाद व अहिर्बुध्न्य आणि धनाध्यक्ष कुबेर धनाचें रक्षण करीत असतात. तस्मात् या तिघांची प्रार्थना केली असतां धनप्राप्ति होते. इतर कोणत्याहि मार्गानें ती होत नाहीं.

हे गालवा, तुला धनावांचून अश्व संपादन करतां येणार नाहींत. यास्तव तूं एखाद्या राजर्षिकुलोत्पन्न भूपालाची याचना कर. आपल्या प्रजेला पीडा न देतां ( म्ह० त्यांच्यावर कर, शेतसारा इत्यादि अधिक न लादतां ) जो नृपाल आप-ल्याला कृतार्थ करील त्याच्याकडे आपण जाऊं या. सोमवंशांत उत्पन्न झालेला एक नृप माझा मित्र आहे. तो पृथ्वीवरील सर्व ऐश्वर्यानें युक्त आहे. तो नहुषपुत्र सत्यपराक्रमी ययाति-राजर्षि मीं समक्ष सांगितलें असतां तुला इष्ट धन देईल. त्या नृपश्रेष्ठाजवळ कुबेरासारखी संपत्ति आहे. यास्तव तूं त्यानें दिलेल्या दानानें दक्षिणेचा परिहार कर. "

याप्रमाणें बोलत व उचित कर्तव्याचा विचार करीत ते दोघे ययाति-नरपतीच्या समीप जाऊन उभे राहिले. तेव्हां राजानें श्रेष्ठ अर्घ्य-पाद्यादिकांनीं त्यांचा सत्कार करून आगमनाचें कारण विचारिलें.

राजानें केलेल्या आतिथ्याचा स्वीकार करून विनतासुत म्हणाला—हे राजन्, हा तपोनिष्ठ गालव माझा सखा आहे. हा दीर्घकालपर्यंत विश्वामित्र मुनीचा शिष्य होऊन राहिला होता. योग्य कालीं गुरूनें त्याला ' मीं तुजवर उपकार करण्याच्या इच्छेनेंच हें विद्यादिक दिलें आहे, यास्तव तूं आतां घरीं जा ' अशी अनुज्ञा दिली. परंतु या विप्रानें त्याला 'मी गुरुदक्षिणा देतों ' असें पुनः पुनः म्हटलें.

तेव्हां विश्वामित्र किंचित् क्रुद्ध झाला व हा ब्राह्मण निर्धन आहे हें जाणत असूनहि म्हणाला—" हे गालवा, गुरुदक्षिणा देण्याचीच जर तुझी इच्छा असेल तर एका बाजूनें श्यामकर्ण असलेले चंद्रासारखे कांतिमान् व शुभ्र असे जातिवंत आठशें अश्व मला आणून दे."

हे नाहुषा, तपोधन विश्वामित्राचें हें क्रोधयुक्त भाषण ऐकून हा विप्र शोकानें अतिशय संतप्त झाला व अशी दुर्लभ गुरुदक्षिणा देण्यास असमर्थ असलेला तो तुला शरण आला आहे. तुझ्याकडून ही भिक्षा मिळाली असतां हा ब्राह्मण निश्चिंत होईल आणि गुरूच्या ऋणांतून मुक्त होऊन महत्तप आचरण्यासाठीं वनांत निघून जाईल. हे नरेश्वरा, तो आपल्या तपाचा तुलाहि भाग देईल, आणि राजर्षितपानें युक्त असलेल्या तुला आपल्या तपानें युक्त करील. अश्वांच्या अंगावर जेवढे रोम असतात, तेवढीं वर्षें अश्वदाता त्या लोकाला प्राप्त होतो. हे महीपते, हा ब्राह्मण प्रतिग्रहाला सत्पात्र आहे आणि तूंहि श्रेष्ठ दाता आहेस. तस्मात् तूं त्याला इष्ट दान दे. म्हणजे शुभ्र शंखांतील पवित्र दुधाच्या उपमेलाच तुम्ही दोघेहि पात्र व्हाल. ५. ६. ११४.

---

## अध्याय ११५ वा.

[ १ यज्ञामध्यें ययातीचें वित्त क्षीण झाल्यामुळें स्वकन्येचें गालवाला दान. २ गालवाचें हर्यश्वराजाकडे शुल्कार्थ गमन. ]

( १ ) नारद—हे धार्तराष्ट्रा, याप्रमाणें सुपर्णाचें यथार्थ व उत्तम भाषण लक्षपूर्वक ऐकून सहस्रावधि यज्ञ करणारा व दात्यांतील श्रेष्ठ काशीपति ययाति

पुनः पुनः विचार करून स्वतःशींच असें वचन बोलला—हा माझा प्रिय सखा गरुड व द्विजश्रेष्ठ गालव यांचें आज मला दर्शन घडलें. हा विप्र तपाची साक्षात् मूर्तिच आहे. सर्व सूर्यवंशी श्रेष्ठ नृपालांचें उल्लंघन करून माझ्या बुद्धिमत्तेकडे लक्ष देऊन ज्याअर्थीं त्यानें माझ्याकडे येऊन ही श्लाघ्य भिक्षा मागितली, त्याअर्थीं आज माझा जन्म सफल झाला.

नंतर तो सुपर्णाला म्हणाला—हे अनघा, तूं माझें कुल व देश यांचा उद्धार केलास. परंतु हे मित्रा, मी वस्तुस्थिति सांगतों ती ऐक. मी आतां पूर्वींसारखा धनवान् राहिलों नाहीं. माझी सर्व संपत्ति क्षीण झाली आहे. तथापि हे पक्षिश्रेष्ठा, तुझें आगमन मी व्यर्थ होऊं देणार नाहीं. कारण या विप्रर्षीची आशा निष्फल करणें मला योग्य वाटत नाहीं. यास्तव तुझें इष्ट कार्य संपादन करून देईल, अशी वस्तु मी तुला देतों. आशेनें आलेला याचक हताश होऊन परत गेला असतां तो दात्याचें कुल दग्ध करितो.

हे वैनतेया, याचकाची प्रार्थना विफल करण्यापेक्षां व कोणीं 'अमुक वस्तु दे' अशी याचना केली असतां त्याला स्पष्ट 'नाहीं' असें म्हणण्यापेक्षां दुसरें अधिक पातक नाहीं. हैताश व अकृतार्थ झालेला मान्य पुरुष स्वतः हत होऊन त्या हित न करणाऱ्या धनवान् पुरुषाच्या पुत्र-पौत्रांचाहि नाश करतो.

तस्मात् हे गालवा, माझी ही 'माधवी'-नामक कन्या मी तुझ्या स्वाधीन करितों. सर्व धर्मांची वृद्धि करणारी ही माझी दुहिता स्वतःच्या व पतीच्या चार मातृ-पितृवंशांना स्थिर करणारी आहे. देवकन्येप्रमाणें अप्रतिम रूपानें युक्त असलेल्या या कुमारीची देव, मनुष्य व असुर इच्छा करितात. या बालेचा तूं स्वीकार कर. हिच्या प्राप्तीसाठीं अनेक राजे आपलें राज्यहि देण्यास सिद्ध होतील, मग आठशें श्यामकर्ण अश्वांची काय कथा ! यास्तव या माधवीला तूं घेऊन जा. मी ही आपली कन्या तुला पुत्रिकाविधीनें देत आहें. हिला होणाऱ्या पुत्रामुळें मी दौहित्रवान् व्हावें, एवढीच माझी इच्छा आहे.

---

१ न चाशामस्य विप्रर्षेर्वितथीकर्तुमुत्सहे ॥
२ अभिगम्य हताशो हि निवृत्तो दहते कुलम् ॥
३ हताशो ह्यकृतार्थः सन् हतः संभावितो नरः ।
हिनस्ति तस्य पुत्रांश्च पौत्रांश्चाकुर्वतो हितम् ॥

ययातीचें हें भाषण ऐकून गालवानें त्या कन्येचा स्वीकार केला व 'आम्ही दोघे तुला पुनः भेटूं' असें बोलून तो गरुडासह त्या कन्येला घेऊन निघाला. तेव्हां सुपर्णहि 'तुला अश्वप्राप्तीचें हें द्वार प्राप्त झालें' असें म्हणून व गालवाची अनुज्ञा घेऊन स्वगृहीं निघून गेला.

पक्षिराज निघून गेला असतां गालव 'या कन्येचें दान करून शुल्क मिळविता येईल, असा समर्थ राजा कोण आहे ?' याचा विचार करीत त्या राजकन्येसह निघाला. तो मनोवेगानें अयोध्येमध्यें इक्ष्वाकु कुलोत्पन्न 'हर्यश्व'-नामक राजश्रेष्ठाकडे आला. तो महावीर्यवान् नृपाल चतुरंगसेना, कोश, धान्य व सैन्य यानें युक्त होता. त्याला आपली प्रजा प्रिय होती व तो द्विजांना प्रिय होता. तो वृद्ध भूपति प्रजेसाठीं श्रेष्ठ तप करीत होता.

त्या हर्यश्वाच्या समीप जाऊन गालव त्याला म्हणाला—हे राजेंद्रा, ही माझी कन्या संततीच्या योगानें कुलवृद्धि करणारी आहे. हिचा तूं भार्यार्थ स्वीकार करून मला शुल्क दे. मला कशा प्रकारचें शुल्क अपेक्षित आहे तें सांगतों, लक्षपूर्वक ऐक. ५. ६. ११५

## अध्याय ११६ वा.

[ १ हर्यश्वानें दोनशें अश्वांचें शुल्क देऊन केलेला कन्यापरिग्रह. २ एका पुत्रोत्पत्तीनंतर तिच्यासह गालवाचें अन्य राजाकडे गमन. ]

(१) नारद्—हे नृपते, त्यानंतर नृपश्रेष्ठ हर्यश्वानें गालवाचें हें वचन ऐकून संततीसाठीं अनेक प्रकारें विचार केला व दीर्घ आणि उष्ण निश्वास सोडून तो म्हणाला—"हे विप्रर्षे, ही कन्या उत्तम लक्षणांनीं युक्त आहे. हिचे पादपृष्ठ करपृष्ठ व वक्षःस्थल हे सहा अवयव उन्नत आहेत. त्वचा, केंस, दांत, करांगुलि, पादांगुलि व त्यांचीं पर्वें सूक्ष्म आहेत. हिचा स्वर, बुद्धि व नाभि हीं तीन गंभीर आहेत आणि जिह्वा, अधरोष्ठ, तालु, नेत्राच्या दोन्ही बाजू व हाताचे तळवे हे पांच अवयव आरक्त आहेत. ही कन्या अनेक देव व असुर यांनाहि प्रेक्षणीय आहे. गंधर्वांची गायनादि विद्या हिला अवगत आहे. ही अनेक सुलक्षणांनीं युक्त असून विपुल प्रजेला जन्म देणारी आहे. तस्मात् ही कन्या चक्रवर्ती पुत्र प्रसवण्यास समर्थ आहे. हे द्विजश्रेष्ठा, माझी संपत्ति लक्षांत घेऊन तूं आपलें शुल्क सांग.

गालव—हे राजा, मला एका बाजूनें श्यामकर्ण, चंद्रासारखे शुभ्र व जातिवंत असे आठशें अश्व दे. म्हणजे अग्नीला उत्पन्न करणाऱ्या अरणीप्रमाणें ही शुभा तुझ्या पुत्रांची जननी होईल.

नारद—गालवाचें हें भाषण ऐकून काममोहित व दीन झालेला तो राजर्षि हर्यश्व म्हणाला—हे ऋषिसत्तमा, मजपाशीं तूं वर्णन केलेस तशा प्रकारचे फक्त दोनशेंच अश्व आहेत. इतर जातिवंत अश्व शेंकडों आहेत. यास्तव या कन्येच्या ठिकाणीं मी एकच अपत्य उत्पन्न करीन. तूं माझा एवढा मनोरथ पूर्ण कर.

राजाचें हें वचन ऐकून ती कन्या गालवाला म्हणाली—"हे द्विजा, कोणीं एका ब्रह्मवादी महात्म्यानें मला 'तूं प्रत्येक प्रसूतीनंतर पुनः कन्याच रहाशील' असा वर दिला आहे. यास्तव तूं हे उत्तम अश्व घेऊन मला या राजाला अर्पण कर. अशारीतीनें चार नृपतींना मला दे व प्रत्येकाकडून दोनशें अश्व संपादन करून तूं आपली आठशें अश्वांची संख्या पूर्ण करून घे. त्यामुळें मलाहि चारच पुत्रांची प्राप्ति होईल. या उपायानें तूं गुरुदक्षिणेच्या ऋणांतून मुक्त व्हावेंस, असें मला वाटतें. तुला हा विचार कसा काय वाटतो !

ती कन्या असें बोलली असतां तो मुनि हर्यश्वनृपतीला म्हणाला—हे नरश्रेष्ठा, शुल्काचा चतुर्थांश देऊन तूं या कन्येचें ग्रहण कर व हिच्या ठिकाणीं एक पुत्र उत्पन्न कर.

त्यानंतर हर्यश्वराजानें त्या कन्येचा स्वीकार केला व गालवाला संतुष्ट केलें.

कांहीं काल लोटला असतां योग्य देशीं व कालीं त्या राजर्षीला इष्ट पुत्राची प्राप्ति झाली. तो 'वसुमना'-नांवाचा राजपुत्र वसूंहून धनाढ्य, धनदाता व वसूंसारखा तेजस्वी झाला.

(२) पुढें योग्यकाळीं धीमान् गालव तेथें आला व प्रसन्नचित्त झालेल्या हर्यश्वाला भेटून म्हणाला—हे नृपाला, तुला हा सूर्यासारखा तेजस्वी पुत्र झालेला आहे. तेव्हां हे नरश्रेष्ठा, मला आतां दुसऱ्या नृपतीकडे भिक्षार्थ जाण्याचा काल प्राप्त झाला आहे.

तेव्हां सत्यवचनांत स्थित असलेल्या हर्यश्वानें ब्राह्मणाला इष्ट असलेले अश्व मिळविण्याचा पुष्कळ यत्न केला, पण ते दुर्लभ आहेत हें जाणून त्यानें माधवी त्याला परत दिली. तेव्हां ती राजैश्वर्याचा त्याग करून पूर्ववत् कुमारी झाली

व गालवाच्या मागोमाग गेली. 'मी परत येईपर्यंत हे अश्व तुजपाशींच राहूं दे' असें हर्यश्वाला सांगून गालव त्या कन्येसह दिवोदास-राजाकडे आला. ५. ६. ११६.

---

## अध्याय ११७ वा.

[ १ दिवोदासानेंहि त्याच मूल्यानें केलेला माधवीचा स्वीकार. २ पुत्रोत्पत्तीनंतर तिचें गालवाला प्रतिनिवर्तन. ]

( १ ) गालव—हे राजकन्ये, काशिदेशांचा स्वामी 'दिवोदास'-नांवानें प्रसिद्ध आहे. त्या महावीर्यवान् महीपालाला 'भैमसेनि' असेंहि म्हणतात. तेथें आपण जाऊं या. भद्रे, सावकाश चल. खिन्न होऊं नको. तो जनेश्वर धार्मिक व संयमी असून सत्यामध्यें स्थित आहे.

नारद—राजा, असें बोलून तो विप्रर्षि राजाच्या समीप आला. तेव्हां त्या नृपालानें त्याचा यथान्याय सत्कार केला. नंतर गालवानें त्या नृपाला प्रजेसाठीं माधवीचा स्वीकार करण्याची प्रेरणा केली.

ब्राह्मणाचें वचन ऐकून दिवोदास म्हणाला—"हे द्विजा, हा वृत्तान्त मीं पूर्वींच ऐकला आहे, तेव्हां तो पुनः सविस्तर सांगण्याची काय आवश्यकता आहे! तुझ्या मुखानें हा वृत्तान्त ऐकूनच मलाहि पुत्रप्राप्तीची आकांक्षा झाली आहे. हे द्विजश्रेष्ठा, तूं इतर नराधिपाकडे न जातां माझ्याकडे आलास यांत माझा बहुमान झाला. हें भवितव्य घडून येईलच यांत संशय नाहीं.

हे गालवा, माझें ऐश्वर्यहि इतकेंच आहे. मी तुला अपेक्षित असलेले दोनशें अश्व देईन व राज्यपदाला योग्य असा एकच पुत्र हिच्या ठिकाणीं उत्पन्न करीन."

तेव्हां 'ठीक आहे' असें बोलून त्या द्विजश्रेष्ठानें ती राजकन्या त्याला अर्पण केली आणि त्या राजर्षीनें तिचें यथाविधि पाणिग्रहण केलें.

नंतर ज्याप्रमाणें रवि प्रभावतीशीं, अग्नि स्वाहेशीं, इंद्र शचीशीं, चंद्र रोहिणीशीं, यम धूमोर्णेशीं, वरुण गौरीशीं, धनेश्वर ऋद्धीशीं, नारायण लक्ष्मीशीं, सागर जाह्नवीशीं, रुद्र रुद्राणीशीं, पितामह वेदीशीं, शक्ति अदृश्यन्तीशीं, वसिष्ठ अरुंधतीशीं, च्यवन सुकन्येशीं, पुलस्त्य संध्येशीं, अगस्त्य लोपामुद्रेशीं, सत्यवान् सावित्रीशीं, भृगु पुलोमेशीं, कश्यप अदितीशीं, जमदग्नि रेणुकेशीं,

विश्वामित्र हैमवतीशीं, बृहस्पति तारेशीं, शुक्र शतपर्वेशीं, भूपति भूमीशीं, पुरूरवा उर्वशीशीं, ऋचीक सत्यवतीशीं, मनु सरस्वतीशीं, दुष्यन्त शकुन्तलेशीं, शाश्वतधर्म धृतीशीं, नल दमयंतीशीं, नारद सत्यवतीशीं, जरत्कारू जरत्कारूशीं, पुलस्त्य प्रतीचीशीं, ऊर्णायु मेनकेशीं, तुम्बुरु रंभेशीं, वासुकि शतशीर्षेशीं, धनंजय कुमारीशीं, राम वैदेहीशीं, व जनार्दन रुक्मिणीशीं, रममाण होतो, त्याप्रमाणें दिवोदासराजा माधवीशीं रममाण झाला व त्याच्यापासून त्या राजकन्येला एक पुत्र झाला तोच 'प्रतर्दन'-नांवानें प्रसिद्ध आहे.

(२) कांहीं कालानें गालव दिवोदास नृपतीपाशीं आला व योग्य समयीं त्यास असें वचन बोलला—हे पृथ्वीपते, माझी कन्या आतां मला परत दे. मी आतां अन्य राजाकडे शुल्कार्थ जात आहें. तोंपर्यंत हे अश्व तुझ्याकडेच राहूं देत.

तेव्हां सत्यधर्मांत स्थित असलेल्या त्या धर्मात्म्या दिवोदासानें गालवाशीं केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणें ती कन्या त्याच्या स्वाधीन केली. ५. ६. ११७.

---

## अध्याय ११८ वा.

[ १ औशीनराला माधवीचें दान. २ पुत्रोत्पत्तीनंतर तिच्यासह परत येत असतां मार्गांत झालेलें सुपर्णदर्शन. ]

(१) नारद—धार्तराष्ट्रा, त्यानंतर यशस्विनी माधवीनें पूर्ववत् आपल्या राजैश्वर्याचा त्याग केला व ती सत्यप्रतिज्ञा राजनंदिनी पुनः कुमारी होऊन त्या विप्राला अनुसरली. तेव्हां गालवाचें चित्त स्वकार्यांतच आसक्त झालें

---

१ येथील जनार्दन व रुक्मीणी हा उल्लेख असंगत दिसतो. कारण रुक्मीणी व जनार्दन तत्कालीन आहेत, असा येथें संशय येतो. पण नारदाच्या भाषणाचा अनुवाद वैशंपायन जनमेजयापुढें करीत आहे. किंवा महाभारत अनादि आहे, त्यामुळें यांत दोष नाहीं. अर्जुनमिश्रानें या दृष्टान्ताची अशी संगति लावली आहे. पण आमच्या मतें दृष्टान्त नेहमीं प्राचीनच असावेत असा कांहीं नियम नाहीं. ते सिद्ध असले म्हणजे श्रोत्याला दार्ष्टांतिकाचें ज्ञान करून देण्यास समर्थ होतात. भारतकालीं श्रीकृष्ण ही प्रसिद्ध व्यक्ति होती व नारदानें हा त्याचा दृष्टान्त दिला आहे.

र्ते. तो द्विज विचार करून औशीनर राजाला भेटण्यासाठीं भोजनगरीस ला व त्या सत्यनिष्ठ राजाला असें वचन बोलला—

गालव—हे महाराज, ही कन्या दोन पृथिवीपति पुत्रांना जन्म देईल. हिच्या ठिकाणीं तुझ्यापासून चंद्र-सूर्यांसारखे तेजस्वी दोन पुत्र उत्पन्न होतील त्यांच्या योगानें तूं इह व पर या दोन्ही लोकीं कृतार्थ होशील. तस्मात् हे र्वधर्मज्ञ राजा, मला चंद्रतुल्य तेजस्वी चारशें श्यामकर्ण अश्वांचें शुल्क दे. रुदक्षिणेसाठीं माझा हा यत्न आहे. एरवीं मला अश्व घेऊन काय करावयाचें ाहे ! तुला जर शक्य असेल तर कांहीं विचार न करितां माझें एवढें कार्य र.

हे पार्थिवा, तुला अपत्य नाहीं, यास्तव दोन पुत्र उत्पन्न कर आणि पुत्ररूपी ौकेनें स्वतःचा व पितरांचा उद्धार कर. हे राजर्षे, पुत्रफलाचा उपभोग घेणारा नुष्य स्वर्गांतून च्युत होत नाहीं आणि अपत्यहीन पुरुष जसे घोर नरकाला ास होतात तसे पुत्रवान् होत नाहींत.

हें व अशाप्रकारचें गालवाचें विविध भाषण ऐकून उशीनर नराधिपानें ाला असें उत्तर दिलें—"हे गालवा, तुझें सर्व भाषण मीं ऐकून घेतलें. माझें न पुत्रोत्पत्तीविषयीं उत्सुक झालें आहे, परंतु दैव बलवत्तर आहे. माझ्यापाशीं शा स्वरूपाचे फक्त दोनशेंच अश्व आहेत. याहून भिन्न अश्व सहस्रावधि ाहेत. यास्तव हे ब्रह्मन्, इतर नृपांप्रमाणेंच मीहि हिच्या ठिकाणीं एकच त्र उत्पन्न करीन व त्यांच्याच इतकें मूल्य देईन. मी प्रजेच्या हितार्थ हें ार्य करीत आहें. स्वतःच्या भोगेच्छेनें नव्हे. जो राजा स्वार्थासाठीं दुसऱ्याला न देतो, तो धर्म व यश यांना प्राप्त होत नाहीं. यास्तव मी या कन्येचा तिग्रह करितों. मला ती अर्पण कर. देवकन्येप्रमाणें असलेली ही कुमारी ला एक पुत्र देईल."

याप्रमाणें त्या कन्येचें अनेक प्रकारें वर्णन करणाऱ्या नृपश्रेष्ठ उशीनराचें ालवानें यथाविधि पूजन केलें व भूपालाकडून माधवीचें विधिवत् पाणिग्रहण रवून तो विप्र वनांत निघून गेला.

( २ ) त्यानंतर त्या राजेंद्रानें त्या नृपतनयेसह अनेक पर्वताच्या गुहा, थांचे निर्झर, विचित्र उद्यानें, वनें, उपवनें, रमणीय मंदिरें, प्रासादशिखरें, ातायन विमानें, भूमींतील गृहें इत्यादि विविध स्थलीं क्रीडा केली. योग्य समयीं

त्याला बालरवीसारखा पुत्र झाला. तोच 'शिबि'-नांवानें प्रसिद्ध असलेला नृपश्रेष्ठ होय.

कांहीं कालानें गालव त्या राजर्षीपाशीं आला व त्या कन्येला घेऊन परत चालला असतां मार्गांत त्याला विनतासुत सुपर्ण भेटला. ५. ६. ११८.

---

## अध्याय ११९ वा.

[ १ सुपर्णाच्या वचनावरून गालवानें विश्वामित्राला केलेलें सहाशें अश्वांसह माधवीचें दान. २ एकपुत्रोत्पत्तीनंतर विश्वामित्राचें वनगमन. ३ माधवीला तिच्या पित्याच्या स्वाधीन करून गालवाचा वनप्रवेश. ]

( १ ) नारद्—धार्तराष्ट्रा, त्यानंतर वैनतेय हंसून गालवाला म्हणाला—"हे द्विजा, तुला मी येथें कृतार्थ झालेला पहात आहें, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे."

सुपर्णाचें हें वचन ऐकून गालव त्याला म्हणाला—"अद्यापि माझें चतुर्थांश कार्य अवशिष्ट राहिलें आहे." असें बोलून त्यानें कार्याचा सर्व वृत्तान्त त्याला निवेदन केला.

तेव्हां वक्त्यांतील श्रेष्ठ सुपर्णानें त्याला म्हटलें—हे गालवा, आतां तूं अधिक अश्व मिळविण्याचा यत्न करूं नको. तुला ते मिळणें शक्य नाहींत. कारण पूर्वी एकदा कान्यकुब्ज देशांत गाधीची 'सत्यवती'-नामक कन्या ऋचीकानें भार्यार्थ वरिली. तेव्हां गाधिराजानें 'एकतः श्यामकर्ण एक सहस्र अश्व मला दे' असें शुल्क मागितलें.

तें ऐकून 'ठीक आहे' असें बोलून ऋचीक वरुणालयांत गेला. तेथें अश्वतीर्थांतून अपेक्षित अश्व घेऊन ते त्यानें राजाला नेऊन दिले. नंतर त्या राजानें पुंडरीक यज्ञ करून या अश्वांचें ब्राह्मणांना दान दिलें. त्या ब्राह्मणांकडून तीन भिन्न भिन्न राजांनीं दोन-दोनशें अश्व विकत घेतले व बाकी राहिलेल्या चारशें अश्वांचें मार्गामध्यें वितस्तेनें हरण केलें. त्यामुळें तुला यापेक्षां अधिक अश्व कदापि प्राप्त होणें शक्य नाहीं. तस्मात् हे विप्रा, दोनशें अश्वांच्या जागीं तूं ही कन्या विश्वामित्राला अर्पण कर व तूं मिळविलेले सहाशें अश्वहि दे. म्हणजे तूं आठशें अश्वांच्या प्रतिज्ञेपासून मुक्त होऊन संमोहरहित व कृतकार्य होशील.

तेव्हां गालव 'ठीक आहे' असें बोलून सुपर्णासह निघाला व अश्वांसह कन्येला घेऊन विश्वामित्राकडे आला आणि त्याला म्हणाला—"हे प्रभो, आपल्याला अपेक्षित असलेले हे सहाशें अश्व मीं आणले आहेत. बाकी राहिलेल्या दोनशें अश्वांच्या मोबदल्यांत या कन्येचा स्वीकार करा. तीन राजर्षींपासून हिला तीन धार्मिक पुत्र झाले. आतां आपणहि हिचें पाणिग्रहण करून चवथा चक्रवर्ति पुत्र उत्पन्न करा. त्यामुळें आपल्या आठशें अश्वांची पूर्तता होईल व मी गुरूंच्या ऋणांतून मुक्त होऊन सुखानें तपाचें आचरण करीत राहीन."

विश्वामित्रानें सुपर्णासह गालव व ती सुलक्षणी कन्या यांस पाहून म्हटलें—"हे गालवा, तूं या कन्येला पूर्वींच माझ्याकडे कां आणलें नाहींस ! म्हणजे मला कुलाची वृद्धि करणारे चार पुत्र प्राप्त झाले असते. आतां मी या कन्येचा केवल एक पुत्रोत्पत्तीसाठीं परिग्रह करितों. हे अश्व माझ्या आश्रमाच्या समीप रहातील."

नंतर महाद्युतिमान् विश्वामित्रानें कांहीं काल माधवीसह सुखोपभोगांत घालविला. योग्यसमयीं तिला 'अष्टक'-नांवाचा पुत्र झाला. त्या पुत्राचा जन्म होतांच महामुनि विश्वामित्रानें त्याला आपलें वित्त, धर्म व अश्व अर्पण केले. चंद्रलोकाच्या तुल्य असलेली आपली नगरी अष्टकाला दिली, ती कन्या आपल्या गालवशिष्याच्या स्वाधीन केली आणि स्वतः वनांत प्रयाण केलें.

गालवहि गुरुदक्षिणेंतून मुक्त होऊन सुपर्णासह संतुष्ट चित्तानें त्या कन्येला म्हणाला—तुला दात्यांतील श्रेष्ठ वसुमना, शूर प्रतर्दन, सत्यधर्मनिष्ठ शिबि, आणि चवथा अष्टक असे चार श्रेष्ठ पुत्र झाले. त्यांच्या योगानें चार भूपाल, तुझा पिता व मी यांचा तूं उद्धार केलास. आतां हे भद्रे, चल, तुझ्या पित्याकडे जाऊं या.

असें बोलून गालवानें सुपर्णाला घरीं जाण्याची अनुज्ञा दिली व त्या कन्येला तिच्या पित्याच्या स्वाधीन करून वनांत गमन केलें. ६. ६. ११९.

---

## अध्याय १२० वा.

[ १ माधवीचा स्वयंवर. तिचें वनसेवन व तपश्चर्या. २ ययातीचा स्वर्गवास. राजांचा अवमान केल्यामुळें त्याचें निस्तेजस्त्व. ]

( १ ) नारद—धार्तराष्ट्रा, त्यानंतर ययातिराजा आपल्या कन्येसह गंगायमुनेच्या संगमावरील आश्रमांत आला व त्यानें तिचें स्वयंवर करण्याचा विचार केला. पुरू व यदु या तिच्या बंधूंनीं माधवीला पुष्पमाला घालून रथांत बसविलें आणि वरान्वेषणासाठीं आश्रमांत फिरविलें.

त्या आश्रमांत नाग, यक्ष, मनुष्यें, गंधर्व, मृग, पक्षी, पर्वत, वृक्ष व इतर प्राण्यांचा समूह जमला होता. नानाप्रकारची प्रजा जेथें आहे, अशा देशांचे नृपति व ब्रह्मतुल्य ऋषि यांनीं तें वन सर्व बाजूंनीं आवृत्त झालें होतें. ययातीचे पुत्र आपल्या भगिनीला ते सर्व वर दाखवूं लागले असतां त्या वरवर्णिनी माधवीनें त्या सर्व वरांचें अतिक्रमण करून वनालाच वरिलें. ती रथांतून उतरली, बंधूंना नमस्कार करून त्या पवित्र वनांत गेली व तीव्र तप करूं लागली. त्या ययातिकन्येनें उपवास, विविध दीक्षा व नियम यांचें पालन करून आपलें शरीर कृश केलें. चित्ताचा राग-द्वेषादि मल घालविला व ती सूक्ष्मतत्त्व जाणण्यास योग्य झाली.

व्याघ्र-सिंहादि हिंस्र पशूंनीं व्यास, दावानलानें रहित, निर्जन व गहन असलेल्या त्या वनांत हिरवें व मृदु तृण भक्षण करणारीं हरिणें होतीं. तीं कटु, मधुर व कोवळें गवत भक्षण करीत व पवित्र नद्यांचें स्वच्छ, शीतल आणि सुरस जल प्राशन करीत त्या वनांत फिरत असत. त्या मृगांबरोबरच ही वनचारिणी ब्रह्मचर्यानें युक्त होऊन एखाद्या मृगीप्रमाणें संचार करीत विपुल धर्माचरण करूं लागली.

( २ ) इकडे ययाति राजाहि पूर्वीच्या राजांप्रमाणें आचरण करीत दीर्घकाल राज्य करून शेवटीं कालवश होऊन स्वर्गलोकीं गेला. त्याचे पुरू व यदु या दोन पुत्रांचे वंश पृथ्वीवर वृद्धि पावले. त्यांच्या योगानें तो नहुषपुत्र ययाति या लोकीं प्रतिष्ठित व परलोकीं पूज्य झाला. स्वर्गांत स्थित होऊन श्रेष्ठ फल भोगणाऱ्या त्या महर्षितुल्य राजानें तेथें अनेक सहस्र वर्षें वास केला.

दीर्घ कालानंतर ययाति विवेकमूढ व विस्मित झाला. एकदा पूज्य व महाऋद्धिमान् महर्षि बसले असतां त्या मूढानें देव, मनुष्य व सर्व ऋषिगण

यांचा अवमान केला. तेव्हां बलनिषूदन शक्राला हा वृत्तान्त कळला. सर्व राजर्षि " धिक्कार धिक्कार " असें बोलूं लागले. ययातीकडे पाहून त्यांच्या मनांत असा विचार उत्पन्न झाला—" हा कोण आहे! हा कोणत्या राजर्षीचा पुत्र आहे! हा स्वर्गांत कसा आला! हा कोणत्या कर्मानें सिद्ध झाला! यानें कोठें तप केलें! स्वर्गांत हा कसा ज्ञात झाला! किंवा याला कोण ओळखतो!"

याप्रमाणें मनांत विचार करणारे ते सर्व स्वर्गवासी राजे ययातीकडे पाहून परस्परांस प्रश्न करूं लागले. त्यांनीं तेथील विमानपाल, शेकडों स्वर्गद्वाररक्षक, व आसनपाल या सर्वांस विचारिलें, तेव्हां " हा राजा कोण आहे, हें आम्ही जाणत नाहीं " असें ते सर्व म्हणाले. त्या सर्वांचें ज्ञान आवृत्त झाल्यामुळें त्यांनीं त्या राजाला ओळखलें नाहीं. तेव्हां एका क्षणांत तो राजा निस्तेज झाला. ५. ६. १२०.

---

## अध्याय १२१ वा.

[ १ प्रतर्दनादि यज्ञ करीत असतां त्यांच्यामध्यें ययातीचें पतन. २ माधवीनें स्वतःचें अर्धें तप व गालवानें अष्टमांश तप देऊन त्याचा केलेला उद्धार. ]

( १ ) नारद—राजा, त्यानंतर ययाति स्वस्थानापासून भ्रष्ट व आसनावरून च्युत झाला. त्याचें मन शोकाग्नीनें व्याकुल होऊन कंपित झालें. त्याच्या कंठांतील पुष्पमाला म्लान झाल्या. विज्ञान नाहींसें झालें. मुकुट व बाहुभूषणें गळून पडलीं. वस्त्रालंकार नष्ट झाले. अशा प्रकारचा तो ययाति सर्व राजांना दिसत होता. परंतु त्याला मात्र सर्व राजे कांहीं काल दिसत व पुनः अदृश्य होत. अशा स्थितींत तो राजा शून्य मनानें भूमीवर पडूं लागला. तेव्हां 'मी पुण्याचा नाश करणाऱ्या कोणत्या अशुभाचें मनानें चिंतन केलें!' असा विचार करणाऱ्या निराधार ययातीला स्वर्गांतील सर्व राजे, सिद्ध व अप्सरा खालीं पडत असलेला पाहूं लागलीं.

इतक्यांत पुण्यक्षीण झालेल्या लोकांना स्वर्गांतून खालीं पाडणारा कोणी एक पुरुष देवराजाच्या आज्ञेनें तेथें आला व ययातीला म्हणाला—" हे नृपात्मजा, तूं अतिशय मत्त झाला आहेस. सर्वांचा अवमान करितोस. या अहंकारामुळें तूं भ्रष्ट झाला आहेस. तूं स्वर्गांत रहाण्यास योग्य नाहींस. तुझें तेज नाहींसें झाल्यामुळें तुला कांहीं कळेनासें झालें आहे. यास्तव जा, तुझा अधःपात होवो. "

तेव्हां तो नहुषात्मज 'मी सज्जनांत पडावें' असें तीनदां बोलला व श्रेष्ठ गतीचें चिंतन करीत भूलोकीं पडूं लागला. त्या वेळीं नैमिषारण्यामध्यें चौघे नृपती त्याला दिसले व तो राजा त्यांच्यामध्यें जाऊन पडला. या वेळीं प्रतर्दन, वसुमना, औशीनर शिबि व अष्टक हे चार राजे वाजपेय यज्ञानें सुरेश्वराचें पूजन करीत होते. त्यांच्या यज्ञाचा धूम स्वर्गद्वारापर्यंत जाऊन पोंचला होता. ययाति त्याचा वास घेत महीतलावर उतरला. त्यावेळीं तो धूम पृथ्वीवर येणाऱ्या शुभ्र गंगानदीप्रमाणेंच भासत होता. त्याचें अवलंबन करून तो राजा खालीं आला.

श्रेष्ठ यज्ञसमाप्तीनंतर केलेल्या अवभृत स्नानानें पावन झालेले ते चौघे माधवीचे पुत्र लोकपालोपम होते. ते राजसिंह महाग्नीसारखे तेजस्वी दिसत होते. हुताग्नितुल्य असलेल्या त्या राजर्षींच्या मध्यें पुण्यक्षीण झालेला ययातिराजा अकस्मात् पडला असतां आपल्या तेजानें देदीप्यमान होणारे ते सर्व राजे त्याला म्हणाले—"आपण कोण ? कोणाचे आप्त ? कोणत्या नगरींत किंवा देशांत रहातां ! आपण यक्ष, राक्षस, गंधर्व, किंवा देव यांतील कोण आहां ? आपलें हें स्वरूप मनुष्याचें दिसत नाहीं. आपण येथें कोणत्या हेतूनें आलां आहां !"

ययाति—मी ययाति राजर्षि आहें. माझें पुण्य क्षीण झाल्यामुळें मी स्वर्गांतून च्युत झालों व अधःपतन होत असतां 'मीं सज्जनांत पडावें' असें चिंतन केल्यामुळें तुमच्यामध्यें येऊन पडलों आहें.

राजे—हे पुरुषश्रेष्ठा, तुझें अभिलषित सत्य होवो. तूं आम्हां सर्वांचें क्रतुफल व धर्म यांचा स्वीकार कर.

ययाति—हे नृपालहो, मी[1] प्रतिग्रहालाच धन मानणारा ब्राह्मण नाहीं. मी क्षत्रिय आहें. दुसऱ्याच्या पुण्याचा नाश करण्यास माझी बुद्धि प्रवृत्त होत नाहीं.

( २ ) नारद्—इतक्यांत मृगीप्रमाणें संचार करणारी माधवी तेथें आली. तिला पाहून ते सर्व भूपति तिला अभिवादन करून म्हणाले—"हे तपोधने,

१ नाहं प्रतिग्रहधनो ब्राह्मणः क्षत्रियो ह्यहम् ।
न च मे प्रवणा बुद्धिः परपुण्यविनाशने ॥

तुझें आगमन कां झालें ? आम्हीं काय करावें, अशी तुझी आज्ञा आहे ? आम्ही सर्व तुझे पुत्र तुझ्या आज्ञेंत स्थित आहों."

त्यांचें हें भाषण ऐकून माधवी परम संतुष्ट झाली. तिनें आपल्या ययाति पित्याच्या समीप जाऊन त्याला वंदन केलें व आपल्या पुत्रांच्या मस्तकांना स्पर्श करून म्हटलें—" हे राजेंद्रा, हे माझे पुत्र असून तुझे दौहित्र आहेत. हे कोणी परके नाहींत. हे तुझा उद्धार करतील. दौहित्रांनीं पितामहाचा उद्धार केल्याचे अनेक दृष्टांत अनादि कालापासून प्रवृत्त झालेल्या वेदांत आढळतात. हे राजन्, मी तुझी कन्या मृगचारिणी माधवी आहें. मींहि धर्मसंचय केला आहे. त्यांतील अर्ध्या धर्माचा तूं स्वीकार कर. ज्याअर्थी सर्व पुरुष अपत्यार्जित पुण्याचे भागिदार आहेत, त्याअर्थीं ते तुझ्यासारखेच दौहित्रांची इच्छा करितात."

त्यानंतर त्या चौघां राजर्षींनीं आपल्या मातेला शिरसा वंदन करून मातामहाला नमस्कार केला व अनुपम, स्निग्ध व उच्च स्वरानें सव मेदिनी दुमदुमून टाकीत त्याच वाक्याचा अनुवाद केला.

याप्रमाणें स्वर्गांतून च्युत झालेल्या मातामहाचा ते चौघे नृपाल जों उद्धार करीत आहेत, तोंच तेथें गालव आला व तो ययाति राजाच्या समीप जाऊन म्हणाला—हे प्रभो, माझ्या तपाचा अष्टमांश ग्रहण करून आपण स्वर्गारोहण करा. ५. ६. १२१.

---

## अध्याय १२२ वा.

[ १ प्रतर्दनादिकांनीं केलेल्या पुण्यदानानें ययातीचें स्वर्गारोहण. ]

( १ ) **नारद**—धृतराष्ट्रा, त्या सज्जनांनीं ओळखतांच तो नरश्रेष्ठ ययातिराजा पृथ्वीला स्पर्श न करितां वर जाऊं लागला. दिव्य स्थानीं स्थित असलेला तो राजा संतापरहित झाला. त्यानें दिव्य माला, वस्त्रें व भूषणें धारण केलीं. तो दिव्य गंधादि गुणांनीं युक्त झाला. भूमीला त्याच्या पायांचाहि स्पर्श झाला नाहीं.

तेव्हां लोकांमध्यें दानपति म्हणून प्रसिद्ध असलेला वसुमना राजर्षि उच्च स्वरानें ययातीला म्हणाला—" सर्व लोकांत अनिंदित असलेलें जें पुण्य मीं संपादन केलें आहे, तें मी तुला अर्पण करितों. तूं त्यानें युक्त हो. दानशील व

क्षमाशील पुरुषाला जें फल प्राप्त होतें तें फल मी तुला देत आहें. त्याचा स्वीकार कर."

त्यानंतर नित्य धर्मामध्यें रत व सदैव युद्धपरायण असलेला क्षत्रियश्रेष्ठ प्रतर्दन म्हणाला—" मला क्षत्रियवंशोद्भव यश व वीरशब्दाचें जें फल प्राप्त झालें आहे, त्यानें तूं युक्त हो."

त्याचें भाषण पुरें होतांच बुद्धिमान् औशीनर शिबि म्हणाला—" ज्या अर्थी मी बालकांच्या समूहांत, स्त्रियांमध्यें, नर्मसचिवांच्या विनोदादिप्रसंगीं, युद्धामध्यें, पराजयांत किंवा संकटांतहि कदापि असत्य भाषण केलेलें नाहीं, त्याअर्थीं त्या माझ्या सत्यप्रभावानें तूं स्वर्गलोकीं जा. हे राजन्, माझे प्राण, राज्य व सर्व इष्ट सुखें या सर्वांचा मी प्रसंगीं त्याग करीन, पण सत्य सोडणार नाहीं. त्या माझ्या सत्यबलावर तू स्वर्गीं जा. ज्या माझ्या सत्यनिष्ठेनें धर्म, अग्नि व शक्र संतुष्ट होतात, त्या सत्याच्या प्रभावानें तूं देवलोकीं गमन कर."

त्यानंतर विश्वामित्र व माधवी यांचा पुत्र राजर्षि अष्टक उठला. सहस्रावधि यज्ञ करणारा तो धर्मवेत्ता नाहुषाजवळ येऊन म्हणाला—" हे प्रभो, मीं शेंकडों पुंडरीक, गोसव आणि वाजपेय यज्ञ केले आहेत. त्या सर्व ऋतूंचें फल तुला प्राप्त होवो. यज्ञामध्यें ज्यांचा विनियोग केला नाहीं, अशीं रत्नें, धन, किंवा अन्य कोणताहि पदार्थ माझ्यापाशीं नाहीं. त्या सत्याच्या सामर्थ्यानें तूं स्वर्गारोहण कर."

याप्रमाणें ते ययातीचे दौहित्र जसे जसे बोलूं लागले तसा तसा तो राजा पृथ्वी सोडून स्वर्गलोकीं वर वर जाऊं लागला. स्वर्गांतून च्युत झालेल्या ययातीला अशा प्रकारें त्या सर्व राजांनीं आपल्या सुकृतांनीं तत्काल तारिलें. त्या दौहित्रांनीं आपल्या यज्ञ-दानरूपी धर्मानें चार राजवंशांची कुलवृद्धि केली आणि आपल्या महाप्राज्ञ मातामहाचा उद्धार केला.

**नृपाल**—हे पार्थिवा, आम्ही तुझे दौहित्र सर्व राजधर्मांनीं व सर्व धार्मिक गुणांनीं युक्त आहों. तूं सुखानें स्वर्गारोहण कर. ५. ६. १२२.

---

## अध्याय १२३ वा.

[ १ पुनः स्वर्गलोकीं गेलेल्या ययातीचें देवतांनीं केलेलें अभिनंदन. २ ययातीचा स्वपतनाविषयीं ब्रह्मदेवाला प्रश्न व 'हें अभिमानाचें फल आहे,' असें उत्तर. ३ नारदाचा दुर्योधनाला अहंकारत्यागाविषयीं उपदेश. ]

( १ ) **नारद्**—हे कुरुश्रेष्ठा, याप्रमाणें विपुल दक्षिणा देणाऱ्या त्या सज्जन भूपालांनीं ययातीला पुनः स्वर्गांत प्रस्थापित केलें. तेव्हां आपल्या दौहित्रांची अनुज्ञा घेऊन ययातिराजा स्वर्गांत जाण्यास निघाला. त्यावेळीं नाना प्रकारच्या सुवासिक पुष्पांची त्याच्यावर वृष्टि झाली. सुगंधयुक्त पवित्र वायु वाहूं लागले. दौहित्रांनीं स्वतःच्या कर्मांनीं संपादन केलेल्या पुण्यफलांनीं युक्त होऊन तो राजा स्वर्गांतील अचल स्थानाला प्राप्त झाला. आपल्या कर्मांनीं वृद्धि पावलेला तो ययाति परम तेजानें अतिशय शोभला. स्वर्गांमध्यें अप्सरा व गंधर्व यांच्या समुदायांनीं नृत्य, गीत व दुन्दुभीचा ध्वनि यांच्या योगानें मोठ्या प्रेमानें त्याचें स्वागत केलें. विविध देव, गंधर्व व चारण यांनीं त्याचें स्तवन केलें आणि देवतांनीं उत्तम अर्घ्यादिकांनीं त्याचा सत्कार केला.

याप्रमाणें पुनरपि स्वर्गफलाला प्राप्त झालेल्या त्या राजर्षीला लोकपितामह ब्रह्मदेव म्हणाला—"हे राजर्षे, तप, यज्ञ, ज्ञान व दान या चतुष्पाद धर्मांचा संचय करून तूं हा अक्षय लोक संपादन केलास. स्वर्गलोकांत तुझी शाश्वत कीर्ति पसरली. परंतु पुढें तुला संपादन केलेल्या पुण्यकर्मांचा अहंकार वाटूं लागला व 'माझ्यासारखा पुण्यवान् कोणी नाहीं' अशा अभिमानानें तूं स्वतःचाच विनाश करून घेतलास. स्वर्गवासी जनांचा अवमान केल्यामुळें ते क्रुद्ध झाले व तुझी ओळख विसरले. त्यामुळें 'तूं ययाति आहेस' हें न जाणतां त्यांनीं तुला स्वर्गांतून खालीं ढकलून दिलें. तुझ्या दौहित्रांनीं प्रेमानें तुझा उद्धार केल्यामुळें तूं पुनः येथें आलास व स्वकर्मानें संपादन केलेल्या या अचल, शाश्वत, ध्रुव, अव्यय व पवित्र स्थानाला प्राप्त झालास.

(२) **ययाति**—हे भगवन्, माझ्या मनांत एक शंका आहे. तिचें निरसन करण्यास तूंच समर्थ आहेस. मला हा प्रश्न तुझ्यावांचून अन्य कोणाला विचारतां येत नाहीं. हे लोकपितामह, मीं दीर्घ कालपर्यंत प्रजेचें पालन केलें, सहस्रावधि यज्ञ करून विपुल दानादि दिलें, त्या महत्पुण्याच्या योगानें मला हें स्वर्गस्थान प्राप्त झालें होतें. पण तें पुण्यफल अल्पकालांत क्षीण कसें झालें ? व

माझा अधःपात कां झाला ! मीं संपादन केलेला हा शाश्वत लोक व माझें सर्व ऐश्वर्य एका क्षणांत नष्ट कसें झालें !

पितामह—हे राजेंद्रा, तूं दीर्घकाल प्रजापालन व यज्ञ-दानादि करून विपुल पुण्य संपादन केलें होतेंस, हें सत्य आहे. परंतु तुझ्या मनांत अभिमान उत्पन्न झाला व त्या एकाच दोषानें तुझें पतन झालें; स्वर्गवासी जनांनीं तुझा धिक्कार केला.

हे राजन्, अभिमान, बल, हिंसा, शाठ्य व कपट यांनीं युक्त असलेल्या पुरुषाला हा शाश्वत लोक प्राप्त होत नाहीं. यास्तव कोणीहि प्राणी अधम, मध्यम किंवा उत्तम असो, त्याचा तूं कदापि अवमान करूं नको. अहंकारानें दग्ध झालेल्या पुरुषाला शांति कदापि प्राप्त होत नाहीं.

जे मानव तुझें हें " पतनारोहण " आख्यान इतरांस कथन करतील, ते संकटांत सांपडले, तरी निःसंशय त्यांतून पार पडतील.

( ३ ) नारद्—हे दुर्योधना, याप्रमाणें पूर्वी ययातिराजा अहंकारामुळें स्वर्गापासून च्युत झाला व गालव दुराग्रहामुळें संकटांत सांपडला. यास्तव स्वतःचें हित इच्छिणारानें आपले सुहृद् व हितचिंतक यांचा सदुपदेश ऐकावा. दुराग्रह धरूं नये. कारण दुरभिमान कुलक्षय करणारा आहे. तस्मात् हे गांधारी-पुत्रा, तूंहि अभिमान व क्रोध यांचा त्याग कर व हा क्षोभ सोडून पांडवांशीं संधि कर.

हे राजपुत्रा, पुरुष जें दान देतो, कर्म आचरितो, तप करितो, किंवा होम करितो, त्याच्या फलाचा नाश व अपकर्षहि होत नाहीं आणि त्याचा फलभोग दुसरा कोणीहि घेऊं शकत नाहीं. कर्त्यालाच त्याचें फल प्राप्त होतें. यास्तव दुर्योधना, तूं पापबुद्धीनें आचरिलेल्या या पापकर्माचें फल तुलाच भोगावें लागेल. तें तुझ्या भ्रात्यादिकांस प्राप्त होणार नाहीं.

जो कोणी पुरुष राग-द्वेषरहित अशा थोर पुरुषाचें हें नाना शास्त्र-युक्त्यादि-कांनीं निश्चित केलेलें उत्कृष्ट महाख्यान पठन करितो, त्याला धर्मादि तीन पुरुषार्थांचें यथार्थ ज्ञान प्राप्त होतें व तो पृथ्वीचा उपभोग घेतो. ५. ६.१२३.

---

## अध्याय १२४ वा.

[ १ धृतराष्ट्रानें पुत्रबोधाविषयीं केलेली श्रीकृष्णाची प्रार्थना. २ श्रीकृष्णानें केलेला सदुपदेश. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे नारदा, तूं सांगतोस तें सत्य आहे. माझीहि अशीच इच्छा आहे. परंतु माझ्या हातीं सत्ता नाहीं. मी परतंत्र आहें.

वैशंपायन—जनमेजया, नारदाला असें बोलून धृतराष्ट्र श्रीकृष्णाकडे वळला व त्याला म्हणाला—"हे केशवा, तूं मला न्याय्य व धर्म्य वचन सांगत आहेस. तें यालोकीं व परलोकींहि श्रेयस्कर आहे. परंतु पुरुषोत्तमा, तुझें वचन मला प्रिय जरी असलें, तरी त्याप्रमाणें वागण्यास मी स्वतंत्र नाहीं. बा कृष्णा, माझा हा मंदमति दुर्योधन शास्त्रांचें अतिक्रमण करीत आहे. त्याला शांतीचा उपदेश करण्याचा यत्न कर.

हे महाबाहो, साध्वी गांधारी, धीमान् विदुर व भीष्मादि हित चिंतिणारे सुहृद् यांचें किंवा अन्य कोणाचेंच सदुपदेश वचन तो मूढ ऐकत नाहीं. त्या क्रूर दुरात्म्याचें चित्त पापानें युक्त झाल्यामुळें तो जणुकाय चेतनाशून्यच झाला आहे. त्या पापमति दुर्योधनाला तूं स्वतः कांहीं उपदेश कर. त्यामुळें तूं फार मोठें सुहृत्कार्य केलेंस असें होईल !"

( २ ) धृतराष्ट्राची ही प्रार्थना ऐकून सर्व धर्मवेत्ता जनार्दन दुर्योधनाकडे वळून असें मधुर वचन बोलला–"कुरुश्रेष्ठ दुर्योधना, तुझ्या सर्व अनुयायांच्या व विशेषतः तुझ्या शमासाठीं मी तुला सांगत आहें, तें माझें भाषण लक्षपूर्वक ऐक. हे भारता, तूं श्रेष्ठ कुलांत उत्पन्न झाला आहेस, शास्त्राध्ययनसंपन्न आहेस व सर्व गुणांनीं युक्त आहेस. तस्मात् तुला शम करणेंच उचित आहे.

बाबारे, तूं जें करण्याचें मनांत आणिलें आहेस, तसें आचरण दुष्कुलोत्पन्न क्रूर व निर्लज्ज दुरात्मे करीत असतात. या लोकीं सज्जनांची वृत्ति नेहमीं धर्मार्थयुक्त असते व दुर्जनांची त्याच्या विपरीत असते. त्या असज्जनांप्रमाणेंच तुझी ही वृत्ति विपरीत दिसत आहे. तुझ्या वर्तनांत घोर अधर्म प्रतीत होतो, तो फार मोठी प्राणहानि करणारा असल्यामुळें अनिष्ट व निष्कारण आहे. तुझा तो अधर्म कोणालाहि सहन होण्यासारखा नाहीं. यास्तव हे वीरा, तूं त्या अनर्थाचा परिहार कर. म्हणजे तूं स्वतःचें, आपल्या भ्रात्यांचें व मित्रांचेंहि कल्याण करशील आणि अधर्म्य व अयशस्कर अशा कर्मांपासून मुक्त होशील.

महोत्साही, शूर, बहुश्रुत, आत्मवेत्ते व प्राज्ञ अशा पांडवांशीं तूं संधि कर. बुद्धिमान् धृतराष्ट्र, पितामह भीष्म, द्रोण, बुद्धिमान् विदुर, कृप, सोमदत्त, बाह्लिक, अश्वत्थामा, विकर्ण, संजय, व विविंशति या सर्वांना पांडवांशीं शम करणें प्रिय व हितकर वाटत आहे. तूं शम केल्यास त्यांत ज्ञातिजन, मित्र किंबहुना सर्व जगत् यांचें कल्याण होईल.

हे परंतपा, तूं श्रेष्ठ कुलांत उत्पन्न झाला आहेस. तूं अकार्योविषयीं लज्जा बाळगणारा व दयाळु आहेस. असें क्रूर कर्म करूं नको. तूं शास्त्राध्ययन केलें आहेस. तस्मात् आपल्या माता-पित्यांच्या आज्ञेंत रहा. तुझा पिता जें श्रेयस्कर मानीत आहे व जो उपदेश करीत आहे, त्याप्रमाणें तूं वाग. जे दुराग्रही लोक आरंभींच पित्याचा उपदेश ऐकत नाहींत, त्यांना संकटांत पडल्यानंतर मग पित्याच्या वचनाचें स्मरण होत असतें. यास्तव तूं पित्याचें वचन अमान्य करूं नको.

भीष्मादि अमात्यांसह तुझ्या पित्याला पांडवांशीं संधि करणें संमत आहे; यास्तव तें तुलाहि मान्य होवो. जो मानव सुहृदांचा सदुपदेश ऐकून त्याप्रमाणें वागत नाहीं, त्याला मरणसमयीं भक्षण केलेल्या विषारी फलाप्रमाणें परिणामीं पश्चात्ताप होतो.

जो मनुष्य आपल्या कल्याणाचें वाक्य मोहानें ऐकत नाहीं, तो दीर्घसूत्री पुरुष अर्थहीन होऊन पश्चात्तापांत पडतो. परंतु जो विवेकवान् पुरुष कल्याण-पर वचन ऐकून आपला दुराग्रह सोडतो, तो सुखी होतो. जो स्वाभाविक प्रतिकूलतेमुळें कल्याणेच्छु पुरुषाचें वचन ऐकत नाहीं; उलट प्रतिकूल वचनें आदरानें श्रवण करितो, तो शत्रूच्या स्वाधीन होतो. जो मनुष्य सज्जनांचें अतिक्रमण करून असज्जनांच्या मताप्रमाणें वागतो, त्याला संकटांत पडलेलें पाहून त्याच्या सुहृदांवर शोक करण्याचा प्रसंग लवकरच येतो. जो राजा मुख्य अमात्यांचा त्याग करून हीन लोकांचा सहवास करितो, तो घोर आपत्तीला प्राप्त होतो व त्याला तारणाराहि कोणी भेटत नाहीं. जो दुर्जनांचा सहवास व मिथ्याचरण, सुहृदांच्या भाषणांचा अनादर, स्वजनांचा द्वेष आणि परकीयाशीं स्नेह करितो, त्याचा पृथ्वी त्याग करिते.

हे भारता, जो तूं पांडवांसारख्या वीरांशीं विरोध करून कर्णादिकांसारख्या अशिष्ट व असमर्थ मूढांकडून संरक्षणाची इच्छा करीत आहेस, त्या तुला

काय बोलावें ! आपल्या शक्रतुल्य ज्ञातिबांधवांचें अतिक्रमण करून अन्य लोकांकडून रक्षणाची इच्छा करणारा तुजवांचून या पृथ्वीवर दुसरा कोणता मानव आहे !

हे कौरवा, तूं पांडवांना जन्मापासून पीडा देत आला आहेस, परंतु ते धर्मात्मे तुजवर क्रुद्ध होत नाहींत. तूं त्या बांधवांशीं जन्मापासून कपटाचरण करीत आलास, तरी ते यशस्वी पांडव तुझ्याशीं सरळ वागत आहेत. यास्तव तूंहि त्या आपल्या साक्षात् बंधूंशीं तसेंच वर्तन ठेव. व्यर्थ क्रोधाधीन होऊं नको.

हे भरतश्रेष्ठा, प्राज्ञजन नेहमीं धर्म, अर्थ व काम या त्रयीनें युक्त असेंच कार्य आरंभितात. जेव्हां या तिन्हींचा असंभव दिसतो, तेव्हां मानव धर्म व अर्थ यांस अनुसरून कार्य करितात. परंतु ज्यावेळीं हे तीन, किंवा दोन पुरुषार्थ एकत्र साधणें शक्य नसतें व ते पृथक् साधावे लागतात, तेव्हां बुद्धिमान् मनुष्य धर्माचेंच अवलंबन करितो. मध्यम मनुष्य कलहाला कारण होणाऱ्या अर्थाला अनुसरतो व मूर्ख केवल कामाचाच आश्रय करितो. इंद्रियवश झालेला जो प्राकृत मनुष्य लोभानें धर्माचा त्याग करितो आणि काम व अर्थ अयोग्य उपायानें मिळविण्याची इच्छा करितो, तो सत्वर नाश पावतो. तस्मात् काम व अर्थ यांची इच्छा करणारानें प्रथम धर्माचरण करावें. कारण धर्मावांचून काम किंवा अर्थ कदापि प्राप्त होत नाहींत.

हे राजा, तीनहि पुरुषार्थांचें साधन धर्मच आहे, असें विद्वान् म्हणतात. त्यामुळें धर्मानें काम व अर्थ यांची इच्छा करणारा पुरुष तृणाच्या राशीवर पडलेल्या अग्नीप्रमाणें वृद्धि पावतो. असें असतां तूं सर्व लोकांत प्रसिद्ध असलेलें हें उज्ज्वल साम्राज्य अमार्गानें मिळविण्याची इच्छा करीत आहेस. परंतु हे राजन्, [1]सरळ वागणारांशीं कपटाचरण करणारा मनुष्य, परशूनें वनाचा जसा नाश करावा, तसा आपलाच घात करितो. ज्याच्यापासून आपला पराभव व्हावा, असें वाटत नसेल, त्याची बुद्धि आपल्या लोभादि दोषांनीं दूषित करूं नये. ज्याची बुद्धि आपल्या दोषांनीं दूषित झालेली नसते, तो आपल्या कल्याणाचीच आकांक्षा करितो. स्वतःचें हित इच्छिणाऱ्या मनुष्यानें तीन्ही

---

१ आत्मानं तक्षति ह्येष वनं परशुना यथा ।
यः सम्यग्वर्तमानेषु मिथ्या राजन् प्रवर्तते ॥

लोकांत एखाद्या प्राकृत पुरुषाचाहि अवमान करूं नये. मग पांडवांसारख्या नरश्रेष्ठांविषयीं काय सांगावें! परंतु अमर्षानें व्याप्त झालेला नर हें कांहीं जाणत नाहीं व सर्व प्रमाणभूत मार्गापासून च्युत होतो.

हे भारता, ही गोष्ट लोकांत व वेदांतहि प्रसिद्ध आहे. तिकडे लक्ष दे. दुर्जनांच्या संगतीपेक्षां पांडवांचा सहवास श्रेयस्कर आहे. त्यांना संतुष्ट केल्यास तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील व पांडवांना वश करून घेतल्यावर मिळविलेल्या पृथ्वीचा उपभोग घेशील. परंतु तूं पांडवांना मागें सारून इतरांकडून संरक्षणाची अपेक्षा करीत आहेस. दुःशासन, दुर्विषह, कर्ण व सौबल यांना ऐश्वर्य देऊन कल्याणाची इच्छा करीत आहेस. परंतु त्यांचें ज्ञान, धर्म व अर्थ यांतील कांहींहि पांडवांच्या तुल्य नाहीं, किंवा त्यांचा पराक्रमहि पांडुपुत्रांशीं विरोध करण्यास पुरेसा नाहीं.

हे राजा, तुझ्यासहित हे सर्व राजे युद्धांत क्रुद्ध झालेल्या भीमसेनाच्या मुखाकडे पहाण्यासहि समर्थ नाहींत. येथें जमलेलें हें सर्व पार्थिवांचें सैन्य, हा भीष्म, द्रोण, कर्ण, कृप, भूरिश्रवा, सौमदत्ति, अश्वत्थामा व जयद्रथ हे सर्व धनंजयाशीं युद्ध करण्यास असमर्थ आहेत. सर्व सुरासुर, मानव व गंधर्व या सर्वांना अर्जुन अजिंक्य आहे. यास्तव तूं युद्धाचा आग्रह धरूं नको.

रणांत अर्जुनाशीं युद्ध करून अक्षत शरीरानें घरीं जाईल असा एक तरी योद्धा या समग्र राजसैन्यांत दिसत आहे का, तूंच पहा! हे भरतश्रेष्ठा, या लोकांचा क्षय करून तुला कोणता लाभ होणार आहे! यापेक्षां या युद्धांत ज्याला जिंकलें असतां सर्व पांडवसैन्य जिंकल्यासारखें होईल, असा एकच पुरुष तूं आपल्या सैन्यांतून निवडून काढ. ज्या वीरानें देव, गंधर्व, यक्ष, असुर, पन्नग या सर्वांना खांडवप्रस्थांत जिंकिलें, त्या धनुर्धराला युद्धांत जिंकण्यास कोणता मानव समर्थ आहे!

त्याचप्रमाणें ज्या एकट्या महारथानें अनेक योद्ध्यांचा पराभव करून अद्भुत पराक्रम केल्याचें आम्हीं ऐकलें आहे, त्याच्या अजेयत्वाविषयीं हें एकच उदाहरण पुरेसें आहे. ज्या सव्यसाचीनें साक्षात् महादेवाला युद्धामध्यें संतुष्ट केलें, त्या अजिंक्य, दुराधर्ष अर्जुनाला तूं समरांत जिंकण्याची इच्छा करीत आहेस, हें केवढें आश्चर्य!

एकट्या धनंजयानें एवढा पराक्रम केला आहे व आतां तर मी त्याचा साह्यकर्ता असल्यावर रणक्षेत्रांत त्याच्याकडे पहाण्यास कोण समर्थ आहे!

साक्षात् इंद्रहि युद्धामध्यें पार्थांवर चाल करण्यास धजणार नाहीं. बा दुर्योधना, जो वीर युद्धामध्यें अर्जुनाचा पराभव करील, तो आपल्या हातांनीं पृथ्वीला झेलून धरील, क्रुद्ध होऊन या सर्व प्रजेला दग्ध करील आणि स्वर्गांतून देवांना खालीं पाडवील. ( इतकें अद्भुत सामर्थ्य ज्याच्या अंगीं असेल, तोच अर्जुनाला जिंकूं शकेल. )

हे कौरवा, आपले पुत्र, भ्राते व सर्व ज्ञातिबांधव यांच्याकडे पहा ! तुझ्या-साठीं हे सर्व भरतश्रेष्ठ नाश न पावोत !! कौरवांचा शेष भूलोकीं राहो !!! हें कुल नष्ट न होवो. लोक तुला कुलघ्न न म्हणोत. तुझ्या कुलाची कीर्ति नाश न पावो. हे नराधिपा, तूं पांडवांचें मागणें मान्य केलेंस तर ते महारथ पांडुपुत्र धृतराष्ट्राला सार्वभौम राज्यावर व तुला यौवराज्यावर स्थापन करतील. तस्मात् घरीं चालून आलेल्या संपत्तीचा असा अवमान करूं नको. पांडवांना अर्धें राज्य अर्पण करून विपुल ऐश्वर्याचा उपभोग घे. आपल्या सुहृदांचें वचन मान्य करून पांडवांशीं शम कर. त्या योगानें मित्रांना संतोष होईल व तुझें परम कल्याण होईल. ५. ६. १२४.

---

## अध्याय १२५ वा.

[ १ भीष्माचा उपदेश. २ द्रोणाचें त्याला अनुमोदन. ३ विदुरानें केलेली दुर्योधनाची निर्भर्त्सना. ४ धृतराष्ट्राचा शमाविषयीं बोध. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, केशवाचें हें वचन ऐकून शान्तनव भीष्म अमर्षी दुर्योधनाला म्हणाला—" बा दुर्योधना, शमाची इच्छा करणाऱ्या सुहृद् कृष्णाचें भाषण तूं ऐकलेंच आहेस, त्याप्रमाणें वाग. व्यर्थ क्रोधवश होऊं नको. महात्म्या केशवाचें वचन न ऐकल्यास तुला श्रेय, सुख किंवा कल्याण कदापि प्राप्त होणार नाहीं. महाबाहु देवकीनंदनानें तुला धर्मार्थयुक्त असाच उपदेश केला आहे. त्याचें ग्रहण कर. प्रजेचा विनाश करूं नको.

तूं जर हा आपला दुराग्रह सोडला नाहींस, तर सर्व राज्यांहून अधिक उज्ज्वल असलेल्या या भारती लक्ष्मीला धृतराष्ट्राच्या देखत केवल आपल्या दौरात्म्या-मुळें दूर सारशील. तूं दुरभिमानानें आपले अमात्य, पुत्र, भ्राते व बांधव यांसह स्वतःच्या जीविताचा नाश करशील. केशवाच्या अर्थयुक्त तथ्य वच-नाचें व त्याचप्रमाणें तुझा पिता आणि धीमान् विदुर यांच्या उपदेशाचें अति-

क्रमण केल्यास तूं प्राणाला मुकशील. यास्तव हे भरतश्रेष्ठा, तूं कुलघ्न, दुर्मति व हीनपुरुष होऊं नको आणि या अमार्गानें जाऊन आपल्या माता-पितरांना शोकसागरांत लोटूं नको."

( २ ) त्यानंतर क्रोधवश होऊन वारंवार निश्वास सोडणाऱ्या दुर्योधनाला द्रोण असें वचन बोलला—" हे नराधिपा, तुला केशवानें जें धर्मार्थयुक्त वचन सांगितलें व शान्तनव भीष्मानेंहि जसा बोध केला आहे, त्याप्रमाणें तूं वर्तन कर. ते दोघेहि प्राज्ञ, मेधावी, दमनशील अर्थ-कामवेत्ते व बहुश्रुत आहेत. त्यांनीं तुला हितवचन सांगितलें आहे. त्याचें ग्रहण कर. कृष्ण व भीष्म यांनीं तुला जसें सांगितलें आहे त्याप्रमाणेंच वाग. मोहानें माधवाचा अवमान करूं नको.

हे परंतपा, हे कर्णादिक तुला युद्धाचें प्रोत्साहन देत आहेत, पण युद्धाचा प्रसंग आला असतां ते केव्हांहि विजयी होणार नाहींत, उलट पराजयाचा दोष आमच्या गळयांत बांधून मोकळे होतील. यास्तव तूं आपली सर्व प्रजा, पुत्र व भ्राते यांचा घात करूं नको. ज्या पक्षांत वासुदेव व अर्जुन आहेत, तो पक्ष अजिंक्य आहे, असेंच समज. तस्मात् तूं जर श्रीकृष्ण व भीष्म यांचें हें सत्य वचन मानणार नाहींस, तर तुला पश्चात्ताप करावा लागेल. परशुरामानें अर्जुनाचें जें वर्णन केलें, त्याहूनहि तो अधिक प्रतापवान् आहे आणि देवकीनंदन कृष्ण तर देवांनाहि असह्य आहे. त्यांनीं तुला हितावह व न्याय्य उपदेश केला आहे, परंतु तुज मूढाला त्याचें काय महत्त्व ! हें सर्व तूं ऐकलेंच आहेस. यापुढें तुला जें योग्य वाटेल तें कर. आतां तुला यापेक्षां अधिक कांहीं सांगण्याची माझी इच्छा नाहीं."

( ३ ) वैशंपायन—राजा, द्रोणाचार्यांच्या भाषणानंतर अमर्षी दुर्योधनाकडे पाहून विदुर म्हणाला—" हे भरतश्रेष्ठा दुर्योधना, तुझ्यासाठीं मला खेद वाटत नाहीं; परंतु तुझ्या या वृद्ध माता-पितरांसाठीं मला अतिशय दुःख होत आहे. तुज दुष्ट पुत्रामुळें धृतराष्ट्र व गांधारी हीं दोघें मित्रहीन व अमात्यरहित होऊन पंख तोडलेल्या पक्ष्यांप्रमाणें अनाथ होऊन फिरतील. अशा कुलघ्न कुपुत्राला जन्म दिल्यामुळें त्यांना शोकमग्न होऊन या पृथ्वीवर भिक्षा मागत फिरावें लागेल, याचा मला अतिशय खेद होत आहे."

( ४ ) विदुराचें भाषण संपतांच राजा धृतराष्ट्र सर्व राजांच्या परिवारांत भ्रात्यांसह बसलेल्या दुर्योधनाला म्हणाला—" वत्सा, महात्म्या शौरीच्या या

कल्याणकारक भाषणाकडे लक्ष दे. त्याचें हें वचन अतिशय शुभ, अव्यय व योगक्षेम देणारें आहे. या सहज कर्मे करणाऱ्या कृष्णाच्या साहाय्यानें सर्व राजापेक्षां आपल्याला इष्टार्थ प्राप्त होतील. तूं केशवाच्या बरोबर जाऊन युधिष्ठिराशीं ऐक्य कर आणि भारतांचें अनामय स्वास्थ्य स्थिर कर. वत्सा, जा; वासुदेवाच्या द्वारा शम कर, संधीचा हा योग्य काल प्राप्त झाला आहे. त्याचें अतिक्रमण करूं नको. शमाची याचना करणाऱ्या व तुला एवढा हिताचा उपदेश करणाऱ्या या केशवाच्या असल्या उत्तम वचनांचा तूं जर अनादर करशील तर तुझा विजय कदापि होणार नाहीं. ५. ६. १२५.

---

## अध्याय १२६ वा.

[ १ भीष्म-द्रोणांचा दुर्योधनाला पुनः सदुपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, धृतराष्ट्राचें हें वचन ऐकून भीष्म व द्रोण एकसारखेच व्यथित झाले आणि शासनाचें उल्लंघन करणाऱ्या दुर्योधनाला पुनः म्हणाले—" बा दुर्योधना, जोंवर कृष्णार्जुन कवचें चढवून सज्ज झाले नाहींत, जोंवर गांडिवधनुष्य स्वस्थानापासून हाललें नाहीं, धौम्यानें संग्रामाग्नींत तुझ्या सैन्याची आहुति दिली नाहीं आणि ह्रीमान् युधिष्ठिरानें क्रुद्ध होऊन तुझ्या सैन्याकडे पाहिलें नाहीं, तोंवर तुमचें वैर शांत होवो.

जोंवर महाधनुर्धर भीमसेन आपल्या सैन्यांत स्थित असलेला दृष्टीं पडला नाहीं व त्या गदाधर वृकोदरानें शत्रुसैन्यास भयभीत करीत अनेक मार्गांनीं संचार करण्यास आरंभ केला नाहीं, तोंवर तूं पांडवांशीं संधि कर. हे राजन्, जोंवर त्या पांडवानें वृक्षावरून पडणाऱ्या परिपक्व फलांप्रमाणें गजारूढ योद्ध्यांचीं मस्तकें आपल्या वीरघातिनी गदेनें पाडलीं नाहींत, तोंवर शम होवो.

जोंवर कृतास्त्र असलेले नकुल, सहदेव, पार्षत धृष्टद्युम्न, विराट, शिखंडी व शिशुपालपुत्र यांनीं कवचें चढवून शस्त्रास्त्रांचा वेगानें वर्षाव करीत महार्णवांत प्रवेश करणाऱ्या नक्राप्रमाणें रणांगणांत संचार केला नाहीं, तोंवर वैर शांत होवो. जोंवर भूपालांच्या सुकुमार शरीरांत गार्ध्रपत्रांनीं युक्त असलेले तीक्ष्ण शर शिरले नाहींत, तोंवर तुमचा शम होवो. महाधनुर्धर, कृतास्त्र व दूर असलेल्या लक्ष्यांवर नेम धरून त्वरेनें शरसंधान करणाऱ्या वीरांचे मोठमोठे लोखंडी बाण चंदनाच्या उट्या लावलेल्या व रत्नजडित सुवर्ण हारांनीं भूषित झालेल्या वीरांच्या वक्षःस्थलांवर पडूं लागले नाहींत, तोंवर वैर शांत होवो.

हे भरतर्षभा, राजसिंह धर्मराज युधिष्ठिर शिरसा वंदन करणाऱ्या तुला आपल्या दोन्ही बाहूंनीं उचलून आलिंगन देवो. तो उदारात्मा अजातशत्रु ध्वज, अंकुश व पताका यांनीं चिह्नित असलेला आपला दक्षिण बाहु शांतीसाठीं तुझ्या स्कंधावर ठेवो. तो पांडुपुत्र रत्नौषधींनीं व रत्नाप्रमाणें आरक्त अंगुलींनीं युक्त असलेला आपला हस्त समीप बसलेल्या तुझ्या पाठीवरून फिरवो.

सामाचें वचन बोलणाऱ्या तुला सालवृक्षासारखे स्कंध असलेला महाबाहु वृकोदर आलिंगन देऊन तुझ्याशीं शमाचें वचन बोलो. त्याचप्रमाणें अर्जुन, नकुल व सहदेव या तिघांनीं तुला अभिवादन केलें असतां तूं त्यांच्या मस्तकांचें अवघ्राण करून तुमचें प्रेमाचें भाषण होवो. हे पार्थिवा, वीर पांडवभ्रात्यांशीं तुझें सख्य झालेलें पाहून नराधिप आनंदाश्रु ढाळोत. सर्व समृद्ध भूपालांच्या राजधानींत, या पृथ्वीचा भ्रातृभावानें उपभोग घेतला जावो, अशी घोषणा होवो आणि हे दुर्योधना, तुझा क्रोध शांत होवो." ५. ६. १२६.

---

## अध्याय १२७ वा.

[ १ पांडवांना सुईच्या अग्राइतकीहि भूमि न देण्याविषयीं दुर्योधनाची प्रतिज्ञा.]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, याप्रमाणें त्या कौरवसभेमध्यें अप्रिय भाषणें ऐकून दुर्योधन यशस्वी वासुदेवाला म्हणाला—" हे केशवा, तूं कांहीं विचार करून हें भाषण करावयाचें होतेंस. पण तूं तर विशेषतः माझीच कठोर शब्दांनीं निंदा करीत आहेस, पांडवांची तुजवर भक्ति असल्यामुळें तूं नेहमीं आमचीच निंदा करितोस, यांत तूं बलाबलाचा कांहीं विचार केला आहेस का!

हे मधुसूदना, तूं, विदुर, हा राजा धृतराष्ट्र, द्रोणाचार्य आणि पितामह भीष्म माझी निंदा करून मलाच सर्व दोष देतां. इतर कोणाहि राजाला दोष देत नाहीं. माझ्या पित्यासह तुम्ही सर्व जरी माझा द्वेष करीत अहां, तरी मीं कांहीं अन्याय केला आहे, असें मला तरी वाटत नाहीं. हे केशवा, मीं पुष्कळ विचार करून पाहिला, परंतु माझा यत्किंचित्‌हि अपराध असल्याचें मला दिसत नाहीं.

प्रीतीनें स्वीकारलेल्या द्यूतांत शकुनीनें पांडवांचें राज्य जिंकून घेतलें त्यांत माझा काय दोष ! पांडवांनीं जें द्रव्य द्यूतांत जिंकून घेतलें होतें, तें आम्हीं

त्याच वेळीं त्यांना देऊन टाकलें. अजिंक्य असलेल्या पांडवांचा द्यूतांत पराभव झाला व ते वनांत गेले, यांत आमचा कांहींच अपराध नाहीं. कांहीं तरी निमित्त काढून व आम्हांला शत्रु समजून तेच आमच्याशीं विरोध करितात. वस्तुतः ते असमर्थ आहेत. तथापि आमच्याशीं युद्ध करण्याची गोष्ट निघाली म्हणजे आमच्या शत्रूप्रमाणेंच त्यांना मोठा हर्ष होतो. पण आम्हीं त्यांची अशी कोणती हानि केली आहे ! संजयांसह पांडव आम्हां धार्तराष्ट्रांचा वध करण्याची इच्छा करीत आहेत, तर आम्हीं त्यांचा असा कोणता अपराध केला आहे ! उग्र वचनानें किंवा कर्मानें आम्ही केव्हांहि भिणार नाहीं, किंवा साक्षात् इंद्रालाहि भीतीनें प्रणाम करणार नाहीं. आम्हांला युद्धांत जिंकण्यास समर्थ होईल असा क्षत्रधर्मांत स्थित असलेला एकहि योद्धा मला दिसत नाहीं. हे कृष्णा, कर्णासह भीष्म-द्रोण, कृप यांना युद्धांत जिंकण्यास देवहि समर्थ नाहींत, मग पांडवांची काय कथा !

हे माधवा, स्वधर्मालाच अनुसरणाऱ्या आम्हांला युद्धांत अस्त्रांनीं जर मरण आलें, तर त्यामुळें आम्ही स्वर्गालाच प्राप्त होऊं. आम्हां क्षत्रियांचा हाच मुख्य धर्म आहे. आम्हीं जर संग्रामांत शरतल्पावर शयन केलें, तर तें आमचें वीरशयनच होईल. शत्रूंना प्रणाम न करतांच आमच्यावर मरणाचा प्रसंग आल्यास आमच्यापैकीं कोणालाहि दुःख होणार नाहीं. उत्तम क्षत्रियकुलांत उत्पन्न झालेला व क्षत्रधर्माचें अनुवर्तन करणारा कोणता पुरुष भयभीत होऊन नुस्त्या जीविकेकडेच दृष्टि देऊन शत्रूला प्रणाम करील ! नेहमीं यत्न करावा. उद्यम केव्हांहि सोडूं नये. कारण हेंच पौरुष आहे. [1] वेळूप्रमाणें अस्थानींहि भग्न व्हावें, पण कोणापुढें नम्र होऊं नये, असें मातङ्गमुनीचें वचन आहे व आपल्या हिताची इच्छा करणारे लोक त्यालाच अनुसरतात. माझ्या सारखे लोक धर्मासाठीं केवल ब्राह्मणाला वंदन करतील. परंतु अन्य कोणापुढें केव्हांहि नम्र होणार नाहींत. हा क्षत्रियांचा धर्म आहे आणि माझेंहि मत तसेंच आहे. माझ्या पित्याकडून मला पूर्वीं जो राज्यांश प्राप्त झाला आहे तो मी जिवंत असेपर्यंत परत देणार नाहीं. जोंवर राजा धृतराष्ट्र प्राण धारण करीत आहे, तोंवर आम्ही व ते यांतील कोणत्या तरी एकापक्षानें क्षत्रिय-

१ अप्यपर्वणि भज्येत न नमेदिह कर्हिचित् ।
इति मातङ्गवचनं परीप्सन्ति हितेप्सवः ॥

धर्मांचा त्याग करून भिक्षुकाप्रमाणें आयतें सिद्ध असलेलें अन्न भक्षण करून जिवंत राहिलें पाहिजे.

हे जनार्दना, मीं बाल असल्यामुळें पराधीन होऊन पूर्वी अज्ञानानें किंवा भयानें पांडवांना अदेय असलेलें राज्य दिलें, परंतु आतां मात्र तें पांडवांना पुनः प्राप्त होणार नाहीं. हे केशवा, सांप्रत मी जिवंत आहें, तोंपर्यंत सूईच्या तीक्ष्ण अग्रानें विद्ध होईल इतकीहि भूमि पांडवांना देणार नाहीं. ५. ६. १२७.

---

## अध्याय १२८ वा.

[ १ कृष्णानें केलेली दुर्योधनाची निर्भर्त्सना. २ दुःशासनाचें भाषण व दुर्योधनाचें राजांसह सभेंतून निर्गमन. ३ भीष्मानें दुर्योधनाची केलेली निंदा. ४ कृष्णाचा भीष्मादिकांना दुर्योधनत्यागाविषयीं उपदेश. ]

(१) **वैशंपायन**—दुर्योधनाचें हें भाषण ऐकून दाशार्ह कृष्ण क्रुद्ध झाला. त्याचे नेत्र आरक्त दिसूं लागले व त्या कौरवसभेंत तो दुर्योधनाला असें वचन बोलला—"हे भारता, ठीक आहे, तुझ्या इच्छेप्रमाणें तुला युद्धांत वीरशयन प्राप्त होईल व तुझा मनोरथ पूर्ण होईल. आपल्या अमात्यांसह तूं याच दुर्बुद्धीमध्यें असाच स्थिर स्थित हो. तुझ्या या अनयामुळें घोर संग्राम घडून येईल.

हे मूढा ' मीं पांडवांचा कांहींहि अपराध केला नाहीं, असें जें तूं म्हणत आहेस, तें किती सत्य आहे, हें सर्व नराधिप ऐकोत. महात्म्या पांडवांचें ऐश्वर्य पाहून संतप्त झालेल्या तूं सौबलाशीं द्यूताचा दुष्ट संकेत केलास. पण साधूंना संमत व तुझ्याहून श्रेष्ठ असलेल्या निष्कपट ज्ञातिबांधवांशीं असें कपटाचरण करणें न्याय्य कसें ठरेल !

हें अक्षद्यूत सज्जनांच्या मतीचा विनाश करणारें आहे. त्यामुळें असज्जनांत भेद उत्पन्न होतात व त्यांच्यावर संकटें येतात. पापाचरण न करणाऱ्या व सदाचारसंपन्न अशा आपल्या भ्रात्यांशीं, तूं परिणामाकडे लक्ष न देतां द्यूताच्या द्वारा हें घोर वैर उपस्थित केलें आहेस.

पांडवांना प्राणांहूनहि प्रिय असलेल्या त्यांच्या सम्राज्ञीला तूं ज्याप्रकारें कौरव सभेंत आणविलेंस, त्या शीलसंपन्न कुलीन द्रौपदीला जे क्लेश दिलेस, व आपला क्षुद्रपणा व्यक्त केलास, त्याप्रकारें आपल्या भ्रातृभार्येचा अपमान करण्यास तुझ्यावांचून इतर कोणीहि उद्युक्त होणार नाहीं. वनवासाला जाण्यास

निघालेल्या पांडुपुत्रांना दुःशासन जीं दुर्वचनें बोलला, तीं सर्व कौरवांनीं ऐकलींच आहेत.

सदाचारी, अलुब्ध व सतत धर्माचरणी अशा आपल्या बांधवांशीं कोणता सज्जन असें अश्लाघ्य वर्तन करील! हे दुर्योधना, कर्ण, दुःशासन व तूं अशा तिघांनीं अनार्य पुरुषांनाच शोभणारें निष्ठुर भाषण अनेकदा केलें आहे.

पांडव बाल असतांना त्यांना मातेसह वारणावतांत दग्ध करण्याचा तूं मोठा यत्न केलास, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. त्यावेळीं ते पांडुपुत्र आपल्या मातेला घेऊन 'एकचक्रा' नगरींत एका ब्राह्मणाच्या घरांत गुप्तपणें दीर्वकाल राहिले. तूं पांडवांचा नाश करण्यासाठीं विषप्रयोग, सर्पबंधन इत्यादि सर्व उपाय करून पाहिलेस, पण त्यांत तुला यश मिळालें नाहीं. याप्रमाणें तूं महात्म्या पांडवांशीं सतत मिथ्याचरण करीत असतां 'मीं पांडवांचा कांहीं अपराध केला नाहीं,' असें कसें म्हणतोस. ते तुझ्याजवळ आपल्या पितृराज्याचा अंश मागत आहेत. तोहि तूं त्यांना देत नाहींस. परंतु हे पापमते, तूं जेव्हां ऐश्वर्यभ्रष्ट होऊन पडशील, तेव्हां तुला त्यांचें राज्य द्यावें लागेल. जो तूं मिथ्याचरण करणारा अनार्य होऊन पांडवांशीं अनेक कार्यांत निर्दयपणानें वागलास आणि आज आपल्या माता-पित्यांशींहि मिथ्यावाद करीत आहेस, त्या तुला काय बोलावें!

तुझी माता-पिता, विदुर, भीष्म, द्रोण, तुला वारंवार 'शम कर' असें सांगत असतां तूं शांत होत नाहींस! हे राजा, शम करण्यांत तुझा व पांडवांचा असा दोघांचाहि फार मोठा लाभ आहे. परंतु तुझ्या अल्पबुद्धीमुळें तुला तें रुचत नाहीं. पण सुहृदांच्या वचनाचें उल्लंघन करून तुला सुख प्राप्त होणार नाहीं. हे पार्थिवा, तूं हें अधर्म्य आणि अयशस्कर वर्तन करीत आहेस.

(२) वैशंपायन—राजा, दाशार्हानें दुर्योधनाला असें म्हटलें असतां त्या कौरवसभेंत दुःशासन उभा राहिला व असें वचन बोलला—"हे राजन्, तूं जर पांडवांशीं स्वेच्छेनें संधि न करशील, तर हे कौरव तुला बांधून पांडुपुत्रांच्या हातीं देतील. आपला हा पिता व भीष्म-द्रोण हे तुला, मला व कर्णाला पांडवांच्या स्वाधीन करतील."

भ्रात्याचें हें वचन ऐकून धार्तराष्ट्र सुयोधन क्रुद्ध झाला, तो फूत्कार टाकणाऱ्या महासर्पाप्रमाणें निश्वास टाकीत आसनावरून उठला व विदुर, धृतराष्ट्र,

महाराज बाल्हिक, कृप, सोमदत्त, भीष्म, द्रोण आणि जनार्दन या सर्वांचा अनादर करून तो निर्लज्ज दुर्मति सभेंतून जाऊं लागला. मान्यांचा अवमान करणारा तो मानी मर्यादेचा त्याग करून अशिष्टाप्रमाणें जाण्यास निघालेला पाहून अमात्यांसह त्याचे भ्राते व राजे त्याला अनुसरले.

( ३ ) याप्रमाणें भ्रात्यांसह सभेंतून उठून निघून जाणाऱ्या क्रुद्ध दुर्योधनाकडे पहात शान्तनव भीष्म म्हणाला—" हे जनार्दना, जो राजा धर्मार्थांचा त्याग करून क्रोधाचा आश्रय करितो, त्याचे शत्रु लवकरच त्याला संकटांत पडलेलें पाहून त्याचा उपहास करितात. हा दुरात्मा राजपुत्र दुर्योधन राज्याविषयींच्या मिथ्या अभिमानानें क्रोध व लोभ यांच्या वश होऊन भलत्याच उपायांचें अवलंबन करीत आहे. ज्याअर्थीं अमात्यांसह सर्व पार्थिव मोहानें त्यालाच अनुसरत आहेत, त्याअर्थीं सर्व क्षत्रियजातीच्या नाशाचा काल समीप आला आहे, असें मला वाटतें."

(४) भीष्माचें हें वचन ऐकून कमलनेत्र श्रीकृष्ण भीष्म-द्रोणादि सर्व प्रमुख सभासदांस म्हणाला—" हे कुरुश्रेष्ठहो, तुम्ही सर्व वयोवृद्ध येथें असतांना या ऐश्वर्यमदानें मत्त झालेल्या मंदमति राजाचा निग्रह कसा करीत नाहीं. हा तुमचा मोठा प्रमाद आहे. त्याच्या निग्रहाचा काल प्राप्त झाला आहे, असें मला वाटतें. तें कार्य केलें असतां तुमचें कल्याण होईल. हे निष्पाप वीरांनो, मी तुमच्या हिताचें वचन सांगत आहें, तें लक्षपूर्वक ऐका. त्याचा तुम्हांला प्रत्यक्ष अनुभव येईल. मी तुम्हांला जें सांगणार आहें, तें जर तुम्हांला रुचेल व अनुकूल वाटेल तर तुम्ही त्याप्रमाणें वागा.

हे भारतहो, तुम्हांला ठाऊकच असेल कीं, जेव्हां वृद्ध भोजराजाच्या दुराचारी व अविचारी पुत्रानें आपला पिता जिवंत असतां त्याचें राज्य हरण केलें, तेव्हां त्या उग्रसेनपुत्र कंसाचा त्याच्या सर्व बांधवांनीं त्याग केला व ज्ञातीच्या हितासाठीं मीं महायुद्धांत त्याचा वध केला. याप्रमाणें तो मृत्युवश झाला असतां भोजराज्याची वृद्धि करणारा त्याचा पिता जो आहुक उग्रसेन त्याला आम्हीं मोठ्या सत्कारानें राज्यावर बसविलें. अशाप्रकारें सर्व यादव, वृष्णि व अंधक यांनीं कुलासाठीं एका कंसाचा त्याग केला व ते सर्व सुखी झाले."

अशाच प्रकारची दुसरी एक कथा सांगतों ती ऐका—पूर्वी एकदा देवासुरांचें युद्ध चाललें असतां दोन्ही पक्षांतील योद्धे परस्परांवर आयुधांचे प्रहार करीत नाश पावले. तेव्हां लोकभावन भगवान् प्रजापति म्हणाला—"असुरांसह दैत्य-

दानवांचा पराभव होईल आणि आदित्य, वसु, रुद्र इत्यादि विजयी होऊन स्वर्ग जिंकतील, हें निश्चित आहे. परंतु या युद्धांत क्षुब्ध झालेले देव, असुर, मानव, गंधर्व, उरग व राक्षस हे सर्व परस्परांचा संहार करतील. यास्तव हे यमधर्मा, तूं दैत्य-दानवांना बद्ध करून वरुणाच्या स्वाधीन कर."

प्रजापतींचें हें वचन ऐकून यमधर्मानें परमेष्ठीच्या आज्ञेप्रमाणें सर्व दैत्य-दानवांना बांधून वरुणाच्या स्वाधीन केलें. तेव्हांपासून जलेश्वर वरुण त्या दानवांना यमपाशांनीं व स्वतःच्या पाशांनीं बांधून त्यांचें समुद्रामध्यें मोठ्या दक्षतेनें नित्य रक्षण करीत आहे.

हे धृतराष्ट्रराजा, या पूर्व इतिहासाप्रमाणें तूंहि दुर्योधन, कर्ण, शकुनि व दुःशासन यांस बांधून पांडवांच्या स्वाधीन कर. हे क्षत्रियश्रेष्ठा, 'कुलासाठीं एका पुरुषाचा त्याग करावा व स्वतःसाठीं समग्र पृथ्वीचाहि त्याग करावा.' हा न्याय तुला ठाऊकच आहे. यास्तव दुर्योधनाला बद्ध करून तूं पांडवांशीं शम कर. तुझ्या या कृतीनें सर्व क्षत्रियांचा नाश न होवो. ५. ६. १२८.

---

## अध्याय १२९ वा.

[ १ धृतराष्ट्राची गांधारीला सभेंत आणण्याविषयीं विदुराला आज्ञा. २ गांधारीचें आगमन व दुर्योधनाला शमाचा उपदेश करण्याविषयीं धृतराष्ट्राचें वचन. ३ दुर्योधनाचा पुनः सभाप्रवेश. ४ पांडवांना अर्धें राज्य देण्याविषयीं गांधारीचा पुत्राला परोपरीनें उपदेश. ]

(१) **वैशंपायन**—राजा, कृष्णाचें तें वचन ऐकून जनेश्वर धृतराष्ट्र सर्वधर्मज्ञ विदुराला त्वरेनें असें बोलला—"बा विदुरा, जा, जा आणि दीर्घदर्शी गान्धारीला सत्वर घेऊन ये. तिच्या सांगण्यानें तरी तो दुर्मति आमचें हितवचन ऐकतो का पाहूं या. ती जरी त्या दुर्बुद्धि दुरात्म्याचें मन वळवूं शकली, तरी आपण सारे सुहृद् श्रीकृष्णाच्या वचनाप्रमाणें वागूं शकूं! दुष्टांच्या संगतींत रहाणाऱ्या त्या लोभी दुर्योधनाला गांधारी शमाचा उपदेश करून जर त्याला सन्मार्गावर आणण्यास समर्थ झाली तर त्या मूढाच्या कृतीनें आपणांवर ओढवणारें हें घोर संकट टळेल व दीर्घकाल सुखाची प्राप्ति होईल."

---

१ हें समग्र सुभाषित अर्थासह भाग १. संभवपर्व पृ. ३२५ वर दिलें आहे. म्हणून येथें त्याचा संक्षेप केला आहे.

( २ ) राजाची ही आज्ञा ऐकून विदुरानें तत्काल दीर्घदर्शी गांधारीला सभेंत आणविलें. तेव्हां ती आल्याचें कळतांच धृतराष्ट्र म्हणाला—"हे गांधारि, कोणाचाहि उपदेश न ऐकणारा हा तुझा दुरात्मा पुत्र ऐश्वर्यलोभानें आपलें जीवित व ऐश्वर्य या दोहोंनाहि मुकेल. तो निर्लज्ज मूढ आपल्या पापी अनुयायांसह सुहृदांच्या शब्दांचा अनादर करून अशिष्टाप्रमाणें सभेंतून निघून गेला आहे.

वैशंपायन—भर्त्याचें हें वचन ऐकून महच्छ्रेयाची इच्छा करणारी ती यशस्विनी गांधारी असें म्हणाली—

गांधारी—महाराज, त्या राज्यलोलुप पुत्राला सत्वर येथें आणवा. धर्मार्थांचा लोप करणाऱ्या, अनम्र व अशिष्ट असलेल्या त्याला तें प्राप्त होणें योग्य नव्हे. तथापि हे प्रभो, पुत्राचे अतिशय लाड पुरविल्याचा हा परिणाम आहे, त्यामुळें याचा दोष तुझ्याकडेच अधिक आहे. तो पापी आहे, तामस प्रकृतीचा आहे, हें जाणत असतांहि तूं त्याच्या दुष्ट विचारांप्रमाणें कसा वागतोस? तो दुरात्मा काम, क्रोध व लोभ यांनीं प्रमत्त झाला आहे. आतां तुला त्याचें बलानें निवारण करतां येणें शक्य नाहीं. तो मूढ बालिश आहे, दुर्जनांच्या सहवासानें लोभी बनला आहे, त्या दुर्मतीच्या हातीं राज्य दिल्याचें हें फल आपल्याला भोगावें लागत आहे. स्वबांधवांत भेद उत्पन्न झाला असतां महीपतीनें त्याची उपेक्षा कशी करावी ! तुझा स्वजनाशीं भेद झालेला पाहून शत्रूहि तुला हंसतील. हे राजन्, जें संकट सामानें किंवा भेदानें निवारतां येणें शक्य आहे, त्या कार्यासाठीं कोणता सुज्ञ राजा स्वजनांवरच दंडाचा प्रयोग करील !

( ३ ) वैशंपायन—त्यानंतर विदुरानें धृतराष्ट्र पिता व गांधारी माता यांच्या आज्ञेवरून दुर्योधनाला सभेंत बोलावून आणविलें. तेव्हां मातेचें वचन ऐकण्यासाठीं त्यानें पुनः सभेंत प्रवेश केला. त्यावेळीं त्याचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले असून तो एखाद्या क्रुद्ध सर्पाप्रमाणें दीर्घ निश्वास टाकीत होता.

( ४ ) तेव्हां त्या अमार्गगामी पुत्रानें सभेंत प्रवेश केला आहे असें पाहून गांधारी त्याची निंदा करीत शमार्थ असें वचन बोलली—

"हे वत्सा दुर्योधना, माझें इतकें वचन ऐक. त्यामुळें तुझें व तुझ्या अनुयायांचें हित होईल व तें परिणामीं तुम्हांला सुखावह होईल. तुझा पिता,

भीष्म, द्रोण, कृप, व विदुर या सुहृदांचें वचन मान्य कर. तूं जर द्रोणादि सुहृदांच्या सांगण्याप्रमाणें शम केलास तर त्यांत भीष्म, तुझा पिता व मी यांचें तूं पूजनच केल्यासारखें होईल.

हे महाप्राज्ञा, मनसोक्त वागण्यानें राज्याची प्राप्ति होत नाहीं, त्याचें संरक्षण करतां येत नाहीं. किंवा उपभोगहि घेतां येत नाहीं. अजितेंद्रिय पुरुषाला दीर्घकाल राज्योपभोग लाभत नाहीं. याच्या उलट जितेंद्रिय व बुद्धिमान् पुरुष चिरकाल राज्याचें पालन करितो. काम व क्रोध हे दोन शत्रू पुरुषाला त्याच्या अभ्युदयापासून दूर नेत असतात. यास्तव जो नृपति या शत्रूंना प्रथम जिंकतो, तोच सर्व पृथ्वीवर जय मिळवितो.

हे लोकेश्वरा, प्रभुत्व हें पद परम दुर्लभ आहे. राज्य प्राप्त करून घेण्याची सर्वांना इच्छा असते. परंतु तें मिळाल्यावर त्याचें रक्षण करणें फार दुष्कर आहे. राज्याची इच्छा करणारानें प्रथम आपलीं इंद्रियें धर्मार्थांमध्यें नियुक्त करावीं. इंद्रियांचा निग्रह केला असतां इंधनांनीं वृद्धि पावणाऱ्या अग्नीप्रमाणें बुद्धीची वाढ होते. मार्गामध्यें कुसारथ्याला गर्तेत टाकणाऱ्या अदान्त व अवश अश्वांप्रमाणें हीं अवश असलेलीं इंद्रियें पुरुषाचा नाश करण्यासहि समर्थ आहेत.

जो राजा स्वतःच्या इंद्रियांना जिंकल्यावांचून आपल्या अमात्यांना जिंकण्याची इच्छा करितो, किंवा इंद्रियाधीन असलेला तो अमात्यांना वश केल्यावांचून शत्रूंना जिंकूं पहातो, तो स्वतःच पराभव पावतो. यास्तव पुरुषानें प्रथम स्वतःच्या इंद्रियांचाच द्वेष करावा. त्यांना आत्मवश केल्यावर मग क्रमानें अमात्य व शत्रू यांवर जय मिळवावा. म्हणजे विजयाची इच्छा व्यर्थ होत नाहीं. जितेंद्रिय अमात्यांना आपल्या वश ठेवणारा, विचारपूर्वक कार्य करणारा, दुष्टांना दंड करणारा व धीर, अशा पुरुषाचा श्री सदैव आश्रय करिते. सूक्ष्म छिद्रानें युक्त असलेल्या जाळयांत दोन मासे जसे झांकून ठेवावे, तसे काम व क्रोध हे दोन शत्रू मनुष्याच्या शरीरांत राहून विवेकाला आच्छादून टाकितात. देवहि स्वर्गाची इच्छा करणाऱ्या पुरुषाच्या स्वर्गद्वाराला या काम-क्रोधांच्या योगानें झांकून टाकितात. कारण अनेक लोकांचें स्वर्गारोहण देवांना प्रिय नसतें. फार काय पण हे काम-क्रोध विरक्ताच्याहि स्वर्गमार्गाचा निरोध करितात. जो नृपति काम, क्रोध, लोभ, दंभ व दर्प यांवर योग्यप्रकारें जय मिळवितो, तोच पृथ्वी जिंकण्यास समर्थ होतो. यास्तव धर्म, अर्थ व

शत्रूचा पराजय यांची इच्छा करणाऱ्या नृपानें सतत इंद्रियनिग्रह करावा. काम व क्रोध यांच्या अधीन होऊन जो पुरुष स्वजनांशीं किंवा परकीयांशीं मिथ्याचरण करितो, त्याला कोणीहि साहाय्य करीत नाहीं.

बा दुर्योधना, पांडव एक मतानें रहाणारे, महाप्राज्ञ, शूर व शत्रूंचा संहार करणारे आहेत. त्यांच्यासह तूं पृथ्वीचा उपभोग घेऊन सुखी हो.

वत्सा, कृष्ण व अर्जुन हे दोघे अजिंक्य आहेत, असें जें शान्तनव भीष्म व महारथ द्रोण सांगत आहेत, तें अगदीं सत्य आहे. यास्तव तूं अक्लिष्ट कर्मे करणाऱ्या या केशवाला शरण जा. म्हणजे प्रसन्न झालेला तो तुम्हां दोघांनाहि सुखप्रद होईल. जो पुरुष प्राज्ञ, कृतविद्य व हितवचन सांगणाऱ्या सुहृदांचें वचन ऐकत नाहीं तो शत्रूंना आनंद देणारा होतो. युद्धामध्यें कल्याण नाहीं किंवा धर्मार्थहि प्राप्त होत नाहीं; मग सुख कोठलें! त्यांत नेहमींच विजय होतो असेंहि नाहीं. यास्तव तूं युद्धाला प्रवृत्त होऊं नको.

दुर्योधना, तूं बुद्धिमान् आहेस. तुझ्या पित्यानें, भीष्मानें व बाल्हिकानें पूर्वी भेदाच्या भीतीनेंच पांडवांना त्याचा राज्यांश दिला, हें तूं जाणत असशील. आतां तूं त्या शूरांनीं निष्कंटक केलेल्या समग्र पृथ्वीचा जो उपभोग घेत आहेस, तें त्यांना दिलेल्या राज्यांशाचेंच समृद्ध फल आहे. यास्तव तुला जर अमात्यांसह राज्योपभोगाची इच्छा असेल तर पांडुपुत्रांचें अर्धे राज्य त्यांना परत दे. अर्ध्या पृथ्वीचें राज्य अमात्यांसह तुला सुखानें रहाण्यास अगदीं पुरेसें आहे. हा सुहृदांचा उपदेश ऐकलास तर तुला निश्चयानें यश प्राप्त होईल.

ते पांडव तेजस्वी, आत्मवेत्ते, बुद्धिमान् व जितेंद्रिय आहेत, त्यांच्याशीं केलेलें वैर तुला महत्सुखापासून च्युत करील. यास्तव पांडुपुत्रांना त्यांचा राज्यांश देऊन सुहृदांचा क्रोध शांत कर व आपल्या यथोचित राज्याचें शासन कर.

तूं जें तेरा वर्षे त्यांच्याशीं वैर केलेंस तें पुरें कर. काम-क्रोधांनीं प्रज्वलित झालेलें तें वैर आतां शांत कर. दीर्घद्वेषी कर्ण, तुझा भ्राता दुःशासन व तूं पार्थाच्या राज्यांचा अभिलाष धरीत आहां, पण तुम्हांला त्याचा अपहार करतां येणें शक्य नाहीं. भीष्म, द्रोण, कर्ण, भीमसेन, धनंजय व धृष्टद्युम्न हे वीर क्रुद्ध झाले असतां ही सर्व प्रजा तत्काळ नष्ट होईल. तस्मात् क्रोधवश होऊन कौरवांचा नाश करूं नको. तुझ्यासाठीं या समग्र पृथ्वीचा क्षय न होवो.

हे मूढा, भीष्म-द्रोण-कृपादिक तुझ्यासाठीं मनःपूर्वक युद्ध करतील असें जें तूं समजत आहेस, तो तुझा भ्रम आहे. असें होणें शक्य नाहीं. त्या आत्मवेत्त्यांचें तुम्हां दोघांवर सारखेंच प्रेम आहे. तुम्हां दोघांचें राज्य व स्थान समान आहे, हेंहि ते जाणतात. परंतु त्यांच्या पक्षांत धर्म अधिक आहे. तो तुझ्या ठिकाणीं नाहीं. राजाच्या अन्नावर ते वाढले असल्यामुळें त्याच्या भयानें तुझ्यासाठीं आपलें जीवित अर्पण करतील, परंतु युधिष्ठिराकडे क्रोधानें पहाण्यासहि ते धजणार नाहींत. या लोकीं पुरुषांना लोभानें संपत्ति प्राप्त झाल्याचें कोठेंहि दिसत नाहीं. यास्तव बा दुर्योधना, हा लोभ आवर आणि शम कर. ५. ६. १२९.

---

## अध्याय १३० वा.

[ १ दुर्योधनाचें सभेंतून निर्गमन. २ त्याचा श्रीकृष्णाला बद्ध करण्याचा संकेत. ३ सात्यकीनें त्या गुप्तसंकेताचें धृतराष्ट्रादिकांस केलेलें कथन. ४ श्रीकृष्णाचें भाषण. ५ दुर्योधनाला पुनः सभेंत आणून धृतराष्ट्रानें केलेली निर्भर्त्सना. ६ विदुरानें केलेला निषेध. ]

( १ ) वैशंपायन—राजा, याप्रमाणें गांधारीनें पुत्राला अनेक प्रकारें सदुपदेश केला; परंतु त्या अर्थयुक्त मातृवचनाचा अनादर करून तो दुर्मति पुनः क्रोधानें सभेंतून उठला व आपल्या दुष्टबुद्धि अनुयायांकडे जावयास निघाला. नंतर त्या कौरवानें सभागृहांतून बाहेर पडून आपले अक्ष-विद्यानिपुण अमात्य-सौबल शकुनि, कर्ण व दुःशासन यांची गांठ घेतली व त्या चौघांनीं मिळून असा संकेत केला.

( २ ) या शीघ्रकार्य करणाऱ्या जनार्दनानें आपला निग्रह केला नाहीं, तोंच शान्तनव भीष्म व धृतराष्ट्र यांच्यासह आपण त्याला बद्ध करूं या. इंद्रानें जसें बलीला बलात्कारानें बद्ध केलें होतें, तसा आपण बलात्कारानें या हृषीकेशाचा निग्रह करूं. याप्रमाणें आम्हीं वार्ष्णेयाला बद्ध करून ठेवलें आहे, असें ऐकलें म्हणजे भग्नदंत झालेल्या सर्पाप्रमाणें हतबुद्ध झालेले पांडव उत्साहशून्य होतील. कारण हा केशव त्यांचा सुखदाता व रक्षिता आहे. या वरद सात्वतश्रेष्ठाला प्रतिबद्ध केलें असतां सोमकांसह पांडव उद्यमरहित होतील. यास्तव धृतराष्ट्रानें जरी आक्रोश केला, तरी आपण त्या क्षिप्रकारी माधवाला येथेंच बद्ध करून शत्रूंशीं युद्ध करूं या.

( ३ ) याप्रमाणें त्या दुष्टबुद्धि कौरवांनीं विचार केला असतां त्यांचा तो पापी संकेत दुसऱ्याचें इंगित जाणणाऱ्या आत्मज्ञानी सात्यकीनें तत्काल जाणला आणि त्याच्या निवारणार्थ तो हार्दिक्यासह सभेंतून बाहेर येऊन कृत-वर्म्याला म्हणाला—" अक्लिष्ट कर्मे करणाऱ्या कृष्णाला हा सर्व वृत्तान्त कळवून मी परत येईपर्यंत तूं आपलें सर्व सैन्य सज्ज कर व कवच चढवून सभा-द्वाराला वेढा देऊन उभा रहा. "

असें बोलून पर्वताच्या गुहेंत शिरणाऱ्या सिंहाप्रमाणें त्या वीरानें सभेंत प्रवेश केला व महात्म्या कृष्णाला त्या दुष्टांचा संकेत निवेदन करून धृतराष्ट्र व विदुर यांना हंसतच म्हटलें—" राजा, तुझे हे मंदमति पुत्र सज्जनांनीं निंद्य मानलेलें आणि धर्म, अर्थ व काम यांनीं हीन असलेलें हें दूतनिग्रहाचें कर्म करण्याची इच्छा करीत आहेत, पण त्यांचा तो हेतु कदापि सिद्धीस जाणार नाहीं. हे सर्व पापात्मे जमले आहेत. ते मूढ काम व क्रोध यांच्या अधीन आणि क्रोध व लोभ यांच्या वश होऊन पूर्वीपासून कलहच करीत आले आहेत व आतां जडबुद्धि लोक किंवा अज्ञ बालक प्रज्वलित अग्नीला जसे वस्त्रानें झांकण्याची इच्छा करितात तसे हे मंदमति कौरव पुंडरीकाक्षाला प्रति-बद्ध करण्याची इच्छा करीत आहेत. "

सात्यकीचें हें वचन ऐकून दीर्घदर्शी विदुर महाबाहु धृतराष्ट्राला त्या कौरव-सभेंत म्हणाला—" हे राजन्, तुझ्या पुत्रांचा काल फिरला आहे, म्हणूनच ते असलें अयशस्कर व अशक्य कर्म करण्यास प्रवृत्त झाले आहेत. ते या वासवा-नुज त्रिविक्रम कृष्णाला बलात्कारानें बद्ध करून त्याचा निग्रह करण्याची इच्छा करीत आहेत. परंतु हा पुरुषव्याघ्र दुरासद व दुराधर्ष आहे, हें ते जाणत नाहींत. युद्धाची इच्छा करणारे ते सर्व जनार्दनाच्या समीप जातांच अग्नीवर झडप घालणाऱ्या पतंगाप्रमाणें नाश पावतील. क्रुद्ध सिंह हत्तींना जसा गतप्राण करतो, तसा हा कृष्ण त्यांना यमलोकीं पाठविण्यास समर्थ आहे. पण तो महात्मा असलें निंद्य व पापयुक्त कर्म कदापि करणार नाहीं. हा पुरु-षोत्तम धर्मापासून कदापि च्युत होणार नाहीं.

( ४ ) विदुराचें हें भाषण ऐकून सुहृदांचा समुदाय ऐकत असतां कृष्ण धृतराष्ट्राकडे पाहून म्हणाला—"हे राजन्, ठीक आहे. तुझ्या क्रुद्ध झालेल्या पुत्रांना स्वसामर्थ्यानें माझा निग्रह खुशाल करूं दे. ते मला बद्ध करितात

किंवा मी त्याचा निग्रह करितों तें पाहूं या. क्षुब्ध झालेल्या या सर्व मूढांचें नियंत्रण करण्यास मी समर्थ आहें. तथापि मी असलें निंद्य पापकर्म कदापि करणार नाहीं. पांडवांच्या राज्याचा लोभ करणारे तुझे हे मंदमति पुत्र स्वतः-च्याच स्वार्थाला मात्र मुकतील. मला बद्ध करण्याची यांची ही इच्छा युधि-ष्ठिराला कृतकार्य करणारीच आहे. हे भारता, आजच मीं जर या दुर्योधनाला त्याच्या अनुयायांसह बद्ध करून पांडवांच्या स्वाधीन केलें, तर त्यांत कसलें दुष्कर्म आहे !

परंतु मी असल्या निंद्य कर्मांत प्रवृत्त होणार नाहीं; हे महाराज, दुर्योधन जें क्रोधजन्य पापकर्म करण्याची इच्छा करीत आहे, तें त्याला तुझ्या समक्ष खुशाल करूं दे. मी तुझ्या सर्व पुत्रांना अनुज्ञा देतों."

( ५ ) श्रीकृष्णाचें हें भाषण ऐकून धृतराष्ट्र विदुराला म्हणाला—हे विदुरा, त्या राज्यलुब्ध दुर्योधनाला त्याचे मित्र, अमात्य, सहोदर व अनुयायी यांसह बोलावून आण. त्याला सन्मार्गावर आणतां आल्यास पुनः यत्न करून पाहूं या.

राजाच्या आज्ञेनें विदुरानें दुर्योधनाला पुनः सभेस येण्याविषयीं निरोप पाठ-विला. तेव्हां त्यानें भ्राते, राजे व सर्व परिवार यांसह अनिच्छेनें सभेंत पुनरपि प्रवेश केला. त्याला पाहून धृतराष्ट्र म्हणाला—"हे पातक्या, क्रूरा, तुला क्षुद्रकर्मांत साह्य करणारे कोण कोण आहेत, तें मी जाणतों. त्या पापी साह्य-कर्त्यांच्या मतानें वागून तूं असलें पापकर्म करण्याची इच्छा करीत आहेस. हे मूढा, तुझ्यासारख्या कुलकलंकानें जें करण्याचें योजिलें आहे, तें कर्म सज्ज-नांनीं निंद्य मानलें आहे. तें अयशस्कर असून सिद्धीस जाणेंहि शक्य नाहीं. तुझ्या सारखे कुलकलंकच असल्या कर्मांत प्रवृत्त होत असतात. हा पुंडरीकाक्ष दुराधर्ष व दुरासद आहे. त्याला पापी साह्यकर्त्यांच्या अनुमतीनें तूं बद्ध कसा करूं शकशील !

बाबारे, इंद्रासह सर्व देवहि जें बलात्कारानें करण्यास समर्थ नाहींत, तें तूं चंद्राला धरूं इच्छिणाऱ्या बालाप्रमाणें करण्याची इच्छा करीत आहेस. देव, मनुष्य, गंधर्व, असुर, व उरग यांतील कोणीहि केशवाला युद्धांत सहन कर-ण्यास समर्थ नाहींत हें तूं जाणत नाहींस काय ! हे मूढा, ज्याप्रमाणें वायूला हातानें ग्रहण करणें किंवा चंद्राला स्पर्श करणें अशक्य आहे, त्याचप्रमाणें केशवाला बलात्कारानें बद्ध करतां येणें शक्य नाहीं." धृतराष्ट्र असें बोलला असतां विदुरहि अमर्षी दुर्योधनाला उद्देशून असें म्हणाला—

( ६ ) विदुर—दुर्योधना, आतां माझें हें वचन लक्षपूर्वक ऐक. पूर्वी एकदा ' द्विविद '-नामक वानरश्रेष्ठानें या केशवाला सौभद्वारांत पाषाणवृष्टीनें आच्छादून टाकिलें होतें. या माधवाला प्रतिबद्ध करण्याच्या इच्छेनें त्यानें त्याला धरण्याचे सर्व यत्न केले, परंतु तोहि याचा निग्रह करूं शकला नाहीं. अशा या महात्म्याला तूं बलात्कारानें बद्ध करण्याची इच्छा करीत आहेस !

हा शौरि प्राग्जोतिष नगरींत गेला असतां, तेथेंहि दानवांसह नरकासुरानें त्याला बंदींत टाकण्याचा यत्न केला होता, पण त्यालाहि जें शक्य झालें नाहीं तें तूं बलात्कारानें कसें करूं इच्छितोस ! या दीर्घायु श्रीकृष्णानें युद्धांत नरकासुराचा वध करून सहा सहस्र महासुरांना पाशांनीं बद्ध केलें व निर्मोचन नगरींतील सहस्रावधि कन्यांना मुक्त करून त्यांच्याशीं यथाविधि विवाह केला. परंतु ज्याला ते दानवहि प्रतिबद्ध करूं शकले नाहींत, त्याचा निग्रह करण्याची तूं इच्छा तरी कशी करतोस !

हे भरतश्रेष्ठा, या अच्युतानें बाल्यावस्थेंतच पूतनेला गतप्राण केलें, शकुनीचा वध केला, गार्यींच्यासाठीं गोवर्धनपर्वत धारण केला, अरिष्ट, धेनुक, चाणूर, महाबल अश्वराज, पापाचरणी कंस, जरासंध, दंत, वक्र, शिशुपाल, बाण व इतरहि अधार्मिक राजे यांचा युद्धांत संहार केला. या अमित तेजस्वी कृष्णानें राजा वरुण व अग्नि यांना जिंकलें, पारिजातकाचें हरण करणाऱ्या यानें साक्षात् इंद्राचाहि पराभव केला. प्रलयकालीं एकार्णवांत शयन करणाऱ्या या प्रभूनें मधु-कैटभांचा वध केला व दुसरा जन्म घेऊन हयग्रीव असुरालाहि गतप्राण केलें.

हा भगवान् सर्व सृष्टीचा कर्ता आहे. याचा कर्ता कोणी नाहीं. सर्व पौरुषाचें आदिकारणहि हाच आहे. हा शौरि जी गोष्ट मनांत आणतो, ती यत्नावांचून सहज करितो. अशा या घोरविक्रम करणाऱ्या गोविंदाला तूं जाणत नाहींस ! हा कृष्ण सर्पाप्रमाणें क्रूर, तेजस्वी व अनिंद्य आहे. अशा या अक्लिष्टकर्में करणाऱ्या महाबाहूला बद्ध करूं पहाणारा तूं आपल्या अमात्यांसह, अग्निसमीप जाणाऱ्या पतंगाप्रमाणें एका क्षणांत नाश पावशील. ५.६. १३०.

---

## अध्याय १३१ वा.

[ १ भगवानाचें विश्वरूपदर्शन. २ धृतराष्ट्राला दिव्यचक्षूंची प्राप्ति. ३ श्रीकृष्णाचें सभेंतून निर्गमन. ४ धृतराष्ट्राचें स्वपराधीनत्वकथन. ५ कृष्णाचें सभासदांचा निरोप घेऊन कुंतीच्या गृहाकडे प्रयाण. ]

( १ ) वैशंपायन—राजा, याप्रमाणें विदुरानें दुर्योधनाचा निषेध केल्यानंतर शत्रुसमूहाचा संहार करणारा केशव त्या धार्तराष्ट्राला असें वचन बोलला—"हे दुर्योधना, तूं मोहवश होऊन 'मी एकटा आहें' असें समजत आहेस व माझा पराभव करून मला बद्ध करून ठेवण्याची इच्छा करीत आहेस. परंतु हे दुर्बुद्धे, सर्व पांडव, वृष्णि, अंधक, त्याचप्रमाणें आदित्य, रुद्र, वसु व सर्व महर्षि येथेंच तुझ्या दृष्टीं पडतील."

असें बोलून महात्म्या शौरीनें मोठ्यानें हास्य केलें, तेव्हां त्याच्या हंसणाऱ्या मुखांतून विद्युद्रूप असलेले अंगुष्ठमात्र देव अग्नीच्या ज्वालेप्रमाणें बाहेर पडले. त्याच्या ललाटावर ब्रह्मा, वक्षःस्थलीं रुद्र व भूजांवर लोकपाल दिसले. मुखांतून अग्नि उत्पन्न झाला. आदित्य, साध्य, वसु, दोघे अश्विनिकुमार, इंद्रासह मरुद्गण, विश्वेदेव, यक्ष, गंधर्व व राक्षस हे सर्व एकरूप झाले. त्याच्या दोन्ही भुजांपासून बलराम व अर्जुन आर्विभूत झाले. उजव्या बाजूला धनुर्धर धनंजय व डाव्या बाजूला हलधर बलराम दिसूं लागला. भीम, युधिष्ठिर व उभय माद्रेय पृष्ठभागीं व अंधक-वृष्णि-प्रद्युम्नादि वीर मोठालीं शस्त्रें उगारून अग्रभागीं स्थित असलेले दृष्टीं पडले. कृष्णाच्या अनेक भुजांमध्यें शंख, चक्र, गदा, शक्ति, धनुष्य, नांगर इत्यादि सज्ज केलेलीं देदीप्यमान विविध आयुधें दिसलीं. त्या प्रभूचे नेत्र, श्रोत्र व कर्ण यांतून अतिशय भयंकर अग्नीच्या धूमयुक्त ज्वाला निघूं लागल्या. त्याचप्रमाणें त्याच्या सर्व रोमरंध्रांतून सूर्यकिरणांप्रमाणें तेजस्वी किरण बाहेर पडले.

त्या वेळीं केशवाचें तें घोर विश्वरूप पाहून द्रोण, भीष्म, महाप्राज्ञ विदुर, महाभाग संजय व तपोधन ऋषि यांच्यावांचून इतर सर्व सभासद व राजे भयभीत झाले व त्यांनीं आपले नेत्र मिटून घेतले. भगवानांनीं ज्यांना दिव्य दृष्टि दिली होती, तेवढेच महात्मे त्याचें तें आत्मस्वरूप पहाण्यास समर्थ झाले. त्या सभेंत माधवानें दाखविलेलें तें महदाश्चर्य पाहून देवांनीं दुंदुभि वाजविल्या व पुष्पवृष्टि केली.

( २ ) धृतराष्ट्र—हे यादवश्रेष्ठा, तूं सर्व जगताचें हित करणारा आहेस. यास्तव हे पुण्डरीकाक्षा, तूं प्रसन्न हो. हे भगवन्, मला तुझें रूप पहाण्याची इच्छा आहे. मी केवळ तुझ्याच दर्शनाची इच्छा करितों. दुसऱ्या कोणालाहि पाहूं इच्छीत नाहीं, यास्तव तुझें विश्वरूप पहाण्यास योग्य अशी दृष्टि मला दे. तुझें हें रूप पाहिल्यानंतर माझी दृष्टि पूर्ववत् लुप्त होऊं दे.

तेव्हां महाबाहु जनार्दन धृतराष्ट्राला म्हणाला—हे कुरुनंदना, तुझें इतरांना अदृश्य असलेले दोन्ही नेत्र व्यक्त होवोत.

वैशंपायन—हे महाराज, त्या वेळीं एक अद्भुत प्रकार घडला. वासुदेवाच्या कृपेनें धृतराष्ट्राला विश्वरूपदर्शनाच्या इच्छेनें दिव्यदृष्टि प्राप्त झाली. तेव्हां दिव्य चक्षूंनीं युक्त होऊन बसलेल्या धृतराष्ट्राला पाहून ऋषींसह सर्व नराधिप विस्मित झाले व मधुसूदनाची स्तुति करूं लागले. त्या वेळीं समग्र पृथ्वी कांपूं लागली, सागर क्षुब्ध झाले व सर्व पार्थिव आश्चर्यचकित झाले.

( ३ ) त्यानंतर त्या पुरुषश्रेष्ठानें आपल्या दिव्य देहाचा आणि अद्भुत व विचित्र ऐश्वर्याचा उपसंहार केला आणि तो मधुसूदन एका हातानें सात्यकीचा व दुसऱ्या हातानें हार्दिक्याचा हात धरून ऋषींची अनुज्ञा घेऊन सभागृहांतून बाहेर आला. तेव्हां नारदादि देवर्षि अंतर्धान पावले. त्या वेळीं सभेंत फार कोलाहल झाला. खरोखर तो मोठा चमत्कारच घडला.

याप्रमाणें केशव सभेंतून निघाला आहे, असें पाहून शक्राला अनुसरणाऱ्या देवांप्रमाणें सर्व राजांसह ते कौरव त्याच्या मागोमाग गेले. पण त्या सर्व राजमंडलाकडे दुर्लक्ष करून धूमयुक्त अग्नीप्रमाणें दिसणारा तो अमेयात्मा शौरि तेथून बाहेर पडला. इतक्यांत दारुक त्याचा श्रेष्ठ रथ घेऊन पुढें आला. श्रीकृष्णाचा तो शुभ्र व भव्य रथ घुंगुरमालांनीं युक्त असून सुवर्णाच्या विचित्र भूषणांनीं अलंकृत केला होता. तो शीघ्रगामी असून त्याचा मेघासारखा निनाद होत होता. त्याचें छत सुंदर शुभ्र व्याघ्रचर्मानें मढविलेलें होतें व त्याला शैब्य आणि सुग्रीव हे दोन जातिवंत अश्व जोडलेले होते. अशाप्रकारचा तो श्रेष्ठ रथ सज्ज करून दारुक सभाद्वारापाशीं स्थित असलेला सर्वांच्या दृष्टीं पडला. त्याचप्रमाणें महारथ कृतवर्मा व वृष्णींना संमत असलेला वीर हार्दिक्य हेहि आपापल्या रथांत बसलेले दिसले.

( ४ ) याप्रमाणें शौरि रथारूढ होऊन जाण्यास निघाला असतां धृतराष्ट्र महाराज पुनः त्याला म्हणाला—" हे जनार्दना, माझा पुत्रावर कितीसा अधिकार चालतो, हें तूं प्रत्यक्षच पाहिलें आहेस. कारण तुझ्या समक्षच सर्व प्रकार घडला आहे. त्यामुळें तुला परोक्ष कांहींच राहिलें नाहीं. हे केशवा, कुरूंचा शम व्हावा अशी माझी इच्छा आहे व मीं तसा यत्नहि केला. यास्तव माझी ही परिस्थिति जाणून तूं मजविषयीं साशंक होऊं नको. माझ्या मनांत पांडवांविषयीं यत्किंचित्‌हि पापबुद्धि नाहीं. मीं दुर्योधनाला जो हितोपदेश केला तोहि तूं ऐकला आहेस व हे सर्व पार्थिव आणि कौरव यांनाहि तो अवगत आहे. हे माधवा, मीं शमासाठीं सर्वप्रकारें यत्न करून पाहिला, पण तो व्यर्थ झाला."

( ५ ) **वैशंपायन**—राजा, त्यानंतर जनार्दनानें धृतराष्ट्र, द्रोण, पितामह भीष्म, विदुर, बाल्हिक व कृप यांना म्हटलें—" हे नरश्रेष्ठहो, तो मंदमति दुर्योधन अशिष्टाप्रमाणें कौरवसभेंतून क्रोधानें कसा निघून गेला, हें आपण आज प्रत्यक्षच पाहिलें आहे व हा महीपति धृतराष्ट्र स्वतःला असमर्थ समजत आहे, हेंहि तुम्हीं ऐकलें आहे. ठीक आहे. मी आतां तुम्हां सर्वांची अनुज्ञा घेतों व युधिष्ठिराकडे परत जातों."

याप्रमाणें रथस्थ शौरि निरोप घेऊन निघाला असतां भीष्म, द्रोण, कृप, विदुर, धृतराष्ट्र, बाल्हिक, अश्वत्थामा, विकर्ण व महारथ युयुत्सु हे सर्व श्रेष्ठ वीर, त्याच्या मागोमाग चालले. तेव्हां त्यांच्या समक्ष कृष्ण आपल्या विशाल व शुभ्र रथांतून आपल्या पितृभगिनीला भेटावयास गेला. ६. ५. १३१.

---

## अध्याय १३२ वा.

[ १ कृष्णाचें कुंतीला सभेंतील वृत्तांतकथन. २ तिनें केलेला पुत्रांच्या वर्तनाचा निषेध. ३ मुचुकुंदाची कथा. ४ युधिष्ठिराला युद्ध करून राज्य परत मिळविण्याविषयीं कुंतीचा संदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, त्यानंतर कुंतीच्या गृहापाशीं येऊन कृष्ण रथांतून उतरला व गृहांत प्रवेश करून त्यानें कुंतीच्या दोन्ही चरणांवर मस्तक ठेवलें, तिला वंदन केलें आणि कौरवसभेंतील सविस्तर वृत्तान्त कथन केला.

वासुदेव—हे आर्ये, श्रेष्ठ ऋषिवृंदांनीं व मीं त्या मूढ दुर्योधनाला अनेक प्रकारें ग्राह्य व सयुक्तिक उपदेश केला. परंतु त्या दुर्मतीनें आमचें सांगणें ऐकलें नाहीं. दुर्योधनाच्या अधीन होऊन वागणाऱ्या लोकांचा काल आतां समीप आला आहे, हेंच खरें. आतां मी तुझा निरोप घेऊन सत्वर पांडवांकडे जातों. त्यांना कांहीं संदेश असल्यास सांग. मी तो त्यांस पोंचता करीन. हे महाप्राज्ञे, तुझें वचन ऐकण्याची माझीहि इच्छा आहे.

( २ ) कुंती—हे केशवा, धर्मात्म्या युधिष्ठिराला म्हणावें कीं, तूं धर्माची हानि करीत आहेस, यास्तव हे वत्सा, असें करूं नको. एखाद्या अर्थज्ञानशून्य वेदाध्ययन करणाऱ्या मंदबुद्धि श्रोत्रियाप्रमाणें तुझी बुद्धि वेदश्रवणानें केवल धर्मैकनिष्ठ झाली आहे. परंतु स्वयंभू ब्रह्मदेवानें नियत केलेल्या धर्माकडे तूं लक्ष दे. क्षत्रियांनीं बाहुबलावर आपली उपजीविका करावी, याच हेतूनें प्रजापतीनें त्यांस बाहूपासून उत्पन्न केलें. नित्य प्रजेचें पालन करून क्रूर कर्मै करण्यासाठींच क्षत्रिय निर्माण झाले आहेत.

( ३ ) याविषयीं मीं वृद्धांच्या मुखांनीं ऐकलेली एक कथा दृष्टान्तासाठीं सांगत्यें, ती ऐक. पूर्वी कुबेरानें मुचुकुंद राजर्षीला ही समग्र पृथ्वी मोठ्या प्रेमानें देऊं केली, तेव्हां स्वपराक्रमानें पृथ्वी जिंकून त्या राज्याचा उपभोग घेण्याच्या इच्छेनें त्यानें तिचा स्वीकार केला नाहीं. त्या राजानें क्षत्रियधर्माला अनुसरून स्वबाहुबलानें पृथ्वीचें राज्य मिळविलें व त्याचें योग्यप्रकारें पालन केलें. तें पाहून कुबेराला विस्मय वाटला व तो संतुष्टहि झाला.

( ४ ) राजाकडून सुरक्षित असलेली प्रजा जें धर्माचरण करिते, त्या धर्माचा चतुर्थांश राजाला प्राप्त होतो. राजानें जर धर्माचरण केलें तर त्याला देवत्वाची प्राप्ति होते व अधर्माचरण केलें तर तो नरकांत जातो. स्वामीनें योजिलेली दंड-नीति चातुर्वर्ण्याला धर्मामध्यें नियुक्त करिते व राजानें योग्यप्रकारें जर त्यांचें नियमन केलें तरच ते अधर्मापासून दूर रहातात. ज्या वेळीं राजा दंड-नीतीचा योग्य प्रकारें व पूर्णपणें प्रयोग करितो, तेव्हांच कृतयुगाचा श्रेष्ठ काल प्रवृत्त होतो.

काल राजाचें कारण आहे कीं, राजा कालाचें कारण आहे, असा संशय तुझ्या मनांत न येवो. कारण राजाच धर्माधर्मादि युगरूप कालाचें कारण आहे. राजा कृतयुग निर्माण करितो, त्रेता व द्वापरहि तोच उत्पन्न करितो

आणि चवथ्या कलीचेंहि कारण राजाच आहे. राजानें जर कृतयुग प्रवृत्त केलें व धर्माचरणानें सर्व प्रजेला समृद्ध सुखांत ठेविलें तर त्या नृपतीला अक्षय स्वर्गसुख प्राप्त होतें. त्रेतायुग प्रवृत्त केलें असतां अत्यंत स्वर्गसुख मिळत नाहीं. द्वापराच्या कालांत समभाग पुण्य-पाप प्राप्त होतें व कलीमध्यें राजाला अत्यंत पापाचें फल भोगावें लागतें. त्या दुष्कर्मांमुळें त्याला दीर्घकाल नरकांत पडावें लागतें. राजाचा दोष प्रजेला लागतो व जगताच्या दोषानें राजा दूषित होतो.

तस्मात् बा युधिष्ठिरा, तुझ्या पितृ-पितामहांनीं आचरिलेल्या राजधर्माकडे लक्ष दे. तूं हल्लीं जी वृत्ति स्वीकारिली आहेस, तो राजर्षींचा धर्म नव्हे. दैन्य स्वीकारून दयाप्रधान झालेल्या तुला प्रजापालनरूप धर्मापासून उत्पन्न झालेलें अल्पफलहि प्राप्त झालेलें नाहीं.

सांप्रत तूं जी वृत्ति धारण केली आहेस, तशा प्रकारें तूं वागावेंस असा तुझ्या पितामहाचा, पांडूचा किंवा माझाहि तुला आशीर्वाद नव्हता. तर तूं यज्ञ, दान, तप, शौर्य, प्रज्ञा, संतति, माहात्म्य, बल व तेज यांनीं नित्य युक्त व्हावेंस अशीच मी इच्छा करीत आहें. तूं नित्य ज्यांचें सम्यक् आराधन करितोस त्या देवता तुला इहलोकीं दीर्घायु देवोत. देवांना अर्पण केलेल्या स्वाहा व पितरांच्या स्वधा, हीं सत्कर्मे परलोकाचीं साधनें आहेत. योग्य प्रकारें शुभ आराधना केलेले देव व पितर दीर्घायु, धन आणि पुत्र देतात. देव आणि पितर पुत्रांकडून नित्य दान, अध्ययन, यज्ञ व प्रजापालन यांची अपेक्षा करीत असतात.

हे कृष्णा, माझें हें वचन धर्मयुक्त असो किंवा अधर्मयुक्त असो, परंतु तें स्वभावतःच प्राप्त आहे, हें तूं जाणतोसच. शिवाय पांडवहि विद्यासंपन्न आहेत. ते उच्च कुलोत्पन्न आहेत. तथापि आज अन्नालाहि मुकले आहेत.

जेथें पृथ्वीवर भटकणारे क्षुधित प्राणी शूर व दातृत्ववान् राजापाशीं येऊन तृप्त होऊन जातात, त्याच्याहून आणखी अधिक धर्म कोणता आहे ! राज्य प्राप्त झालें असतां इहलोकीं धार्मिक राजानें यथासंभव कोणाला दानानें, कोणाला बलानें आणि कोणाला मधुर व सत्य वाणीनें सर्वतः वश करून घ्यावें.

ब्राह्मणानें भिक्षाचरण करावें, क्षत्रियानें प्रजेचें पालन करावें, वैश्यानें धनार्जन करावें व शूद्रानें या तीन वर्णांची परिचर्या करावी. तस्मात् बा धर्मराजा, तुला भिक्षाचरण विहित नाहीं. कृषिहि योग्य नाहीं. तूं क्षत्रिय आहेस. चोर,

व्याघ्रादिक, यांपासून प्रजेचें रक्षण करणें हें तुझें कर्तव्य आहे. तुला बाहुबला-वरच उपजीविकेचें साधन मिळविणें अवश्य आहे. हे महाबाहो, तुझ्या पित्याचा राज्यांश शत्रूंनीं बुडविला आहे. त्याचा तूं साम, दान, भेद, दंड किंवा न्याय यांतील कोणत्या तरी उपायानें पुनः उद्धार कर.

वत्सा युधिष्ठिरा, तुझ्या सारख्या समर्थ पुत्राला जन्म देऊन आज मला पर-क्याच्या अन्नावर उपजीविका करावी लागत आहे. माझे सर्व बांधव दीन झाले आहेत. यापेक्षां अधिक दुःखकर तें काय असणार ! यास्तव तूं क्षत्रिय-धर्माचें अवलंबन करून युद्ध कर. आपल्या पितरांना दुःखांत लोटूं नको आणि तूंहि क्षीणपुण्य होऊन आपल्या अनुजांसह अधोगतीला जाऊं नको. ५.६.१३२.

---

## अध्याय १३३ वा.

[ १ कुंतीनें कथन केलेला विदुला-पुत्रसंवाद. ]

( १ ) कुंती—हे परंतप कृष्णा, मी तुला दुसरी एक पुरातन कथा सांगत्यें, ऐक. विदुलेचा हा पुत्राशीं झालेला संवाद नेहमीं सांगत असतात. हा प्राचीन इतिहास तूं माझ्यापेक्षांहि अधिक विस्तारानें व श्रेयस्कर होईल अशा प्रकारें युधिष्ठिराला कथन कर.

‘ विदुला ’-नांवाची क्षत्रियधर्मांत रत असलेली एक यशस्विनी सम्राज्ञी होती. ती दीर्घदर्शी स्त्री सत्कुलांत उत्पन्न झालेली असून अतिशय क्रोधी, मानी, निग्रही, बहुश्रुत, राजसभेंत विश्रुत, व भाषण करण्यांत प्रवीण होती. तिच्या पुत्राला सिंधुराजानें जिंकल्यामुळें तो दीन होऊन पडला होता. त्यावेळीं आपल्या त्या औरस पुत्राची निर्भर्त्सना करीत विदुला म्हणाली—

हे कुपुत्रा, मीं तुला जन्म दिला खरा, पण तूं माझा शोक वाढविणारा व शत्रूंना हर्ष देणारा असा कसा निपजलास ! तूं माझा पुत्र नाहींस किंवा तुझ्या पित्यापासूनहि उत्पन्न झालेला नाहींस, असें मला वाटतें. आमच्या कुलांत तूं कोठून निर्माण झालास ! तूं असा ईर्ष्याशून्य कसा निपजलास ! तुझ्या या निर्वीर्य वर्तनानें तुला शत्रु तुच्छ लेखतात. क्लीबाप्रमाणें तुझी कोणी गणनाच करीत नाहीं. यास्तव असा स्वाभिमानशून्य होऊं नको. अल्प लाभानें संतुष्ट होऊं नको. स्वतःच्या कल्याणासाठीं राज्यभार धारण कर. कशाचेंहि भय

बाळगूं नको. प्रतिकूल गोष्टी दूर सार आणि ऊठ. पराजितासारखा निजून राहून निरुद्योगी होऊं नको. तूं स्वाभिमानाचा त्याग करून शत्रूंना आनंद देत आहेस व तुझ्या आप्तांना शोकमग्न करीत आहेस.

ज्याप्रमाणें एखादी क्षुद्र नदी थोड्याशा पुरानें तुडुंब भरून वाहूं लागते, उंदिराची मूठ जशी धान्याच्या चार कणांनीं भरते त्याप्रमाणें हीन पुरुष अल्प लाभानें सहज संतुष्ट होतात. सर्पाच्या दाढेला हात घालून तत्काल मरणाधीन हो. जीवितावर उदार होऊन कांहीं तरी पराक्रम दाखीव. आकाशांत दूरवर राहून श्येनपक्षी जसा शत्रूंचें छिद्र पहात असतो, तसा तूं सर्वत्र संचार करून, विवाद करून किंवा तटस्थ राहून गुप्तपणानें शत्रूंचें छिद्र शोधून काढ. वज्रानें हत होऊन प्रेतवत् पडणाऱ्या पुरुषाप्रमाणें तूं असा स्वस्थ कसा पडून राहिला आहेस ! ऊठ.

हे दुर्बला, शत्रूनें तुला जिंकलें आहे म्हणून असा निजून राहूं नको. कृपणासारखा अस्तंगत होऊं नको. स्वकर्मानें प्रसिद्धीला ये. शत्रूला वश करण्याचे चार मार्ग आहेत. त्यांतील साम व भेद हे दोन मध्यम आहेत. दान अधम म्ह० नीच उपाय आहे व दंड हेंच उत्तम साधन आहे. यास्तव तूं या तीन उपायांचा त्याग करून दंडाचें अवलंबन कर.

टेंभुरणीचें कोलित जसें चारी दिशांत ठिणग्या उडवीत क्षणांत प्रज्वलित होतें, तसा तूं आपल्या पराक्रमानें सर्वत्र प्रकाशित हो. जिवंत रहाण्याच्या इच्छेनें तुषाग्नीप्रमाणें दीर्घकाल धुमसत राहूं नको. तूं यापुढें कोणत्याहि राजगृहांत जन्म घेऊन अतिशय मृदु किंवा अतिशय कठोर राजा होऊं नको. जो पुरुष उत्तम प्रकारें संग्राम करून मनुष्याला उचित असें कर्म करितो, तो धर्माच्या ऋणांतून मुक्त होतो व स्वतःच्या निंदेला पात्र होत नाहीं.

इष्टप्राप्ति होवो अथवा न होवो. त्याविषयीं ज्ञानी मनुष्य कदापि शोक करीत नाहीं. तो आपलें सामर्थ्य ओळखून उद्योग आरंभितो. तृष्णेचा त्याग करितो व केवल धनानें संतुष्ट होत नाहीं. तस्मात् तूं आपला पराक्रम प्रकट कर किंवा युद्धाच्या योगानें क्षात्रधर्म पुढें करून धारातीर्थीं देह ठेव आणि श्रेष्ठ गतीला प्राप्त हो. असा व्यर्थ जिवंत कशाला रहातोस ! हे क्लीबा, तुझें इष्टापूर्त व अखिल कीर्ति नाश पावली आहे. राज्य विच्छिन्न झालें आहे. अशा स्थितींत तूं जगलास तरी कशाला ?

हे पुत्रा, आपण पडत असलों किंवा बुडत असलों तरी शत्रूंचा पाय धरून त्याला आपल्याबरोबर ओढावें. व त्याला घेऊन पडावें किंवा बुडावें. पराभव होऊन निर्मूलन होण्याचा प्रसंग आला तरी उद्योग सोडूं नये. समरांगणांत हतबल न होणाऱ्या जातिवंत अश्वाचें उदाहरण स्मरून राज्याचा भार सहन करण्याची ईर्ष्या धरावी. तूं स्वतःचें बल, पराक्रम व मान ओळखून उद्योग कर आणि तुझ्यामुळें बुडत असलेल्या कुलाचा उद्धार कर.

ज्या पुरुषाच्या अद्भुत कार्याविषयीं लोकांत प्रसिद्धि नसते, तो केवल गणना करण्याच्याच योग्य होय. तो स्त्रीहि नव्हे व पुरुषहि नव्हे. ज्याचें दान, तप, सत्य, विद्या व अर्थलाभ यांतील कशाविषयींहि यश गायिलें जात नाहीं, तो खरोखर पुत्र नसून मातेची विष्ठाच होय. विद्या, तप, धन, किंवा पराक्रम यांतील एकाहि उपायानें जो इतरांचा पराभव करण्यास समर्थ असतो, तोच कर्मानें खरा पुरुष होय. यास्तव अयशस्कर, क्रूर व हीन पुरुषालाच उचित, अशी ही दुःखमय जडवृत्ति किंवा भिक्षावृत्ति तुला शोभत नाहीं.

वस्त्रहीन, निवासरहित, क्रूर व लोकांनीं अवमानिलेल्या दीन पुरुषाला पाहून शत्रूंना आनंद होतो. अल्प लाभालाहि 'बहु' मानून कृतकृत्य होणाऱ्या हीनवृत्तीच्या आप्तापासून त्याच्या बांधवांना सुख होत नाहीं. तुझ्या या निरुत्साहामुळें आम्ही स्वराष्ट्रापासून च्युत होऊन वृत्तीच्या अभावीं अन्नावांचून मरण पावूं. आम्ही द्रव्यहीन, स्थानभ्रष्ट व सर्व सुखोपभोगांनीं रहित झालों आहों. हे संजया, सज्जनामध्यें राहून अमंगल आचरण करणाऱ्या आणि कुल व वंश यांचा नाश करणाऱ्या तुज कलीला मीं व्यर्थ जन्म दिला. तुझ्या सारख्या अमर्षशून्य, उत्साहरहित, व निर्वीर्य पुत्राला कोणतीहि स्त्री जन्म न देवो. तूं असा धुमसत राहूं नको. प्रज्वलित हो आणि शत्रूंचें आक्रमण करून त्यांचा वध कर. एक मुहूर्त मात्र, किंबहुना एक क्षणभर तरी शत्रूच्या मस्तकावर प्रकाशित हो. जो असा अमर्षी व क्षमा न करणारा असतो, तोच पुरुष होय. क्षमावान् व स्वाभिमानशून्य प्राणी पुरुषहि नव्हे व स्त्रीहि नव्हे.

संतोष आणि दया हीं ऐश्वर्याचा नाश करितात. शत्रूवर चाल न करणें व भय हीं दोन्ही ऐश्वर्याचा विनाश करणारीं आहेत. निरुद्योगी पुरुष महत्पदाला प्राप्त होत नाहीं. या पराभवदोषापासून तूं स्वतःच आपल्याला मुक्त करून घे. हृदयाला लोहवत् दृढ करून आपलें नष्ट झालेलें राज्य परत मिळविण्याचा यत्न कर. जो मनुष्य 'परं विषहते' म्हणजे शत्रूला सहन करितो, त्याला 'पुरुष'

असें म्हणतात. परंतु जो निरुद्योगी होऊन गृहांत अबलेप्रमाणें पडून रहातो त्याला पुरुष हें नांव व्यर्थ होय. शूर, तेजस्वी व सिंहवत् पराक्रमी पुरुष मृत झाल्यावरहि त्याची पुत्रादि संतति आनंदांत रहाते. जो आपल्या प्रिय-सुखांचा त्याग करून ऐश्वर्याचा शोध करितो, तो आपल्या अमात्यांना सत्वर हर्ष देतो.

**पुत्र**—हे माते, मी मृत्युमुखीं पडून तुझ्या दृष्टिआड झालों तर तुला ही समग्र पृथ्वी, वस्त्रालंकार, इतर भोग्य वस्तु, किंबहुना जीवित यांचा काय उपयोग ! ( माझ्यावांचून या सर्व वस्तूंनीं तुला कसलें सुख होणार !)

**माता**—स्वाभिमानशून्य व आळशी लोक शत्रूला प्राप्त होतात. ज्यांनीं स्वतःचा आदर केला आहे, अशाच लोकांना आमचे सुहृद् प्राप्त होवोत.

भृत्यांनीं ज्यांचा त्याग केला आहे व जे परान्नावर उपजीविका करितात अशा सत्त्वरहित कृपणांच्या वृत्तीचें तूं अनुकरण करूं नको. वत्सा, इंद्राला अनुसरणाऱ्या देवांप्रमाणें व पर्जन्यावर उपजीविका करणाऱ्या भूतांप्रमाणें ब्राह्मण व सुहृद तुझ्या आधारावर जिवंत राहोत. हे संजया, एखाद्या परिपक्क फलांनीं युक्त असलेल्या वृक्षावर पक्ष्यादि जीव जसे निर्वाह करितात, तसे ज्या पुरुषाच्या आश्रयानें अनेक प्राण्यांचें पोषण होतें, त्याचेंच जीवित सफल होय. शतक्रतूच्या बलावर ऐश्वर्य भोगणाऱ्या देवांप्रमाणें ज्या शूराच्या पराक्रमावर त्याचे बांधव सुखी होतात, त्याचेंच जीवित प्रशंसनीय होय. जो मनुष्य स्वतःच्या बाहुबलाचा आश्रय करून उत्कर्ष पावतो त्याला या लोकीं कीर्ति व परलोकीं शुभगति प्राप्त होते. ५. ६. १३३.

---